ऐसें मृत्यूहूनि तिख । कां घोंटे जळतें विख ।
डोंगर गीळितां मुख । न फटे काई ॥ ६८ ॥
ह्मणौनि योगाचिया वाटा । जे निगाले गा सूभटा ।
त्यांसि दुःखाचा वाटा । भागासि आला ॥ ६९ ॥
पाहे पां लोहाचे चणे । बोचरां पडती खाणें ।
तें पोट भरणें किं प्राणें । शुद्धि ह्मणों ॥ ७० ॥
ह्मणौनि समुद्र बाहीं । तरणें आथि केहीं ।
गगनामाजि पाईं । खोलिजत असे ॥ ७१ ॥
वळघलेयां थाटी । आंगिं न भरतां काठी ।
सूर्याची पाउटी । होववे काइ गा ॥ ७२ ॥
यालागि पांगुळां हेवा । नव्हे वायूसिं पांडवा ।
तेवि देहवंतां जीवां । अव्यक्तिं गति ॥ ७३ ॥
ऐसा ही जन्हीं धिवंसा । बांधौनियां आकाशा ।
झोंबति तरि क्लेशा । पात्र होंती ॥ ७४ ॥

**ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः ।**
**अनन्येनैव योगेन मां ध्यायंत उपासते ॥ ६ ॥**

ह्मणौनि येर तयांची वार्ता । परिसैं गा पार्था ।
जे कां भक्तिपंथा । वोटंगले ॥ ७५ ॥
कर्मे इंद्रियें सुखें । करीति कर्मे अशेषें ।
जियें कां वर्णविशेषें । भोगासि आलीं ॥ ७६ ॥
विधितें पाळीत । निषेधातें गाळीत ।
मज देउनि जाळीत । कर्मफळें ॥ ७७ ॥
ऐसिया परिं पाहिं । अर्जुना माझां ठांइं ।
संन्यासूनि नाहिं । करिति कर्मे ॥ ७८ ॥
आणिक जें जें सर्व । काहिं एक मानसीक भाव ।
तेयां मीं वांचूनि धावं । आनौती नाहिं ॥ ७९ ॥

ऐसे जे मत्पर । उपासिति निरंतर ।
ध्यानमीसें घर । माझेंचि जाले ॥ ८० ॥
जेयाचिया आवडी । केली मासिं कुलवाडी ।
भोग मोक्ष बापुडीं । त्यजिलिं कुलें ॥ ८१ ॥
ऐसे अनन्ययोगें । विकले जिवें आंगें ।
तेयां काइयेक सांगें । जें मीं करिं ॥ ८२ ॥
किंबहुना धनुर्धरा । जो मातेचेया ये उदरा ।
तिये मातेचा सवंसारा । केतुला पां ॥ ८३ ॥
तेवि मिं तेयां । जैसे असति तैसेयां ।
कृत तें धनंजया । घेतला पाटा ॥ ८४ ॥
माझेया आणि भक्तां । सवंसारिची चिंता ।
काइ समर्थाची कांता । भूकेतें शोची ॥ ८५ ॥
तैसे ते माझें । कलत्र ऐसें जाणिजे ।
काइसेनि हिं न लजें । तेयाचेनि मीं ॥ ८६ ॥
तेयां जन्मृत्युचां लाटीं । झलंबली हे सृष्टी ।
देखौनियां पोटीं । ऐसें जालें ॥ ८७ ॥
तरि या सिंधूचेनि माजें । कवणासि धाकु नुपजे ।
येथ झनें माझे । भितिल हान ॥ ८८ ॥
म्हणौनि गा पांडवा । मूर्तिचा मेळावा ।
करूनियां गावां । धावंतु आलों ॥ ८९ ॥
सडे जे देखिले । ते ध्यानाचिये कासे लाविले ।
ग्रुहीं घातले । क्रियांतारिं ॥ ९० ॥
नामाचां सहस्रवेन्हीं । नावा इया अवधारि ।
सज्जूनि सवंसारिं । तारूं जालां ॥ ९१ ॥
प्रेमाचिं पेटिं । बांधलिं येकाचां पोटिं ।
मग नीणिले तटीं । सायुज्याचां ॥ ९२ ॥

परि भक्तांचेनि नावें । चतुष्पदादीक आघवे ।
वैकुंठिचिये राणिवे । योग्य केले ॥ ९३ ॥

**तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात् ।**
**भवामि न चिरात्पार्थ मय्यावेशितचेतसां ॥ ७ ॥**

म्हणौनि गा भक्तां । नाहिं येकिही चिंता ।
यांमीशाश्वतां तेयांतें समुद्धर्ता । मीं सदा आथि ॥ ९४ ॥
आणि जेधवां चि भक्तीं । दीधलिया मज मती ।
तेव्हां चि मज सूती । तेयाचां हितिं ॥ ९५ ॥

**मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय ।**
**निवसिष्यसि मय्येव अत ऊर्ध्वं न संशयः ॥ ८ ॥**

एया कारणें तुवां । हा मंत्र धनंजया ।
कीजे जें येया । मार्गा भजिजे ॥ ९६ ॥
तरि मन हें येक । माझां स्वरूपीं वृत्तिक ।
करूनि घालीं आणिक । बुद्धी ही हे ॥ ९७ ॥
इयें दोन्हि सारिसिं । मजमाजि प्रेमेंसिं ।
रिगालीं तरि पावसी । मातें चि तूं गा ॥ ९८ ॥
जारे मनें बुद्धि इहिं । घर केलें माझां ठाइं ।
तारे सांघें मग काइ । तूंपण उरे ॥ ९९ ॥
म्हणौनि दिवा पालवे । सवें चि तेज माल्हवे ।
कां रविबिंबासवें । प्रकाशु जाये ॥ १०० ॥
उचललेया प्राणासरिसिं । इंद्रियें निगति जैसीं ।
तैसा मनबुद्धीपासिं । अहंकारु ये ॥ १ ॥
ह्मणौनि माझां स्वरूपीं । मनबुद्धि हे निक्षेपीं ।
एतुलेनि सर्वव्यापीं । मी चि होंसि ॥ २ ॥
येया बोला काहिं । अनारिसें नाहिं ।
आपुली आण पाहिं । वांतु असें ॥ ३ ॥

**अथ चित्तं समाधातुं न शक्नोषि मयि स्थिरम् ।**
**अभ्यासयोगेन ततो मामिच्छाप्तुं धनंजय ॥ ९ ॥**

अथवा हें चित्त । मनबुद्धीसहित ।
माझां हातिं अचुंबित । न शकसि देवों ॥ ४ ॥
तरि गा येतुकें करीं । यां आठां पाहारां भीतरी ।
एक निमिषभरी देंतु । जाये ॥ ५ ॥
मग जें जें निमिष । देखैल माझें सुख ।
तेतुलालें आरोचक । विषइं येईल ॥ ६ ॥
जैसा शरत्कालु निगे । आणि सरिता वोहटों लागे ।
तैसें काढैल वेगें । प्रपंचौनि ॥ ७ ॥
मग पुनिवेहोनि जैसें । शशिबिंबा दिहें दीसें ।
हारपत अवसे । नाहिं चि होए ॥ ८ ॥
तैसें भोगाआंतूनि निगतां । चित्त मजमाझि रिगतां ।
हळुहळु पांडुसुता । मी चि होंसि ॥ ९ ॥
आगा अभ्यासयोगु ह्मणिजे । तो हा येकु जाणिजे ।
येणें कांइयेक न निफजे । ऐसें नाहिं ॥ ११० ॥
येयाचेनि बळें । येकां गती अंतराळें ।
व्याघ्रसर्प प्रांजळें । केले एकीं ॥ ११ ॥
विष कि आहारें पडे । समुद्रीं मध्यें वाट जोडे ।
एकिं वाग्ब्रह्म थोडें । अभ्यासें केळें ॥ १२ ॥
ह्मणौनि अभ्यासासि काहिं । सर्वथा दुष्कर नाहिं ।
यालागि माझां ठांइं । अभ्यासें मीळ ॥ १३ ॥

**अभ्यासेऽप्यसमर्थोऽसि मत्कर्मपरमो भव ।**
**मदर्थमपि कर्माणि कुर्वन् सिद्धिमवाप्स्यसि ॥ १० ॥**

कां अभ्यासाहीलागि । नाहिं कसु तूझां आंगिं ।
तरि आहासि जिया भंगीं । तियाचि अस ॥ १४ ॥

इंद्रियें न कोंडिं । भोग न तोडिं ।
अभिमानु न संडी । स्वजातीचा ॥ १५ ॥
कुळधर्मु चाळिं । विधिनिषेधु पाळिं ।
सुखें तुज सरली । दीन्हली असे ॥ १६ ॥
पण मनें वाचा देहें । जैसा जो व्यापारु होए ।
तो मी करितु आहें । ऐसें न ह्मण ॥ १७ ॥
करणें कां न करणें । आघवें तो चि जाणे ।
विश्व चळिजत असे जेणें । ऐसें जाण ॥ १८ ॥
उणेया पुरेयाचें काहिं । उरों नेंदीं आपुळां ठांइं ।
स्वजात चि करुनि घेइं । जीवित हें ॥ १९ ॥
माळियें जेउतें नेलें । तेउतें निवांत चि गेलें ।
तेया पाणियां ऐसें जालें । नाठवे हें ॥ २० ॥
तें यन्हविं तन्हीं सूभटा । हें उजू कां अन्हांटा ।
या व्यर्थ खटपटा । करित आहे ॥ २१ ॥
तरि प्रवृत्ति आणि निवृत्ति । यियें वोझिं नेंघों मती ।
अखंड चित्तवृत्ति । आठवों मी ॥ २२ ॥
आणि जें जें कर्म निफजे । तें थोडें बहूत न ह्मणिजे ।
निवांत चि अर्पिजे । माझां ठांइं ॥ २३ ॥
ऐसिया मद्भावना । तनूत्यागिं अर्जुना ।
तूं सायुज्यसिद्धसदना । त्रिशुद्धी एंसी ॥ २४ ॥

**अथैतदप्यशक्तोऽसि कर्तुं मद्योगमाश्रितः ।**
**सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु यतात्मवान् ॥ ११ ॥**

नातरि हें इं तुज । नेंदवे कर्म सहज ।
तन्हीं गा तूं मज भज । पांडुसुता ॥ २५ ॥
बुद्धीचिये पाठिं पोटिं । कर्मा आदिसेवटीं ।
मातें बांधलें किरीटी । दुआड जरि ॥ २६ ॥

तरि हेंहिं असो । सांडी माझा अतिसो ।
पारि संयतिसीं वसो । बुद्धि मार्गी ॥ २७ ॥
आगा वृक्षा कां वल्ली । लोटति फळें पीकलीं ।
तैसिं सांडिं निफनलिं । कर्में सिद्धें ॥ २८ ॥
पारि मातें मनिं धरावें । कां मजउद्देशें करावें ।
हें काहीं चि नोको आघवें । जावों दे शून्य ॥ २९ ॥
खडकिं जैसें वरिषलें । कां अग्नीमाजि पेरिलें ।
कर्म मानीं देखिलें । स्वप्न जैसें ॥ १३० ॥
आगा आत्मजेचां विखिं । जैसा जीउ निराभिलाषी ।
तैसा कर्मि अशेषिं । निष्कामु होये ॥ ३१ ॥
वन्हिची ज्वाला जैसी । वायां जाये आकासिं ।
क्रिया जिरों दे तैसी । शून्यामाजि ॥ ३२ ॥
अर्जुना हा फळत्यागु । आवडे कीर आसलगु ।
पारि योगामाजि योगु । धूरेचा हा ॥ ३३ ॥
येणें फळत्यागें सांडे । तें तें कर्म न विरुढे ।
येके चि वेळे झाडें । वांझें जैसिं ॥ ३४ ॥
तैसें येणें शरीरें । शरीरा येणें सरे ।
किंबहुना यरिझारे । चीरा पडे ॥ ३५ ॥

**श्रेयो हि ज्ञानमभ्यासाज्ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते।**
**ध्यानात्कर्मफलत्यागस्त्यागाच्छान्तिरनन्तरम् ॥ १२ ॥**

पैं अभ्यासाची पाउटी । करुनि टाकिजे किरीटि ।
ज्ञानें येइजे भेटी । ध्यानाचिये ॥ ३६ ॥
मग ध्यानेंसिं खेवं । देंति आवघे चि भाव ।
तेधवां कर्मजात सर्व । दूरि ठाके ॥ ३७ ॥
कर्म जेथ दुरावे । तेथ फळत्यागु संभवे ।
त्यागातुव आंगवे । शांति सकळा ॥ ३८ ॥

ह्मणौनि यावेया शांती । हा चि क्रमु गा सुभद्रापती ।
अभ्यासू चि प्रस्तुतिं । कारण येथ ॥ ३९ ॥
अभ्यासाहूनु गहन । पार्था मग ज्ञान ।
ज्ञानापासूनि ध्यान । विशेषिजे ॥ १४० ॥
मग कर्मफलत्यागु । तो ध्यानापासौनि चांगु ।
त्यागातव भोगु । शांतिसुखाचा ॥ ४१ ॥
ऐसिया एया वाटा । इहिं चि पेणा सूभटा ।
शांतिचा माजिवटा । टाकिला जेणें ॥ ४२ ॥

**अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च ।**
**निर्ममो निरहंकारः समदुःखसुखः क्षमी ॥ १३ ॥**

जो सर्व भूताचां ठांइं । द्वेषातें नेणे कांहिं ।
आप परु नाहिं । चैतन्या जैसा ॥ ४३ ॥
उत्तमातें धरिजे । अधमातें अव्हेरिजे ।
हें कहिं चि नेणिजे । वसुधा जेवि ॥ ४४ ॥
रायाचें देह चाळूं । रंकातें परउतें गाळूं ।
हें नेणे चि कृपाळू । प्राणु पैं गा ॥ ४५ ॥
गाइची तृषा हरुं । व्याघ्रा विष होउनि मारुं ।
हें नेणे चि करुं । तोय जैसें ॥ ४६ ॥
घरिचिया उजियेड करावा । पारखेया आंधारु होआवा ।
हें न म्हणे चि पांडवा । दीपु जैसा ॥ ४७ ॥
ऐसी सर्व भूतमात्रिं । येकपणाची मैत्री ।
कृपेची धात्री । आपण जो ॥ ४८ ॥
आणि मी हे भाष नेणे । माझें कांहिं चि न म्हणे ।
सुख दुःख जाणणें । नाहिं जेया ॥ ४९ ॥

**संतुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः ।**
**मय्यर्पितमनोबुद्धिर्योमद्भक्तः स मे प्रियः ॥ १४ ॥**

तेविं चि क्षमे लागि । पृथ्वीचा पवाडु आंगिं ।
संतोषा उत्संगिं । घर दीन्हले ॥ १५० ॥
वारिषायें वीण सागरु । जळें जैसा निर्भरु ।
तैसा निरउपचारु । संतोषिया जो ॥ ५१ ॥
वाउनि आपुली आण । धरी अंतष्करण ।
निश्चया साचपण । जेयाचेनि ॥ ५२ ॥
जीउ परमात्मा दोन्हीं । बैसौनि एका आसनिं ।
जेयाचां हृदयभुवनीं । विराजति ॥ ५३ ॥
ऐसा योगसमृद्धी । होउनि जो निरवधीं ।
आर्पिति मनोबुद्धि । माझां ठांइं ॥ ५४ ॥
आंतु बाहिरि योगु । निर्वाळला चांगु ।
माझा अनुरागु । सप्रेमु जेया ॥ ५५ ॥
अर्जुना तो चि भक्तु । तो चि योगी मुक्तु ।
तो वल्लभा मी कांतु । ऐसा पढियें ॥ ५६ ॥
हें नां तो आवडे । जीवाचेनि पाडें ।
हें इं येथ थोडें । रूप करणें ॥ ५७ ॥
पढियंतेयाची काहाणी । हें भूलिची भारणी ।
येथौनि बोलणीं । बोलवती ॥ ५८ ॥
ह्मणौनि गा आह्मां । वेगिं आली उपमां ।
यऱ्हविं काइ प्रेमा । उपमा असे ॥ ५९ ॥
आतां असो हें किरीटि । प्रियाचिया गोठी ।
दूणा थाउं ऊठी । आवडि गा ॥ १६० ॥
तेया ही वरि विपायें । प्रेमळ संवादियें होये ।
तरि तिये गोडिये काय आहे । कांटाळें गा ॥ ६१ ॥
ह्मणौनि गा पार्था । तूं चि प्रियु आणि श्रोता ।
वरि प्रियाची वार्त्ता । प्रसंगें आली ॥ ६२ ॥

तरि आतां बोलों । भलेया सुखा मीनलों ।
ऐसें ह्मणौनि डोलों । लागले देउ ॥ ६३ ॥

**यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः ।**
**हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो यः स च मे प्रियः ॥ १५ ॥**

मग ह्मणे जाण । तेयाचें लक्षण ।
जेया मीं अंतष्करण । बैसों घाली ॥ ६४ ॥
तरि सिंधूचेनि माजें । जलचरां भय नुपजे ।
आणि जलचारिं नु बुजे । समुद्रु जैसा ॥ ६५ ॥
तेवि उन्मत्तें जगें । जेयासि खंति न लगे ।
आणि जेयाचेनि आंगें । न सिणें लोकु ॥ ६६ ॥
किंबहुना पांडवा । शरीर जैसें अवयवां ।
तैसा नुभगे जीवा । जिवपणें जो ॥ ६७ ॥
हें जग चि देह जालें । म्हणौनि प्रियाप्रीय गेलें ।
हर्षामर्ष ठेले । दूरि जेया ॥ ६८ ॥
ऐसा जो द्वंद्वमुक्तु । भयोद्वेगरहितु ।
एया ही वरि भक्तु । माझां ठांइं ॥ ६९ ॥
तरि तेयाचा गा मज मोहो । काय सांघों तो पढियो ।
हें असो जिवें जीवो । माझेंनि तो ॥ १७० ॥
जो निजानंदें धाला । परिणामां आयुष्य आला ।
पूर्ण तेजाला । वल्लभु तो ॥ ७१ ॥
जेयाचां ठांइं पांडवा । अपेक्षे नाहिं रिगावां ।
सुखासि चढावा । जेयाचें असणें ॥ ७२ ॥
गंगा शुचि होये । पाप ताप जाये ।
परि तेथ आहे । बुडणें येक ॥ ७३ ॥

**अनपेक्षः शुचिर्दक्ष उदासीनो गतव्यथः ।**
**सर्वारंभपरित्यागी यो मद्भक्तः स मे प्रियः ॥ १६ ॥**

मोक्ष देउनि उदार । कासी होये किर सधर ।
पारि वेचावें लागे शरीर । तिये गावि ॥ ७४ ॥
हिमवंतिं दोष जाये । पारि तेथ जीविताची हाणि होए ।
तैसें सुचित्त नव्हे । सज्जनाचें ॥ ७५ ॥
खोलिये पारु नेणिजे । तऱ्हीं संतीं न बुडिजे ।
रोकडेया आणि लाहिजे । मोक्षु फुका ॥ ७६ ॥
संतांचेनि आंगलगें । पापातें जिणणें गंगे ।
तेयांचें मिं सांगें । सुचित्व कैसें ॥ ७७ ॥
ह्मणुनु असो जो ऐसा । शुचित्वें तीर्थी कुवांसा ।
जेणें लंघविलें दिशा । मनोमल ॥ ७८ ॥
आंतु बाहिरि चोखाळु । सूर्यु जैसा निर्मळु ।
आणि तत्वार्थीचा पायळू । देखणा जो ॥ ७९ ॥
व्यापक आणि उदास । जैसें हें आकाश ।
तैसें जेयाचें मानस । सर्वगत ॥ १८० ॥
जो सवंसारव्यथा फीटला । निरास्यें निवडला ।
फांसाहूनि सूटला । विहंगु जैसा ॥ ८१ ॥
तैसा संततु स्वसुखें । कव्हणी चटवंच ने दखे ।
नेणिजे गतायुष्यें । लज्जा जैसी ॥ ८२ ॥
आणि कर्मारंभा लागि । जेया अहंकृति नाहि आंगिं ।
जैसा निरंधनि विण आगी । विझणें चि उरे ॥ ८३ ॥
तैसा उपशमू चि भागा । जेयासि आला पैं गा ।
जो मोक्षाचिया आंगा । लिहिला जैसा ॥ ८४ ॥
अर्जुना हा ठावो वेऱ्हीं । सोहंभावसरोवरीं ।
द्वैताचां पइली तीरीं । उतरों सरला ॥ ८५ ॥
किं भक्तिसुखा लागि । आपण चि जाला दों भागीं ।
वांटूनियां आंगीं । सेवकै बाणी ॥ ८६ ॥

येरा नावं मीं ठेंवी । मज भजतेया वोज बरवी ।
न भजतेया दावी । योगियां जो ॥ ८७ ॥
तेया आम्हां वेसन । आमचें तो निधान ।
किंबहुना समाधान । तो मिळे तैं ॥ ८८ ॥
तेया लागि रूपा येणें । तेयाचेनि एथ असणें ।
तेया लोण कीजे प्राणें । ऐसा पढियें ॥ ८९ ॥
जो आत्मलाभा सारिखें । गोमटें काहिं चि नें दखे ।
आणि भोगविशेषें । हरिखैजेना ॥ १९० ॥
आपण चि विश्व जाला । तरि भेदभाऊ गेला ।
ह्मणौनि द्वेष दूरि ठेला । जेया पुरुषा ॥ ९१ ॥

**यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न काङ्क्षति ।**
**शुभाशुभपरित्यागी भक्तिमान्यः स मे प्रियः ॥ १७ ॥**

पैं आपुलें जें साचें । तें कल्पांतिं हिं न वचे ।
हें जाणूनि गतांचें । न शोची जो ॥ ९२ ॥
जेया परौतें नाहिं । तें जाला आपुलां ठांइं ।
या लागि काहिं । आकांक्षी ना ॥ ९३ ॥
वोखटें ना गोमटें । या काइसेया ही न भेटे ।
राति देऊ न घटे । सूर्यु जैसा ॥ ९४ ॥
ऐसा बोधू चि केवळु । होउनियां निश्चळु ।
यावरि भजनशीळु । माझां ठांइं ॥ ९५ ॥
तरि तेया ऐसें दुसरें । आम्हां पढियंतें सोयरें ।
नाहिं गा साचोकारें । तूझी आण ॥ ९६ ॥

**समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः**
**शीतोष्णसुखदुःखेषु समः संगविवर्जितः ॥ १८ ॥**

पार्था जेयाचां ठांइं । वैषम्याची परि नाहिं ।
रिपुमित्रां दोन्हीं । सरिसा पाडु ॥ ९७ ॥

जो खांडावेया घाउ घाली । कां लावणी जेणें केली ।
या दोघां येकि चि साउली । वृक्ष जैसा ॥ ९८ ॥
नातरि इक्षुदंडु । पालितेया गोडु ।
गालितेया ही तो चि पाडु । येकु चि गा ॥ ९९ ॥
अरिमित्रासिं तैसा । अर्जुना जेया भाव ऐसा ।
मानापमानीं सरिसा । हीतु जाए ॥ २०० ॥
साइं रितुं समान । जैसें कां हें गगन ।
तैसें येक जि मान । शीतोष्णीं जेया ॥ १ ॥
दक्षिणोत्तर मारुता । मेरु जैसा पांडुसुता ।
तैसा सुखदुःखां प्राप्तां । मध्यस्तु जो ॥ २ ॥
माधूर्यें चंद्रिका । सरिसी चि राया रंका ।
तैसा जो सकलिकां । भूतां समु ॥ ३ ॥
आघवेयां येक । सेव्य जैसें उदक ।
तैसें जेयातें लोक । आसंसीति ॥ ४ ॥

**तुल्यनिंदास्तुतिर्मौनी संतुष्टो येनकेनचित् ।**
**अनिकेतः स्थिरमतिर्भक्तिमान्मे प्रियो नरः ॥ १९ ॥**

जो सबाह्यें संगु । सांडूनियां लागु ।
येकाकी असंगु । आंगिं सूनि ॥ ५ ॥
जो निंदेतें नेघे । स्तुतितें न श्लाघे ।
आकाशा न लगे । लेपु जैसा ॥ ६ ॥
तैसा निंदे आणि स्तुती । मानु करुनु येका पांती ।
विचारें प्राणप्रवृत्ती । जनिं मौनीं ॥ ७ ॥
साच लटिकें दोन्हीं । न बोलैल मौनिं ।
भोगितां उन्मनीं । आराय ना ॥ ८ ॥
जो यथालाभें तोखे । अलाभें हिं न पारुखे ।
पाउसें विण न सुके । समुद्र जैसा ॥ ९ ॥

आणि वायुसि येके ठांइं । बिढार जैसें नाहिं ।
तैसा न धरी चि केहीं । आश्रयो जो ॥ २१० ॥
हें विश्व चि माझें घर । ऐसी मति जेयाची स्थिर ।
किंबहुना चराचर । आपण जाला ॥ ११ ॥
एया वरि पार्था । माझां भजनीं आस्था ।
तरि तेयातें मीं माथां । मुगुटु करीं ॥ १२ ॥
उत्तमासि मस्तक । खालविजे हें काये कवतिक ।
हा मानु करिति लोक । पायवणियां ॥ १३ ॥
तरि श्रद्धावस्तूसि आदरु । करितां जाणिजे प्रकारु ।
जरि होये श्रीगुरु । सदाशिव ॥ १४ ॥
तरि हें असो आतां । महेशातें वानितां ।
आत्मस्तुति करितां । संचारु असे ॥ १५ ॥
येयालागि हें । म्हणितलें रमानाहें ।
अर्जुना मी वाहें । सिरिं जेयातें ॥ १६ ॥
जो पुरुषार्थसिद्धि चौथी । घेउनि आपुलां हातिं ।
रिगाला भक्तिपंथीं । जगा देंत ॥ १७ ॥
कैवल्याचा अधिकारी । सोडि बांधि मोक्षाची करी ।
किं जळाचिया परीं । तळवट घे ॥ १८ ॥
ह्मणौनि तो नमस्कारुं । तेयातें मुगुट करूं ।
तेयाचे टांक धरूं । कंठिं आह्मि ॥ १९ ॥
तेयाचेया गुणाची लेणीं । लेववुं आपुलां वाणीं ।
तेयाची कीर्ति श्रवणीं । आइकों आह्मीं ॥ २२० ॥
तो पाहावा हे डोहळे । ह्मणूनि अचक्षू मज डोळे ।
हातिचेनि करकमळें । पूजीं जेयातें ॥ २१ ॥
दों वरि दोनि । भुजा आलों घेउनि ।
आलिंगावेया लागौनि । तेयाचें आंग ॥ २२ ॥

तेया संगाचेनि सुरवाडें । आह्मां देहधरणें घडे ।
किंबहुना आवडे । निरोपमु ॥ २३ ॥
तेया आह्मां मैत्र । येथ काइसें पां चित्र ।
परि तेयाचें हिं चरित्र । आयिकति जे ॥ २४ ॥
ते ही प्राणा परौते । आवडति हें निरुतें ।
जे भक्तिचरित्रातें । आसंसीति २५ ॥

**ये तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते ।**
**श्रद्धाना मत्परमा भक्तास्ते तीव मे प्रियाः ॥ २० ॥**

जें हें साद्यंत । सांघितलें तुज प्रस्तुत ।
भक्तियोगसंमत । योगरूप ॥ २६ ॥
मी प्रीतीतें करीं । कां मनीं सिरसा धरीं ।
येवढी थोरी । जेया स्थिती ॥ २७ ॥
ते हे गोठि रम्य । अमृताधारधर्म्य ।
प्रेरीति प्रतीतिगम्य । आइकौनि जे ॥ २८ ॥
परि निरोपिली जैसी । तिया स्थिति रमत मानसिं ।
मग सुक्षेत्रिं जैसी । पेरणी जाली ॥ २९ ॥
तरि श्रद्धा करुनि आदरें । जेयांचा ठांइं विस्तारे ।
जीविं जेयां थारे । अनुष्ठिती ॥ २३० ॥
पार्था गा जगीं । भक्तु तो चि योगी ।
उत्कंठा तेयां लागि । सदा मज ॥ ३१ ॥
तो तीर्थ तो क्षेत्र । जगीं तो चि पवित्र ।
भक्तिकथेसि मैत्र । जेयां पुरुषां ॥ ३२ ॥
जो सुरसाह्वें सील । लोकललनलील ।
प्रणतिप्रतिपाल । खेलु जेयाचा ॥ ३३ ॥
जो भक्तवत्सल । प्रेमलप्रांजल ।
सत्यसेतुसकल । कलानिधी ॥ ३४ ॥

आह्मि करुं तेयाचें ध्यान । तो आमचें देवतार्चन ।
तें वांचूनि आन । गोमटें न मनूं ॥ ३५ ॥
तेया आह्मा वेसन । आमचें तो निधान ।
किंबहुना समाधान । तो मिळे तो ॥ ३६ ॥
प्रेमलाचेया वार्त्ता । जे अनुमोदिती पांडुसुता ।
ते देखों परदेवता । आपुली जैसी ॥ ३७ ॥
ऐसें निजजनानंदें । तेणें जगदादिकंदें ।
बोलिलें मुकुंदें । संजयो ह्मणे ॥ ३८ ॥
राया जो निजनिर्मळु । निष्कळु लोककृपाळु ।
शरणगतां स्नेहाळु । शरण्य जो ॥ ३९ ॥
जो धर्मकीर्त्तिढवळु । अगाध दातृत्वें सरळु ।
अतिबळु प्रबळु । बळिवंधनु ॥ २४० ॥
तो कृष्णुजी वैकुंठीचा । चक्रवर्त्ती निजाचा ।
सांवे एरु दैवांचा । आइकतु असे ॥ ४१ ॥
आतां एया वरी । निरोपिती परी ।
संजयो ह्मणे अवधारी । धृतराष्ट्रातें ॥ ४२ ॥
ते चि रसाळकथा । मऱ्हाटिया प्रतीतीपंथा ।
आणिजैल आस्था । अवधारिजो ॥ ४३ ॥
ज्ञानदेउ ह्मणे तुह्मीं । संत वोलगावेति हें मीं ।
पढविला स्वामीं । निवृत्तिनाथें ॥ २४४ ॥

ॐ ॥ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे **भक्तियोगो** नाम द्वादशोऽध्यायः ॥१२॥

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

# ज्ञानेश्वरी

## अध्याय तेरावा

श्रीगणेशायनमः ॥

केलेयां स्मरण । सकळ विद्यांचें अधिकरण ।
ते वंदूं चरण । श्रीगुरूचे ॥ १ ॥
जेयांचेनि आठवे । शब्दसृष्टि आंगवे ।
सारस्वत आघवें । जीभेसि ये ॥ २ ॥
वक्तृत्व गोडपणें । अमृतातें पारु ह्मणे ।
रस होंति ओळगणे । अक्षरांचे ॥ ३ ॥
भावांचें अवतरण । अवतरवीति खुण ।
हाता चढे संपूर्ण । तत्वभेदु ॥ ४ ॥
श्रीगुरूचे पाए । हृदय गवसूनि ठाए ।
तैं एवडें भाग्य होए । उन्मेषासि ॥ ५ ॥

**अर्जुन उवाच** ॥

**प्रकृतिं पुरुषं चैव क्षेत्रं क्षेत्रज्ञमेव च**
**एतद्वेदितुमिच्छामि ज्ञानं ज्ञेयं च केशव** ॥ १ ॥

तेथ अर्जुनु ह्मणे प्रकृतिपुरुष । क्षेत्रज्ञ आणि क्षेत्रविशेष ।
हें तुज पासाव अशेष । इच्छितु असें जाणों ॥ ६ ॥

श्रीभगवानुवाच ॥

**इदं शरीरं कौंतेय क्षेत्रमित्यभिधीयते ॥**
**एतद्यो वेत्ति तं प्राहुः क्षेत्रज्ञमिति तद्विदः॥ २ ॥**

तो नमस्कारूं आतां । पितामहाचा पिता ।
लक्ष्मीयेचा भर्त्ता । ऐसें ह्मणे ॥ ७ ॥
पार्था परिसिजे । देह हें क्षेत्र ह्मणिजे ।
हें जाणें तो बोलिजे । क्षेत्रज्ञु गा ॥ ८ ॥

**क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि सर्वक्षेत्रेषु भारत ॥**
**क्षेत्रक्षेत्रज्ञयो र्ज्ञानं यत्तज्ज्ञानं मतं मम ॥ ३ ॥**

तरि क्षेत्रज्ञु येथें । तो मी चि निरुतें ।
जो सर्व क्षेत्रांतें । संगोपुनु असे ॥ ९ ॥
आणि क्षेत्रक्षेत्रज्ञातें । जाणणें जें निरुतें ।
ज्ञान ऐसें तेयातें । मानूं आह्मीं ॥ १० ॥

**तत्क्षेत्रं यच्च यादृक्च यद्विकारि यतश्च यत् ॥**
**स च यो यत्प्रभावश्च तत्समासेन मे श्रुणु ॥ ४ ॥**

तरि क्षेत्र एणें नावें । शरीर जेणें भावें ।
ह्मणितलें तें आघवें । सांघों आतां ॥ ११ ॥
हें क्षेत्र कां ह्मणिजे । कैसें हें कें उपजे ।
कवण कवणीं वाहिजे । विकारीं एथ ॥ १२ ॥
हें आंवुठ हात मोटकें । कि केवडें पां केतुकें ।
बरड कि पीकें । कवणाचें हें ॥ १३ ॥
इत्यादि सर्व । जे एयाचे प्रभाव ।
ते बोलिजति साजीव । अवधान दीजो ॥ १४ ॥

**ऋषिभि र्बहुधा गीतं छंदोभि र्विविधैः पृथक् ॥**
**ब्रह्मसूत्रपदैश्चैव हेतुमद्भि र्विनिश्चितैः ॥ ४ ॥**

पैं या चि स्थला कारणें । श्रुतीं सदा बोबाणें ।
तर्कु एणें चि ठीकरणें । तोंडौता केला ॥ १५ ॥
चालितां हे चि बोली । दर्शनें सेवटा आलिं ।
तें चि नाहिं बुझावलिं । अझुइं द्वंद्वें ॥ १६ ॥
शास्त्रांचिये सोइरिके । विचारिलीं एणें चि एकें ।
एयाचेनि एकवंकें । जगासि वादू ॥ १७ ॥
तोंडेंसिं तोंडा न पडे । बोलेंसिं बोला न वडे ।
एया गुंती बडबडे । त्राये जाली ॥ १८ ॥
नेणों कोणाचें हें स्थल । परि कैसें अभिलाखाचें बल ।
जें घरोघरीं कपाल । पीटवीतसे ॥ १९ ॥
नास्तिकां देयावेया तोंड । वेदांचें गाढें बंड ।
तें देखौनि पाखंड । आन चि वाजे ॥ २० ॥
ह्मणे तूं निर्मूल । लटकें वाग्जाल ।
ना ह्मणसी तरि पोफल । घातलें असे ॥ २१ ॥
पाखंडाचेया कडे । नागिविं लुंचिति मुंडें ।
नियोजिलीं वितंडें । ताला येति ॥ २२ ॥
मृत्युबलाचेनि माजें । हें जाइल विण कांजें ।
तें देखौनि व्याजें । निगाले योगी ॥ २३ ॥
मृत्यूसिं आधाइलें । तिहिं निरंजन सेविलें ।
यमदमाचे केले । मेले पुरे ॥ २४ ॥
येणें चि क्षेत्राभिमानें । राज्य त्यजिलें ईशानें ।
गूंति जीणौनि स्मशानें । वसों आदरिलीं ॥ २५ ॥
ऐसिया पैजा महेशा । पांगुरणें दाही दिशा ।
लांचकरु ह्मणौनि कोलिसा । कामु केला ॥ २६ ॥
पैं सत्यलोकनाथा । वदनें आलीं बलार्था ।
तऱ्हीं तो सर्वथा । जाणे चि ना ॥ २७ ॥

एक ह्मणति हें स्थळ । जीवाचें चि समूळ ।
मग प्राणु हें कुळ । तेयाचें एथें ॥ २८ ॥
जें प्राणाचां घारें । आंगें राबते भाऊ च्यारी ।
आणि मना ऐसा आवरी । कुळवाडिकारु ॥ २९ ॥
तेयातें इंद्रियबैलांची पेटी । न ह्मणे अवसिपाहाटि ।
विषयक्षेत्रीं आटि । काढी भली ॥ ३० ॥
मग विधिची वाप चुकवी । अन्याइं बिं वाहवी ।
कुकर्माचा करवी । राबु जरि ॥ ३१ ॥
तरि तेया चि सारिखें । असंभड पाप पीके ।
जन्मकोडी दुःखें । भोगवी जीउ ॥ ३२ ॥
नातारि विधिचेये वापे । सत्क्रिया बिं आरोपे ।
जन्मशतमापें । सुख चि मविजे ॥ ३३ ॥
तवं एक ह्मणति हें न्हवे । हें जीवाचें न ह्मणावें ।
आमतें पूसावें । क्षेत्राचें इया ॥ ३४ ॥
जीव एथ उखिता । वास्तिकरु वांटे जांता ।
आणि प्राणु हा बलौता । ह्मणौनि जागे ॥ ३५ ॥
अनादि जे प्रकृति । सांख्य जीतें गांति ।
क्षेत्र हे वृत्ति । तियेची जाण ॥ ३६ ॥
आणि तियेतें चि आघवा । आथि घरमेळावा ।
ह्मणोनि वाहिवां । घरीं वाहे ॥ ३७ ॥
बाह्यांचिये राहाटी । मुदल तीव भृष्टी ।
ते तियेचां पोटीं । जाले गुण ॥ ३८ ॥
रजोगुणु पेरी । तेतुलें सत्व सोंकरी ।
एकलें तम करी । सावगंणी ॥ ३९ ॥
रचूनु महत्तत्वाचें खलें । मळी एकें चि काळुगेनि पोलें ।
तेथ अव्यक्ताची मिळे । सांजे भली ॥ ४० ॥

तवं एकिं मतिवंतीं । या बोलाचिया खंती ।
ह्मणितलें एया चांथी । अर्वाचीना ॥ ४१ ॥
हां हो परतत्त्वा आंतु । केउती प्रकृतीची मातु ।
हा क्षेत्रवृत्तांतु । उगेयां आइकां ॥ ४२ ॥
शून्यसेजसालिये । सुलीनतेचिये तूलिये ।
नीद केली होती बलियें । संकल्पें येणें ॥ ४३ ॥
तो अवसांत चेइला । उद्यमीं सदैउं भला ।
ह्मणौनि ठेवा जोडला । इछे सवें ॥ ४४ ॥
निरालंबिची वाडी । त्रिभुवना एवडी ।
हे तियेचिया जोडी । रूपा आली ॥ ४५ ॥
महाभूतांचे एकावट । सैरा वेंटालु उमाट ।
भूतग्रामाचे आवाट । चिरिले च्याम्ही ॥ ४६ ॥
यावरि आर्दि । पंचवटिकांची बांधी ।
बांधली होती प्रभेदिं । पांचभूतिकिं ॥ ४७ ॥
कर्मा अकर्माचे गुंढे । वातले दोहिं कडे ।
नपुंसकें बरडें । रानें केलिं ॥ ४८ ॥
तेथ येरिझारि लागि । जन्ममृत्यूंची सुरंगी ।
सुवाललीं चांगी । संकल्पें एणें ॥ ४९ ॥
मग अहंकारेंसिं एकावदी । करूनि जीविता अवधी ।
वाहिलें बुद्धी । चराचर ॥ ५० ॥
इया परिं निरालीं । वाढे संकल्पाची डाली ।
ह्मणौनि तो मूली । प्रपंचा इया ॥ ५१ ॥
ये मतमुगुतकिं । पढिगाइलें आणिकिं ।
ह्मणति हां हो विवेकी । तन्हीं तुह्मि ॥ ५२ ॥
परतत्त्वाचां गावें । संकल्पाची सेज देखावी ।
तरि कां पां न मनावी । प्रकृति तेयाची ॥ ५३ ॥

परि असो हें नव्हे । तुह्मीं येया न लगावें ।
आइकां आघवें । सांविजैल ॥ ५४ ॥
तरि आकाशिं कवणें । केलिं मेघांचि भरणें ।
अंतरिक्ष तारागणें । धरी कोण ॥ ५५ ॥
गगनाचा तडवा । उभिला कोणें ह्मणावा ।
वारा हिंडतु असावा । हें कोणाचें मत ॥ ५६ ॥
रुंख कवण पेरी । कोण समुद्र भरी ।
पर्जन्याचिया करी । धारा कवण ॥ ५७ ॥
तैसें क्षेत्र हें स्वभावें । अव्हांत्रीक कव्हणाचें न्हवे ।
एथ वाहे तेया फावे । येरा तूटि ॥ ५८ ॥
तवं आणिकें एकें । खोदें ह्मणितलें नीकें ।
तरि भोगिजे एकें । कालें जेवि ॥ ५९ ॥
हें जाणों मृत्यु रागिठा । सिंहाडेयाचा दरकुटा ।
परि काइ वाजटां । पूरिजतसे ॥ ६० ॥
जन्हीं एयाचा मारु । देखताति अनिवारु ।
परि स्वमतिं भरु । अभिमानियां ॥ ६१ ॥
महाकल्पा परौती । कव घाल्लनि अवचिती ।
सत्यलोकभद्रजाती । आंगीं वाजे ॥ ६२ ॥
लोकपाल नीचनवे । दिग्गजमेलावे ।
स्वर्गीचिये अडवे । रिगौनि मोडी ॥ ६३ ॥
येरें एयाचेन आंगवातें । जन्ममृत्यूचिये गर्ते ।
निर्जीवें होउनि भ्रमितें । जीवंमृगें ॥ ६४ ॥
निहाला पां केवडा । पसरूनियां चवडा ।
करितसे माजिवडा । आकारगजु ॥ ६५ ॥
ह्मणौनि कालाची सत्ता । हा बोलु निरुता ।
ऐसेसे वाद्वु पांडुसुता । क्षेत्रा लागि ॥ ६६ ॥

हे बहू उखीविखी । रिखीं केली नैमिषिं ।
पुराणें इये विखीं । मतपत्रिका ॥ ६७ ॥
अनुष्टुभादि छंदें । प्रबंधिं जियें विविधें ।
तें पत्रालंबनमदें । करीत आझुई ॥ ६८ ॥
वेदिचें ब्रह्मसूत्र । देखणेपणें पवित्र ।
परि तेया ही हें क्षेत्र । नेणवे चि ॥ ६९ ॥
आणिकिं आणिकिं बहुतिं । महाकवी हेतुमंतीं ।
एया लागि मती । वेचिलिया ॥ ७० ॥
परि ऐसें हें एवडें । कां अमुकेयाचें चि फुडें ।
हें कोण्हा हिं वरिपडें । होये चि ना ॥ ७१ ॥
आतां एयावरि जैसें । क्षेत्र हें असे ।
तुज सांगों तैसें । सायंत गा ॥ ७२ ॥

**महाभूतान्यहंकारो बुद्धिरव्यक्तमेव च ॥**
**इंद्रियाणि दशैकं च पंच चेंद्रियगोचराः ॥ ५ ॥**

तरि महाभूतपंचकु । आणि अहंकारु एकु ।
बुद्धि अव्यक्त दशकु । इंद्रियांचा ॥ ७३ ॥
आणि मन हिं एकु । विषयांचा दशकु । इंद्रियांचा
सुखदुःखद्वेखु । संघातु इछा ॥ ७४ ॥
आणि चेतना धृति । एवं क्षेत्रव्यक्ति ।
सांघितली तुज प्रति । आघवी चि हे ॥ ७५ ॥
आतां महाभूतें कवणें । कवण विषय कैसिं करणें ।
हे वेगळालेपणें । एकैक सांघों ॥ ७६ ॥
तरि पृथ्वी आप तेज । वायु व्योम गा बुझ ।
सांघितलें बा तुज । महातत्त्वें ॥ ७७ ॥
आणि जागतिये दशे । स्वप्न लपालें असे ।
नातरि अवंसे । चंद्र गूढ ॥ ७८ ॥

नातरि अप्रौढें बालकिं । तारुण्य राहे थोंकिं ।
कां न फुलतां कलिकिं । आमोदु जैसा ॥ ७९ ॥
किंबहुना काष्टिं । वन्हि जेवि किरीटी ।
तेवि प्रकृतिचां पोटीं । गोप्यु जो असे ॥ ८० ॥
जैसा ज्वरु धातुगतु । कुपथ्याचें मीस पांतु ।
मग जालेयां आंतु । बाहिरि व्यापी ॥ ८१ ॥
तैसी पांचां हिं गांठि पडे । जैं देहाकारु घडे ।
तैं नाचवी चहूंकडे । तो अहंकारु गा ॥ ८२ ॥
आतां बुद्धि जे ह्मणिजे । ते ऐसां चिन्हिं जाणिजे ।
बोलिलें यदुराजें । आइकैं सांघों ॥ ८३ ॥
तरि कंदर्पाचेनि बळें । इंद्रियवृत्तिचेनि मेळें ।
विभांडूनि येंति पाळे । विषयांचे ॥ ८४ ॥
तो सुखदुःखाचा नागोवा । जेथ उगाणों लागे जीवा ।
तेथ दोहींसि बरवा । पाडु जे धरी ॥ ८५ ॥
हें सुख हें दुःख । हें पुण्य हें दोख ।
हें मैळ हें चोख । ऐसें जें निवाडी ॥ ८६ ॥
जिये अधमोत्तम सूजे । सानें थोर बूझे ।
जिया दीठी पारखिजे । विखो जीवें ॥ ८७ ॥
जे तेजतत्वाची वृद्धि । जे सत्वगुणाची निधि ।
जे आत्मेयां जीवाची संधि । वसवीतसे ॥ ८८ ॥
अर्जुना ते जाण । बुद्धि गा संपूर्ण ।
आतां आइक तूं उ्ळखण । अव्यक्ताचें ॥ ८९ ॥
पैं सांख्याचां सिद्धांतिं । प्रकृति जे महामती ।
ते चि येथ प्रस्तुतिं । अव्यक्त गा ॥ ९० ॥
आणि सांख्ययोगमतें । प्रकृति परिसविली तूतें ।
दोहीं परि ची जेथें । विवंचिली ॥ ९१ ॥

तेथ दूजी जे जीवदशा । तिये नावं वीरेशा ।
येथ अव्यक्त ऐसा । पर्याॐ हा ॥ ९२ ॥
तर्‍हीं पाहालेयां रजनी । तारा लोपति गगनीं ।
कां हारपति अस्तमानीं । भूतक्रिया ॥ ९३ ॥
कां देह गेलेयां पाठिं । देहादिक किरीटी ।
उपाधि लोपे पोटीं । कृतकर्मांचां ॥ ९४ ॥
कां बीजमुद्रे आंतु । थोंके तरु समस्तु ।
कां वस्त्रपणें तंतु । दशे राहे ॥ ९५ ॥
तैसें सांडूनु स्थूलधर्म । महाभूतें भूतग्राम ।
लया जांति सूक्ष्म । होउनि जेथ ॥ ९६ ॥
अर्जुना तेया नावें । अव्यक्त हें जाणावें ।
आतां आइक आघवें । इंद्रियभेद ॥ ९७ ॥
तरि श्रवण नयन । त्वचा घ्राण रसन ।
इयें जाणैं ज्ञान । करणें पांचै ॥ ९८ ॥
इये तत्वमेलापकिं । सुखदु:खाची उखीविखी ।
बुद्धि करितसे मुखिं । पांचै इहिं ॥ ९९ ॥
मग वाचा आणि कर । चरण अधोद्वार ।
अपायु हे प्रकार । पांचै आणिक ॥ १०० ॥
कर्मेंद्रिय ह्मणिपति । तियें इयें जाणिजति ।
आइकैं कैवल्यपति । सांघत असे ॥ १ ॥
पैं प्राणाची आंतौरी । क्रियाशक्ति जे शरीरीं ।
तियेची रिगिनिगि द्वारीं । पांचै इहीं ॥ २ ॥
एवं दाही करणें । सांघितलीं देॐ ह्मणे ।
आतां परियस फुडेपणें । मन तें हें ॥ ३ ॥
जें इंद्रियां आणि बुद्धी । माझारिलिये संधी ।
रजोगुणाचां खांदीं । तरलत असे ॥ ४ ॥

नीलिमा अंबरीं । कां मृगतृष्णालहरी ।
तैसा वायां चि फाउरी । वावो जालें ॥ ५ ॥
आणि शुक्रशोणिताचा सांधा । मिळतां पांचाचा बांधा ।
वायुतत्व दशधा । एक चि जालें ॥ ६ ॥
मग तें हीं दाहें भागीं । देहधर्माचां वैवंगीं ।
अधिष्ठिलें आंगीं । आपुलालां ॥ ७ ॥
तेथ चांचल्य निखिळ । एकलें ठेलें निढाळ ।
ह्मणौनि रजाचें बळ । धरिलें तेणें ॥ ८ ॥
तेथ बुद्धीसि बाहिरि । अहंकारावरि ।
ऐसां ठांइं माझारि । बळियाविलें ॥ ९ ॥
वायां हें नावं । यऱ्हविं कल्पना हे चि सावेव ।
जेयाचेनि संगें जीव । दशा वस्तू ॥ ११० ॥
जें प्रवृत्तीसि मूळ । कामा जेयाचें बळ ।
जें अखंड सुए सळ । अहंकारासिं ॥ ११ ॥
जें इछेतें वाढवी । आशेतें चडावी ।
जें पाठि पुरवी । जगासि येया ॥ १२ ॥
द्वैत जेणें उठी । अविद्या जेणें लाठी ।
जें इंद्रियांतें लोटी । विषयां माझि ॥ १३ ॥
संकल्पित शृष्टि घडी । सवें चि विकल्पूनि मोडी ।
मनोरथाचिया उतरडी । उतरी रची ॥ १४ ॥
जें भूलिचें कुल्हार । वायुतत्वाचें अंतर ।
बुद्धिचें द्वार । झांकललें जेणें ॥ १५ ॥
तें गा किरीटी मन । एया बोला नाहिं आन ।
आतां विषयाभिधान । भेदु आइक ॥ १६ ॥
तरि स्परिसु आणि शब्दु । रूप रसु गंधु ।
हा विवेकु पंचविधु । ज्ञानेंद्रियाचा ॥ १७ ॥

इहीं चि पांचैं द्वारीं । ज्ञानासि धावं बाहिरि ।
जैसें कां हिरव चारीं । भांभावे पशु ॥ १८ ॥
मग स्वर वर्ण विसर्गु । अथवा स्वीकारु त्यागु ।
चंक्रमण उत्सर्गु । मलमूत्रांचा ॥ १९ ॥
हे कर्मेंद्रियांचे पाच । विषय गा साच ।
जें बांधौनि मांच । क्रिया जे उठी ॥ १२० ॥

**इच्छा द्वेषः सुखं दुःखं संघातश्चेतना धृतिः ॥**
**एतत्क्षेत्रं समासेन सविकारमुदाहृतं ॥ ६ ॥**

ऐसे हे दाही । विषय इये देहीं ।
आतां इछा ते ही । सांघिजैल ॥ २१ ॥
तरि भूतलें आठवे । कां बोलें कानु झांकवे ।
ऐसिया वरि चेतवे । जे वृत्ति गा ॥ २२ ॥
इंद्रियां विषयांचिये भेटी । सरिसी चि वेगें उठी ।
कामाचिया बाहुटी । धरूनियां ॥ २३ ॥
जियेचेनि उठिलेपणें । मना सैघ धावणें ।
ना रिगावें तेथ करणें । तोंडें सूंति ॥ २४ ॥
जियें वृत्तिचिया वाढी । बुद्धि होये वेडी ।
विषइं जेया गोडी । ते हे इछा ॥ २५ ॥
आणि इछिलेया सांगडे । इंद्रियां आमिष न जोडे ।
ऐसेयां डाऊ जो पडे । तो चि द्वेषु ॥ २६ ॥
आतां या वरि सुख । तें एवंविध देख ।
जेणें एकें चि अशेख । विसरे जीउ ॥ २७ ॥
मनें वाचा कायें । जें आपुली आण वायें ।
देहस्मृतिची त्रायें । मोडित जाये ॥ २८ ॥
जेयाचेनि जालेपणें । पांगुला होणें प्राणे ।
सात्विकां दुणे । वरि हि लाभु ॥ २९ ॥

आघवियाचि इंद्रियवृत्ती । हृदयाचां एकांतिं ।
थापटूनि सुषुप्ती । आणि जें गा ॥ १३० ॥
किंबहुना सोए । जीउ–आत्मेयांची लाहे ।
तेथ जें होये । तेया नावं सुख ॥ ३१ ॥
आणि ऐसी हे अवस्था । न जोडतां पार्था ।
जीजे तेया नावं सर्वथा । दुःख जाणैं ॥ ३२ ॥
तें मनोरथभंगें होये । येर सिद्धी गेलें जाए ।
हें दोनी चि उपाये । सुखदुःखासि गा ॥ ३३ ॥
आतां असंगा साक्षिभूता । देहिं चैतन्याची सत्ता ।
तिये नावं पांडुसुता । चेतना एथ ॥ ३४ ॥
जे नखौनि केंसेवेन्हीं । उभी लागे शरीरीं ।
जे तिहिं अवस्थांतरीं । पालटे ना ॥ ३५ ॥
मनबुध्यादि आघवी । जियेचेनि टवटवी ।
प्रकृतिवनमाधवी । सदा चि जे ॥ ३६ ॥
जडाजडीं अंशीं । जे राहाटि सरिसी ।
ते चेतना गा तुजसीं । लटकें नाहिं ॥ ३७ ॥
पैं राऊ परिवाण नेणे । आज्ञा चि परचक्र जीणे ।
कां चंद्राचेनि परिपूर्णें । सिंधु भरति ॥ ३८ ॥
नाना भ्रमकाचेनि सन्निधानें । लोह करी सचेतनें ।
कां सूर्यसंगु जनें । चेष्टविजे ॥ ३९ ॥
आगा मुखमेळेविण । पीलेयाचें पोखण ।
करी जेवि निरीक्षण । कूर्मिचें ॥ १४० ॥
पार्था तिया परिं । आत्मसंगति इये शरीरीं
सजीवत्वाचा करी । उपेगु जडा ॥ ४१ ॥
मग तियेतें चेतना । ह्मणिपे अर्जुना ।
धृतिची विवंचना । आतां आइक ॥ ४२ ॥

तत्वां परस्परें । उघड जातिवैरें ।
नव्हे पृथिवीयेतें नीरें । निनासिजे ॥ ४३ ॥
नीरातें आटी तेज । तेजा वायुसि जूझ ।
गगन तवं साहाज । वायु भक्षी ॥ ४४ ॥
तेविं चि कव्हणी वेळे । आपण काइसेया ही न मिळे ।
आंतु रिगौनु वेगळें । आकाश हें ॥ ४५ ॥
ऐसिं पांचै भूतें । न साहांति एकमेकातें ।
किं स्यें हिं ऐक्यातें । देहां यंति ॥ ४६ ॥
द्वंद्वाची उखीविखी । सांडूनि वस्ती एकी ।
एकातें पोखी । निजगुणें ॥ ४७ ॥
ऐसें मिळतेयां साजणें । चले धैर्यैं जेणें ।
तेया नावं ह्मणे । धृति पैं गा ॥ ४८ ॥
आणि जीवेंसिं पांडवा । यां सतिसां सतिसांचा मेळावा ।
तो पैं येथ जाणावा । सांघातु गा ॥ ४९ ॥
एवं सतीस भेद । सांवितले तुज विशद ।
एयां एतुलेयांतें प्रसिद्ध । क्षेत्र ह्मणिजे ॥ १५० ॥
रथांगाचा मेळावा । रथु ह्मणिजे पांडवा ।
कां अधोर्ध्व अवयवां । नावं देह ॥ ५१ ॥
करी–चातुरंग–समाजें । सेना नावं निफजे ।
वाक्यें ह्मणिपति पुंजे । अक्षरांचे ॥ ५२ ॥
जळधरांचा मेळा । वाच्य होये अभाळा ।
नाना लोक सकळा । नावं जगु ॥ ५३ ॥
कां स्नेह–सूत्र–वन्हि । मेळु एकी स्थानीं ।
धरिजे तो जनीं । दीपु होये ॥ ५४ ॥
तैसिं सतीस हीं तत्वें । मिळति एकत्वें ।
तेणें समूहपरत्वें । क्षेत्र ह्मणिजे ॥ ५५ ॥

आणि वाहतेनि भौतिकें । पापपुण्य एथ पीके ।
ह्मणौनि आह्मि कवतिकें । क्षेत्र ह्मणों ॥ ५६ ॥
एकाचेनि मतें । देह ह्मणति एयातें ।
परि असो हें अनंतें । नावें एयासि ॥ ५७ ॥
सुरनरउरगीं । घडत आहे योनिविभागीं ।
ते गुणकर्मसंगीं । पडिलें सांतें ॥ ५८ ॥
पैं परतत्वा आरौतें । आणि स्थावरांता आंतौतें ।
जें काहिं होतें जातें । क्षेत्र चि हें ॥ ५९ ॥
हे चि गुणविवंचना । पुढां ह्मणिपैल अर्जुना ।
प्रस्तुत आतां ज्ञाना । रूप दाउं ॥ १६० ॥
क्षेत्र तवं सविस्तर । सांघितलें सविकार ।
ह्मणौनि आतां उदार । ज्ञान आइक ॥ ६१ ॥

**अमानित्वमदंभित्वमहिंसा क्षांतिरार्जवं ॥**
**आचार्योपासनं शौचं स्थैर्यमात्मविनिग्रहः ॥ ७ ॥**

जेया ज्ञाना लागि । गगन गीलिताति योगी ।
स्वर्गिंची आडवंगी । उमरुडूनि ॥ ६२ ॥
न करीति सिद्धिंचे पाड । न धरीति रिद्धींची भीड ।
योगा ऐसें दुवाड । हेलासति ॥ ६३ ॥
तपोदुर्गें वोलांडिति । ऋतुकोडी वोवांडिति ।
उलथौनि सांडिति । कर्मवेली ॥ ६४ ॥
नाना भजनमार्गीं । धावंतु उघडां आंगीं ।
एक रिगति सुरंगीं । सूक्ष्मतेचिये ॥ ६५ ॥
ऐसी जिये ज्ञानीं । मुनीश्वरां उतान्ही ।
वेदतरुचां पानोवानीं । हींडताति ॥ ६६ ॥
देईल गुरुसेवा । इया बुद्धी पांडवा ।
जन्माचा सांडोवा । टाकिति जे ॥ ६७ ॥

जेयाची रिगवणी । अविद्ये उणें आणी । आत्मवेया
जीवात्मेयां बुझावणी । मांडूनि दे ॥ ६८ ॥
जें इंद्रियांचीं दारें अडी । प्रवृत्तिचे पाये मोडी ।
जें दैन्य चि फेडी । मानसाचें ॥ ६९ ॥
द्वैताचा दुकलु पाहे । साम्याचें सुवाण होये ।
जेया ज्ञानाची सोये । ऐसें करी ॥ १७० ॥
मदाचा ठाउ पूसी । जें महामोहातें गिवसी ।
नेंदी आपपरु ऐसी । भाख उरों ॥ ७१ ॥
जें संसारातें उन्मूळी । संकल्पपंकु पाखाळी ।
अनावरातें वेंटाळी । ज्ञानतेजें ॥ ७२ ॥
जेयाचेनि उजाळें । उघडति बुद्धिचे डोळे ।
जीउ दोंदावरि लोळे । आनंदाचेया ॥ ७३ ॥
ऐसें जें ज्ञान । पवित्रैकनिधान ।
जेथ विटाळलें मन । चोख कीजे ॥ ७४ ॥
आत्मेयां जीवबुद्धि । जे हे लागली क्षयव्याधि ।
ते जेयाचेया सन्निधी । बळि कीजे ॥ ७५ ॥
निरूप्यतें अनिरूप्य कि निरूपिजे । आइकतां बुद्धीं आणिजे ।
वांचौनि डोळां देखिजे । ऐसें नाहिं ॥ ७६ ॥
मग एकीं शरीरीं । आपुली प्राची करी ।
तैं इंद्रियां व्यापारीं । दीठी ही दीसे ॥ ७७ ॥
पैं वसंताचें रिगवणें । झाडांचेनि साजेपणें ।
जाणिजे तेवि करणें । सांघति ज्ञान ॥ ७८ ॥
आगा वृक्षासि पाताळीं । जळ सांपडे मुळिं ।
तें शाखांचिया बाहाळीं । दीसे वरि ॥ ७९ ॥
कां भूमिचें मार्दव । सांवे कोंभाची लवलव ।
नाना आचार गौरव । सुकुलीचें ॥ १८० ॥

अथवा संभ्रमाचिया आयती । स्नेहो जैसा ए व्यक्ती ।
कां दर्शनाचिया प्रशस्ती । पुण्यपुरुषु ॥ ८१ ॥
नातरि केळि कापुरु जाला । तो परिमळें जाणों आला ।
कां भिंगारां दीपु ठेविला । बाहिरि फांके ॥ ८२ ॥
तैसिं हृदइंचेनि ज्ञानें । जियें उमटति देहिं चिन्हें ।
तियें सांघों अवधानें । चांगें आइक ॥ ८३ ॥
तरि कव्हणी विखिचें । जीवा साम्य होणें न रुचे ।
संभावितपणाचें । ओझें जेया ॥ ८४ ॥
आथिले चि गुण वानितां । कां मान्यपणें मानितां ।
योग्यतेचें येतां । रूप आंगा ॥ ८५ ॥
गजबजों लागे कैसा । व्याघ्रें रुंधला मृगु जैसा ।
कां बाहिं उतरलां वळसां । दाटला जेवि ॥ ८६ ॥
पार्था तेणें पाडें । सन्मानें जो सांकडे ।
गरिमेतें आंगा कडे । येऊं नेंदी ॥ ८७ ॥
पूज्यता डोळां नेदखावी । स्वकीर्त्ति कानिं नाइकावी ।
हा अमुका ऐसी न व्हावी । से चि लोका ॥ ८८ ॥
तेथ सत्काराची कें गोठी । कें आदरा होईल भेटि ।
मरणेंसिं साठि । नमस्कारितां ॥ ८९ ॥
वाचस्पतिचेनि पाडें । सर्वज्ञता तरि जोडे ।
परि वेडिवे माजि दडे । महिमे भेण ॥ १९० ॥
चातुर्य लपवी । महत्त्व हारवी ।
पीसेपण मिरवी । आवडौनि ॥ ९१ ॥
लौकिकाचा उद्वेगु । शास्त्रांवरि उभगु ।
उगेपणिं चांगु । आथि भरु ॥ ९२ ॥
जगें अवज्ञा चि करावी । संबंधिं सोये न धरावी ।
ऐसी ऐसी जीविं । चाड बहू ॥ ९३ ॥

तळैटेपण बाणे । आंगीं हीणाउ खेवणें ।
तें तें चि करणें । बहुतकरुनु ॥ ९४ ॥
हा जीतु ना नव्हे । लोकु कल्पी येणें भावें ।
तैसें जीणें होआवें । ऐसी आश ॥ ९५ ॥
पैल चालत कां आहे । किं वारेनि जांत नोहे ।
जना ऐसा भ्रमु जाए । ऐसेयां होइजे ॥ ९६ ॥
माझें असतेपण लोपो । नामरूप हारपो ।
मज झनें वासिपो । भूतजात ॥ ९७ ॥
ऐसिं जेयाचि नवसियें । एकांता जात जाए ।
नावें चि जो जिये । रानाचेनि ॥ ९८ ॥
वायू आणि जेया पडे । गगनेंसिं बोलों आवडे ।
जीउ प्राणु झाडें । पढियंति गा ॥ ९९ ॥
किंबहुना ऐसिं ऐसिं । चिन्हें जेया देखसी ।
जाण तेया ज्ञानेंसिं । सेस जाले ॥ २०० ॥
पैं अमानित्व पुरुषीं । जाणावें इहिं मिखिं ।
आतां अदंभित्वाचिये उलखी । सौरसु करूं ॥ १ ॥
तारि अदंभित्व तें ऐसें । लोभियाचें मन जैसें ।
जीउ जाउ परि नुमसे । ठेविला ठाउ ॥ २ ॥
तेया परी किरीटी । पडिला ही प्राणसंकटीं ।
परि सुकृत न प्रकटी । आंगें बोलों ॥ ३ ॥
खडाणे आला पान्हा । पळवी जेवि अर्जुना ।
कां राहे पण्यांगना । वडीलपणें ॥ ४ ॥
आढयु आंतुडे अडविं । मग आढ्यता जेवि हारवी ।
कां कुलवधू लपवी । अवेवांतें ॥ ५ ॥
नाना कृषिवलु आपुलें । पांगुरवी पेरिलें ।
तैसें झांकी निफनलें । दानपुण्य ॥ ६ ॥

वरि देह न पूजी । लोकातें न रंजी ।
स्वधर्मु वाग्बीजिं । बांधों नेणें ॥ ७ ॥
परोपकारु नोबोले । न मिरवी अभ्यासिलें ।
न शके विकूं जोडिलें । स्फीतीसाठिं ॥ ८ ॥
आंगभोगा कडे । पाहांतां कृपणु आवडे ।
यऱ्हविं धर्मविखीं थोडें । बहू न ह्मणे ॥ ९ ॥
घरिं दीसैल सांकड । देहिची ही आइति रोड ।
पारि दानिं जेया होड । सुरतरूसिं ॥ २१०
किंबहुना धर्मि थोरु । अवसरिं उदारु ।
आत्मचर्चे चतुरु । यऱ्हविं वेडा ॥ ११ ॥
केळिचें दळवाडें । हळू पोकळ आवडे ।
पारि फळौनियां गाढें । रसाळ जैसें ॥ १२ ॥
कां मेघाचें आंगझीळ । दीसे वारेनि जैसें जाइल ।
पारि वरिखती नवल । घनवटीतें ॥ २१३ ॥
तैसा जो पुर्णीं । पातां धांति आणी ।
यऱ्हविं तरि वाणी । तो चि ठाऊ ॥ १४ ॥
हें असो एया चिन्हांचा । नडनाचु ठांइं जेयाचा ।
जाण ज्ञान तेयाचा । हातु चंढलें ॥ १५ ॥
पैं गा अदंभपण । ह्मणितलें तें हें जाण ।
आतां आइक खूण । अहिंसेची ॥ १६ ॥
तरि अहिंसा बहुवे परीं । बोलिली असे अवधारीं ।
आपुलाला मतांतरिं । निरोपितां ॥ १७ ॥
परि ते ऐसी देखां । जैसिया खांडूनियां शाखा ।
मग तेया चि बुडुखा । कूंपु कीजे ॥ १८ ॥
बाहे तोडूनि विकिजे । मग भूखेची पीडा राखिजे ।
नाना देउळें मोडूनि कीजे । पौळि देवा ॥ १९ ॥

तैसी चि हिंसा करूनि अहिंसा । कर्मकांडिं हा ऐसा ।
पूर्वमीमांसा । निर्णो केला ॥ २२० ॥
जैं अदृष्टिचेनि उपद्रवें । गादैल विश्व चि आघवें ।
ह्मणौनि पर्जन्ययष्टि करावे । नाना याग ॥ २१ ॥
तिये इष्टिचां बुडीं । पशुहिंसा तवं रोकडी ।
मग अहिंसेची थडी । लेसां दीसे ॥ २२ ॥
पेरिजे नुसदी हिंसा । तेथ आवैल काय अहिंसा । उगवैल
परि नवलु बा धिवंसा । याज्ञिकांचा ॥ २३ ॥
आणि आयुर्वेदु ही आघवा । एया चि मोहरा पांडवा ।
जें जीवां कारणें करावा । जीवां घातु ॥ २४ ॥
नव्हे रोगीं आहाळलीं । लोळतीं भूतें देखिलीं ।
ते हिंसा निवारावेया केली । चिकित्सिका ॥ २५ ॥
तवं चिकित्सा पहिलें । एकांचे कंद खणविले ।
एकां उपडविलें । समूळांतें ॥ २६ ॥
एकें आडमोडीं केलीं । अजंगमाची खाल काढविलीं ।
गाभिणीं उकढलीं । पुटां माझि ॥ २७ ॥
अजातशत्रुतरुवरां । सर्वांगिं देवविलिया सिरा ।
ऐसे जीव घेउनि वीरा । कोरडे केले ॥ २८ ॥
आणि जंगमा हिं हात । लाउनि काढिलें पित्त ।
मग राविले सीणत । आणिक जीव ॥ २९ ॥
आहावसुवारें । मोडूनि केले देव्हारे ।
नागवूनु वेव्हारे । गवांदि घातली ॥ २३० ॥
मस्तक पांगुराविलें । तवं तळवटीं उघडें ठेलें ।
मागां मोडूनु केलें । पुढें घड ॥ ३१ ॥
नाना पांगुरणें । जाळूनि जैसें तापणें ।
नातरि जालें आंगधुणें । कुंजराचें ॥ ३२ ॥

बैलु वीकूनि कोठा । पूंस लाउनि गांठा ।
इयें करणी कीं चेष्टा । कायि हांसों ॥ ३३ ॥
एकिं धर्माचिया वाहाणी । गाळूं आदरिलें पाणी ।
तेथ गाळितेयाचिया आहळणी । जीव मेले ॥ ३४ ॥
एक न पचिति चि कण । इये हिंसे चि भेण ।
तेथ कदर्थले प्राण । ते चि हिंसा ॥ ३५ ॥
एवं हिंसा चि अहिंसा । कर्मकांडिं हा ऐसा ।
सिद्धांतु सुमनसा । ऊळख तूं ॥ ३६ ॥
पहिलें अहिंसेचें नावं । केलें आह्मिं जवं ।
तवं स्फूर्त्ति बांधली हावं । इये मतीं ॥ ३७ ॥
तरि कैसेनि इयेतें गाळावें । ह्मणौनि पडिलें बोलावें ।
तेविं चि तुवां जाणावें । ऐसा भाऊ ॥ ३८ ॥
बहूकरुनि किरीटी । हा चि विषो इये गोठी ।
यऱ्हविं कां आडवाटीं । धांविजैल ॥ ३९ ॥
आणि स्वमताचिया निर्द्धारा । लागौनियां धनुर्द्धरा ।
प्राप्ता मतांतरा । निर्वचु कीजे ॥ २४० ॥
ऐसी हे अवधारीं । निरोपिती परी ।
आतां यावरी । मुख्य जें गा ॥ ४१ ॥
तें स्वमत बोलिजैल । अहिंसे रूप कीजैल ।
जेया उठविलेयां आंतुल । ज्ञान दीसे ॥ ४२ ॥
परि तें चि अधिष्ठिलेनि आंगें । जाणिजे आचरतेनि बागें ।
जैसी कसवटी सांघे । वानियेतें ॥ ४३ ॥
तैसें ज्ञानमनाचिये भेटी । अहिंसेचें बिंब उठी
तें चि ऐसें किरीटी । परिस आतां ॥ ४४ ॥
तरि तरंग नोलांडितु । लहरी पायें न फेडितु ।
संचलु न मोडितु । पाणियांचा ॥ ४५ ॥

वेगें आणि लेसां । दीठि घालूनि आवेंसा ।
जळिं बकु जैसा । सोंए ॥ ४६ ॥ पाउलें
कां कमळावरि भवर । पाये ठेविति हळुवार ।
कुचुंबैल केसर । इया शंका ॥ ४७ ॥
तैसे परिमाणु पांगुतले । जाणौनि जीउ सानुले ।
कारुण्या माझि पाउलें । लपौनि चाले ॥ ४८ ॥
ते वाट कृपेची करितु । ते दिशा चि स्नेहें भरितु ।
जीवा तळिं आंथुरितु । आपुला जीउ ॥ ४९ ॥
ऐसिया जतना । चालणें जेया अर्जुना ।
हें अनिर्वाच्य परि मना । पुरिजे ना ॥ २५० ॥
पैं मोहाचेनि सांगडें । लांसि पीलें धरी तोंडें ।
तेथ दातांचें आगरडें । जैसें लागे ॥ ५१ ॥
कां स्नेहाळ माए । तान्हेयांची वास पाहे ।
तिये दीठी आहे । हळुवार जें ॥ ५२ ॥ जैसी
डोळे नाना कमळदळें । डोलवीजिजति ढाळें ।
तो जेणें पाडें बुबुळें । वारा घेपे ॥ ५३ ॥
तैसेनि मार्दवें पाए । भूमी ठेवीतु जाये ।
लागति तेथ होये । जना सुख ॥ ५४ ॥
ऐसिया लविमा चालता । क्रिमिकीटक पांडुसुता ।
देखे तरि मावौता । हळू चि निगे ॥ ५५ ॥
ह्मणे पाऊ दडफडील । निद्रा स्वामिची मोडैल ।
रचलेपणा पडैल । झोंति हान ॥ ५६
इया काकुळती । वाहाणि वे मावौति ।
कोण्ही हिं व्यक्ती । न वचवे वरि ॥ ५७ ॥
जीवाचेनि नावें । तृण हिं नोलांडावें ।
मग नेखितां जावें । हें कें गोठि ॥ ५८ ॥

मुंगिये मेरु नोलांडवे । मशका सिंधु नुतरवे ।
तैसें भेटलें न करवे । अतिक्रमू ॥ ५९ ॥
ऐसी जेयाची चालि । क्रियाफलासि आली ।
देखसी जियाली । दया वाचे ॥ २६० ॥
स्वसणें चि तें सकुमार । मुख मोहाचें माहियेर ।
माधुर्या जाले अंकुर । दशन तैसे ॥ ६१ ॥
पुढां स्नेह पांझरे । मागां चालति अक्षरें ।
शब्दु पाठिं अवतरे । कृपा आधीं ॥ ६२ ॥
तवं बोलणें चि नाहीं । भिये ह्मणे जरी कांहिं ।
बोलु कोण्हा हिं । खुपैल कां ॥ ६३ ॥
बोलतां अधिकु ही निगे । तरि कोण्हां वर्मी हान लागे ।
कोण्हासि रिगे । शंका मनीं ॥ ६४ ॥
मांडली गोठि हान मोडैल । वासिपैल कन्हणी उडैल ।
आइको चि वोवांडिल । कोण्हीं जरी ॥ ६५ ॥
तरि दुवाळि कोण्हा न व्हावी । कोण्हाची भंवै नुचलावी ।
ऐसा भाउ जीविं । ह्मणौनि उगा ॥ ६६ ॥
मग प्रार्थिला विपाएं । जरि लोभें बोलों जाए ।
तरि परियस तेयां होए । मायबापु ॥ ६७ ॥
नादब्रह्म मूर्छलें । गंगापय आसललें ।
पतिव्रते आलें । वृद्धाप्य कां ॥ ६८ ॥
तैसी साच आणि मौवाळ । सीतळी आणि रसाळ ।
बोल जैसे कल्लोळ । अमृताचे ॥ ६९ ॥
उरोधु वाडुवळु । प्राणुपापता ढाळु ।
उपहासु चाळु । वर्मस्पर्शु ॥ २७० ॥
आंवु वेगु विंदाण । आश शंका प्रतारण ।
हे संन्यासिले अवगुण । जेया वाचा ॥ ७१ ॥

आणि तेया चि परी किरीटी । थाउं जियाचिया दीठी ।
सांडिलिया भृकुटी । मोकलिया ॥ ७२ ॥
मूर्ति वस्तु आहे । तिये रूपीं सके विपायें ।
ह्मणौनि वास ना पाहे । बहुत करुनि ॥ ७३ ॥
ऐसा ही कोण्ही एकी वेळे । आंतुली कृपेचेनि बळें ।
उचलूनियां डोळे । दीठी घाली ॥ ७४ ॥
तरि चंद्रबिंबौनि धारा । सूटति नव्हंति गोचरा ।
परि एकसरिं चकोरां । निगति दोंदें ॥ ७५ ॥
तैसें प्राणियांसि होए । जरि तो वास पाहे ।
तेया अवलोकनाची सोए । कूर्मी हीं नोहे ॥ ७६ ॥
किंबहुना ऐसी । दीठि जेया भूतांसि ।
कर ही देखसी । तैसे चि गा ॥ ७७ ॥
होउनियां कृतार्थ । राहिले सिद्धांचे मनोरथ ।
तैसे जेयाचे हात । निर्व्यापार ॥ ७८ ॥
अक्षम आणि सन्यासिलें । निरंधन आणि विझालें ।
मूकेनि घेतलें । मौन जैसें ॥ ७९ ॥
तिया परिं काहिं । जियां करां करणें नाहिं ।
जें अकर्तेयाचां ठांइं । बैसउं एंती ॥ २८० ॥
आसुडैल हान वारा । नख लागैल अंबरा ।
इया बुद्धी करां । चळों नेदी ॥ ८१ ॥
तेथ आंगावरिलें उडाविं । कां डोळां रिगतें झाडाविं ।
पशुपक्षां दावावी । त्रासमुद्रा ॥ ८२ ॥
इया केउतिया गोठी । नावडे दंडुकाठी ।
मग शस्त्रांचें किरीटी । बोलणें कें ॥ ८३ ॥
लीलाकमळें खेळणें । पुष्पमाळा झेलणें ।
न करी ह्मणे गोफणें । ऐसें होइल ॥ ८४ ॥

हालवती रोमावली । या लागि आंग न कुरवाळी ।
नखांची गुंडाळि । बोटां वरि ॥ ८५ ॥
तवं करणेयांचा चि विपाऊ । जरि ऐसा ही पडे ठाऊ ।
तरि हातां हा चि स्वभाऊ । जें जोडिजति ॥ ८६ ॥
कां नाभिकारा उभिजे । हातु पडिलेयां दीजे ।
आर्तीतें परिसिजे । अलुमालु ॥ ८७ ॥
हें इं उपरोधें करणें । आर्ति भय हरणें ।
नेणति चंद्रकिरणें । जीवाला तो ॥ ८८ ॥
पाहूनि तो स्पर्शु । मलयानीलु खरपुसु ।
एणें मानें पशु । कुरुवाळणें ॥ ८९ ॥
जियें सदा रीतिं पोकळें । जैसिं चंदनांगें शीतळें ।
न फळतां हिं निष्फळें । होंति चि ना ॥ २९० ॥
असो हें वाग्जाल । जाणिजे करतळ ।
सज्जनाचें सीतळ । स्वभावें जैसें ॥ ९१ ॥
आतां मन तेयाचें । सांघों ह्मणे साचें ।
तरि सांवितलें कोणाचे । विलास हे ॥ ९२ ॥
काइ शाखा नव्हे तरु । जळें विण असे सागरु ।
तेज आणि तेजकरु । सिनानी आथि ॥ ९३ ॥
अवेव आणि शरीर । हें वेगळालें जर ।
किं रसु आणि नीर । सिनानीं आथि ॥ ९४ ॥
ह्मणौनि जे हे सर्व । सांवितले बाह्य भाव ।
तें मन चि गा सावेव । ऐसें जाण ॥ ९५ ॥
जें बिं भुइं खोविलें । तें चि वरि रुंख जाले ।
तैसें इंद्रियद्वारीं फांकलें । अंतरिचें ॥ ९६ ॥
पैं मानसिं जरि । अहिंसेची अवसरी ।
तरि कैंची बाहिरि । बोसंडैल ॥ ९७ ॥

आवडे ते वृत्ति किरीटी । आधिं मनौनि उठी ।
मग वाचे दीठी । करांसि ये ॥ ९८ ॥
वांचूनि मनीं नाहिं । तें आंगिं उमटैल काइ ।
बीजें विण भुइं । अंकुरु असे ॥ ९९ ॥
उगविं चि वालौनि जाए । तें अधिं कैंचें वाहे ।
जीउ गेलेयां आहे । चेष्टा देहिं ॥ ३०० ॥
तैसें मनपण जैं मोडे । तैं इंद्रियां आधीं चि उबडे । उपडे
सूत्रें विण साईखडें । वाउ जैसें ॥ १ ॥
ह्मणौनि मन पांडवा । मूल एयां इंद्रियभावां ।
हें चि राहाटे आघवां । द्वारिं इहिं ॥ २ ॥
परि जिये वेले जैसें । जें होउनि आतुं असे ।
बाहिरि ये तैसें । व्यापाररूपें ॥ ३ ॥
यालागि साचोकारें । मनीं अहिंसा थावे थोरें ।
पैं कलि जैसी द्वारें । बोबांत निगे ॥ ४ ॥
ह्मणौनि इंद्रियें ते संपदा । वेंचितां हिं उदावादा ।
अहिंसेचा बांधा । करितें आहाति ॥ ५ ॥
समुद्र दाटी भरितें । तैं समुद्र चि करी खारियांतें ।
तैसें स्वसंपत्ति चित्तें । इंद्रियां केलें ॥ ६ ॥
हें बहु असो पंडितु । धरूनु बालकाचा हातु ।
वोलि लेहे वेगवंतु । आपण चि ॥ ७ ॥
तैसें दयालुत्व आपुलें । मनें हातां पायां आणिलें ।
मग तेथ उपजविलें । अहिंसेतें ॥ ८ ॥
याकारणें किरीटी । इंद्रियांचिया गोठी ।
मनाचिये चि राहाटी । रूप केलें ॥ ९ ॥
ऐसा मनें देहें वाचा । सर्व संन्यासु दंडाचा ।
जाला ठांइ जेयाचां । देखसील ॥ ३१० ॥

तो जाण वेल्हाळ । ज्ञानाचें वेळाउळ ।
हें असो निखळ । ज्ञान चि तो ॥ ११ ॥
जे अहिंसा कानिं आइकिजे । ग्रंथाधार निरोपिजे ।
ते पाहावी हें उपजे । तैं तो चि पाहावा ॥ १२ ॥
ऐसें ह्मणितलें देवें । तें बोलें एकें सांघावें ।
परि फांकला हें उपसाहावें । तुह्मीं मज ॥ १३ ॥
ह्मणाल हिरव चारिवें गोरुं । विसरे मोहर घरुं ।
कां वारेलगें पाखिरुं । गगनीं भरे ॥ १४ ॥
तैसा प्रमेयाचिया स्फूर्ती । फावलिया रसवृत्ती ।
वाहविलां मती । अलुमाळु ॥ १५ ॥
तरि तैसें नव्हे अवधारां । कारण असे विस्तारा ।
एऱ्हविं पद तरि अक्षरां । तिहिंचें चि ॥ १६ ॥
अहिंसा ह्मणतां थोडी । परि तैं चि होये उघडी ।
जैं आलोडिजति कोडी । मतांचिया ॥ १७ ॥
यऱ्हविं प्रातें मतांतरें । थाथंबूनि आंगभरें ।
बोलिजैल तें न सरे । तुह्मा पासिं ॥ १८ ॥
रत्नपारिखियाचां गाविं । जाईल गंडी तरि सोडावी ।
काश्मिरीं न करावीं । मढंगणें ॥ १९ ॥
इछा वासु कापुरा । मंद जेथ अवधारां ।
पिठाचा विकिरा । तिये सांते ॥ ३२० ॥
ह्मणौनि इये सभे । बोलिकेपणाचेनि क्षोभें ।
लागसर न लभें । बोलों प्रभू ॥ २१ ॥
सामान्य आणि विशेषा । सकळव कीजैल देखां ।
तरि कानाचेया ही मुखा । कडे नेनां तुह्मीं ॥ २२ ॥
शंकेचेनि गदलपणें । जैं शुद्ध प्रमेय मैळणें ।
मागुत वाउलीं पुळवणें । अवधान येतें ॥ २३ ॥

करूनि बाबुळियेची बूंथि । जळें जियें ठाति ।
तेयांची वांस पाहाती । हंस काई ॥ २४ ॥
कां अभ्रा पैलीकडे । येंत चांदिणें कोंडे ।
तैं चकोर चांचुवडे । पसरीति ना ॥ २५ ॥
तैसें तुह्मि वास न पाहाल । ग्रंथु नेया वरि कोपाल ।
जरि निर्वेवादां नव्हैल । निरोपण ॥ २६ ॥
न बुझावति मतें । न फीटे आक्षेपाचें लागतें ।
तें वाखाणें जी तुमतें । जोडुनु नेंदीं ॥ २७ ॥
आणि माझें तवं आघवें । ग्रंथार्यंत एणें विभावें ।
जें तुह्मि संति होआवें । सन्मुखां सदा ॥ २८ ॥
यऱ्हवि तऱ्हीं साचोकारें । तुह्मि गीतार्थाचे सोयरे ।
जाणौनि गीता जीवसरें । धरिली मियां ॥ २९ ॥
जें आपुलें सर्वस्व देयाल । मग इयेतें सोडवूनु नेयाल ।
ह्मणौनि ग्रंथु नव्हे बोल । साच चि हे ॥ ३३० ॥
कां सर्वस्वाचा लोभु धरा । बोलेचा अव्हेरु करा ।
तरि गीते मज अवधारां । एकी चि गति ॥ ३१ ॥
किंबहुना मज । तुमचिया कृपा काज ।
तिये लागौनि व्याज । ग्रंथाचें केलें ॥ ३२ ॥
तरि तुह्मां रसिकां जोगें । वाखाण शोधावें लागे ।
ह्मणौनि मतांगें । बोलों ठेलां ॥ ३३ ॥
तवं कथे पसरु जाला । श्लोकार्थु दूरि ठेला ।
कीजो क्षमा या बोला । अपत्या मज ॥ ३४ ॥
आणि घांसांतूळु हरळु । फेडितां लागे वेळु ।
तें दूषण नव्हे आडळु । सांडाबा किं ॥ ३५ ॥
सवंचोर चूकवितां । दीस लागलेयां माता ।
कोपावें किं जीविता । जींताणें कीजे ॥ ३६ ॥

परि या वरिल हें नव्हे । तुह्मिं उपसाहिलें तें बरवें ।
आतां अवधारां जी देवें । बोलिलें ऐसें ॥ ३७ ॥
ह्मणे उन्मेखसुलोचना । सावधु होइं अर्जुना ।
करूं तुज ज्ञाना । वोलखि पाहूं ॥ ३८ ॥
तरि परि ज्ञान गा तेथें । वोलख तूं निरुतें ।
आक्रोशें विण जेथें । क्षमा आथि ॥ ३९ ॥
अगाधें सरोवरिं । कमलिनी जेया परीं ।
कां सदैवांचां घरीं । संपती जैसी ॥ ३४० ॥
पार्थ तेणें पाडें । क्षमा जेयातें वाढे ।
तें हिं लक्ष फुडें । लक्षण सांवों ॥ ४१ ॥
तरि पढियंतें लेणें । आंगिं भावे जेणें ।
धरिजे तेवि साहाणें । सर्व चि जेया ॥ ४२ ॥
त्रिविध मुख्य आघवे । उपद्रवांचे मेळावे ।
वरिपाडिलेयां न्हवे । वांकुडा जो ॥ ४३ ॥
अपेक्षित पावे । तो जेणें तोखें मानवे ।
अनपेक्षिता ही करावें । तो चि मानु ॥ ४४ ॥
जो मानापमानातें साहे । सुखदुःख जेथ माये ।
निंदास्तुती नोहे । दुखंडु जो ॥ ४५ ॥
उन्हालेनि जो न तपे । हेमवंतीं न कंपे ।
काइसेया ही न वासिपे । पातलेयां ॥ ४६ ॥
स्वशरीराचा भारु । नेणे जैसा मेरु ।
कां धरा इया सूकरू । वोझें न ह्मणे ॥ ४७ ॥
नाना चराचरीं भूतीं । दाटणी नव्हे इये क्षिती ।
तैसा नाना द्वंद्वप्राप्ती । घामेजे ना ॥ ४८ ॥
घेउनु जळाचे संघाट । आलेयां नदीचे लोट ।
करी वाढ पोट । सिंधु जेवि ॥ ४९ ॥

तैसें जेयाचां ठांइं । न साहणें काहीं चि नाहिं ।
सात आणि सात असे ऐसें हिं । स्मरे ना जो ॥ ३५० ॥
आंगा जें पातलें । तें करूनि घाली आपुलें ।
तेथ साहंतेनि नवलें । घेपिजे ना ॥ ५१ ॥
हे अनाक्रोश क्षमा । जेयातें आथि प्रियोत्तमा ।
जाण तेणें महिमा । ज्ञानासि गा ॥ ५२ ॥
तो पुरुषु पांडवा । ज्ञानाचा उ्ळावा ।
आतां परियस आर्जवा । रूप करुं ॥ ५३ ॥
तरि आर्जव तें ऐसें । प्राणाचें सौजन्य जैसें ।
आवडतेया हीं दोसें । एक चि गा ॥ ५४ ॥
कां तोंड पाहूनि प्रकाशु । न करी जेवि चंडांशु ।
जगा एकू चि अवकाशु । आकाशातें ॥ ५५ ॥
तैसें जेयाचें मन । मानुषप्रति आनान ।
नाहिं आणि वर्त्तन । ऐसें पैं तें ॥ ५६ ॥
जें जग चि सनोलख । जगेंसिं चि सोयेरिक ।
आपपरु हे भाष । जाणणें चि नाहिं ॥ ५७ ॥
भलेतेणेंसिं मेळु । पाणियां ऐसा ढाळु ।
कोण्ही हि विखीं आडळु । नेघे चित्त ॥ ५८ ॥
वारेयाची धावं । तैसे सरळ भाव ।
शंका आणि हांवं । नाहिं जेया ॥ ५९ ॥
माये पुढां बाळका । रिगतां न पडे चि आवांका ।
तैसें मन देतां लोका । नाळोची जो ॥ ३६० ॥
प्रकटलेया इंदीवरा । परिवरु नाहिं धनुर्द्धरा ।
तैसा कोनकोंपरा । नेणे जीउ ॥ ६१ ॥
चोखाळपण रत्नाचें । रत्नावरि नाचे ।
तैसें पुढां मन जेयाचें । करणें पाठिं ॥ ६२ ॥

आंलोंचु जो नेणे । अनभिज्ञ जोगावणें ।
धरी मेळीसि करणें । नाहिं जेया ।। ६३ ।।
दीठि नोहे मिणधी । देखणा नाहिं संधी ।
कोण्हासि ही बुद्धी । राहाटों नेणे ।। ६४ ।।
दाही इंद्रियें प्रांजळें । निःप्रपंचें उवळें ।
पांचै पालव मोकले । आठै पाहार ।। ६५ ।।
अमृताची धार । तैसें उजू अंतर ।
किंबहुना माहेर । यां चिन्हांचें ।। ६६ ।।
तो पुरुषु सूभटा । आर्जवाचा आंगवटा ।
जाण तेथ चि घरटा । ज्ञानें केला ।। ६७ ।।
आतां या वरि । गुरुभक्तिची परी ।
सांघों अवधारीं । चतुरनाथा ।। ६८ ।।
आघवेया चि दैवां । जन्मभूमि जे सेवा ।
जे ब्रह्म करी जीवा । शोच्यते ही ।। ६९ ।।
ते आचार्यउपास्ति । सांघिजैल तुज प्रति ।
बैसो सहस्रा एका ची पांती । अवधानाची ।। ३७० ।।
तरि सकळजळसमृद्धी । गंगा रिगाली उदधी ।
कां श्रुति हे महापदीं । पैठी जाली ।। ७१ ।।
नाना वेंटाळुनु जीवितें । गुणावगुण उखितें ।
प्राणनाथा उचितें । दीन्हलें प्रिया ।। ७२ ।।
तैसें सबाह्य आपुलें । जेणें गुरुभक्ती दीधलें ।
आपणपें केलें । भक्तिचें घर ।। ७३ ।।
गुरुगृह जिये देशीं । तो देशु चि आहे मानसिं ।
विरहिणी जैसी । वल्लभातें ।। ७४ ।।
तिये कडौनु येंतु वारा । देखौनु धांवे सामोरा ।
आडपडे ह्मणे घरा । बीजें कीजे ।। ७५ ।।

साच प्रेमाचिया भूली । तिया दिशा चि वोवाली ।
जीउ थानापति करुनु घाली । गुरुगृहिं जो ॥ ७६ ॥
गुरुआज्ञा धरलें । देह गावि असे एकलें ।
वांसुरुवां लाविलें । दावें जैसें ॥ ७७ ॥
ह्मणे कै हें बिरडें फीटैल । कै तो स्वामि भेटैल ।
युगा ही होन वडिल । निमिष मानी ॥ ७८ ॥
ऐसें गुरुग्रामिचें आलें । कां स्वयं गुरु चि धाडिलें ।
तरि गतायुषा जोडलें । आयुष्य जैसें ॥ ७९ ॥
कां सुकतेया अंकुरा । वरि पडिलेयां पीयूखधारा ।
कां निर्जलिचा सागरा । आला मछु ॥ ३८० ॥
नातरि रंकें निधान देखिलें । आंधलेया डोले उघडले ।
भणगाचेया आंगा आलें । इंद्रपद ॥ ८१ ॥
तैसें गुरुकुलिचेनि नावें । महासुखें थोरावे ।
जें कोडि हिं न पोटलवे । आकाशाचां ॥ ८२ ॥
पैं गुरुकुलिं ऐसी । भक्ति जेया देखसी ।
जाण ज्ञान तेया पासिं । पाइकया असे ॥ ८३ ॥
आणि अभ्यंतरिली कडे । प्रेमाचेनि पवाडें ।
श्रीगुरुचें रूपडें । उपासी ध्यानीं ॥ ८४ ॥
हृदयशुद्धिचां आवारीं । आराध्य तें धूर करी ।
मग सर्वभावेंसिं परिवारीं । आपण होए ॥ ८५ ॥
कां चैतन्याचिया पवली । माझि आनंदाचां राउलिं ।
गुरुलिंगा ढाली । ध्यानामृत ॥ ८६ ॥
उदैजतां बोधार्का । बुद्धिची डाल सात्विका ।
भरौनि दे त्र्यंबका । लाखौली तेया ॥ ८७ ॥
शुद्धि त्रिकालिं । जीवदशा धूपु जाली ।
ज्ञेयदीपें उज्वाली । निरंतर ॥ ८८ ॥

समरस्याची रससोय । अखंड अर्पीतु जाए ।
आपण भराडा होए । गुरुतें लिंगा ॥ ८९ ॥
नातरि जिवाचिये सेजे । गुरु कांतु करुनु भुंजे ।
ऐसिं प्रेमाचिं भोजें । बुद्धि वाहे ॥ ३९० ॥
कोण्ही एकीं अवसरिं । अनुरागु भरें अंतरीं ।
किं तेया नावें करी । क्षीराब्धि ॥ ९१ ॥
तेथ ध्यान बहुसुख । ते शेष तुलई निर्दोष ।
वरि जलसेनु देख । भावी गुरु ॥ ९२ ॥
वोलगती पाए । लक्ष्मी आपण होए ।
गरुड होउनु राहे । आपण चि ॥ ९३ ॥
नाभी आपण जन्मे । ऐसी गुरुमूर्त्ति प्रेमें ।
अनुभवी मनोधर्मे । ध्यानसुखें ॥ ९४ ॥
एकाधिये वेले । गुरु माये करी भावबलें ।
मग स्तन्य उत्संगिं लोले । अंका वरि ॥ ९५ ॥
नातरि गा किरीटी । चैतन्यतरूतलवटीं ।
गुरुधेनु आपण पाठिं । वत्स होए ॥ ९६ ॥
गुरुस्नेहसलीलीं । आपण होये मासली ।
कोण्ही एकी वेलीं । हें चि भावी ॥ ९७ ॥
गुरु आमृताचें वडप । आपण होये लाहालाहात रोप ।
ऐसेसे संकल्प । वियें मन ॥ ९८ ॥
चक्षुपक्षिं विण । पीलु होये आपण ।
ऐसें पैं अपारपण । आवडिचें ॥ ९९ ॥
गुरुतें पक्षिणी करी । चाराचारी चांचु वेऱ्हीं ।
गुरु तारुं कास धरी । आपण जलीं ॥ ४०० ॥
ऐसें प्रेमाचेनि थावें । ध्यान चि ध्यानातें प्रसवे ।
पूर्ण सिंधू हेलावे । सूटति जैसे ॥ १ ॥

किंबहुना इया परीं । गुरुमूर्त्ति अंतारें ।
भोगी आतां अवधारीं । बाह्य सेवा ॥ २ ॥
तरि जीवीं ऐसे आवांके । ह्मणे दास्य करीं न नीकें ।
जवं गुरु कवतिकें । माग ह्मणति ॥ ३ ॥
तैसिया साचा उपास्ती । गोसांविं प्रसन्न होंति ।
तेथ मी विनती । ऐसी करीन ॥ ४ ॥
ह्मणौनु तुमचा देवा । परिवारु आघवा ।
तेतुलीं रूपें होआवा । मीं चि एकु ॥ ५ ॥
आणि देव्हाराचिं आपुलीं । उपकरणें जेतुलीं ।
माझिं रूपें तेतुलीं । होआवीं जी ॥ ६ ॥
ऐसा मागैन वरु । तेथ हो ह्मणति श्रीगुरु ।
मग तो परिवारु । मीं चि होइन ॥ ७ ॥
उपकरणजात सकळैक । तें हिं होईन एकैक ।
मग उपास्तिचें कवतिक । देखिजैल ॥ ८ ॥
श्रीगुरु बहुतांचीं माए । परि एकलौती होउनि ठाए ।
तैसें करूनु आण वाए । कृपे तिये ॥ ९ ॥
तेया अनुरागा वेधु लावी । एकपत्नीव्रत घेववी ।
क्षेत्रसन्यासु करवी । लोभा करवि ॥ ४१० ॥
चतुर्दिक्षु वारा । न ल्हाये निगों बाहिरा ।
तैसा गुरुकृपे पांजरा । आपण चि होईन ॥ ११ ॥
आपुलेया गुणाचीं लेणीं । करीन गुरुसेवे स्वामिणी ।
हें असो होईन गवसणी । गुरुभगतीसि ॥ १२ ॥ भक्तीसि
गुरुस्नेहाची वृष्टि । मी पृथ्वी होईन तळवटीं ।
ऐसिया मनोरथांचिया शृष्टी । रची अनंता ॥ १३ ।
ह्मणे श्रीगुरुचें भवन । मी आपण होईन ।
आणि दासु होउनु करीन । दास्य तेथिचें ॥ १४ ॥

रिगतां निगतां दातारें । उल्लांडिजति उंबरें ।
ते मी होईन आणि द्वारें । द्वारपाळु ॥ १५ ॥
मी पाउवा होइन । तेया मीं चि मेळवीन ।
छत्री मी होईन । बारी मी चि ॥ १६ ॥
मी तळु उपरु ह्मणता । चवरधरु हातुदेंता ।
स्वामी पुढां बोळता । होईन मी ॥ १७ ॥
हडपु मीं वोळगैन । उगाळु मी चि घेईन ।
उळिग मी करीन । आंघोळिचें ॥ १८ ॥
होईन गुरुचें आसन । अलंकार परिधान ।
चंदनादि होईन । उपचार मीं ॥ १९ ॥
मी चि होईन सुआरु । वोगरीन उपहारु ।
आपणपें श्रीगुरु । वोवाळिन ॥ ४२० ॥
मग देउ आरोगिति । तेधवां पांतिकरु पांती ।
मीं चि होईन पुढुतीं । देईन वीडा ॥ २१ ॥
मग मी ताट काढीन । सेज मी झाडीन ।
चरणसेवा करीन । मी चि देखैं ॥ २२ ॥
सिंहासन होईन आपण । वरि श्रीगुरु करिति आरोहण ।
करीन खरेपण । उल्लगेचें ॥ २३ ॥
श्रीगुरुचें मन । जेया देईल अवधान ।
तो मी पुढां होईन । चमत्कारु ॥ २४ ॥
तेया श्रवणाचां आंगणीं । होईन शब्दाचिया क्षोणी ।
स्पर्श होईन घसणी । आंगिचिये ॥ २५ ॥
श्रीगुरुचे डोळे । अवलोकन स्नेहाळें ।
पाहांती तियें सकळें । रूपें होइन ॥ २६ ॥
तिये रसने जो रसु रुचैल । तो आप । चि होइजैल ।
गंधरूपें कीजैल । घ्राणसेवा ॥ २७ ॥

एवं बाह्यमनोगत । गुरुसेवा समस्त ।
वेंटाळूनु वस्तुजात । होउनियां ॥ २८ ॥
जवं देह असैल । तवं ऐसी सेवा कीजैल ।
मग देहांतिं नवल । बुद्धि असे ॥ २९ ॥
इये शरीरिची माती । मेळवीन तिये क्षिती ।
जेथ श्रीचरण ठाति । श्रीगुरुचे ॥ ४३० ॥
माझा स्वामी कवतिकें । स्पर्शैल जियें उदकें ।
तेथ लया नीकें । नेईन आप ॥ ३१ ॥
श्रीगुरु वोवाळिजति । कां भवनीं जिये उजळिजति ।
तेयां दीपाचेया दीप्ती । ठेवीन तेज ॥ ३२ ॥
चवरिं हान वीजणा । तेथ लयो करीन प्राणा ।
मग आंगाचा वीजणा । करीन तेथ ॥ ३३ ॥
जिये जिये अवकाशीं । श्रीगुरु असति परिवारेंसिं ।
आकाश लयाकाशीं । नेईन तिये ॥ ३४ ॥
परि जींतु मेळा न संडीं । निमिषु वायां न घडीं ।
ऐसेन गणाविया कोडी । कल्पांचिया ॥ ३५ ॥
एतुले वेन्हीं धिवंसा । जेयाचेया मानसा ।
आणि करूनि हीं तैसा । अपारु चि ॥ ३६ ॥
राति दियो नेणे । थोडें बहू न ह्मणे ।
ह्मणियांचेनि दासपणें । साजा होए ॥ ३७ ॥
तो व्यापारु एणें नावें । गगना होउनु थोरावे ।
एकला करी आघवें । एकी चि काळिं ॥ ३८ ॥
हृदयवृत्ती पुढां । आंग चि वे दवडा ।
काज करी होडा । मानसेंसीं ॥ ३९ ॥
एकाधेया वेळा । श्रीगुरुचेया खेळा ।
लोण करी सकळा । जीविताचें ॥ ४४० ॥

गुरुदास्यें कृशु । जो गुरुप्रेमें सपोसु ।
गुरुआज्ञे आवासु । आपण जो ॥ ४१ ॥
जो गुरुकुळें सकुळीनु । जो गुरुबंधुसौजन्यें सौजनु ।
जो गुरुदास्यें सव्यसनु । निरंतर ॥ ४२ ॥
गुरुसंप्रदायधर्म । ते जेया वर्णाश्रम ।
गुरुचर्या नित्यकर्म । जेयासि गा ॥ ४३ ॥
गुरु क्षेत्र गुरु देवता । गुरु माये गुरु पिता ।
जो गुरु परौता । मार्गु नेणे ॥ ४४ ॥
श्रीगुरुचें द्वार । तें जेया सर्वस्व सार ।
गुरुसेवकां सहोदर । प्रेमें भजे ॥ ४५ ॥
जेयाचें वक्त्र । वाहे गुरुनामाचे मंत्र ।
गुरुवचना वांचूनि शास्त्र । हातिं न शिवे ॥ ४६ ॥
सीतळें गुरुचरणीं । भळेतें जें पाणीं ।
तेया तीर्थें यात्रे आणीं । त्रैलोकिचीं ॥ ४७ ॥
श्रीगुरुचें उसिटें । ल्हाहे जैं अवचटें ।
तैं तेणें लाभें वीटे । समाधीसि ॥ ४८ ॥
कैवल्यसुखा साठिं । परमाणु वे किरीटी ।
उधळति पायां पाठिं । चाळतां जे ॥ ४९ ॥
हें असो सांघों केती । नाहिं पार गुरुभक्ती ।
तऱ्हीं गा क्रांतमती । कारण हें ॥ ४५० ॥
जेयां इये भक्ती चाड । जेयां इये चि विखिचें कोड ।
जो सेवे वांचूनु गोड । न मनी काहिं ॥ ५१ ॥
तो तत्वज्ञानासि ठाउ । ज्ञाना तेणें चि आवो ।
हें असो तो देउ । ज्ञानभक्तु ॥ ५२ ॥
हें जाण पां साचोकारें । तेथ ज्ञान उघडेनि द्वारें ।
नांदतसे जगा पुरे । या रीती ॥ ५३ ॥

जिये गुरुसेवा विषीं । माझा जीउ अभिलाखी ।
ह्मणौनि सोये चूकी । बोली केली ॥ ५४ ॥
एऱ्हवीं असतां हातिं खुळा । भजनअवधानीं आंधला ।
आणि चर्ये लागि पांगुला । पासौनि मंदु ॥ ९५ ॥
गुरुवर्णानिं मूका । आलसी पोसिजे फुका ।
परि आथि नीका । सानुरागु ॥ ५६ ॥
तेणें चि कारणें । हें स्थूल पोखणें ।
पडिलें मज ह्मणे । ज्ञानदेउ ॥ ५७ ॥
तरि तो बोलु उपसाहावा । वोलगे अवसरु देयावा ।
आतां ह्मणैन बरवा । ग्रंथार्थु चि ॥ ५८ ॥
तरि परियसां श्रीकृष्णु । जो भूतभारसहिष्णु ।
तो बोलतसे वितृष्णु । पार्थु आइके ॥ ५९ ॥
ह्मणे शुचित्व गा ऐसें । जेया पासिं दीसे ।
आंग मन जैसें । कापुराचें ॥ ६० ॥
कां रत्नाचें दलवाडें । तैसें सबाह्य चोखडें ।
आंतु बाहिरि एकें पाडें । सूर्यु जैसा ॥ ६१ ॥
बाहिरि कर्में क्षाळला । भीतरि ज्ञानें उजलला ।
इहिं दोहिं परिं आला । शुचित्वासि ॥ ६२ ॥
मातिया आणि जळें । बाह्य एणें मेळें ।
निर्मळां होइजे बळें । वेदांचेनि ॥ ६३ ॥
भलें तेथ बुद्धि बळीं । पैं रजें आरिसा उजळी ।
सौंदणि फेडी थिगळीं । वस्त्राचिं गा ॥ ६४ ॥
किंबहुना इया परीं । बाह्य चोख अवधारीं ।
ज्ञानदीपु अंतरीं । ह्मणौनि शुद्धु ॥ ६५ ॥
यऱ्हवीं तऱ्हीं पांडुसुता । आंतु शुद्ध नव्हतां ।
बाह्य कर्म तत्वता । विटंबु गा ॥ ६६ ॥

मृत्यु जैसा श्रिंगारिला । गर्दभु तीर्थि न्हाणिला ।
कडू दूधिया माखिला । गुळें जैसा ॥ ६७ ॥
वोसिं तोरण बांधलें । उपवासियें अन्नें माखिलें ।
कुंकुंसेंदुर केलें । कांतहीनें ॥ ६८ ॥
कलस ढिवांचे पोकल । जळो वरिचील झलाल ।
काइ करिसी चित्रफल । आंतु सेण ॥ ६९ ॥
तैसें कर्म वरिचिली कडां । न सरे थोर मोला कूडा ।
नव्हे मदिरेचा घडा । पवितृ गंगा ॥ ४७० ॥
ह्मणौनि अंतरिं ज्ञान होआवें । मग बाह्य लाभैल स्वभावें ।
वारि ज्ञान कर्मे संभवें । ऐसें कैं जोडे ॥ ७१ ॥
या लागि बाह्यविभागु । कर्मे धूतला चांगु ।
ज्ञानें फेडिला वंगु । अंतरिचा ॥ ७२ ॥
तेथ अंतरबाह्य गेलें । निर्मलत्व एक जालें ।
किंबहुना निर्वाळलें । शुचित्व चि ॥ ७३ ॥
ह्मणौनि सद्भाव जीवगत । बाहिरि दीसताति फांकत ।
स्फटिकगृहिचे डोलत । दीप जैसे ॥ ७४ ॥
विकल्पु जेणें जेणें उपजे । नाथिली विकृति निफजे ।
अन्यायवृत्तिचीं बीजें । अंकुर येंति ॥ ७५ ॥
तें आयिके अथवा भेटे । पारि मनीं काहिं नुमटे ।
मेघरंगें न घटे । व्योम जैसें ॥ ७६ ॥
यऱ्हविं इंद्रियांचेनि मेळें । विषयां वरि लोळे ।
पारि विकाराचेनि विटाळें । सिंपिजे ना ॥ ७७ ॥
भेटलिया नारी । चोखी अथवा माहारी ।
तेथ नातलती परी । राहाटों जाणे ॥ ७८ ॥
कां पति–पुत्रातें आलंगी । एकें चित्तें तन्वंगी ।
तेथ पुत्रभावाचां आंगीं । न लगे चि कामु ॥ ७९ ॥

तैसें हृदय चोख । संकल्पविकल्पीं सनोलख ।
कृत्याकृत्य विशेष । फुडें जेया ॥ ४८० ॥
पाणियें हीं रान भीजे । आधणिं हरलु न सिजे ।
तैसी विकल्पजातीं न सिंपिजे । मनोवृत्ती ॥ ८१ ॥
तेया नावं शुचित्व्पण । पार्था गा संपूर्ण ।
हें देखसी तेथ जाण । ज्ञान असे ॥ ८२ ॥
आणि स्थिरता साचे । घर रिगाली जेयाचें ।
तो पुरुषु ज्ञानाचें । आयुष्य गा ॥ ८३ ॥
देह तरि वरिचिली कडे । आपुलेया पारि हींडे ।
पारि बैसिक न मोडे । मानसाची ॥ ८४ ॥
वत्सा वरौनि धेनुचें । स्नेह राना न वचे ।
न येंति भोगुं सतियांचें । प्रेमभोग ॥ ८५ ॥
कां लेभिया दूरि जाये । पारि जीउ ठेवां चि आहे ।
तैसा देह चालितां नोहे । चळु चित्ता ॥ ८६ ॥
धावंतेया अभ्रा सवें । आकाश जैसें न धवे ।
भ्रमण—चक्रीं न भंवे । जैसा ध्रुवु ॥ ८७ ॥
पथिकांचिया एरिझारा । सवें एणेंजाणें धनुर्द्धरा ।
नाहिं जेवि तरुवरां । पथींचियां ॥ ८८ ॥
तैसा चलनवलनात्मकिं । असौनि इये पंचभौतिकिं ।
भूतउर्मीं एकी । चालिजे ना ॥ ८९ ॥
वांहुटलिचेनि ब्ळें । पृथ्वी जैसी न ढळे ।
तैसा उपद्रवधुमाळें । न लोटे जो ॥ ९० ॥
दैन्यदुःखें न तपे । भयशोकें न कंपे ।
देहमृत्यू न वासिपे । पातलेयां ॥ ९१ ॥
आर्तिआशपडिभरें । विविधव्याधिगजरें ।
उजू असतां पाठिमोरें । नव्हे चित्त ॥ ९२ ॥

निंदा निस्तेज दंडीं । कामलोभ वरिपडी ।
लोम नव्हे वांकुडी । मानसाची ॥ ९३ ॥
आकाश हें ओसरो । पृथिवी वर वीरो ।
परि नेणे मोहरों । चित्तवृत्ती ॥ ९४ ॥
हाथि हाला फुलिं । पासिवणें जेवि न घली ।
तैसा नोहोटे दुर्वाक्यसेलीं । सेलिला सांता ॥ ९९ ॥
क्षीरार्णवाचां कल्लोलिं । नाहिं कंपु मंदराचालिं ।
आकाश न जले जालिं । वणवेयाचां ॥ ९६ ॥
तैसा आला गेला उर्मीं । नाहिं गजबज मनोधर्मिं ।
किंबहुना धीरु क्षमिं । कल्पांति हिं ॥ ९७ ॥
पैं स्थैर्य ऐसी भाष । बोलिजे सविशेष ।
ते हे दशा देख । देखणेयां ॥ ९८ ॥
हें स्थैर्य निजगडें । जेथ आंगें जीवें जोडे ।
तो ज्ञानाचें उघडें । निधान जाण ॥ ९९ ॥
आणि इसालु जैसा घरा । कां दंदिया हातियरा ।
न विसंबे भांडारा । बद्धकु गा ॥ ५०० ॥
एकलौतेया बालका । वरिपडौनि असे अंबिका ।
कां मधुविषिं मधुमक्षिका । लोभिणि जैसी ॥ १ ॥
अर्जुना तिया परिं । अंतष्करणा जतन करिं ।
नेदि उभें ठाकों द्वारीं । इंद्रियाचां ॥ २ ॥
ह्मणे कामु हा आइकैल । हे आशसेयाचि देखैल ।
तरि जीवा कडे ढूंकैल । ह्मणुनि भेदु ॥ ३ ॥
बाहिरि धिटे जैसी । दाटुगा पति कलासी ।
करी टेहणी तैसी । प्रवृत्तीसि ॥ ४ ॥
सतेचेनि वाणिपणें । देहा सकट आटणें ।
संयमा वरि करणें । बुजुनु घाली ॥ ५ ॥

मनाचां महाद्वारिं । प्रत्याहाराचे ठाणांतरिं ।
यमदम शरीरीं । जागवी उभे ॥ ६ ॥
आधारिं नाभिकंठिं । बंधत्रयाची घरटी ।
चंद्रसूर्यसंपुटीं । सुये चित्त ॥ ७ ॥
समाधिचिये सेजेपासिं । बांधौनि घाली ध्यानेंसिं ।
समरसिं करणासिं । अंतरातें ॥ ८ ॥
आगा अंतष्करणनिग्रहो जो । तो हा पैं जाणिजो ।
हा आथि तेथ उदोजो । ज्ञानाचा पैं ॥ ९ ॥
जेयाची आज्ञा आपण । सिरिं वाहे अंतष्करण ।
मनुष्याकारें जाण । ज्ञान चि तो ॥ ५१० ॥

**इंद्रियार्थेषु वैराग्यमनहंकार एव च ।**
**जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनं ॥ ८ ॥**

आणि विषयविखिं । वैराग्याची नीकी ।
पुरवणी मानसिकिं । जेयातें आथि ॥ ११ ॥
वमिलेया अन्ना । लाळ न घोंटी रसना ।
आंग न सुवे आंलिंगना । प्रेताचिया ॥ १२ ॥
विष खाणें नांगवे । जळतां घरिं न रिगवे ।
व्याघ्रविवरा न वचवे । वस्ती जेवि ॥ १३ ॥
धडाडिते लोहरसिं । उडी न घलवे जैसी ।
न करवे उसिसी । अजगराची ॥ १४ ॥
अर्जुना तेणें पाडें । विषया वार्त्ता नावडे ।
नेंदी इंद्रियांचेनि तोंडें । काहिं चि जाऊं ॥ १५ ॥
जेयाचां मनिं आलस्य । देहिं अतिकारिष्य ।
यमदमेंसिं समरस्य । जेयासि ॥ १६ ॥
तपोव्रतांचा मेळावा । जेयाचां ठांइं पांडवा ।
युगांतु जेया गावां । आंतु एतां ॥ १७ ॥

बहु योगाभ्यासिं हावं । राना कडे धाव ।
न साहे जो नावं । सांघाताचें ॥ १८ ॥
नाराजाचिं आंथुरणें । पूयपंकिं लोळणें ।
तैसी लेखी भोगणें । इहिकिचें ॥ १९ ॥
स्वर्गातें मानसें । आइकौनि मानी ऐसें ।
कुहिलें पिशित जैसें । श्वानाचें ॥ ५२० ॥
हें तें विषयवैराग्य । जें आत्मलाभाचें भाग्य ।
येणें ब्रह्मानंदा योग्य । होति जीव ॥ २१ ॥
ऐसा उभयभोगुत्रासु । देखसी जेथ बहुवसु ।
तेथ जाण रहिवांसु । ज्ञानाचा असे ॥ २२ ॥
आणि सचाडाचिया परी । इष्टापूर्त करी ।
परि केलेपण शरीरीं । उरों नेदी ॥ २३ ॥
वर्णाश्रमपोषकें । कर्मे नित्यनैमित्यकें ।
तेयां माझि काहिं न ठके । आचरतां ॥ २४ ॥
परि हें मियां केलें । कां हें माझेनि जालें ।
ऐसें नाहिं ठेविलें । वासने माझि ॥ २५ ॥
जैसें अवचितेपणें । वायूसि विचरणें ।
निराभिमानीं उदैजणें । सूर्याचें ॥ २६ ॥
कां श्रुति सदा बोले । गंगा काजें विण चाले ।
तैसें अवष्टंभहीन भलें । वर्त्तन जेयाचें ॥ २७ ॥
रुतुकाळिं तारि फळति । परि फळलों हें नेणति ।
तेया वृक्षांचिया ऐसी वृत्ती । कर्मिं सदा ॥ २८ ॥
एवं मनिं कर्मे बोलिलिं । जेथ अहंकारा उखी जाली ।
एकावळिएची काढिली । दोरी जैसी ॥ २९ ॥
संबंधें विण आकाशीं । अभ्रें असति आपैसिं ।
देहिं कर्मे तैसीं । जेयासि गा ॥ ५३० ॥

मद्यपा आंगिचें वस्त्र । कां लेपा हातिचें शस्त्र ।
नातरि बैला वरि शास्त्र । बांधलें असे ॥ ३१ ॥
तेणें पाडें देहीं । आहें हे से चि नाहिं ।
निरहंकारता पाहिं । तेया नावं ॥ ३२ ॥
हें संपूर्ण जेथ दीसे । तेथ गा ज्ञान असे ।
इयें विखिं अनारिसें । बोलों न ये ॥ ३३ ॥
आणि जन्म मृत्यु दुःखें । व्याधि वार्धक्य कलुषें ।
यें आंगा न यंतां देखे । दूरौनि जो ॥ ३४ ॥
साधकु विंवंसिया । कां उपसर्गें योगिया ।
पावे उणेया पुरेयां । वोथंबा जेवि ॥ ३५ ॥
वैर जन्मांतरिचें । सापा मनौनि न वचे ।
तेवि अतीतां जन्मांचें । उणें वाहे ॥ ३६ ॥
डोलां हरलु न थरे । घाइं शोल्ल न जिरे ।
तैसें कालिचें न विसरे । जन्मदुःख ॥ ३७ ॥
ह्मणे पूयगर्त्ते रिगालां । मूत्ररंध्रौनि निगालां ।
कटारे मियां चाटिला । कुचस्वेदु ॥ ३८ ॥
ऐसिया ऐसिया परीं । जन्माचा कांटाला धरी ।
आतां तें करीं । जेणें नोहे ॥ ३९ ॥
हारि उमचावेया । जुंवारु ये डाया ।
कां वैरा बापिकेया । पुत्र जचे ॥ ५४० ॥
मारिलेयाचेनि रागें । पाठिचा सूड मागे ।
तेणें आक्षेपें लागे । जन्मा पाठिं ॥ ४१ ॥
परि जन्मांतिं जे लाज । न संडी तेयाचें निज ।
संभाविता निस्तेज । न साहे जैसें ॥ ४२ ॥
आणि मृत्यु पुढां आहे । तो चि कल्पांतिं कां पाहे ।
परि आजिचि होये । सावधु जो ॥ ४३ ॥

माझि अथाउं ह्मणतां । थडिये चि पांडुसुता ।
पव्हणारु आइता । काशि जेवि ॥ ४४ ॥
कां न पवतां रणाचा ठाऊ । सांभाळिजे जैसा आवो ।
वोडण सूयिजे जैसा घावो । न लगतां चि ॥ ४५ ॥
पाहेचा पेणा वाटवंधां । तवं आजि चि होइजे सावधां ।
जीउ न निगतां ओखदा । धांविजे जेवि ॥ ४६ ॥
यऱ्हवि ऐसें केवि घडे । जो जळतां घरिं सांपडे ।
तो न पवाडे । कुहां खणों ॥ ४७ ॥
चोंढिये पाथरु गेला । तैसेनि जो बुडाला ।
तो बोंबे सकट मूकला । कोण सांवे ॥ ४८ ॥
ह्मणुनु समर्थेंसि वैर । जेया पडे हाडकाइर ।
तो जैसा आठे पाहार । परजुनु चि असे ॥ ४९ ॥
नातरि केळवली नोवरी । संन्यासी कां जेया परिं ।
तैसी न मरतां करी । मृत्युसूचना ॥ ५५० ॥
पैं गा जो इया परिं । जन्में चि जन्म निवारी ।
मरणें चि मृत्यु मारी । आपण उरे ॥ ५१ ॥
तेयातें घरिं ज्ञानाचें । सांकडें नाहिं साचें ।
जेया जन्ममृत्युचें । ह्रदइं शल्य ॥ ५२ ॥
आणि तेया चि परीं जरा । न टेंकतां शरीरा ।
तारुण्याचिया भरा । माझि देखे ॥ ५३ ॥
ह्मणे आजिचां अवसरिं । पुष्टि जे हे शरीरिं ।
ते पाहे होईल काचरी । सिजळी जैसी ॥ ५४ ॥
निदैवांचे व्यवसाये । तैसे ठाकति हातपाए ।
अमंत्रिया राज्याची परि होये । बळासिया ॥ ५५ ॥
फुलाचेया भोगा । लागि प्रेम दांगा ।
तें कऱ्हेयाचा गुडगा । तैसें होइळ ॥ ५६ ॥

बोढालाचां खुरिं । आखरु आते बुरीं ।
तैसी दशा माथें श्रवण वरि । सव लेहें ॥ ५७ ॥
पद्मदलेंसिं इसालें । मांडताति हे डोळे ।
ते होतील पडवळें । पीकलीं तैसीं ॥ ५८ ॥
भवैंचि पडलें । वोमथती सिनसालें ।
उरु कुहिजैल जलें । आंसुवांचेनि ॥ ५९ ॥
जैसें बाबुलेंचें खोड । गिरबडूनि जाति सरड ।
तैसें पिचडिं तोंड । सरांडैल ॥ ५६० ॥
रांधवण वोलि पुढें । पन्हिवे वाहाति खाताडें ।
तैसिं होति नाकाडें । बिडिबिडितील ॥ ६१ ॥
तांबोलें वोंठ राउं । हांसतां दांत दाउं ।
सनागर मिरउं । बोली जेणें ॥ ६२ ॥
तेयाचिया तोंडा । येर जलंबाचा लोंढा ।
हरडी उमलैल दाढा । दांतेंसिं जाण ॥ ६३ ॥
कुलवाडि जैसी खेटली । कां वाकडिया ढोरें बैठलि ।
तैसी नूठील काहिं केली । जीभ हें ॥ ६४ ॥
कुसलें कोरडिं । वारेंनि जांति बरडी ।
तैसी आपल्य तोंडी । दाढियेसि ॥ ६५ ॥
आशाढिचेनि जलें । जैसिं झिरपांति मौलें ।
तैसें खांडेहूनि लाले । पेटति पुर ॥ ६६ ॥
वाचेसि अपवाडु । कानासि अनुघाडु ।
पिंडु गरुवा मांकडु । होईल हा ॥ ६७ ॥
तणाचें बुजवणें । आंदोले वारें गुणें ।
तैसें येईल कांपणें । सर्वांगासि ॥ ६८ ॥
पायां पडति वेंगडीं । हात होंति मुरुकुंडी ।
बरवेपण बागडीं । नाचवील हे ॥ ६९ ॥

मलमूत्रद्वारें । होउनि ठांति खोंकरें ।
नवसियें सूंति येरें । माझां निधनिं ॥ ५७० ॥
देखौनि थूंकील जगु । मरणाचा पडैल पांगु ।
सोइरियां उभगु । होईल माझा ॥ ७१ ॥
स्त्रिया ह्मणति विंवंसी । बालें जाति मुर्सि ।
किंबहुना चिलसी । पात्र होइन ॥ ७२ ॥
उभलिचा उजगरा । सेजियां साइलेयां घरा ।
सिंणवी ह्मांतारा । बहुतांतें हा ॥ ७३ ॥
ऐसी वृद्धाप्याची खोंचणी । आपणेया तरुणपणिं ।
देखों देखों आणि । मग जो वीटे ॥ ७४ ॥
ह्मणे पाहे हें होइल । आतांचि भोगितां जाइल ।
मग काइ उरैल । हितालागि ॥ ७५ ॥
ह्मणुनि नाइकणें पावे । तवं आइकौनि घाली आघवें ।
पंगु नव्हतां जावें । नीकेया स्थाना ७६ ॥
दीठि जवं जाये । तवं पाहावें तेतुलें पाहे ।
मूकत्वा आधिं धाये । सुभाषितिं ॥ ७७ ॥
हात होतील खुलें । हें पुढैल मोटकें कले ।
तवं करुनि घाली सकलें । दयादिकें ॥ ७८ ॥
मन होइल वेडें । ऐसिये दशे पुढें ।
चिंतौनि ठेवी चोखडें । अदृष्ट जो ॥ ७९ ॥
जैसें चोर पाहे झोंबती । तवं आजी चि रुसिजे संपत्ती ।
झांकाझांकि कीजे वाति । न वचतांचि ॥ ५८० ॥
तैसें वृद्धाप्यें थावें । मग जें वायां जावें ।
तें आपणेयां आघवें । सोवतें करी ॥ ८१ ॥
आतां मोडुनु वसविलिं दुर्गें । कां वलित धरिलें खगें ।
तेथ उफकेन जो रिगे । तो नांगवला ॥ ८२ ॥

तैसें वृद्धाप्य होये । आलेपणें वायां जाये ।
जें तो शतवृद्धु आहे । नेणों कैंचा ॥ ८३ ॥
झाडिलिं कोलें झाडी । तेया न फले चि जेवि बोंडिं ।
जाला आगि तरि राखोंडी । जाळील काइ ॥ ८४ ॥
ह्मणुनि वृद्धाप्याचेनि आठवें । वृद्धाप्यें जो न नगवे ।
तेयाचां ठांइं जाणावें । ज्ञान आहे ॥ ८५ ॥
तैसेचि नाना रोग । पडिघांति पुढां आंग ।
तवं आरोग्यतेचे उपेग । करुनि घाली ॥ ८६ ॥
सांपाचां तोंडिं । जे पडिलें सकूडी ।
ते लाउनियां सांडी । बुद्धिवंत ॥ ८७ ॥
तैसा वियोगु जेणें दुःखें । विपत्ति शोकु पोखे ।
तें स्नेह सांडौनि सुखें । उदासु जो होए ॥ ८८ ॥
आणि जेणें जेणें कडे । दोष सूंतील तोंडें ।
तिये कर्मरंध्रीं गुंडे । नियमाचे दाटी ॥ ८९ ॥
ऐसीऐसीया आइती । जेयाची परि असती ।
तो ज्ञानसंपत्ती । गोसांवि गा ॥ ५९० ॥

**असक्तिरनभिष्वंगःपुत्रदारगृहादिषु ।**
**नित्यं च समचित्तत्वमिष्टानिष्टोपपत्तिषु ॥ ९ ॥**

आतां आणिक ही एक । लक्षण अलौकिक ।
सांघैन आइक । धनंजया ॥ ९१ ॥
तरि गृहपरिग्रहावरि । उदासु इया परिं ।
उखिता जैसा बिढारीं । बैसविला असे ॥ ९२ ॥
कां झाडांची साउली । वाटे जांतां मिनली ।
घरावरि तेतुली । आस्था जेया ॥ ९३ ॥
साउली सरिसी चि असे । परि असो हें नेणिजे जैसें ।
स्त्रियेचें तैसें । लागतें जेया ॥ ९४ ॥

आणि प्रजा जे जाली । ते वसती चि कीर आली ।
कां गोरुवें बैसलीं । रुंखातलिं ॥ ९५ ॥
जो संपती माजि असतां । ऐसा गमे पांडुसुता ।
जैसा कां वाटे जाता । साक्षी ठेविला ॥ ९६ ॥
किंबहुना पूंसा । पांजरेया माझि जैसा ।
वेदाज्ञेसि तैसा । भीउनु असे ॥ ९७ ॥
यऱ्हविं दारां गृहपुत्रीं । नाहिं जेयाची मैत्री ।
तो जाण धात्री । ज्ञानाची गा ॥ ९८ ॥
आणि माहासिंधु जैसा । ग्रीष्मवर्षा सरिसा ।
इष्टांनिष्टां तैसां । जेयाचां ठांइं ॥ ९९ ॥
कां तीन्ही काळ होंतां । त्रिधा न्हवे चि सविता ।
तैसा सुखदु:खि चित्ता । भेदु नाहिं ॥ ६०० ॥
जेथ नभाचेनि पाडें । समत्वा उणें न पडे ।
तेथ गा ज्ञान जोडें । जातखेऊं ॥ १ ॥

**मयि चानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी ।**
**विविक्तदेशसेवित्वमरतिर्जनसंसदि ॥ १० ॥**

आणि मी वांचुनु काहिं । गोमटें जेया नाहिं ।
ऐसा समो तिहिं । निश्चयाचा केला ॥ २ ॥
शरीर वाचा मानस । पियालीं कृतनिश्चयाचे कोश ।
एक मी वांचूनि वास । न पाहवेया ॥ ३ ॥
किंबहुना निज । जेयाचें जालें मज ।
जेणें आपणेयां आह्मां सेज । येकि केलि ॥ ४ ॥
रिगतां वल्लभापुढें । नाहिं जीविं सांकडें ।
तिये कांतेचेनि पाडें । एकसरे जो ॥ ५ ॥
मिळौनि मिळत चि असे । समुद्रिं गंगापय जैसें ।
मी होउनि मातें तैसें । सर्वस्व दे ॥ ६ ॥

सूर्याचां होणां होइजे । सूर्यासवें जाइजे ।
हें विकलेपण साजे । प्रभे जेवि ॥ ७ ॥
पैं पाणियांचिये भूमिके । पाणी चि तळपे कवतिकें ।
ते लहरी म्हणति लौकिकें । यन्हवीं पाणी चि तें ॥ ८ ॥
जो अनन्यु तियापरी । मी जाला हिं मातें वरी ।
तो ते मूर्त्ति धरीं । ज्ञानाची येथ ॥ ९ ॥
आणि तीर्थें तटें । तपोवनें चोखटें ।
आवडति कपाटें । वसों जिया ॥ ६१० ॥
शैलकक्षाचीं कंदरें । जळाशय परिकरें ।
अधिष्ठी जो आदरें । नगरा न ए ॥ ११ ॥
बहू ऐकांतावरि प्रीति । जेया जनपदाची खंती ।
जाण मानुषी मूर्त्ति । ज्ञान चि तो ॥ १२ ॥
आणिक ही पुढुतीं । चिन्ह गा सुमती ।
ज्ञानाचिये निरुती । लागी सांघों ॥ १३ ॥

**अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्वज्ञानार्थदर्शनं ।**
**एतज्ज्ञानमिति प्रोक्तमज्ञानं यदतोन्यथा ॥ ११ ॥**

तरि परमात्मा ऐसें । जें एकि वस्तु असे ।
तें जेया असे । ज्ञानातव ॥ १४ ॥
तें एक वांचूनि आनें । जियें भवस्वर्गादि ज्ञानें ।
तें अज्ञान ऐसें मनें । निश्चयो करी ॥ १५ ॥
स्वर्गु जीणावा हें सांडी । भवविषिं काम अडी ।
दे अध्यात्मज्ञानिं बुडी । सद्भावेंसिं ॥ १६ ॥
भंगलिये वाटे । शोधूनियां अव्हांटे ।
निगिजे जेवि नीटें । राजपंथें ॥ १७ ॥
तैसें अज्ञानजात करी । पण आववेंचि एकीकडे सारी ।
मग मन बुद्धि मोहरी । अध्यात्मज्ञानिं ॥ १८ ॥

ह्मणे हें चि एक आथि । एर जाणणें ते भ्रांति ।
ऐसा निष्कर्षीं मति । मेरु होये ॥ १९ ॥
येवं निश्चयो जेयाचा । द्वारिं अध्यात्मज्ञानाचा ।
ध्रुवो देवो गगनिचा । तैसा राहला ॥ ६२० ॥
तेयाचां ठांइं ज्ञान । या बोला ह्मणसी व्यवधान ।
जें ज्ञानिं बैसलें मन । तेव्हां चि तो तें ॥ २१ ॥
तरि बैसलेपणें जें होये । तें बैसतां चि वेळिं नोहे ।
तऱ्हीं ज्ञाना तेया आहे । सरिसा पाडु ॥ २२ ॥
आणि तत्वज्ञान निर्मळ । विये जें एक फळ ।
ते ज्ञेय हिं वरि सरळ । दीठि जेयाची ॥ २३ ॥
यऱ्हविं बोधा आलेनि ज्ञानें । जरि ज्ञेय न दिसे चि मनें ।
तरि ज्ञानलाभु ही न मने । जाला सांता ॥ २४ ॥
आंधळेनि हातिं दिवा । घेउनि काये करावा ।
तैसा ज्ञाननिश्चयो आघवा । वायां जाए ॥ २५ ॥
परि ज्ञानाचेनि प्रकाशें । परतत्विं दीठि जैं बैसे ।
ते स्फूर्त्ति असे । अंध होउनि ॥ २६ ॥
ह्मणुनि ज्ञान जेतुलें दावी । तेतुली वस्तु अघवी ।
देखे ऐसी होआवी । बुद्धि चोख ॥ २७ ॥
या लागि ज्ञानें निर्दोषें । दाविलें ज्ञेय देखे ।
तैसेनि उन्मेखें । आथिला जो ॥ २८ ॥
जेवढी ज्ञानाची उधि । तेव्हडी चि तेयाची बुद्धि ।
तो ज्ञान हे शाद्धि । करणें न लगे ॥ २९ ॥
पैं ज्ञानाचिये प्रभे सवें । जेयाची मति पावे ।
हातधरणियां सींवे । परतत्वातें ॥ ६३० ॥
तो चि ज्ञान हे बोलतां । विस्मो कोणु पांडु सुता ।
कां सवितेयातें सविता । ह्मणावें असें ॥ ३१ ॥

तवं श्रोतां ह्मणितलें असो । न संधें देवाचा अतिसो ।
ग्रंथउत्कंठे आडसो । घालिली कां ॥ ३२ ॥
तूझा हा चि आह्मां थोरु । वगतृत्वाचा उपकारु ।
जे ज्ञानविषो फारु । उपदेशिला ॥ ३३ ॥
रसु न व्हावा अतिमात्रु । हा धेतासि केवि मंत्रु ।
तरि अबंतुनु शत्रु । करितासि गा ॥ ३४ ॥
ठांइं बैसतिये वेळे । जें रससोयें घेउनि पळे ।
तियेंचा येरु वोडौ मिळे । कोणा अर्था ॥ ३५ ॥
आघवा चि विर्षि भादि । परि सांजवणी टेंकों नेंदी ।
ते खुरथोडी नसुधी । पोसी कवण ॥ ३६ ॥
तैसी ज्ञानें मति न फांके । येरें जल्पति नेणों केतुकें ।
परि तें असो नीके । केलें तुवां ॥ ३७ ॥
जेया ज्ञानलेसादोसें । कीजति योगातिसायासें ।
तें धणिचें आणि तूझेया ऐसें । केलें निरोपण ॥ ३८ ॥
अमृताची सातवाकडी । लागो कां अनुवाडी ।
सुखाचे दीस कोडी । गणिजतु कां ॥ ३९ ॥
पूर्णचंद्रेंसि राति । युग एक असौनि पांति ।
तरि काय पाहातांति । चकोर ते ॥ ४० ॥
तैसें ज्ञानाचें बालणें । आणि येणें रसालपणें ।
आतां पुरे कोण ह्मणे । आकर्णितां ॥ ४१ ॥
आणि सभाग्यु पाहुणा ये । सुभगाची वाढती होये ।
तैं सरों न ये रससोए । ऐसें आथि ॥ ४२ ॥
तैसा घडला प्रसंगु । ज्ञानि आह्मां लागु ।
आणि तुज ही अनुरागु । आथि येथ ॥ ४३ ॥
ह्मणौनि यया वाखाणा । पाठि सेइली चौगुणा ।
ना ह्मणों न येसि देखणा । होंसि ज्ञानी ॥ ४४ ॥

तरि आतां या वरि । प्रश्नेचा माजु धरिं ।
पद साहसिं करी । निरोपण ॥ ४५ ॥
या संतवाक्या सरिसें । जी म्हणितलें निवृत्तिदासें ।
माझें हीं जी ऐसें । मनोगत ॥ ४६ ॥
या वरि आतां तुम्हीं । आज्ञापिलां स्वामी ।
तरि वायां चि वाग्मी । वाढों नेंदी ॥ ४७ ॥
एवं यें अवधारा । ज्ञानलक्षणें अठरा ।
श्रीकृष्णें धनुर्द्धरा । निरोपिलिं ॥ ४८ ॥
मग म्हणे या नावें । ज्ञान येथ जाणावें ।
हें स्वमतें आघवें । ज्ञानिये म्हणति ॥ ४९ ॥
करतळा वरि वाटुळा । डोलत देखिजे जेवि आवळा ।
तैसें ज्ञानें डोळां । आम्हिं दाविलें तुज ॥ ६५० ॥
आतां जैं महामती । अज्ञान ऐसी वदंती ।
ते ही सांघों व्यक्ती । लक्षणीं गा ॥ ५१ ॥
यऱ्हावीं ज्ञान फुडें जालेयां । अज्ञान जाणवे धनंजया ।
जें ज्ञान नव्हे तें आपैसेया । अज्ञान चि ॥ ५२ ॥
पाहे पां देउ आघवा चि सरे । मग रात्री चि वोवि उरे ।
वांचूनु काहिं तिसरें । नाहिं जेवि ॥ ५३ ॥
तैसें ज्ञान जेथ नाहिं । तें चि अज्ञान पाहिं ।
तरि सांघों काहिं काहिं । चिन्हें तियें ॥ ५४ ॥
तरि संभावने जियें । जो मानाची वाट पाहे ।
सत्कारें होये । तोषु जेया ॥ ५५ ॥
गर्वें पर्वताचिं सिखरें । तैसा महत्वा वरौनि नुतरे ।
तेयाचां ठांइं पुरें । अज्ञान असे ॥ ५६ ॥
आणि स्वधर्माची मागवेलि । बांवे वाचेचा पिंपलिं ।
उभिला जैसा देउळिं । जाणौनि कुंचा ॥ ५७ ॥

घाली विद्येचा पसारा । सुये सुकृताचा डांगोरा ।
करी तेतुलें मोहरा । स्फीतीचिया ॥ ५८ ॥
आंग वरि चर्ची । जनातें वंची ।
तो जाण अज्ञानाची । खाणी येथ ॥ ५९ ॥
आणि वन्हि वनिं विचरे । तेथ जळति जैसिं स्थावरें ।
तैसें जेयाचेनि आचारें । जगा दुःख ॥ ६६० ॥
कवतिकें जें जल्पे । तें साबळाहुनु रूपे ।
विषाहुनु संकल्पें । मारकु जो ॥ ६१ ॥
तेयातें बहू अज्ञान । अज्ञानाचें चि निधान ।
हिंसेसि आयतन । जेयाचें जीणें ॥ ६२ ॥
आणि फूंके भाति फुगे । रेचिली सवें चि उफगे ।
तैसा संयोगवियोगें । चढे वोहटे ॥ ६३ ॥
पडिली वारेयाचा वळसां । धूळि चढे आकाशा ।
हरिषा वळघे तैसा । स्तुतिवेळे ॥ ६४ ॥
निंदा मोटकी आइके । आणि कपाळ धरूनि ठाके ।
थेंबें विरे वारेनि शोके । चिखलु जैसा ॥ ६५ ॥
तैसा मानापमानिं होये । जो कोण्ही उर्मी न साहे ।
तेयाचां ठांइं आहे । अज्ञान पुरें ॥ ६६ ॥
आणि जेयाचां मनिं गांठि । वरि मोकली वाचा दीठि ।
आंगें मीतलें जीवें पाठि । भलेतेया दे ॥ ६७ ॥
व्याधाचें चारा घालणें । तैसें प्रांजळ जोगावणें ।
चांगाचें अंतष्करणें । वीरू करी ॥ ६८ ॥
गार सेवाळें गुंडाळली । कां निंबोली जैसी पीकली ।
तैसी जेयाची भली । बाह्य क्रिया ॥ ६९ ॥
अज्ञान तेयाचां ठांइं । ठेविलें असे पाहिं ।
या बोला आन नाहिं । सत्य माझें ॥ ६७० ॥

आणि गुरुकुलें जो लाजे । गुरुभक्ती उभजे ।
विद्या घेउनु माजे । गुरुसी चि ॥ ७१ ॥
तेयाचें नावं घेणें । तें वाचेसि शूद्रान्न होणें ।
परि घडलें लक्षणें । बोलतां इयें ॥ ७२ ॥
आतां गुरुभक्ताचें नावं घेऊं । तें चि वाचेसि प्रायश्चित्त देऊं ।
गुरुसेवकु पाहों । सूर्यु हा ॥ ७३ ॥
एतुलेनि लागु पापाचा । निस्तरैल हे वाचा ।
जो गुरुलोपकाचा । पापिं घडला ॥ ७४ ॥
हा ठाऊ वरि । तेया नावांचें भय हरी ।
मग ह्मणे अवधारीं । आणिकें चिन्हें ॥ ७५ ॥
आंगें कर्मा ढीला । जो मनें विकल्पें भरला ।
अडविचा अवगलला । कुहा जैसा ॥ ७६ ॥
तेया तोंडि कांटियडें । आंतु नसुदिं हाडें ।
अशुचि तेणें पाडें । सबाह्य जो ॥ ७७ ॥
जैसें पोट पोसी सुणें । उघडें झांकलें न ह्मणे ।
तैसें आपुलें परावें नेणे । द्रव्या लागि ॥ ७८ ॥
या ग्रामकोलाचां ठाइं । जैसा मिलणी ठाऊ नाहिं ।
तैसा स्त्रीविषइं कांहिं । विचारीना ॥ ७९ ॥
कर्माचा वेलु चूके । कां नित्यनैमित्यक ठाके ।
तें जेया न दूखे । जीवा माझि ॥ ६८० ॥
पापिं जो निसुगु । पुण्यि अति निलागु ।
जेयाचा मनिं वेगु । विकल्पाचा ॥ ८१ ॥
तो जाण निखला । अज्ञानाचा पूतला ।
जो बांधौनि असे डोलां । विन्यासातें ॥ ८२ ॥
आणि स्वार्थें अलुमालें । जो धीरापासौनि चले ।
जैसें तृणबीज बलें । मुंगियेचेनि ॥ ८३ ॥

पावो सूदलेया सर्वे । थिल्लर जैसें कालवे ।
तैसें भयाचेनि नावें । गजबजे जो ८४ ॥
वायुचेनि अनुवावें । धूं दिगंत वेन्हीं जाये ।
दुःखवार्त्ता होये । तैसें जेया ॥ ८५ ॥
मनोरथांचा धारसां । वाहवणें जेयाचेया मानसा ।
पुरीं पडला जैसा । दूधिया कां ॥ ८६ ॥
वाउधणाचिया परी । जो आश्रयो केहीं न धरी ।
क्षेत्रिं तीर्थीं पुरीं । थारों नेणे ॥ ८७ ॥
मातलेया सरडा । पुडुतिं बूढ पुडुतीं सेंडा ।
हिंडणवारा कोरडा । तैसा जेया ॥ ८८ ॥ री | शेंथ
जैसा रोविलेयां उर्णे । रांजणु बैसों नेणे ।
तैसा पडे तरि राहाणें । यन्हविं हींडे ॥ ८९ ॥
तेयाचां ठांई उद्दंड । अज्ञान असे उघड ।
जो चांचल्यें भावंड । मर्कटाचें ॥ ६९० ॥
आणि पैं धनुर्द्धरा । जेयाचेया अंतरा ।
नाहिं वोढा वारा । संयमाचा ॥ ९१ ॥
लेंडिये आला लोंढा । न मनी वालुवेचा वरंडा ।
तैसा निषेधाचेया तोंडा । भिये ना जो ॥ ९२ ॥
व्रतातें आडमोडी । धर्माचे पाये उपडी ।
नियमाची आश तोडी । जेयाची क्रिया ॥ ९३ ॥
नाहिं पापाचा कांटाळा । नेंदी पुण्यासि जीवाला ।
लाजेचा पेंडवला । खणौनि घाली ॥ ९४ ॥
कुलेंसि पाठिमोरा । वेदाज्ञेसि दुन्हा ।
कृत्याकृत्यव्यापारा । निवाडु नेणे ॥ ९५ ॥
वसो जैसा मोकटु । वारा जैसा अफांटु ।
फुटला जैसा पाटु । निरंजनीं ॥ ९६ ॥

आंधळें हातिरु मातलें । कां डोंगरीं जैसें पेटलें ।
तैसें विषइं लागलें । चित्त जेयाचें ॥ ९७ ॥
पैं उघडा काय न पडे । मोकाटु कोणां नांतुडे ।
गावंदारिचें आडें । नोलांडी कवण ॥ ९८ ॥
जैसें सत्रीं अन्न जालें । कां सामान्या बीक आलें ।
वाणसिये उभलें । कोण न रिगे ॥ ९९ ॥
तैसें जेयाचें अंतःकरण । तेयाचां ठांइं संपूर्ण ।
अज्ञानाची जाण । रिद्धि असे ॥ ७०० ॥
आणि विषयांची गोडी । जो जींत मेला न संडी ।
स्वर्गीं हिं खावेया जोडि । येथौनि चि ॥ १ ॥
जो अखंड भोगा जचे । जेया व्यसन कामक्रियेचें ।
मुख देखौनि विरक्ताचें । सचैल करी ॥ २ ॥
विषो शीणौनि जाए । पारि न सिणे सावधु नोहे ।
जेणें कुहिला हातें चि खाये । कोढी जैसा ॥ ३ ॥
खरी टेंकों नेदी उडे । लातौनि फोडी नाकाडें ।
तऱ्हीं जैसा न कढे । मागौता खरु ॥ ४ ॥
तैसा जो विषयां लागि । घाली जळतिये आगी ।
व्यसनाचिं आंगीं । लेणीं मिरवी ॥ ५ ॥
फुटौनि पडे तवं । मृगु वाढवी हांवं ।
पारि न ह्मणे माव । रोहिणीची ॥ ६ ॥
तैसा जन्मौनि मृत्यु वेऱ्हीं । विषइं त्रासितां बहु इं परीं ।
पारि त्रासु नेघे धरी । अधिक प्रेम ॥ ७ ॥
पाहिलिये बाळदशे । आई बा हें चि पिसें ।
तैं सरे मग स्त्रीमांसें । भुलौनि ठाके ॥ ८ ॥
मग स्त्री भोगितां थावे । वृद्धाप्यें लागे नेऊं ।
मग तो चि प्रेमभाऊ । बाळकां आणी ॥ ९ ॥

आंधळें वियालें जैसें । तैसिं बालकें परिवंसे ।
परि जिये तवं न त्रासे । विषयांसि जो ॥ ७१० ॥
जाण तेयाचां ठांइं । अज्ञानासि पारु नाहिं ।
आतां आणिकें हिं । चिन्हें सांघों ॥ ११ ॥
तरि देह हें आत्मा । ऐसेया जो मनोधर्मा ।
वळघौनियां कर्मा-। रंभ करी ॥ १२ ॥
आणि उणें कां पुरें । जें जें काहिं आचरे ।
तेयाचेनि आविष्कारें । कुंथों लागे ॥ १३ ॥
डोइये ठेविलेनि भोजें । देवळविसें फुंजे ।
तैसा विद्यावयमाजें । उताणा चाले ॥ १४ ॥
ह्मणे मीं चि येकु आथि । माझां चि वरि संपत्ति ।
माझी आचरती रीती । कोण्हासि नाहि ॥ १५ ॥
नाहिं माझेनि पाडें वाडु । मी चि सर्वज्ञ एकु रूढु ।
ऐसा शिवमुष्टिगंडु । घेउनु ठाके ॥ १६ ॥
व्याधिलेया माणसा । न ये भोगु दाखउं जैसा ।
नीके न साहे तैसा । पुढिलांचें ॥ १७ ॥
पैं गुण तेतुला खाए । स्नेहें किं जळतु जाए ।
जेथ ठेविजे तेथ होए । मसी ऐसा ॥ १८ ॥
जीवनें तिडिपिडि । वीजिला प्राणु फेडी ।
लागला तरि काडी । उरों नेंदी ॥ १९ ॥
अलुमालु प्रकाशु करी । तेतुलेनि उबारा धरी ।
तेया दीपाचेया परी । सुविद्यु जो ॥ ७२० ॥
वोखदाचेनि नावें अमृतें । जैसा नवज्वरु आवुथे ।
कां विख चि होउनि परते । सापा दूध ॥ २१ ॥
तैसा सद्गुणीं मत्सरु । वित्पत्तिअहंकारु ।
तपें ज्ञानें अपारु । ताठा चढे ॥ २२ ॥

अंत्यु राणिवे बैसला । कां आरें धारणु गीळिला ।
तैसा गर्वे फुगला । देखसी जो ॥ २३ ॥
जो लाठी ऐसा न लवे । पाथरु तैसा न द्रवे ।
गुणियांसि नागवे । फोडसें जेवि ॥ २४ ॥
किंबहुना तेया पासिं । अज्ञान आहे वाढिसिं ।
हें निकरें गा तुजसिं । बोलत असों ॥ २५ ॥
आणि पैं धनंजया । जो देहगेहसामग्रिया, ।
नेदखे चि कालिचेया । जन्मातें गा ॥ २६ ॥
कृतघ्ना उपेगु केला । चोरा वेव्हारु दीधला ।
निसुगु अस्ताविला । विसरे जेवि ॥ २७ ॥
वोढालिवां लाइलें । तैसें कान पूंस बोलें ।
पुडुतिं वोढाळं आलें । सुणें जेवि ॥ २८ ॥
बेडुकु सापाचां तोंडिं । जातसे सबडबुडी ।
तो मशकाचिया जोडी । स्मरे चि ना ॥ २९ ॥
तैसीं नवै द्वारें श्रवति । देहाची छृति जींति ।
जेणें जाली तें चित्तीं । सले ना जेया ॥ ७३० ॥
मातृकोदरकुहरिं । सूनि विष्टिचां दारिं ।
जठरिं नव मास वेर्‍हीं । उकढला जैं ॥ ३१ ॥
ते गर्भिची व्यथा । कां जे जाली उपजतां ।
तें काहिं चि सर्वथा । नाठवी जो ॥ ३२ ॥
मलमूत्रपंकिं । लोलतें बालकें अंकिं ।
देखौनि जो न थूंकी । त्रासु नेघे ॥ ३३ ॥
कले चि ना जन्म गेलें । पाहे चि ना पुडुतिं आलें ।
ऐसेसें वाटलें । नाहिं जेया ॥ ३४ ॥
आणि पैं तिया चि परी । जीविताची फरारी ।
देखौनि जो न करी । मृत्युचिंता ॥ ३५ ॥

जीणेयाचेनि विश्वासें । मृत्यु येकु असे ।
हें जेयाचेनि मानसें । मानिजे ना ॥ ३६ ॥
अल्पोदकिचा मासा । नाटे ऐसिया आशा ।
न वचे चि कां जैसा । अगाधा डोहा ॥ ३७ ॥
कां गोरिचिया भूली । मृग व्याधा दीठि न वळीं ।
गळु न पाहतां गीळी । उंडी मीनु ॥ ३८ ॥
दीपाचेया झगमगा । जाळील हें पतंगा ।
नेणवे चि पैं गा । जिया परी ॥ ३९ ॥
कां गांवारु निद्रासुखें । घर जळत नेदखे ।
नेणतां जेवि विषें । रांधिलें अन्न ॥ ७४० ॥
तैसा जीविताचेनि मीसें । हा मृत्यु चि ना आला असे ।
हें नेदखे चि राजसें । सुखें जाणा ॥ ४१ ॥
शरीरिची वाढि । अहोरात्रिची जोडि ।
विषयसुखें प्रौढि । साच चि मानी ॥ ४२ ॥
पारि बापुडा ऐसा नेणे । जें वेश्येसि सर्वस्व देणें ।
तें चि नागवणें । रूप एथ ॥ ४३ ॥
सवंचोराचें साजणें । तें चि तें प्राणु घेणें ।
लेपासि स्नपन करणें । तो चि नाशु ॥ ४४ ॥
पांडु आंग सूटलें । तेया चि नावं खुंटलें ।
तैसें नेणे जें भूललें । आहारनिद्रा ॥ ४५ ॥
सन्मुखा सूळा । धावंतेया पायला ।
प्रतिपदिं जचला । मृत्यु जेवि ॥ ४६ ॥
तेवि देहा जवं जवं वाढु । जवं दीसांचा पवाडु ।
जवं जवं सुखाडु । भोगाचा हा ॥ ४७ ॥
तवं तवं अधिकें । मरण आयुष्यातें जींके ।
मीठ जैसें उदकें । ग्रासिजतसें ॥ ४८ ॥

तैसें जीवित जाये । तेया अस्तवे काला पाहे ।
हें हातोहातीं नोहे । ठाउवें जेया ॥ ४९ ॥
किंबहुना पांडवा । हा आंगिचा मृत्यु नीच नवा ।
नेदखे चि जो मावा । जीवितासाया ॥ ७५० ॥ या
तो अज्ञानदेशिचा राउ । या बोला महाबाहो ।
न पडे गा वंठाउ । आणिचा हा ॥ ५१ ॥
पैं जीविताचेनि सुखें । जैसा कां मृत्युतें नेदखे ।
तैसा चि तारुण्याचेनि तोखें । जरेतें न गणी ॥ ५२ ॥
कडाडिं लोटिला गाडा । शिखरौनि सूटला ढोंडा ।
तैसें नेदखे पुढां । वृद्धाप्य आहे ॥ ५३ ॥
कां आडवोहला पाणी आलें । ह्मैसेयाचें जूझ मातलें ।
तैसें तारुण्याचें चढलें । भुररें जेया ॥ ५४ ॥
पुष्टि लागे विघरों । कांति पाहे निसरों ।
माथा आदरी सिरों । बागीबल ॥ ५५ ॥
दाढी साउल धरी । मान हालउनि वारी ।
तऱ्हीं जो करी । प्रायेचा आवेशु ॥ ५६ ॥
पुढील उरीं आदले । नेदखे जैसें आंधलें ।
कां डोळेया वरिलें निगलें । आलसी तोखे ॥ ५७ ॥
तैसें तरुणेपण आजिचें । भोगितां वृद्धाप्य पाहिचें ।
नेदखे चि तो साचें । अज्ञानु गा ॥ ५८ ॥
देखे अक्षमें कुबुजें । किं विपलावों लागे फुंजे ।
परि नेणे पाहे माझे । हे चि भावे ॥ ५९ ॥
आंगिं वृद्धाप्याची । संज्ञा एउनि मरावें चि ।
परि जेया तारुण्याची । भूलि न फिटे ॥ ७६० ॥
तो अज्ञानाचें घर । हें साच चि वे उत्तर ।
तेवि चि परियसैं थोर । चिन्ह आणिक ॥ ६१ ॥

तरि वाघाचिये अडवे । येकोल चरौनि आला दैवें ।
तेणें विश्वासें पुढुतिं धांवे । वसो जैसा ॥ ६२ ॥
कां सर्प घरा आंतु । अवचटें देखो गेला स्वस्थु ।
येतुलिया साठिं निश्चंतु । नास्तिकु होए ॥ ६३ ॥
तैसेनि टंवच दियें । येक दोनि चि वेल लाहे ।
येथ लागु एकु आहे । हें मानी ना जो ॥ ६४ ॥
वैरियां नीद आली । आणि दंदें माझि सरलिं ।
हें मानी तो सपीली । मूकला जेवि ॥ ६५ ॥
तैसी आहारनिद्रेची उजिरी । रोग निवांत जवं वेर्‍हीं ।
तवं जो न करी । व्याधिचिंता ॥ ६६ ॥
आणि स्त्रीपुत्रादिमेलें । संपति जवं फले ।
तेणें रजें डोले । जाति जेयाचे ॥ ६७ ॥
सवले चि वियोगु पडैल । विलौनि विपत्ति होइल ।
हें दुःख पुढैल । नेदखे जो ॥ ६८ ॥
तो अज्ञानु गा पांडवा । तो ही तो चि जाणावा ।
जो इंद्रियें अव्हासव्हा । चारी एथ ॥ ६९ ॥
वयसेचेनि उवायें । संपत्तिचेनि सावायें ।
सेव्यासव्य जाये । सरकटीतु ॥ ७७० ॥
न करावें तें करी । असंभाव्य मनी धरी ।
चिंतूं नये तें विवरी । जेयाची मति ॥ ७१ ॥
रिगे तेथ न रिगावें । मागे जें नेघावें ।
स्पर्सें जेथ न लगावें । आंग मन ॥ ७२ ॥
न वचावें तेथ जाये । न पाहावें तें पाहे ।
न खावें तें खाये । तेविं चि तोखे ॥ ७३ ॥
न धरावा तो संगु । न लगावा तेथ लागु ।
न चरावा जो मार्गु । आचरे जो ॥ ७४ ॥

नाइकावें तें आइके । न बोलावें तें भाखे ।
पारि दोषु होईल हें नेदखे । प्रवर्त्ततां ॥ ७५ ॥
आंगा मना रुची येयावें । येतुलें कृत्याकृत्य नाठवे ।
जो करणेयांचेनि नावें । भलेतें करी ॥ ७६ ॥
परि पाप मज होईल । कां नरकयातना येइल ।
हें काहिं चि पुढेल । देखे ना जो ॥ ७७ ॥
तेयाचेनि आंगलगें । अज्ञान जगीं दाटुगें ।
जें सज्ञानासि हि संगें । झोंबों शके ॥ ७८ ॥
पारि असो हें आइक । अज्ञानचिन्ह आणिक ।
कां तुज सम्यक । जाणवें जें ॥ ७९ ॥
तरि जेयाची प्रीति पुरी । गुंतली देखसी घरिं ।
नवगंधकेसरी । भ्रमरी जैसी ॥ ७८० ॥
साकरेचिये रासी । बैसली नुठे मासी ।
तैसें निषण्ण आवासिं । जेयाचें मन ॥ ८१ ॥
वेलभेड बेडकु अडिं । मशकु गुंपला सेंबुडीं ।
ढोर सबडबुडी । पंकिं गेला ॥ ८२ ॥
तैसें घरौनि निगणें । नाहिं जींतेनि मरणें ।
जेया सापां होउनि असणें । भाटिं तिये ॥ ८३ ॥
प्रियोत्तमाचां कंठिं । प्रमदा घे आंटी ।
तैसा जीवेंसिं कोंपटी । धरुनि जो ठाके ॥ ८४ ॥
मधुरसादोषें । मधुकारि जचें जैसें ।
गृहसंगोपन तैसें । करी जो गा ॥ ८५ ॥
ह्यातारपणिं जालें । माणिक एक उपाइलें ।
तेयाचें कां जेतुलें । मातापितरां ॥ ८६ ॥
तेतुलेनि पाडें पार्था । घरिं जेयाची आस्था ।
आणि स्त्री वांचौनि सर्वथा । जाणे ना जो ॥ ८७ ॥

महापुरुषाचें चित्त । जालेयां वस्तुगत ।
ठाके व्यवहारजात । जेया परीं ॥ ८८ ॥
तैसा स्त्रीदेहीं जो जीवें । पडौनियां सर्वभावें ।
कोणु मी काय करावें । हें काहिं नेणे ॥ ८९ ॥
हाणि लाभु नदेखे । लोकापवादु नाइके ।
जेयाचिं इंद्रियें एकमुखें । स्त्रिया केलीं ॥ ७९० ॥
चित्त आराधी स्त्रियेचें । स्त्रियेचेनि संदें नाचे ।
मर्कट गारुडियाचें । जैसें होए ॥ ९१ ॥
आपण चि पासिं दावी । इष्टा मैत्रा दुरावी ।
मग कवडा चि वाढवी । लोभी जैसा ॥ ९२ ॥
तैसें दानपुण्य खांची । गोत्रकुटुंबा वंची ।
परि वायणी स्त्रियेची । उणी हो न ये ॥ ९३ ॥
पूजितें दैवतें जोगावी । गुरुतें बोलें झांकवी ।
मायेबापा दावी । निदारपण ॥ ९४ ॥
स्त्रियेचां तरि विखिं । भोगसंपत्ति अनेकी ।
आणिकि वस्तु नीकी । जे जे देखे ॥ ९५ ॥
प्रेमाथिलेनि भगतें । भजिजे कुळदेवतेतें ।
तैसा एकाग्रचित्तें । स्त्रि जो उपासी ॥ ९६ ॥
इयेतें कोण्ही देखैल । इयेसि वेग्वासें जाइल ।
तरि युग चि बुडैल । ऐसें जेया ॥ ९७ ॥
साच आणि चोख । तें स्त्रियेसी चि अशेष ।
एरी विषिं जोगावणुक । ते ही नाहिं ॥ ९८ ॥
नाइटेयां भेण । न मोडी नागाची आण ।
तैसी पाली उणखुण । स्त्रियेची जो ॥ ९९ ॥
किंबहुना धनंजया । स्त्री चि सर्वस्व जेया ।
आणि तियेचेया जालेया । लागि प्रेम ॥ ८०० ॥

आणिक ही जें समस्त । तेथिचें संपत्तिजात ।
तें जीवाहूनु आप्त । मानी जो गा ॥ १ ॥
तो अज्ञानासि मूळ । अज्ञाना तेणें बळ ।
हें असो केवळ । तें चि तो रूप ॥ २ ॥
मातलिये सागरिं । फोकिलियां तरि ।
लाटाचां येरझारिं । आंदोळे जेवि ॥ ३ ॥
तैसी प्रिय वस्तु पावे । आणि सुखें जो उंचावे ।
तैसा अप्रिया सवें । तळु खाए ॥ ४ ॥
ऐसी जेयाचां चित्तिं । वैषम्यसाम्याची वोखती ।
वाहे तो महामती । अज्ञानु गा ॥ ५ ॥
आणि माझां ठाइं भगति । फळा लागि जेया आथि ।
धना दोसें विरगति । नटणें जेवि ॥ ६ ॥
कां कांताचां मानसिं । रिगौनु स्वैरिणी जैसी ।
राहाटे आणिकेंसिं । जावेया लागि ॥ ७ ॥
तैसें मातें किरीटी । भजती गा पाउटी ।
करूनि जो दीठी । विषो सुये ॥ ८ ॥
आणि भजिनलेया वरि । तो विषयो न पवे जरि ।
सांडि ह्मणे तरि । आघवें टवाळ हें ॥ ९ ॥
कुणबटु कुलवाडी । तैसा आनु देॐ मांडी ।
आदिलाची पिडी । करी तेयातें ॥ ८१० ॥
तेया गुरुमार्गा टेंके । जेयाचा सुगुरुवां देखे ।
तरि तेयाचा मंत्रु सीखे । एर नेघे ॥ ११ ॥
प्राणिजातेंसिं निष्ठुरु । स्थावरिं बहुत भरु ।
तेविं चि नाहिं एकसरु । निर्वाहो जेया ॥ १२ ॥
माझी मूर्ति आपजवी । ते घराचां कोनिं बैसवी ।
आणि देवादेवीं । यात्रे जाए ॥ १३ ॥

नीच आराधन माझें । काजीं कुळदेवतिं भजे ।
पर्वविशेषें भोजें । पूजा आन ॥ १४ ॥
माझें अधिष्ठान घरीं । आणि वौसे आनाचे करी ।
पितरकार्यअवसरीं । पितरांचा होए ॥ १५ ॥
एकादशिचां दिसिं । जेतुला पाडु आमासिं ।
तेतुला चि नागांसि । पंचमीसि ॥ १६ ॥
चौथि मोटकी पाहे । आणि गणेशाचा चि होए ।
चाउदसिं ह्मणे माए । तूझा चि वो दुर्गे ॥ १७ ॥
नवमीतें मांडी । आणि बैसे नवचंडी ।
आदित्यवारिं वाढी । भैरवां भरीं ॥ १८ ॥
पाठिं सोमवारु पावे । आणि बेलेंसिं लिंगा धांवे ।
ऐसें एकला चि आघवें । जोगावी जो ॥ १९ ॥
अखंड भजन करी । उगा न राहे क्षणभरी ।
आघवेनि गांवदारी । ऐहेव जैसी ॥ ८२० ॥
तैसेनि जो गा भगतु । वेखासिं सैरा धावंतु ।
जाण अज्ञानाचा मूर्त्तु । अवतारु तो ॥ २१ ॥
आणि एकांतें चोखटें । तपोवनें तीर्थें तटें ।
देखौनि जो वीटे । तो ही तो चि ॥ २२ ॥
आणि आत्मा गोचरु होए । ऐसी जे विद्या आहे ।
तें आइकौनु डौरु वाहे । विद्वांसु जो ॥ २३ ॥
उपनिषदांकडे न वचे । योगशास्त्र न रुचे ।
अध्यात्मज्ञानाचें । मनीं चि नाहिं ॥ २४ ॥
आत्मचर्चा एकि आथि । ऐसिये बुद्धीची भींति ।
पाडूनि जेयाची मति । वोढाळ जाली ॥ २५ ॥
कर्मकांड तरि जाणे । मुखोद्गतें पुराणें ।
ज्योतिषिं तो ह्मणे । तैसें चि होए ॥ २६ ॥

शिल्पिं अतिनिपुणु । सूपशास्त्रिं प्रवीणु ।
विधि अथर्वणु । हाति जेया ॥ २७ ॥
कोकिं नाहिं ठेलें । भरतु करी ह्मणितलें ।
आगम उपासिले । मूर्त्त होति ॥ २८ ॥
नीति सुझे । वैदिक बुझे ।
काव्यनाटाकिं दूजें । चतुर नाहिं ॥ २९ ॥
स्मृतिची चर्चा । डंषु जाणे गारुडाचा ।
निघंटु प्रज्ञेचा । पाइकु करी ॥ ८३० ॥
व्याकरणिं चोखडा । तर्की अतिगाढा ।
एकिं अध्यात्मीं चि फुडा । जात्यंधु ॥ ३१ ॥
तें वांचूनु आघवां शास्त्रिं । सिद्धान्तनिर्वाणसूत्री ।
परि जलो तें नक्षत्री । न पाहे गा ॥ ३२ ॥
मोराचां आंगिं असोसें । पिंसें आहाति डोलसें ।
आणि एकली दीठि नसे । तैसें तें गा ॥ ३३ ॥
जरि परमाणू एवडें । संजीवनीमूळ जोडे ।
तरि बहू गाडे । भरणें केवि ॥ ३४ ॥
तैसें शास्त्रजात जाण । आघवें चि अप्रमाण ।
अध्यात्मज्ञानें विण । एकलेनि ॥ ३५ ॥
या लागि अर्जुना पाहिं । अध्यात्मज्ञानाचां ठांइं ।
जेया निश्चयबुद्धि नाहिं । शास्त्रमूढां ॥ ३६ ॥
तेया शरीर जें जालें । तें अज्ञानाचें बिं विरुढलें ।
जेयाचिये वित्पती गेलें । अज्ञानवेलीं ॥ ३७ ॥
तो जें जें बोले । तें अज्ञान चि फूललें ।
तेयाचें पुण्य तें फललें । अज्ञान चि ॥ ३८ ॥
अध्यात्मज्ञान कहिं । जेणें मानिलें चि नाहिं ।
तो ज्ञानार्थु न देखे काहीं । हें बोलावें असे ॥ ३९ ॥

ऐली चि थडी न पवतां । पले जो माघौता ।
तेया पैली तीरिची वार्त्ता । केवि जाणवे ॥ ८४० ॥
कां दाखठां चि जेयाचें । पाये बांधले साचे । दारवंठा
तो केवि परिवरिचें । ठेविलें जाणे ॥ ४१ ॥
तेवि अध्यात्मज्ञान जेया । अनोलख धनंजया ।
तेया ज्ञानार्थु देखावेया । काइ काज ॥ ४२ ॥
ह्मणौनि आतां विशेषें । तो ज्ञानाचें सार न देखे ।
हें सांगावें आंखें लेखें । न लगे तुज ॥ ४३ ॥
जेधवां सगर्भे वाढिलें । तेधवां चि पोटिचें वालें ।
तैसें मागिलें पदें बोलिलें । तें चि होए ॥ ४४ ॥
वांचूनु या वेगलें । रूप करणें हें न मिले ।
घेइं आवंतिलें आंधलें । तैसें जालें ॥ ४५ ॥
एवं इये उपरती । ज्ञानचिन्हें माधौती ।
अमानित्वादिप्रभृती । वाखाणिलीं ॥ ४६ ॥
जियें ज्ञानपदें अठरा । केलियां एरी मोहरा ।
अज्ञान ऐसें आकारा । येथ आहे ॥ ४७ ॥
मागां श्लोकाचेनि अर्द्धार्द्धें । ऐसें सांघितलें मुकुंदें ।
ना उपराठिं ज्ञानपदें । तें चि अज्ञान ॥ ४८ ॥
ह्मणौनि इया वाहाणी । मियां केली उपलवणी ।
वांचौनि दूधा मेळउनि पाणी । फार कीजे ॥ ४९ ॥
तैसें जी न बडबडीं । पदाची कोर न संडीं ।
मूळध्वनिचिये वाढी । निमित्त जालां ॥ ८५० ॥
तवं श्रोते ह्मणति राहे । कें पारिहारा ठाउ आहे ।
भीसि कां वायां हें । कविपोषका ॥ ५१ ॥
तूतें श्रीमुरारी । ह्मणितलें प्रकटें करीं ।
जे अभिप्राय गव्हरीं । झांकिले आह्मीं ॥ ५२ ॥

तें देवाचें मनोगत । दावितु आहासि मूर्त्त ।
हें इं ह्मणतां चित्त । दाटैल तूझें ॥ ५३ ॥
ह्मणौनि असो हें न बोलों । परि सवियां चि गा तोखलों ।
जें लोकत्रया मेळविलों । श्रवणसुखा ॥ ५४ ॥
आतां या वारि । जें तो श्रीहारि ।
बोलिला तें करीं । कथन वेगा ॥ ५५ ॥
या संतवाक्या सरिसें । ह्मणितलें निवृत्तिदासें ।
जी अवधारां ऐसें । बोलिले देउ ॥ ५६ ॥
ह्मणे तुवां पांडवा । हा चिन्हसमुचयो आघवा ।
आइकिला तो जाणावा । अज्ञानभागु ॥ ५७ ॥
येया अज्ञानविभागा । पाठि देउनियां पैं गा ।
मग ज्ञानविषिं चांगा । दढां होइजे ॥ ५८ ॥
मग निर्वाळलेनि ज्ञानें । ज्ञेय भेटैल मनें ।
तें जाणावेया अर्जुनें । आश केली ॥ ५९ ॥

**ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वामृतमश्नुते ॥**
**अनादि मत्परं ब्रह्म न सत्तं नासदुच्यते ॥ १२ ॥**

तवं सर्वज्ञांचा राउ । ह्मणे जाणौनि तेयाचा भाउ ।
परिसैं गा ज्ञेयअभिप्राउ । सांघों आतां ॥ ८६० ॥
तरि ज्ञेय ऐसें ह्मणणें । वस्तूतें येणें चि कारणें ।
जें ज्ञानें वांचूनि कव्हणें । उपाया न ये ॥ ६१ ॥
आणि जाणितलेया वरौतें । जाणणें नाहिं जेथें ।
जें जाणणें चिं तन्मयते । आणी जेयाचें ॥ ६२ ॥
जें जाणितलेया साठिं । संसारा काढूनि कांठीं ।
जिरौनि जाइजे पोटीं । नित्यानंदाचा ॥ ६३ ॥
तें ज्ञेय गा ऐसें । आदि चि जेया नसे ।
परब्रह्म आपैसें । नावं जेया ॥ ६४ ॥

नाहिं ह्मणों जाइजे । तवं विश्वाकारें देखिजे ।
विश्व ऐसें ह्मणिजे । तरि हे माया ॥ ६५ ॥
रूप वर्णु व्यक्ति । नाहिं दृश्यदृष्टस्थिति ।
तरि कोणें कैसें आथि । ह्मणावें पां ॥ ६६ ॥
आणि साच चि जरि नाहिं । तरि महदादि कवणी ठांइं ।
स्फुरत कैंचें काइ । तेणें विण ॥ ६७ ॥
ह्मणौनि आथि नाहिं हे बोली । जें देखौनि मूंकि जालिं ।
विचाराची मोडली । वाट जेथ ॥ ६८ ॥
भांडवटशरावि । जैसी तदाकार असे पृथवी ।
तैसें सर्व होउनि सर्वीं । असे जें वस्तु ॥ ६९ ॥
आववां चि देशिं कालिं । नोहे चि देशकाला वेगली ।
जे क्रिया स्थूलास्थूलीं । ते चि हात जेया ॥ ८७० ॥

**सर्वतः पाणिपादं तत्सर्वतोक्षिशिरोमुखं ।**
**सर्वतः श्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति ॥ १३ ॥**

तेयातें एया कारणें । विश्वबाहु हें ह्मणणें ।
जें सर्व चि सर्वपणें । सदा करी ॥ ७१ ॥
आणि समस्ता ही ठाया । एकी चि कालिं धनंजया ।
आलें असे ह्मणौनियां । विश्वांघ्रि नावं ॥ ७२ ॥
पैं सवितेया आंग डोले । हें नाहिं वेगळवेगळें ।
तैसें सर्वदृष्टें सकळें । स्वरूपें जें ॥ ७३ ॥
ह्मणौनि विश्वतश्चक्षु । हा अचक्षुचा ठांइं पक्षु ।
बोलावेया दक्षु । जाला वेदु ॥ ७४ ॥
पैं गा मूर्त्ति तें चि मुख । हुताशना देख ।
तैसें सर्वत्र अशेष । भोक्तें जें ॥ ७५ ॥
एया लागि तेथ पार्था । विश्वतोमुख हे व्यवस्था ।
आली वाक्पथा । श्रुतीचेया ॥ ७६ ॥

आणि वस्तुमात्रिं गगन । जैसें असे संलग्न ।
तैसें शब्दजातिं कान । सर्वत्र जेया ॥ ७७ ॥
ह्मणौनि आह्मीं तेयातें । ह्मणों सर्वत्र आइकतें ।
एवं जें सर्वातें । आवरूनि असे ॥ ७८ ॥
यऱ्हविं तऱ्हीं महामती । विश्वतश्चक्षु या श्रुती ।
तेयाचिये व्याप्ती । रूप केलें ॥ ७९ ॥
वांचूनि हस्तनेत्रपाए । हे भाक काय तेथ आहे ।
सर्व शून्याचा साहे । निष्कर्ष जें ॥ ८८० ॥
पैं कल्लोलातें कल्लोलें । ग्रासिजतसें ऐसें केलें । क
परि ग्रसितें ग्रासा वेगलें । असे काइ ॥ ८१ ॥
तैसें सर्वादि जें एक । तेथ कें व्याप्यव्यापक ।
परि बोलावेया नावं एक । करावें लागे ॥ ८२ ॥
पैं शून्य जें दावावें जालें । तैं बिंदुलें एक केलें ।
तैसें अद्वैत दावावें बोलें । द्वैत चि कीजे ॥ ८३ ॥
ह्मणौनि गा पार्था । गुरुशिष्यसत्पथा ।
आडळु पडे सर्वथा । बोलु खुंटे ॥ ८४ ॥
ह्मणौनि गा श्रुतीं । द्वैतभावें अद्वैतीं ।
निरोपणा वाहाती । वाट केली ॥ ८५ ॥ कैसी
तें चि आतां अवधारीं । ये नेत्रगोचरे आकारिं ।
तें ज्ञेय जेया परीं । व्यापूनि असे ॥ ८६ ॥
तरि तें गा ऐसें । अवकाशिं आकाश जैसें । आकाशीं
पटीं पटु होउनि असे । तंतु जेवि ॥ ८७ ॥
उदक होउनि उदकिं । रसु जैसा अवलोकीं ।
दीपपणें दीपकीं । तेज जैसें ॥ ८८ ॥
कपूरत्वें कापुरीं । सौरम्य असे जिया परीं ।
शरीर होउनि शरीरीं । कर्म जेवि ॥ ८९ ॥

किंबहुना ऐसें पांडवा । सोनें सोनयांचा रवा ।
तैसें जें या सर्वा । सर्वांगीं असे ॥ ८९० ॥
परि रवेंपणा माझिवडें । तवं रवा ऐसें आवडे ।
वांचूनि सोनें सोनेयां सांगडे । सोनें चि जेवि ९१ ॥
पैं गा वोघू चि वांकुडा । परि पाणी उजू सुहाडा ।
वन्हि आला लोखंडा । लोह नव्हे ॥ ९२ ॥
घटाकारें वेंटाळलें । तैं नभ गमे वाटुलें ।
मठिं तारि चौफळें । आयें दीसे ॥ ९३ ॥
परि ते आकार जैसे । नोहिजती चि आकाशें ।
तेवि विकारु होउनि तैसें । विकारी नोहे ॥ ९४ ॥

**सर्वेंद्रियगुणाभासं सर्वेंद्रियविवर्जितं ।**
**असक्तं सर्वभुक्चैव निर्गुणं गुणभोक्तृ च ॥ १४ ॥**

मन मुख्य इंद्रियां । सत्वादि गुणा येया ।
सारिखें ऐसें धनंजया । आवडे कीर ॥ ९५ ॥
पैं गुळाची गोडी । नव्हे बांधेया सांगडी ।
तैसीं गुणेंद्रियें फुडी । नाहिं तेथ ॥ ९६ ॥
आगा क्षीराचिये दशे । घृत चि क्षीराकारें असे ।
परि क्षीर चि नव्हे जैसें । कपिध्वजा ॥ ९७ ॥
तैसें जें इये विकारिं । विकारु नव्हे अवधारिं ।
परि आकारु नावं भवंरी । सोनें तें सोनें ॥ ९८ ॥
या उघड मन्हाटिया । तें वेगळेपणें धनंजया ।
जाण गुणेंद्रियां । पासौनियां ॥ ९९ ॥
नामरूपसंबंधु । जातिक्रियाभेदु ।
हा आकारासि चि प्रवादु । वस्तुसि नाहिं ॥ ९०० ॥
जें गुण नोहे काहिं । गुणा तेया पाडु नाहिं ।
परि तेयाचां चि ठांइं । आभासति ॥ १ ॥

एतुलेया साठिं । सभ्रांताचां पोटीं ।
ना ऐसें गमे किराटी । जें हें धरी ॥ २ ॥
तरि तें गा धरणें ऐसें । अभ्रातें जेवि आकाशें ।
कां प्रतिवदन जैसें । आरिसेनि ॥ ३ ॥
नातरि सूर्यप्रतिमंडल । जैसें धरी सलील ।
रश्मिकरें मृगजल । धरिजे जेवि ॥ ४ ॥
तैसें गा संबंधें विण । यां सर्वातें निर्गुण ।
परि तें वायां जाण । मिथ्या दृष्टी ॥ ५ ॥
आणि इया परी निर्गुणें । गुणातें भोगणें ।
रंका राज्य करणें । स्वप्निं जेवि ॥ ६ ॥
ह्मणौनि गुणाचा संगु । अथवा गुणभोगु ।
हा निर्गुणिं लागु । बोलों चि न ये ॥ ७ ॥

**बहिरन्तश्च भूतानामचरं चरमेव च ।**
**सूक्ष्मत्वात्तदविज्ञेयं दूरस्थं चांतिके च तत् ॥ १५ ॥**

जें चराचर भूतां । माझि असे पांडुसुता ।
नाना वन्हि उष्णता । अभेद जेवि ॥ ८ ॥
तैसेनि अविनाभावें । सूक्ष्मदशे आघवें ।
व्यापूनि असे तें जाणावें । ज्ञेय एथ ॥ ९ ॥
जें एक आंतु बाहिरि । जें एक जवळें दूरी ।
जें एक वांचूनि परि । दुसरी नाहिं ॥ ९१० ॥

**अविभक्तं च भूतेषु विभक्तमिव च स्थितं ।**
**भूतभर्तृ च तज्ज्ञेयं ग्रसिष्णु प्रभविष्णु च ॥ १६ ॥**

क्षीरसागरिंची गोडी । माजि बहुत थडिये थोडी ।
हें नाहिं तेया परवडी । पूर्ण जें गा ॥ ११ ॥
स्वेदजादिप्रभृती । वेगळालां भूतिं ।
जेयाचिये अनस्यूती । खोमणें नाहिं ॥ १२ ॥

पैं श्रोतेमुखटिळका । घटसहस्रां अनेकां ।
बिंबौनियां चंद्रिका । न भेदे जेवि ॥ १३ ॥
नानां लवणकणाचिया रासी । क्षारता एकि जैसी ।
कां कोडी एके उंसीं । एकु चि रसु ॥ १४ ॥
तैसी अनेकिं भूतजाति । असे एक चि व्याप्ति ।
विश्वकार्या सुमती । कारण जें ॥ १५ ॥
म्हणौनि हा भूताकारु । जेथौनि तें चि आधारु ।
कल्लोळि सागरु । जेया परीं ॥ १६ ॥
पैं बाळादि तिहिं वयसिं । काया एकी चि जैसी ।
तैसें आदिस्थितिग्रासिं । अखंड जें ॥ १७ ॥
सायंप्रातमध्यान्हीं । होंत जांत दिनिदिनीं ।
जैसें कां गगनीं । पालटु नाहिं ॥ १८ ॥
आगा श्रृष्टिवेळे प्रियोत्तमा । जेया नावं ब्रह्मा ।
व्याप्ति जें नामा । पात्र जालें ॥ १९ ॥
मग आकारु हा हारपे । तेधवां रुद्र जें म्हणिपे ।
तें हिं गुणत्रयलोपे । तै जें शून्य ॥ ९२० ॥

**ज्योतिषामपि तज्ज्योतिस्तमसःपरमुच्यते ।**
**ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं हृदि सर्वस्य तिष्ठति ॥ १७ ॥**

जें अग्निचें दीपन । जें चंद्राचें जीवन ।
सूर्याचे नयन । देखति जेणें ॥ २१ ॥
आदीसि जे आदि । जे वृद्धीसि वृद्धि ।
बुद्धिसि बुद्धि । जीवाचा जीउ ॥ २२ ॥
जेयाचेनि उजियेडें । तारागण उघडे ।
महातेज सुरवाडें । जेणें राहाटे ॥ २३ ॥
मनाचें मन । जें नेत्राचे नयन ।
जें घ्राणाचे घ्राण । वाचेची वाचा ॥ २४ ॥

जें प्राणाचे प्राण । जें गतिचे चरण ।
क्रियेसि कर्तेपण । जेयाचेनि ॥ २५ ॥
आकारु जेणें आकारे । विस्तारु जेणें विस्तारे ।
संहारु जेणें संहारे । पांडुकुमरा ॥ २६ ॥
जें मेदिनियेची मेदिनी । जें पाणी पीउनि असे पाणी ।
तेजा दिवेलावणी । जेणें तेजें ॥ २७ ॥
जें वायुचा श्वासोश्वासु । जें गगनाचा अवकाशु ।
आघवा चि आभासु । आभासे जेणें ॥ २८ ॥
किंबहुना पांडवा । जें आववें चि इये आघवां ।
जेथ नाहिं रिगावां । द्वैतभावां ॥ २९ ॥
जें देखिलेया चि सवें । दृष्टादृश्य आघवें ।
एकवाट कालवे । सामरस्यें ॥ ९३० ॥
मग तें चि होये ज्ञान । ज्ञाता ज्ञेय हान ।
ज्ञानें गमिजे स्थान । तें हि तें चि ॥ ३१ ॥
सरलेयां लेख । जैसें आंख होंति एक ।
तैसें साध्यसाधनादिक । ऐक्यते ये ॥ ३२ ॥
अर्जुना जिये ठांइं । सरे द्वैताची लिही ।
हें असो हृदयीं । सर्वांचां असे ॥ ३३ ॥

**इति क्षेत्रं तथा ज्ञानं ज्ञेयं चोक्तं समासतः ।**
**मद्भक्त एतद्विज्ञाय मद्भावायोपपद्यते ॥ १८ ॥**

एवं तुज पुढां । आदि क्षेत्र सुहाडा ।
दाविलें फाडोवाडां । विवंचूनि ॥ ३४ ॥
तैसें चि क्षेत्रपाठिं । जैसें देखिलें दीठी ।
तैसें चि ज्ञान किरीटी । सांघितलें ॥ ३५ ॥
आणि अज्ञाना हिं कवातिकें । रूप केलें नीकें ।
जवं आणि टेंके । पुरे ह्मणसी ॥ ३६ ॥ धाणि

आणि आतां हें रोकडें । उपपत्तिचेनि सुरवाडें ।
निरोपिलें उघडें । ज्ञेय पैं गा ॥ ३७ ॥
हे आघवी चि विवंचना । बुद्धी भरूनि अर्जुना ।
मग सिद्धिभुवना । माझि येंति ॥ ३८ ॥
देहादि परिग्रहीं । सन्यासु वेउनि जिहिं ।
जीउ माझां ठांइं । वृत्तिकु केला ॥ ३९ ॥
ते गा माझे किरीटी । हें जाणौनि सेवटीं ।
आपणपेया साठीं । मी चि होंति ॥ ९४० ॥
तारि मी होती परी । हे मुख्य अवधारिं ।
सोहपी सर्वा परीं । रचिली आझि ॥ ४१ ॥
कडां पायेरी कीजे । निरालिं मांचु बांधिजे ।
अथाविं सूयिजे । तारितें जेवि ॥ ४२ ॥
यऱ्हविं आघवें चि आत्मां । हें सांघौनु वीरोत्तमा ।
तें तूझेया मनोधर्मा । मीलैल ना ॥ ४३ ॥
ह्मणौनि एक चि संचलें । आझि चतुर्धा केलें ।
जें अदलपण देखिलें । तूझिये प्रज्ञे ॥ ४४ ॥
पैं बालक जैं जेवविजे । तैं घांसु विसें ठांइ कीजे ।
तैसें एक चतुर्थ्यीजें । कथिलें आझि ॥ ४५ ॥ एकचि तुज आजें
एक क्षेत्र एक ज्ञान । एक ज्ञेय एक अज्ञान ।
हे भाग केले अवधान । जाणौनि तूझें ॥ ४६ ॥
आणि ऐसेन हिं पार्था । जारि हा अभिप्राउ तुज हाता ।
न ये चि तारि हे वेवस्था । पुडुतिं सांघों ॥ ४७ ॥
आतां चौं ठांइ न करुं । एक चि ह्मणौनि न सरूं ।
आत्मेयां अनात्मेयां धरूं। सरिसा पाडु ॥ ४८ ॥
परि तुवां एतुलें करावें । मागौनि तें आझां देयावें ।
जें काना चि नावं ठेवावें । आपणयातें ॥ ४९ ॥

एया श्रीकृष्णाचेया बोला । पार्थु रोमांचितु जाला ।
तेथ देउ म्हणति उगला । उचंबल ना ॥ ९५० ॥

**प्रकृतिं पुरुषं चैव विध्यनादी उभावपि ।**
**विकारांश्च गुणांश्चैव विद्धि प्रकृतिसंभवान् ॥ १९ ॥**

ऐसेनि तो एता वेगु । धरूनि म्हणे श्रीरंगु ।
प्रकृतिपुरुषां विभागु । परियस सांघों ॥ ५१ ॥
जेया मार्गातें जगीं । सांख्य म्हणति योगी ।
जेयाचिये भाटिवे लागि । मी कपिलु जालां ॥ ५२ ॥
तो आइक निर्दोषु । प्रकृतिपुरुषविवेकु ।
म्हणतसे आदिपुरुखु । अर्जुनातें ॥ ५३ ॥
तरि पुरुषु अनादि आथि । आणि तैं चि लागौनि प्रकृति ।
समरसिं जैसीं दिवोराति । दोन्हीं असति ॥ ५४ ॥
का रूप नव्हे वायां । रूपा लागली छाया ।
निकण वाढे धनंजया । कणेंसि कोंडा ॥ ५५ ॥
ज-ळें तैसिं जाण लवलटें । दोन्हि जियें एकवटें ।
प्रकृतिपुरुषु प्रकटें । अनादिसिद्धें ॥ ५६ ॥
पैं क्षेत्र एणें नावें । जें सांघितलें आघवें ।
तें चि येथ जाणावें । प्रकृति पैं गा ॥ ५७ ॥
क्षेत्रज्ञ ऐसें । जेयातें म्हणितलें असे ।
तो पुरुषु अनारिसें । न बोलों वेइं ॥ ५८ ॥
इयें अनानें नावें । पारि नित्य आन नव्हे ।
हें लक्ष्य न चुकावें । पुडुतिं पुडुतिं ॥ ५९ ॥
तरि केवल जे सत्ता । तो पुरुषु पांडुसुता ।
प्रकृति ते समस्ता । क्रिये नावं ॥ ९६० ॥
बुद्धि इंद्रियें अंतःकरण । इत्यादि विकारभरण ।
आणि तीन्ही गुण । सत्वादिक ॥ ६१ ॥

हा आघवा चि मेळावा । प्रकृती जाला जाणावा ।
हे चि हेतु संभवा । कर्माचेया ॥ ६२ ॥
तेथ इछा आणि बुद्धि । घडवी अहंकारेंसि आदी ।
मग लिया लावीति वेधीं । कारणाचा ॥ ६३ ॥
तें चि कारण टाकावेया । जें सूत्र धरणें उपाया ।
तेया नावं धनंजया । कार्यकारण ॥ ६४ ॥

**कार्यकारणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते ।**
**पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते ॥ २० ॥**

आणि इछामदाचां थावें । लागली मनातें उठवी ।
जें इंद्रिय राहाटवी । तें कर्तृत्व गा ॥ ६५ ॥
ह्मणौनि तीन्ही इयें जाणा । कार्यकर्तृत्वकारणा ।
प्रकृति मूळ हें राणा । सिद्धांचा ह्मणे ॥ ६६ ॥
एवं तिहिंचेनि समवायें । प्रकृति कर्मरूप होये ।
परि जेया गुणां तराये । तेयां चि सारिखें ॥ ६७ ॥
जें सत्वां अधिष्ठिजे । तें सत्कर्म ह्मणिजे ।
रजोगुणें निफजे । मध्यम तें ॥ ६८ ॥
केवळ जरि तमें । जियें निफजति कर्में ।
निषिद्धें अधमें । जाणावि तियें ॥ ६९ ॥
ऐसि संतासंतें । कर्में प्रकृति होतें ।
तेया तव निफजतें । सुखदुःखें गा ॥ ९७० ॥
असतिं दुःख निफजे । सत्कर्मिं सुख उपजे ।
तेयां दोहिंचा बोलिजे । भोगु पुरुषा ॥ ७१ ॥

**पुरुषः प्रकृतिस्थोहि भुङ्क्ते प्रकृतिजान्गुणान् ।**
**कारणं गुणसंगोस्य सदसद्योनिजन्मसु ॥ २१ ॥**

प्रकृतिपुरुषांची कुळवाडी । सांघतां देखें असंघडी ।
जे आबुली जोडी । आमुला खाये ॥ ७२ ॥

सुखदुःखें जवं वेन्हीं । निफजति साचोकारें ।
तवं प्रकृति उद्यमु करी । मग पुरुषु भोगी ॥ ७३ ॥
आमुलेया आबुलिये । संगति ना सोये ।
कां आबुलि जग विये । चोज आइकां ॥ ७४ ॥
अनंगु हा पेंधा । निकवडा नसुधा ।
जीर्णु अतिवृद्धा । पासौनि वृद्धु ॥ ७५ ॥
तेया अडिनावें पुरुषु । एन्हविं स्त्री ना नपुंसकु ।
हें एक ही न्हवे लोकु । प्रकृती तव ॥ ७६ ॥
अचक्षु अश्रवणु । अहस्तु अचरणु ।
रूप ना वर्णु । नावं आथि ॥ ७७ ॥
आगा जेथ काहिं चि नाहिं । प्रकृतिचा भर्त्ता पाहिं ।
किं भोगणें ऐसेया ही । सुखदुःखाचें ॥ ७८ ॥
तो तरि अकर्त्ता । उदासु अभोक्ता ।
परि इया चि पतिव्रता । भोगविजे ॥ ७९ ॥
जियेतें अलुमालु । रूपागुणाचा ढालु ।
ते भलेतैसा खेलु । लेखा आणी ॥ ९८० ॥
मा इयें प्रकृती तव । गुणमई हें चि नावं ।
किंबहुना सावेव । गुण ते चि हे ॥ ८१ ॥
हे प्रकृति क्षणीं नवी । रूपागुणाची आघवी ।
जडातें ही माजवी । इयेचा माजु ॥ ८२ ॥
नावें इया प्रसिद्धें । सखेहें इया साखिग्वें ।
इंद्रियें प्रबुद्धें । इयेचेनि ॥ ८३ ॥
काइ मन नपुंसक । किं ते भोगी तीन्ही लोक ।
ऐसैसें अलौलिक । करणें इयेचें ॥ ८४ ॥
हे भ्रमाचें महाद्वीप । हे व्याप्तिचें चि रूप ।
विकार उमप । इया केले ॥ ८५ ॥

हे कामाची मांडवी । मोहवनिची माधवी ।
जे प्रसिद्ध दैवी । माया ऐसी ॥ ८६ ॥
हे वाङ्मयाची वाढि । हे साकारपणा जोडि ।
प्रपंचाची धाडि । अभंग हे ॥ ८७ ॥
कला येथौनि जालिया । विद्या इया चि केलिया ।
इछा ज्ञान क्रिया । वियाली हे ॥ ८८ ॥
हे नादाची टांकसाल । हे चमत्काराचें वेलाउल ।
किंबहुना सकल । खेलु इयेचा ॥ ८९ ॥
हे उत्पत्ति प्रलयो होंत । ते इयेचे सायं प्रात ।
हें असो आतां बहुत । मोहन हे ॥ ९९० ॥
हे अद्वयाचे दूसरें । हे निःसंगाचें सोयरें ।
हे निरालेंसिं घरें । नांदति असे ॥ ९१ ॥
इयेतें एतुले वेर्‍हीं । सौभाग्याची व्याप्ति थोरी ।
ह्मणौनि तेया आवरी । अनावरातें ॥ ९२ ॥
तेयाचां तवं ठांइं । निपटौनि काहिं चि नाहिं ।
किं तेया आघवें हिं । आपण होये ॥ ९३ ॥
तेया स्वयंभाची संभूति । तेया अमूर्त्ताची मूर्त्ति ।
आपण होये स्थिति । ठाउ तेया ॥ ९४ ॥
तेया अनर्त्ताची आर्त्ति । तेया पूर्णाची तृप्ति ।
तेया अकुलाची जाति । आपण होये ॥ ९५ ॥
तेया अचर्चाचिन्ह । तेया अपाराचें मान ।
तेया अमनस्थाचें मन । बुद्धि होये ॥ ९६ ॥
तेया निराकाराचा आकारु । तेया निर्व्यापाराचा व्यापारु ।
निरहंकाराचा हुंकारु । होउनि ठाके ॥ ९७ ॥
तेया अनामाचें नाम । तेया अजन्माचें जन्म ।
आपण होये कर्म । अक्रिया तेया ॥ ९८ ॥

तेया निर्गुणाचे गुण । तेया अचरणाचे चरण ।
तेया अश्रवणाचे श्रवण । चक्षु ही होये ॥ ९९ ॥
तेया भावातीताचे भाव । तेया निरवयवाचे अवेव ।
किंबहुना होये सर्व । पुरुषाचें हे ॥ १००० ॥
ऐसें इया प्रकृती । आपुलिया सर्वव्याप्ती ।
तेया अविकृतातें विकृती । माजि कीजे ॥ १ ॥
तेथ पुरुषत्व जें असे । तें ये इये प्रकृतिदशे ।
चंद्रमा अवंसे । पडिला जैसा ॥ २ ॥
विदल बहू चोखा । मीनलेया वाला एका ।
कसु होये पांचिका । जिया परीं ॥ ३ ॥
कां साधुतें गोंदलिं । संचरौनि सुये मेलिं ।
नाना सुदिनाचां आभालिं । दुर्दिनु कीजे ॥ ४ ॥
तेथ पय पशुचां पोटीं । कां वन्हि जैसा काष्टीं ।
गूंढूनि घेतला पुटीं । रत्नदीपु ॥ ५ ॥
राजा पराधीनु जाला । सिंहु रोगें रुंधला ।
तैसा पुरुषु प्रकृती आला । स्वतेजा मुके ॥ ६ ॥
जागता नरु सहसा । निद्रा पाडौनि जैसा ।
स्वप्निचिया ही सोसा । वश्यु कीजे ॥ ७ ॥
तैसें प्रकृति जालेपणें । पुरुषा गुण भोगणें ।
उदासु अंतौरिगुणें । आंतुडविजे ॥ ८ ॥
तैसें अजा नित्या होए । आंगिं जन्ममृत्युचे घाए ।
वाजति जैं लाहे । गुणसंगु हा ॥ ९ ॥
पारि तें ऐसें पांडुसुता । तातलें लोह पीटितां ।
जेवि वन्हीसी चि घाता । बोलिजति ॥ १०१० ॥
कां आंदोललेया उदक । प्रतिभा होये अनेक ।
तें नानात्व ह्मणति लोक । चंद्रिं जेवि ॥ ११ ॥

दर्पणाचिया जवळिका । दूजेपण जैसें मुखा ।
कुंकुमें स्फटिका । लोहित्व होए ॥ १२ ॥
तैसा गुणसंगमें । हा अजन्मा जन्में ।
पावतु ऐसा गमे । यऱ्हवीं नाहिं ॥ १३ ॥
अधमोत्तमा योनी । या ऐसिया मानी ।
जैसा संन्यासी स्वप्नीं । अंत्यु होये ॥ १४ ॥
ह्मणौनि केवल पुरुषा । नाहिं होणें भोगणें देखा ।
एथ गुणसंगू चि अशेषा । लागा मूळ ॥ १५ ॥

**उपद्रष्टानुमंता च भर्ता भोक्ता महेश्वरः ।**
**परमात्मेति चाप्युक्तो देहेस्मिन्पुरुषः परः ॥ २२ ॥**

हा प्रकृती माझि उभा । परि जुई जैसा वोथंबा ।
प्रकृति पृथ्वी नभा । तेतुला पाडू ॥ १६ ॥
प्रकृतिचां तटीं । मेरु हा किरीटी ।
माजि बिंबे परि लोटीं । लोटों नेणे ॥ १७ ॥
आणि प्रकृति होये जाये । हा तों असतू चि आहे ।
ह्मणौनि आब्रह्माचें होए । शासन हा ॥ १८ ॥
प्रकृति येणें जिये । या सत्ता जग विये ।
या लागि इये । वरैतु हा ॥ १९ ॥
अनंत काल किरीटी । जिया मिळति इया शृष्टि ।
तिया रिगति एयाचां पोटिं । कल्पांतसमइं ॥ १०२० ॥
हा महद्ब्रह्म गोसांविं । हा ब्रह्मगोल लाघवी ।
अपारपणें मवी । प्रपंचातें ॥ २१ ॥
पैं या देहा माझारि । परमात्मा ऐसी जे परि ।
बोलिजे ते अवधारिं । एयातें चि ॥ २२ ॥
अगा प्रकृती परौता । एकु आथि पांडुसुता ।
ऐसा प्रवादु तो तत्वता । पुरुषु हा पैं ॥ २३ ॥

**यएवं वेत्ति पुरुषं प्रकृतिं च गुणैः सह ।**
**सर्वथा वर्तमानोपि न स भूयोभिजायते ॥ २३ ॥**

जो निखलपणें येणें । पुरुषा तेया जाणे ।
आणि गुणाचें करणें । प्रकृतिचें जें ॥ २४ ॥
हें रूप हे छाया । पैल जल हे माया ।
ऐसें जो धनंजया । निवाडु करी ॥ २५ ॥
तेणें पाडें अर्जुना । प्रकृतिपुरुषविवेंचना ।
जेयाचआ मना । गोचर जाली ॥ २६ ॥
तो शरीराचेनि मेळें । करू कां कर्में सकळें ।
परि आकाश धूमें न मैळे । तैसा असे ॥ २७ ॥
आथिलेनि देहें । नेघेपे देहमोहें ।
देह गेलेयां नोहे । पुनरपि तो ॥ २८ ॥
ऐसा तेया एकु । उपकारु अलौलिकु ।
प्रकृतिपुरुषविवेकु । करी पैं गा ॥ २९ ॥

**ध्यानेनात्मनि पश्यंति केचिदात्मानमात्मना ।**
**अन्ये सांख्येन योगेन कर्मयोगेन चापरे ॥ २४ ॥**

परि हा चि अंतरिं । विवेकु भानुचिया परी ।
उदैजे ते अवधारीं । उपाये बहुत ॥ १०३० ॥
कोण्ही एक सूभटा । विचाराचां आगिठां ।
आत्मानात्मकीटा । पुट देउनि ॥ ३१ ॥
सतीस ही वानी भेद । तोडूनियां निर्विवाद ।
निवडीति शुद्ध । आत्मतत्व ॥ ३२ ॥
तेया आपणपेयाचां पोटीं । आत्मध्यानाचेया दीठी ।
देखति गा किरीटी । आपणपें ॥ ३३ ॥
आणिक पैं दैवबगें । देखति सांख्ययोगें ।
एक ते आंगळगें । कर्माचेनि ॥ ३४ ॥

**अन्ये त्वेवमजानंतः श्रुत्वान्येभ्य उपासते ।**
**ते पि चातितरंत्येव मृत्युं श्रुतिपरायणाः ॥ २५॥**

येणें येणें प्रकारें । निस्तरति साचोकारें ।
हें भय भाउरें । आघवें चि ॥ ३५ ॥
परि ते करिति ऐसें । अभिमानु दवडूनि देसें ।
एकांचेया विश्वासें । टेंकति बोला ॥ ३६ ॥
जे हिताहित देखति । हाणि कणवा घेपति ।
पूसौनि सीणु हरिति । देंति सुख ॥ ३७ ॥
तेयांचेनि मुखें निगे । तेतुलें आदरें चांगें ।
आइकौनियां आंगें । मनें होंति ॥ ३८ ॥
तेयां आयिकणेयां चि नावें । ठेविति गा आघवें ।
तेयां आखरांसि जीवें । करिति लोण ॥ ३९ ॥
तेया परीं कपिध्वजा । या मरणार्णवा समजा ।
पासौनि निगति बोजा । गोमटिया ॥ १०४० ॥
ऐसे हे उपाये । बहुवस एथ पाहे ।
जाणावेया होये । एकि वस्तु ॥ ४१ ॥
आतां असो हें बहुत । पैं सर्वार्थांचें मथित ।
सिद्धांतनवनीत । देउं तुज ॥ ४२ ॥
ऐतुलेनि पांडुसुता । अनुभवु लाहणा आइता ।
येर तवं तुज होंतां । सायास नाहिं ॥ ४३ ॥

**यावत्संजायते किंचित्सत्वं स्थावरजंगमं ।**
**क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात्तद्विद्धि भरतर्षभ ॥ २६ ॥**

म्हणौनि ते बुद्धि रचूं । मतवाद हे खांचूं ।
सोलीवं निर्वचूं । फलितार्थु चि ॥ ४४ ॥
परि क्षेत्रज्ञ एणें बोलें । तुज आपणपें जें दाखविलें ।
आणि क्षेत्र सांघितलें । आघवें चि ॥ ४५ ॥

तेयां येरयेरांचां मेळीं । होइजे भूतीं सकळिं ।
अनिलसंगें सलीलीं । कल्लोल जैसे ॥ ४६ ॥
कां तेजा आणि उखरा । भेटि जालेयां वीरा ।
मृगजलाचेया पूरा । रूप होये ॥ ४७ ॥
नाना धाराधरधारीं । झळंबली वसुंधरी ।
उठी जेवि अंकुरीं । नाना विधीं ॥ ४८ ॥
तैसें चळाचळ आघवें । जें काहिं जीउ नावें ।
तें तो उभययोगें संभवें । ऐसें जाण ॥ ४९ ॥
एया लागि अर्जुना । क्षेत्रज्ञा प्रधाना ।
पासौनि न्हवति भिन्ना । भूतव्यक्ती ॥ १०५० ॥

**समं सर्वेषु भूतेषु तिष्ठंतं परमेश्वरं ।**
**विनश्यत्स्वविनश्यंत यः पश्यति स पश्यति ।।२७।।**

पैं पटुत्व तंतु नोहे । तन्हीं तंतुवें चि तें आहे ।
ऐसां खोलिं डोळां पाहे । ऐक्य हें गा ॥ ५१ ॥
भूतें आघविं चि होंति । एकाचिं एकिं आहाति ।
पैं भूतप्रतीति । वेगळीक असे ॥ ५२ ॥
याचिं नावें आनानें । अनारिसिं वर्त्तनें ।
वेख ही सिनाने । आघवेयांचे ॥ ५३ ॥
ऐसें देखौनि किरीटी । भेदु हान सूंसि पोटीं ।
तरि जन्माचिये आटी । न लाहासि निगों ॥ ५४ ॥
पैं नानाप्रयोजनशीळें । दीर्घें वक्रें वर्त्तुळें ।
होंति येकिचियें फळें । तुंबिणिये ॥ ५५ ॥
होंतु कां उजू वांकुडे । परि वेलिचें हें न मोडे ।
तैसिं भूतें अवघडें । वस्तू उजू ॥ ५६ ॥
अंगारकणीं बहुवासिं । उष्णता समान जैसी ।
तैसा जीवराशी । परेशु असे ॥ ५७ ॥

गगनभरिं धारा । परि पाणी एक वीरा ।
तैसा या भूताकारा । सर्वांगीं तो ॥ ५८ ॥
हे भूतग्राम विषम । वस्तु येथ सम ।
घटमठी व्योम । जिया परीं ॥ ५९ ॥
हा नासतां भूताभासु । एथ आत्मा अविनाशु ।
जैसा केयूरादिकिं कसु । सोनेयांचा ॥ १०६० ॥
एवं जीवधर्महीनु । जीवांसि अभिन्नु ।
जो देखे सुनयनु । ज्ञानियां माझि ॥ ६१ ॥
ज्ञानाचां डोळां डोळसां । माझि डोळसु तो वीरेशा ।
हे स्तुति नोहे बहुवसा । भाग्याचा तो ॥ ६२ ॥

**समं पश्यन् हि सर्वत्र समवस्थितमीश्वरं ।**
**न हिनस्त्यात्मनात्मानं ततो याति परां गतिं ॥ २८ ॥**

जें इंद्रियबोकौटी । देहधातुची त्रिकुटी ।
पांचमेळवेयाची वोखटी । दारुण हे ॥ ६३ ॥
हे उघडी पांचवेउली । हे पंचधा आंगिं लागली ।
जीवपंचानना सांपडली । हरिणिकुटी ॥ ६४ ॥
ऐसां असौनि इये शरीरीं । कोणु अनन्यबुद्धीची सूरी ।
अनित्यभावाचां उदरीं । दाटी चि ना ॥ ६५ ॥
परि इये देहीं असतां । तो नैये चि आपणपेयां घाता ।
आणि शेखिं पांडुसुता । तेथ मिळे ॥ ६६ ॥
जेथ योगज्ञानाचिया प्रौढीं । वोलांडूनि जन्मकोडी ।
न निगों या भाषा बुडी । देंति योगी ॥ ६७ ॥
जें आकाराचें पैल तीर । तुर्येचें माजिघर ।
जे नादाची पैल मेर । परब्रह्म जें ॥ ६८ ॥
मोक्षा सगट गती । जेथें एंति विश्रांती ।
गंगादि अपांपती । सरिता जेवि ॥ ६९ ॥

तें सुख येणें चि देहें । पाये पाखाळणियां लाहें ।
जो भूतवैषम्य नोहे । विषमबुद्धी ॥ १०७० ॥
दीपाचेया कोडी जैसें । एक चि तेज प्रकाशे ।
तैसा जो असतू चि असे । सर्वत्र ईशु ॥ ७१ ॥
तेया समातें पांडुसुता । जीवें जो देखे समता ।
तो मरणा आणि जीविता । नांगवे फुडा ॥ ७२ ॥
म्हणौनि तो दैवांगला । वानित असो वेलेवेलां ।
साम्यसेजे डोला । लागला जेया ॥ ७३ ॥

**प्रकृत्यैव च कर्माणि क्रियमाणानि सर्वशः ।**
**यः पश्यति तथात्मानमकर्त्तारं स पश्यति ॥ २९ ॥**

आणि मनोबुद्धिप्रमुखें । कर्में जियें अशेखें ।
करी प्रकृति चि जो देखे । साचें जो गा ॥ ७४ ॥
घरिचीं चि राहाटति घरीं । घर काहिं न करी ।
अभ्र धांवे अंबरीं । अंबर उगें ॥ ७५ ॥
तैसी प्रकृति आत्मप्रभा । खेळे गुणविधा शोभा ।
येथ आत्मा तो वोथंबा । नेणों कोणु ॥ ७६ ॥
ऐसेनि एणें निवाडें । जेयाचां जीविं उजिवडे ।
अकर्त्तयातें फुडें । देखिलें तेणें ॥ ७७ ॥

**यदा भूतपृथग्भावमेकस्थमनुपश्यति ।**
**तत एव च विस्तारं ब्रह्म संपद्यते तदा ॥ ३० ॥**

यऱ्हविं तैं चि अर्जुना । होइजे ब्रह्मसंपन्ना ।
जैं इया भूताकृती भिन्ना । दीसति एकिं ॥ ७८ ॥
लहरिया जैसिया जाळिं । परमाणु—कणिका स्थळीं ।
रश्मिकर मंडळिं । सूर्याचां ॥ ७९ ॥
नातरि देहिं अवयव । मनिं आघवे भाव ।
विस्फुलिंग सर्व । वन्हि एकि ॥ १०८० ॥

तैसे भूताकार एकाचे । एथ दृष्टि रिगे जै साचें ।
तैं चि ब्रह्मसंपत्तिचें । तारुं लागे ॥ ८१ ॥
मग जिये तिये कडे । ब्रह्माची दृष्टि उघडे ।
किंबहुना जोडे । अपार सुख ॥ ८२ ॥
एतुलेनि तुज पार्था । प्रकृतिपुरुषवेवस्था ।
ठायें ठाउं प्रतीतिपंथा । माजि जाली ॥ ८३ ॥
अमृत जैसें ये चूळा । निधान जैसें देखिजे डोळां ।
तेतुला जीवाला । मानावा हा ॥ ८४ ॥
वांचूनि जालिये प्रतिती । घर बांधणें चित्तिं ।
तें आतां ना सुभद्रापति । या वरि ॥ ८५ ॥
तरि एक दोनि ते बोल । बोलिजति सखोल ।
देइं मनाची वोल । मग तें घेइं ॥ ८६ ॥
ऐसें देवें ह्मणितलें । मग बोलों आदरिलें ।
तेथ अवधानाचें केलें । सर्वांग एरें ॥ ८७ ॥

**अनादित्वान्निर्गुणत्वात्परमात्मायमव्ययः ।**
**शरीरस्थोपि कौंतेय न करोति न लिप्यते ॥ ३१ ॥**

ह्मणे परमात्मा ह्मणिपे । तो ऐसा जाण सरूपें ।
जळिं जळें न सिंपे । सूर्यु जैसा ॥ ८८ ॥
कां जळा आधिं पाठिं । सूर्यु असतू चि किरीटी ।
माजि बिंबे ते दीठी । आणिकाचिये ॥ ८९ ॥
तैसा आत्मा देहिं । आथि ह्मणिपे हें काहिं ।
साचें तरि नाहिं । तो जेथिचा तेथ ॥ ॥ १०९० ॥
आरिसां मुख जैसें । बिंबलेया नावं असे ।
देहिं वसणें तैसें । आत्मतत्व ॥ ९१ ॥
तेया देहा ह्मणति भेटि । हे सपाइ नीजीव गोठि ।
वारेयानि वाळुवे गांठि । केहिं आहे ॥ ९२ ॥

आगि आणि पींसा । दोरा सुयी जैसा ।
केउता सांदा आकाशा । पाखाणेंसि ॥ ९३ ॥
एक निगे पूर्वा कडे । एक तें पश्चिमें पडे ।
तिये भेटिचेनि पाडें । संबंधु हा ॥ ९४ ॥
उजियडा आंधारेया । जो पाडु मृता उभेया ।
तो चि गा आत्मेयां । देहा जाण ॥ ९५ ॥
रात्रि आणि दिवसा । कनका आणि कापुसा ।
पाडु कां जैसा । तैसा चि हा ॥ ९६ ॥
हें तवं पांचाचें जालें । कर्माचां गुणिं गुंतलें ।
भवंतसे चाकिं सूदलें । जन्ममृत्युचां ॥ ९७ ॥
हे कालानलाचां कुंडीं । घातली लोणियांची उंडी ।
मासी पांख पाखडी । तवं हे सरे ॥ ९८ ॥
हें विपाएं आगी पडे । तरि भस्म होनि उडे ।
जालें श्वाना वरिपडें । तरि ते चि विष्ठा ॥ ९९ ॥
यां चूके दोन्हीं काजां । तरि होये क्रिमिचा पुंजा ।
ऐसा परिणामु कपिध्वजा । कश्मलु गा ॥ ११०० ॥
या देहाची हे दशा । आणि आत्मा तो ऐसा ।
पैं सिद्धु नित्यु आपैसा । अनादिपणें ॥ १ ॥
सकलु ना निष्कलु । अक्रियु ना क्रियाशीलु ।
कृशु ना स्थूलु । निर्गुणपणें ॥ २ ॥
आभासु ना निराभासु । प्रकाशु ना अप्रकाशु ।
अल्पु ना बहुवसु । अरूपपणें ॥ ३ ॥
रीता ना भरितु । रहितु ना सहितु ।
मूर्त्तु ना अमूर्त्तु । शून्यपणें ॥ ४ ॥
आनंदु ना निरानंदु । एकु ना विविधु ।
मोकला ना बद्धु । आत्मेपणें ॥ ५ ॥

एतुला ना तेतुला । आयिता ना रचला ।
बोलता ना उगला । अलक्षपणें ॥ ६ ॥
सृष्टिचां होणां न रचे । सर्वसंहारें न वेचे ।
आथिनाथि यां दोहींचें । पंचत्व तो ॥ ७ ॥
मवे ना चर्चे । वाढे ना खांचे ।
वीटे ना वेचे । अव्ययपणें ॥ ८ ॥
एवंरूपु पैं आत्मा । देहिं जे ह्मणति प्रियोत्तमा ।
तें मठाकारिं व्योमा । नावं जैसें ॥ ९ ॥
तैसें तियाचिये आनाभूती । होंती जांती देहाकृती । अनस्यूतें
तो घे ना सांडी सुमती । जैसा तैसा ॥ ११९० ॥
अहोरात्रें जैसीं । होंति जांति आकाशीं ।
आत्मसत्ते तैसीं । देहें जाण ॥ ११ ॥
ह्मणौनि इये शरीरीं । काहिं करवी नां करी ।
आयितां हिं व्यापारिं । सञ्जु नोहे ॥ १२ ॥
या लागि स्वरूपें । उणा पुरा नेघेपे ।
हें असो तो न लिंपे । देहीं देहें ॥ १३ ॥

**यथा सर्वगतं सौक्ष्म्यादाकाशं नोपलिप्यते ।**
**सर्वत्रावस्थितो देहे तथात्मा नोपलिप्यते ॥ ३२ ॥**

आगा आकाश कें नाहिं । हें न रिगे चि कव्हणिये ठांइं ।
परि काइसेनि हिं काहिं । गादे चि ना ॥ १४ ॥
तैसा सर्वत्र सर्वदेहीं । आत्मा असतू चि असे पाहीं ।
परि संगदोषें एकें हिं । लिप्तु नोहे ॥ १५ ॥
पुडुतिं पुडुतिं एथें । हें चि लक्षण निरुतें ।
जें जाणावें क्षेत्रज्ञातें । क्षेत्रविहीना ॥ १६ ॥
संसर्गें चेतविजे लोहें । परि लोह चि भ्रामक नोहे ।
क्षेत्रज्ञा आहे । तैसा पाडु ॥ १७ ॥

दीपकाचां अर्ची । राहाटि वाहे घरींची ।
तर्‍हीं वेगळीक कोडीची । दीपा घरा ॥ १८ ॥
असें काष्टाचां पोटिं । वन्हि जैसा किरीटी ।
काष्ट नोहे या दीठी । पाहिजे जेवि ॥ १९ ॥
अपाडु नभा आभाळा । रवी आणि मृगजळा ।
तैसा चि हा ई डोळा । देखावा पैं ॥ ११२० ॥

**यथा प्रकाशयत्येकः कृत्स्नं लोकमिमं रविः ॥**
**क्षेत्रं क्षेत्री तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत ॥ ३३ ॥**

हें आघवें चि असो एकु । गगनौनि जैसा अर्कु ।
प्रकटवी लोकु । नावें नावें ॥ २१ ॥
एथ क्षेत्रज्ञु तैसा । प्रकाशकु क्षेत्राभासा ।
या वरौतें हें न पुसा । शंका नेघां ॥ २२ ॥
शब्दतत्वसारज्ञा । पैं ते चि देखणी प्रज्ञा ।
जे क्षेत्रा क्षेत्रज्ञा । अपाडु देखे ॥ २३ ॥
एयां दोहिंचें अंतर । देखावेया चतुर ।
ज्ञानियांचें दार । आराधिति ॥ २४ ॥
या चि लागि सुमती । जोडीति तपसंपत्ती ।
शास्त्रांचीं दुभतीं । पोसिति घरीं ॥ २५ ॥
योगाचेया आकाशा । वळविजे येवढा धिवंसा ।
याचिया चि आशा । पुरुषासि गा ॥ २६ ॥
शरीरादि समस्त । मानिताति अंतवंत ।
जीव संतांचे करित । वाहाणधर ॥ २७ ॥
ऐसिया ऐसिया परी । ज्ञानाचिया भरोवरी ।
करूनियां अंतरीं । निरुते होंति ॥ २८
मग क्षेत्रक्षेत्रज्ञाचें । ते अंतर देखति साचें ।
ज्ञानें उन्मेष तेयांचे । वोवाळूं आम्हीं ॥ २९ ॥

आणि महाभूतादिकिं । प्रभेदवेलि अनेकिं ।
पसरली असे लटकी । प्रकृति जे हे ॥ ११३० ॥
ते शुकनलिकान्यायें । न लगती लागली आहे ।
हे जैसी तैसी होए । ठाउवें जेया ॥ ३१ ॥
जैसी माला ते माला । ऐसें चि देखिजे डोलां ।
सर्पबुद्धि तवं टवाला । उखी होउनि ॥ ३२ ॥
कां शुक्तिते शुक्ति । हें साच हे प्रतीति ।
रूपेयाची भ्रांति । जाउनियां ॥ ३३ ॥
तैसी वेगली वेगलेपणें । प्रकृति जै अंतष्करणें ।
देखति ते मी ह्मणें । ब्रह्म होंति ॥ ३४ ॥
जें आकाश होउनि वाड । जें अव्यक्ताची पैली कड ।
जें भेटलेयां आहाडबाहाड । पडों नेंदी । ३५॥

**क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवमंतरं ज्ञानचक्षुषा ।**
**भूतप्रकृतिमोक्षं च ये विदु यांति ते परं ॥ ३४ ॥**

आकारु जेथ सरे । जीवत्व जेथ वीरे ।
द्वैत जेथ नुरे । अद्वय जें ॥ ३६ ॥
तें परत्व पार्था । होंति ते सर्वथा ।
जें आत्मानात्मवेवस्था- । राजहंस ॥ ३७ ॥
ऐसा जी हा आघवा । श्रीकृष्णें तेया पांडवा ।
उगाणा दीधला जीवा । जीवाचेया ॥ ३८ ॥
एरी कलशिचें एरीं । रिचविलें जेया परी ।
आपणपें तेया हरी । दीधलें तैसें ॥ ३९ ॥
आणि कोणा देता कोणु । तो नरु तैसा नारायणु ।
वारि अर्जुनातें कृष्णु । हा मी ह्मणे ॥ ११४० ॥
परि असो हें नाथिलें । न पुसतां कां बोलें ।
किंबहुना दीधलें । सर्वस्व देवें ॥ ४१ ॥

किं तो पार्थु मनीं । आह्मुईं धणि न मनी ।
अधिकाधिक उतान्ही । वाढवितु असे ॥ ४२ ॥
स्नेहाचिया भरोवरी । आबुथिला दीपु घे थोरी ।
चाड अर्जुनाचां अंतरिं । परिसतां तैसी ॥ ४३ ॥
येथ सुगराणि उदारें । रसज्ञें जेवण्हारें ।
मिळति मग अवतरे । हातु जैसा ॥ ४४ ॥
तैसें जी होंतसे देवा । तेया अवधानाचेया ल्वलवा ।
वाखाण चढलें थावां । चौगुणे वेन्हीं ॥ ४५ ॥
सुवायें मेघु सांवरे । जैसा चंद्रें सिंधु भरे ।
तैसा मातला रसु आदरें । श्रोतियाचेनि ॥ ४६ ॥
आतां आनंदमय आघवें । विश्व चि कीजैल देवें ।
तें रायें परिसावें । संजयो ह्मणे ॥ ४७ ॥
एवं जें महाभारतीं । व्यासें अप्रांतमती ।
भीष्मपर्वि शांतिं । ह्मणितली कथा ॥ ४८ ॥
तो कृष्णार्जुनसंवादु । नागरिं बोलिं विशदु ।
सांघों दाउं बंधु । वोवियेचा ॥ ४९ ॥
नसुदी चि शांतीकथा । आणिजैल किर वाक्यपथा ।
परि श्रिंगाराचां माथां । पावो ठेविति ॥ ११५० ॥
दाउं वेल्हाळ देशी नवी । जैसी साहित्यातें वोजावी ।
अमृता ही चूकि ठेवी । गोडिसेपणें ॥ ५१ ॥
बोलु वेल्हावितेनि गुणें । चंद्रासि घे उमाणें ।
रसुभंगु भुलवणें । नादु लोपी ॥ ५२ ॥
खेचरांचेया ही मना । आणि सात्विकाचा पान्हा ।
श्रवणा सवें सुमना । समाधि जोडे ॥ ५३ ॥
तैसा वाग्विलासु विस्तारुं । गीतार्थां विश्व भरुं ।
आनंदाचें आवारुं । मांडू जगा ॥ ५४ ॥

फीटो विवेकाची वाणि । हो काना मना जीणि ।
देखो आवडे ते खाणि । ब्रह्मविद्येची ॥ ५५ ॥
दीसो परतत्व डोळां । पाहो सुखाचा सोहळा ।
रिगो महाबोधु सुकाळा । माजि विश्व ॥ ५६ ॥
हें निफजे आतां आघवें । ऐसें बोलिजैल बरवें ।
जें अधिष्ठली असें परदेवें । निवृत्ती मीं ॥ ५७ ॥
ह्मणौनि आखरीं सुभेदिं । उपमाश्लेषकोंदाकोंदी ।
झाडा देईन प्रतिपदीं । ग्रंथार्थासि ॥ ५८ ॥
हा ठाउ वेरि मातें । पुरतेयां आहे सारस्वतें ।
केलें असे श्रीमंतें । गुरुरायें ॥ ५९ ॥
तेणें जी कृपासावायें । मी बोलें तेतुलें सामाये ।
आणि तुमचिये सभे लाहें । गीतार्थु ह्मणों ॥ ११६० ॥
वरि तुह्मां संतांचे पाये । आजि मी पातलां आहें ।
ह्मणौनि जी नोहे । अटक काहिं ॥ ६१ ॥
प्रभू काश्मिरीं मूकें । नुपजे जी कवतुकें ।
नाहिं गुणें सामुद्रिकें । लक्ष्मीयेसि ॥ ६२ ॥
तैसी तुह्मां संतां पासिं । अज्ञानाची गोठि काइसी ।
या लागि नवरसिं । वरिखैन मीं ॥ ६३ ॥
किंबहुना आघवां । मज अवसरु देयावा ।
ज्ञानदेउ ह्मणे बरवा । सांघैन ग्रंथु ॥ ६४ ॥

ॐ तत्सदितिश्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे क्षेत्रक्षेत्रज्ञयोगो नाम त्रयोदशोऽध्यायः ॥

॥ सर्वात्मकश्रीकृष्णार्पणमस्तु ॥



# ज्ञानेश्वरी

## अध्याय चौदावा

**श्रीगणेशायनमः ॥**

जय जय आचार्या । समस्तसुरवर्या ।
प्रज्ञाप्रभातसूर्या । सुखोदया ॥ १ ॥
जय जय सर्वविसांवेया । सोहंभावसुहावेया ।
नानालोकहेलावेया । समुद्रा तूं ॥ २ ॥
आइकैं गा आर्त्तबंधू । निरंतरकरुणासिंधू ।
विशदविद्यावधू–। वल्लभा जी ॥ ३ ॥
तूं जेया प्रतिलपसि । तेया जग हें दाविसि ।
प्रकट तैं करिसी । आघवें तूं ॥ ४ ॥
पुढेलां तरि चोरिजे । हा दृष्टिबंधु निफजे ।
नवल लाघव तूझें । घरिचां वरीं ॥ ५ ॥
जें तूं चि तूं सर्वां एया । कवणा बोधु कवणा माया ।
ऐसें आपें आपु लाघविया । नमो तूज ॥ ६ ॥
जाणों जगीं आप बोलें । हें रस जी तुवां केलें ।
तूझेनि क्षेमत्व आलें । पृथ्वियेसि ॥ ७ ॥
रविचंद्रादिशूक्ति । उदो कारितां त्रीजगती ।
तें तूझिया दीप्ती । तेज तेजां ॥ ८ ॥

चलबलिजे अनिलें । तें देविकेनि जी बळें ।
नभ तुज माजि खेळे । लपीं थपीं ॥ ९ ॥
किंबहुना माया असोस । ज्ञान तूझेनि डोलस ।
असो वानणें सायास । श्रुतिसि हे ॥ १० ॥
वेद जें वानूनि चांग । जवं न दिसे तूझें आंग ।
मग आह्मा तेया मूग । एकी पांती ॥ ११ ॥
जी एकार्णवाचां ठांइं । बुडडेयांचा पाडु नाहीं । पड्ता थेंबाचा
मग महानदी काई । जाणिजती ॥ १२ ॥
कां उदैलेयां भास्वतु । चंद्र जैसा खद्योतु ।
आह्मा श्रुती तुज आंतु । तेतुला पाडु ॥ १३ ॥
आणि दूजेया थाउ मोडे । जेथ परेसिं वैखरी बुडे ।
मी तो तूं मां कवणें तोंडें । वानावासि ॥ १४ ॥
येया लागि आतां । स्तुति सांडुनि निवांतां ।
चरणीं ठेविजे माथा । हें चि भलें ॥ १५ ॥
तरि तूं जो होसि तेया । नमो श्रीगुरुराया । तुज तैसेया ।
मज ग्रंथउद्यमु फलावेया । वेव्हारा होईं ॥ १६ ॥
आतां कृपाभांडवल सोडीं । भरीं मति माझी पोतडी ।
करीं ज्ञानपद्‌जोडी । थोर मातें ॥ १७ ॥
मग मी सर्वसरेनि तेणें । संतांसि करीं कर्णभूषणें । ना
लेववीन सुलक्षणें । विवेकाचीं ॥ १८ ॥
जी गीतार्थुनिधान । काढू माझें मन ।
सुईं स्नेहांजन । आपुलें तूं ॥ १९ ॥
हे वागभृष्टि येकें वेळें । देखति बुद्धीचे डोळे ।
तैसा उदैजो निर्मळें । कारुण्यबिंबें ॥ २० ॥
माझी प्रज्ञावेलिवें वेल्हाळ । काव्यें होंति सुफळ ।
तो वसंतु होईं स्नेहाळ । शिरोमणी ॥ २१ ॥

प्रमेयमहापुरें । हे मतिगंगा भरे ।
तैसा वरिष उदारें । दीठिवेनि ॥ २२ ॥
आगा विश्वैकधामा । तूझा प्रसादु चंद्रमा ।
करू मज पूर्णिमा । स्फूर्तिची जी ॥ २३ ॥
जिया पाहिलें मातें । उन्मेखसागरिचें भरितें ।
वोसंडैल तें । रस–वृत्तिचें ॥ २४ ॥
तवं तोखौनि गुरुराजें । ह्मणितलें विनतिव्याजें ।
मांडिलें देखों दुजें । स्तवुं तुवां ॥ २५ ॥
हें असो आतां वाजटा । तो ज्ञानकर्पूर गोमटा ।
ग्रंथु दावि उत्कंठा । भंगों नेंदीं ॥ २६ ॥
हो कां जी जी स्वामी । हें चि पाहांतु असें मीं ।
जें श्रीमुखें ह्मणां तुह्मीं । ग्रंथु सांघैं ॥ २७ ॥
जी दूर्वेचा हीरु । आंगें चि तवं अमरु ।
वरि आला महापूरु । पीयुषाचा ॥ २८ ॥
तरि आतां एणें प्रसादें । विन्यासें विदग्धें ।
मूळशास्त्रपदें । वाखाणीन ॥ २९ ॥
परि जीवा आंतुली कडे । जैसी संदेहडोणी बुडे ।
मग श्रवणचाडे । आवाडि दीसे ॥ ३० ॥
तैसां बोलीं साचारीं । अवतरो माझी माधुरी ।
माळें मागैन घरीं । गुरुकृपेचां ॥ ३१ ॥
तरि मागां त्रयोदशीं । अध्याइं गोठि ऐसी
जें श्रीकृष्णु अर्जुनेंसीं । संवादले ॥ ३२ ॥
जें क्षेत्रक्षेत्रज्ञयोगें । होइजे येणें जगें ।
आत्मा गुणसंगें । संसारिया ॥ ३३ ॥
आणि हा चि प्रकृतिगतु । सुखदुःखभोगीं हेतु ।
अथवा गुणातीतु । केवळु हा ॥ ३४ ॥

तरि कैसा यां असंगा संगु । कोणु तो क्षेत्रक्षेत्रज्ञयोगु ।
सुखदुःखादि भोगु । केवि तेया ॥ ३५ ॥
गुण ते कैसे केती । बाधति कवणां रीती ।
नातरि गुणातीतीं । चिन्हु काई ॥ ३६ ॥
एवं येया आघवेया । अर्था रूप करावेया ।
विषो एथ चौदावेया । अध्यायासि ॥ ३७ ॥
तरि तो चि आतां ऐसा । प्रस्तुतु परियसां ।
अभिप्राउ विश्वेशा । वैकुंठाचा ॥ ३८ ॥

**श्रीभगवानुवाच ॥**

**परं भूयः प्रवक्ष्यामि ज्ञानानां ज्ञानमुत्तमं ॥**
**यज्ज्ञात्वा मुनयः सर्वे परां सिद्धिमितो गताः ॥ १ ॥**

तो ह्मणे गा अर्जुना । अवधानांची सर्व सेना ।
मेळउनियां ज्ञाना । झोंबावें हो ॥ ३९ ॥
आर्हीं मागां बहुतिं । दाविलें तुज उपपत्तीं ।
आझुई प्रतीती । कुंसि न निगे ॥ ४० ॥
ह्मणौनि गा पुडुतीं । सांघिजैल प्रतिपत्ती ।
परि ह्मणह्मणों श्रुती । डाहारिजे जें ॥ ४१ ॥
एऱ्हविं ज्ञान हें आपुलें । परि पर हें ऐसें जालें ।
जें अवर घेतलें । स्वर्गादि एणें ॥ ४२ ॥
एणें चि गा कारणें । हें सर्वां उपरि मीं ह्मणें ।
तें वन्हि यें तृणें । एरें ज्ञानें ॥ ४३ ॥
जियें स्वर्गादि तें जाणति । याग चि चांग ह्मणति ।
पारखि फुडी आथि । भेदीं जेयां ॥ ४४ ॥
तियें आघवीं चि ज्ञानें । केलीं एणें स्वप्नें ।
जैसे वातोर्मि गगनें । गीळिले आथि ॥ ४५ ॥

कां उदितें रश्मिराजें । लोपतीं चंद्रादि तेजें ।
नाना प्रलयांबुमाजें । नदीनद ॥ ४६ ॥
तैसें हें पाहालेयां । अज्ञानजात जाये लया ।
ह्मणौनि धनंजया । उत्तम हें ॥ ४७ ॥
अनादि जे मुक्तता । आपुली जे पांडुसुता ।
तो मोक्षु हाताइता । होये जेणें ॥ ४८ ॥
येयाचिया प्रतीती । विचारविरें समस्तीं ।
नेंदिजे चि संशृती । माथा उधों ॥ ४९ ॥
मनें मन धाल्लनियां मागें । विश्रांति जालेयां आंगें ।
देहीं देहा जोगे । होती चि ना ॥ ५० ॥
मग देहाचें बेलें । उग्लांडूनि येकें वेलें ।
समतूकीं काटालें । मसीं जाले ॥ ५१ ॥

इदं ज्ञानमुपाश्रित्य मम साधर्म्यमागताः ॥
सर्गेपि नोपजायंते प्रलये न व्यथंति च ॥ २ ॥

जे माझिया नित्यता । नित्य ते पांडुसुता ।
परिपूर्ण पूर्णता । माझिया चि ॥ ५२ ॥
मी जैसा अनंतानंदु । जैसा चि सत्वसिद्धु ।
तैसा चि तेया भेदु । उरे चि ना ॥ ५३ ॥
जें मीं जेवडें जैसें । तें चि ते जाले तैसें ।
घटभंगीं घटाभासें । आकाश जेवि ॥ ५४ ॥
नातरि दिवा मुकुलिकीं । दीपशिखा अनेकीं ।
मीनलेयां अवलोकीं । जैसें होये ॥ ५५ ॥
अर्जुना तिया परीं । सरली द्वैताची वारी ।
नांदो नामार्थ एकाहारी । आह्मीं ते ही ॥ ५६ ॥
एणें चि पैं कारणें । जैं पहिलें शृष्टिजुपणें ।
तैं तेयां होणें । पडे चिं ना ॥ ५७ ॥

सृष्टिचिये सर्वादी । जेयां देहाची नाहिं बाधी ।
तें कैंचे प्रलयाधी । निमतील पां ॥ ५८ ॥
ह्मणौनि जन्मक्षयां । अतीत ते धनंजया ।
मी जालां ज्ञाना येया । अनुसरौनि ॥ ५९ ॥
ऐसी ज्ञानाची गोडी । वानिली देवें आवडी ।
तेविं चि पार्था सिचडी । लावावेया ॥ ६० ॥
तवं तेया जालें आन । सर्वांगिं निगाले कान ।
सपाई अवधान । पातला तो ॥ ६१ ॥
आतां देवाचेया ऐसें । जाकलिजत वोरसें ।
निरूपण आकाशें । वेंटाले ना ॥ ६२ ॥

**मम योनिर्महद्ब्रह्म तस्मिन्गर्भं दधाम्यहं ॥**
**संभवः सर्वभूतानां ततो भवति भारत ॥ ३ ॥**

तो ह्मणे गा प्रज्ञाकांता । आजि उजळली वागतृता ।
जें बोला एवडा श्रोता । जोडलासि ॥ ६३ ॥
तरि एकु मीं अनेकीं । गोंविजे देहपाशकीं ।
त्रिगुणलुब्धकीं । कवणी परीं ॥ ६४ ॥
कैसा क्षेत्रयोगें । वियें येणें जगें ।
तें परियस सांघों वेगें । कोण आतां ॥ ६५ ॥
पैं क्षेत्र येणें व्याजें । हें या चि लागि बोलिजे ।
जें मत्संगबीजें । भूतीं पिके ॥ ६६ ॥
आणि महद्ब्रह्म । हें इये ऐसें नाम ।
जें महदादिविश्राम—। शालिका हे ॥ ६७ ॥
विकारां बहुसै थोरी । अर्जुना हे चि करी ।
ह्मणौनि अवधारीं । हें महद्ब्रह्म ॥ ६८ ॥
अव्यक्तवादमती । अव्यक्त ऐसी वदंती ।
सांख्याचिया प्रतीती । प्रकृति हे चि ॥ ६९ ॥

वेदांतीं यातें माया । ह्मणिजे प्रज्ञाराया ।
केती बोलों वायां । अज्ञान हें गा ॥ ७० ॥
आपुला आपणेयां । विसरु जो धनंजया ।
तें गा रूप येया । अज्ञानांसि ॥ ७१ ॥
आणिक ही येक असे । जें विचारा वेगळें न दिसे ।
वाती पाहातां जैसें । आंधारें कां ॥ ७२ ॥
हाळविलेयां जाये । निश्चळ तरि राहे ।
दूधीं जैसी साये । दूधा चि तव ॥ ७३ ॥
पैं जागरु ना स्वप्न । स्वरूप ना अवस्थान ।
ते सुषुप्ति घन । जैसी होये ॥ ७४ ॥
कां न वियतां वायुतें । वांझें आकाश रीतें ।
तेया ऐसें निरुतें । अज्ञान गा ॥ ७५ ॥
पैलु खांबु कां पुरुषु । ऐसा निश्चयो नाहिं येकु ।
काइ नेणों अवलोकु । देखतसे ॥ ७६ ॥
तेंवि वस्तु जैसें असे । तैसें फिर न दिसे ।
परि काहिं अनारिसें । देखिजे ना ॥ ७७ ॥
नां राति ना तेज । तिये संधी जैसी सांज ।
तेंवि विरुद्ध ना नीज । ज्ञाना आथि ॥ ७८ ॥
ऐसी कोण्ही येकि दशा । तिये वादु अज्ञान ऐसा ।
तिया गुंडाळलिया प्रकाशा । क्षेत्रज्ञ नावं ॥ ७९ ॥
अज्ञान थोरिये आणिजे । आपणपें तरि नेणिजे ।
तें रूप जाणिजें । क्षेत्रज्ञाचें ॥ ८० ॥
हा चि उभययोगु । बुझें बाण चांगु ।
सत्तेचा नैसर्गु । स्वभाऊ हा ॥ ८१ ॥
आतां अज्ञानां सारिखें । वस्तु आपणपेयातें देखे ।
परि रूपें अनेकें । नेणों कोणें ॥ ८२ ॥

जैसा रंकु भ्रमला । ह्मणे जा रे मी राउ आलां ।
कां मूर्छीतु गेला । स्वर्गलोका ॥ ८३ ॥
तेवि लचकलिया दीठी । देखणें जें जें उठी ।
तेयां नावं शृष्टी । मी वियें गा ॥ ८४ ॥
हे चि आनी भ्रांती । प्रमेय उपलउं पुढ्तीं ।
तरि तूं प्रतीती । इयाचि घेइं ॥ ८५ ॥

**सर्वयोनिषु कौंतेय मूर्त्तयः संभवंति याः॥**
**तासां ब्रह्म महद्योनि रहं बीजप्रदः पिता ॥ ४ ॥**

तरि माझी घरणी । अनादि तरुणी ।
अर्वाच्य गुणीं । अविद्या पैं ॥ ८६ ॥
माझेनि चि आंगें । पहुडल्यां हे जागे ।
आणि सत्तासंभोगें । गुर्विणी होये ॥ ८७ ॥
महद्ब्रह्मउदरीं । प्राकृतें आठें विकारीं ।
गर्भाची करी । पेल्हेवेली ॥ ८८ ॥
इये नाहिं हें चि रूप । ठाणें हें उमप ।
निद्रितां समीप । चेंतां दूरि ॥ ८९ ॥
पैं उभयसंगु पहिलें । बुद्धित्वें उमले ।
बुद्धितत्वें भारैलें । होये मन ॥ ९० ॥
तारुण्यता मनाची । अहंकारत्व रची ।
तेणें महाभूतांची । अभिव्यक्ति होये ॥ ९१ ॥
आणि विषयइंद्रियां गोसी । स्वभावें तरि भूतांसि ।
ह्मणौनि येंति सरिसीं । त्यें हीं रूपा ॥ ९२ ॥
जालेनि विकारक्षोभें । पाठिं गुणाचेनि उभे ।
येवं संपूर्ण जे गर्भें । वायें ठाउ ॥ ९३ ॥ ठा
रुंखाचा ये वांका । जैसी कां बीजकणिका ।
जीर्विं बांधे उदका । भेटतखेउ ॥ ९४ ॥

तैसी माझेनि संगें । अविद्या नाना जगें ।
आरवों लागे । आपणपां चि ॥ ९५ ॥
मग गर्भगोळा तेया । कैसी रूपसे ये आया ।
परियसैं राया । सजनाचेया ॥ ९६ ॥
पैं अंडज स्वेदज । जारज उद्बीज ।
उमटति सहज । अवेव हे ॥ ९७ ॥
व्योमवायुवसें । वांटलेनि गर्भरसें ।
मणिजु उससे । अवेवु तो ॥ ९८ ॥
पोटीं सूनि तमरजें । आगलिका तोय तेजें ।
उठितां निफजे । स्वेदज गा ॥ ९९ ॥
आपपृथ्वीउत्कटें । आणि तमोमात्रें निकृष्टें ।
स्थावरु उमटे । उद्बीजु हा ॥ १०० ॥
पांचां पांच विरजीं । होंति मनबुध्यादि सहजीं ।
आणि इये चि जारजीं । ऐसें जाणैं ॥ १ ॥
ऐसे हे सरल । करचरणतल ।
महाप्रकृति स्थूल । तें चि शिर ॥ २ ॥
प्रवृत्ती पेललें पोट । निवृत्ति ते पाठि नीट ।
सुरयोनि आंगें आठ । ऊर्ध्वाचीं ॥ ३ ॥
कंठु उल्हासता स्वर्गु । मृत्युलोकु मध्यभागु ।
अधोदेशु चांगु । नितंबु तो ॥ ४ ॥
ऐसें लेंकरुं एक । प्रसवली हे देख ।
जेयाचे तीन्ही लोक । बालसें गा ॥ ५ ॥
चौरासी लक्ष योनी । तियें कांडीं पेरी संधानी ।
वाढे प्रतिदीनी । बालक हें ॥ ६ ॥
नाना देह अवेवीं । नामाचीं लेणीं लेववी ।
मोहो स्तनें वाढवी । नीचनवेनि ॥ ७ ॥

सृष्टी वेगळवेगळिया । त्या चि करां आंगुलिया ।
भिन्ना अभिमाना सूदलिया । मुदिया तेथ ॥ ८ ॥
हें एकलौतें चराचर । अविचारतें सुंदर ।
प्रसवौनि थोर । थोरावली ॥ ९ ॥
पैं ब्रह्मा प्रातःकाळु । विष्णु तो मध्यान्हवेळु ।
सदाशिव उवीळु । बालका येया ॥ ११० ॥
महाप्रलयसेजें । खेळौनि आलें नीजे ।
विषमज्ञानें उमजे । कल्पोदईं ॥ ११ ॥
अर्जुना इया परीं । मिथ्यादृष्टिचां घरीं ।
युगावृत्तिचीं करी । चोजवाउलें ॥ १२ ॥
संकल्पु याचा इष्टु । अहंकारु तो नीकटु ।
जैं होये तैं सेवटु । ज्ञानें येया ॥ १३ ॥
आतां असो बहू बोली । ऐसें विश्व माया व्याली ।
तेथ चांग जाली । माझी सत्ता ॥ १४ ॥
येया कारणें मी पिता । महद्ब्रह्म माता ।
अपत्य हा पांडुसुता । जगडंबरु ॥ १५ ॥
आतां शरीरें बहुतें । देखौनि न भेदें हो चित्तें ।
जें मनबुद्धिभूतें । एकें यया ॥ १६ ॥
हांगा एकी चि देहीं । काइ आनारिसे अवेव नाहिं ।
तेवि विचित्र विश्व पाहीं । एक चि हें ॥ १७ ॥
पैं उंचा नीचा डाहालिया । विषमा वेगळालिया ।
एका चि जेवि जालिया । बीजाचिया ॥ १८ ॥
आणि संबंधु तो ही ऐसा । मृन्मयो घटु कां जैसा ।
कां पटत्व कापुसा । आंतु होये ॥ १९ ॥
नाना कल्लोळपरंपरा । संतति जैसी सागरा ।
आह्मा आणि चराचरां । तैसा पाडु ॥ १२० ॥

ह्मणौनि वन्हि ज्वाळ । दोन्ही वन्ही चि केवळ ।
तेवि मी गा हें सकळ । समंधु वाऊ ॥ २१ ॥
जालेनि जगें मी झांकें । तरि जगत्वें कोणु फांके ।
कीलेवारि माणिकें । लोपिजे काइ ॥ २२ ॥
कां अलंकारत्व आलें । आणि सोनेंपण काइ गेलें ।
किं कमलत्व फांकलें— । पणें जायें ॥ २३ ॥
सांघ पां धनंजया । अवेवी अवेवीया ।
आछादिजे किं तेया । तें चि रूप ॥ २४ ॥
विरूढलेयां जोन्हला । कणिसांचां निर्वाला ।
वेचला कीं आगला । दीसतसे ॥ २५ ॥
ह्मणौनि जग परौतें । सारूनि पाहिजे मातें ।
तैसा न्हवे उखितें । आघवें चि मीं ॥ २६ ॥
हा तूं साचोकारा । निश्चयाचा खरा ।
गांठि बांध पां वीरा । जीवाचिये ॥ २७ ॥
आतां मियां मज दाविलां । शरीरीं वेगलालां ।
गुणीं मीं चि बांधलां । ऐसा आवडे ॥ २८ ॥
जैसें स्वप्नीं आपण । उठौनि आत्ममरण ।
भोगिजे गा जाण । कपिध्वजा ॥ २९ ॥
कां कवलातें डोले । प्रकाशूनि पीवलें ।
देखति तें हीं कले । तेयांसी चि ॥ १३० ॥
नाना सूर्य प्रकाशें । प्रकटी तें अभ्र भासे ।
तो लोपला हें इं दीसे । सूर्यें चि ॥ ३१ ॥
पैं आपणपेनि जालियां । छाया गा आपुलिया ।
भीउनि भियालियां । आवडिजे ॥ ३२ ॥
तैसीं इयें नाना देहें । दाउनि मीं नाना होयें ।
नाना होये एथ ऐसा बंध आहें । तें हीं देखें ॥ ३३ ॥

बद्ध कां न बंधिजे । जाणणें मज माझें ।
हें नेणणेनिउपजे । आपुलेनि ॥ १३४ ॥

**सत्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसंभवाः ॥**
**निबध्नंति महाबाहो देहे देहिनमव्ययं ॥ ५ ॥**

तरि कोणें गुणें कैसा । मज चि मीं बद्ध ऐसा ।
आवडे तें परियसां । अर्जुनदेवा ॥ ३५ ॥
गुण ते किंधर्म । काइ येया नाम ।
कें जाले हें वर्म । अवधारिजो ॥ ३६ ॥
तरि सत्वरजतम । तीघांसि हें चि नाम ।
आणि प्रकृति जन्म- । भूमि येयां ॥ ३७ ॥

**तत्र सत्वं निर्मलत्वात्प्रकाशकमनामयं ॥**
**सुखसंगेन बध्नाति ज्ञानसंगेन चानघ ॥ ६ ॥**

तेथ सत्व तें उत्तम । रज तें मध्यम ।
तिहिं माझि तम । सवियां धारें ॥ ३८ ॥
हें एकी चि वृत्तिचां ठांइं । त्रिगुणत्व आलें पाहीं ।
वयसात्रय देहीं । एकिं जेवि ॥ ३९ ॥
कां मीनलेनि कीडें । जवं जवं तूंक वाढे ।
तवं तवं सोनें पडे । पांचिकां कसीं ॥ १४० ॥
पैं सावधपणें जैसें । वाहविलें आळसें ।
सुषुप्ति बैसे । घणावौनि ॥ ४१ ॥
तैसी अज्ञानांगिकारें । निगाली वृत्ति विस्तारे ।
तें सत्वरजद्वारें । तम हीं होए ॥ ४२ ॥
अर्जुना गा जाण । येया नावं गुण ।
आतां दाउं खुण । बांधती ते ॥ ४३ ॥
तरि क्षेत्रज्ञदशे । आत्मा मोटका प्रवेशे ।
हें देह मी ऐसें । मुहूर्त्त करी ॥ ४४ ॥

आजन्ममरणांतीं । देहधर्मसमस्तीं ।
ममत्वाची सूती । घे ना जवं ॥ ४५ ॥
जैसें मीनाचां तोंडीं । पडे ना जवं उंडी ।
तवं गलु आसुडी । जळवारधी ॥ ४६ ॥
तेवि सत्वें लुब्धकें । सुखज्ञानाचीं पाशिकें ।
वोढिजतां खुडुके । जैसा मृगु ॥ ४७ ॥
मग ज्ञानें चडफडी । सुख वरि खुरखोडी ।
स्वयंसुख हें धाडी । हातिचें गा ॥ ४८ ॥
तेव्हळि विद्यामानें तोखे । लाभमात्रें हरिखे ।
मी संतुष्टु हें इं देखे । श्लाघों लागे ॥ ४९ ॥
ह्मणे भाग्य ना माझें । आजि सुखियें नाहिं दूजें ।
विकारें फुंजे । सात्विकाचेनि ॥ १५० ॥
आणि येणें हिं न सरे । लांकण लागे दुसरें ।
जें विद्वत्तेचें भरे । भूत आंगीं ॥ ५१ ॥
आपण चि ज्ञान आहे । तें गेलें हें दुःख नोहे ।
किं विषयज्ञानें होये । गगना एवडा ॥ ५२ ॥
राउ जैसा स्वप्नीं । रंकपणें रिगाला धानी ।
तो गोमटेनि एकें मानी । इंद्र ना मीं ॥ ५३ ॥
तैसें गा देहातीता । जालेयां देहवंतां ।
हों लागे पांडुसुता । बाह्यज्ञानें ॥ ५४ ॥
प्रवृत्तिशास्त्रें बुझे । यज्ञविद्या उमजे ।
किंबहुना सुजे । स्वर्गु वेरीं ॥ ५५ ॥
आणि ह्मणे आजि आन । मी वांचूनि नाहिं सज्ञान ।
चातुर्यचंद्रगगन । माझें चित्त ॥ ५६ ॥
ऐसें सत्व सुखज्ञानीं । जीवासि लाउनि कान्ही ।
बैलाची करी वानी । पांगुळाचेया ॥ ५७ ॥

**रजो रागात्मकं विद्धि तृष्णासंगसमुद्भवं ॥**
**तन्निबध्नाति कौंतेय कर्मसंगेन देहिनं ॥ ७ ॥**

आतां हा चि शरीरीं । रजें जिया परीं ।
बांधिजे तें अवधारीं । सांधिजैल ॥ ५८ ॥
हें जीवीं मोटकें रिगे । आणि कामाचां मार्गीं लागे ।
मग वारेया वळघे । तृष्णेचिया ॥ ५९ ॥ तेथे
हें रज यया चि कारणें । जें जीवातें रंजौं जाणे ।
अभिलाखाचें तरुणें । सबाह्य गा ॥ १६० ॥
आबुथुनि आगियालें । वज्राग्नीतें सांदुकिलें ।
आतां बहू थेकुलें । आहे तेथ ॥ ६१ ॥
तैसी खवळली चाड । होये दुःखा सकट गोड ।
इंद्रश्री ही सांकड । गमों लागे ॥ ६२ ॥
तिया तृष्णा वाढिनलिया । मेरु ही हाता आलेयां ।
ह्मणे वळघों एकादेया । दारुणा हीं ॥ ६३ ॥
आजि असतें वेचिजैल । तरि पाहे काइ कीजैल ।
ऐसा पांगीं वडील । व्यवसाय गा ॥ ६४ ॥
जीविताची कुरवंडी । वोवाळुं लागे कवडी ।
मानी तृणाचिया जोडी । कृतकृत्यता ॥ ६५ ॥
ह्मणे स्वर्गा हान जावें । तरि काइ तेथ खावें ।
यया लागि धांवे । याग करूं ॥ ६६ ॥
व्रता पाठिं व्रतें । आचरे इष्टापूर्त्तें ।
काम्यें वांचूनि हातें । सीवे चि ना ॥ ६७ ॥
ग्रीष्मांतिचा वारा । विसवों नेणे वीरा ।
तैसा न ह्मणे व्यापारां । राति दिउ ॥ ६८ ॥
काइ चंचळु मासा । कामिनीकटाक्षु काइसा ।
वळला होये तैसा । वीजु नाहिं ॥ ६९ ॥

तेतुलेनि गा वेगें । स्वर्गसंसारुपांगें ।
आगी माजि रिगे । क्रियेचिया ॥ १७० ॥
ऐसा देहीं देहा वेगळा । ले तृष्णेचिया सांखळा ।
टोपु वाहे गळां । व्यापाराचा ॥ ७१ ॥
हें रजोगुणाचें दारुण । देहिं देहियासि धारण ।
परियसां विंदाण । तमाचें तें ॥ ७२ ॥

**तमस्त्वज्ञानजं विद्धि मोहनं सर्वदेहिनां ॥**
**प्रमादालस्यनिद्राभिस्तन्निबध्नाति भारत ॥ ८॥**

व्यवहाराचे ही डोळे । मंद जेणें पडळें ।
मायारात्रिचें काळें । मेहुडें जें ॥ ७३ ॥
अज्ञानाचें जियालें । जेया येका लागलें ।
जेणें विश्व भुललें । नाचत असे ॥ ७४ ॥
अविवेकमहामंत्र । जें मौढ्यमद्याचें पात्र ।
हें असो मोहनास्त्र । जीवासि जें ॥ ७५ ॥
पार्था तें गा तम । रचूनि ऐसें वर्म ।
चौखुरी देहात्म । मानीयातें ॥ ७६ ॥
हें ये विकारि शरीरीं । माजों लागे चराचरीं ।
आणि तेथ दुसरी । गोठी नाहिं ॥ ७७ ॥
सर्वेंद्रियां जाड्य । मना माझि मौढ्य ।
माल्हांत दार्ढ्य । आलस्याचें ॥ ७८ ॥
आंगमोडामोडी । कार्यजातां अनावडी ।
नुसंते परिवडी । जांभैयांची ॥ ७९ ॥
उघडिया चि दीठी । देखणें नाहि किरीटी ।
नालवितां उठी । ओह्या ह्मणौनि ॥ १८० ॥
पडिलिये ढोंडी । कोण कानी मुरडी ।
तिया चि परिवडी । टलों नेणें ॥ ८१ ॥

पृथ्वी पाताळा जाऊ । कां आकाश वरि एऊ ।
परि उठावें ऐसा भाऊ । मनी नाहिं ॥ ८२ ॥
उचितानुचित आघवें । ज्ञासुरतां हिं जीवें ।
तेथिचा तेथ लोळावें । ऐसी मेधा ॥ ८३ ॥
उभूनि करतळें । पडिघाये कपोळें ।
पायांचें सिराळें । मांडूं लागे ॥ ८४ ॥
आणि निद्राविषिं चांगु । जीवीं आथि लागु ।
झोंपि जातां स्वर्गु । वाऊ ह्मणे ॥ ८५ ॥
ब्रह्मायुषां होइजे । मग निजैलेयां चि असिजे ।
हें वांचूनि दूजें । व्यसन नाहीं ॥ ८६ ॥
वाटे जातां वुगें । कल्हातां हीं डोलों लागे ।
अमृत ही परि नेघे । जरि नीद ए ॥ ८७ ॥
तेविं चि आक्रोशबळें । व्यापारें कोण्हीं वेळे ।
तरि निगाळें आंधळें । रोसें जैसें ॥ ८८ ॥
केधवां कैसें राहाटावें । कोणेंसिं काइ बोलावें ।
हें टाकतें किं नांगवे । काहिं चि नेणे ॥ ८९ ॥
वणवा मियां आघवा । पाखें चि पूसूनु नेयावा ।
पतंगु इया हावां । घाली जेवि ॥ १९० ॥
तैसा वळघे सहसा । अकारणीं विवंसा ।
किंबहुना ऐसा । प्रमादु रुचे ॥ ९१ ॥
एवं निद्राआलस्यप्रमादीं । तम इहिं त्रिविधिं ।
देहिं बांधे निरुपाधी । चोखटातें ॥ ९२ ॥

**सत्वं सुखे संजयति रजः कर्मणि भारत ॥**
**ज्ञानमावृत्य तु तमः प्रमादे संजयत्युत ॥ ९ ॥**

जैसा वन्हि काष्टीं भरे । तैं दीसे काष्टाकारें ।
व्योम घटें आवरे । तें घटाकाश ॥ ९३ ॥

नाना सरोवर भरलें । तेथ चंद्रत्व बिंबलें ।
गुणाभासिं बांधलें । ऐसें गमे ॥ ९४ ॥
परिहरौनि कफवात । जैं देहीं आटोपे पित्त ।
तैं करी संतप्त । देह जेविं ॥ ९५ ॥
कां वर्षांतिं जैसे । जीणौनि शीत चि दीसे ।
तेव्हलि होये हींवा ऐसें । आकाश हें ॥ ९६ ॥
नाना स्वप्न जाग्रती । लोपूनि ये सुषुप्ती ।
तै क्षणु येकु धृती । तें चि होये ॥ ९७ ॥
तैसीं रजतमें हारवी । जैं सत्व माजु मिरवी ।
तैं जीवा करवि ह्मणवी । सुखिया नामीं ॥ ९८ ॥
तैसें चि सत्व रज । लोपूनि तमा ओज ।
वळघे तैं सहज । प्रमादिए होए ॥ ९९ ॥

**रजस्तमश्चाभिभूय सत्वं भवति भारत ॥**
**रजस्सत्वंतमश्चैव तमः सत्वं रजस्तथा ॥ १० ॥**

तिया चि गा परिपाटी । सत्वतमातें पोटीं ।
घालूनि जेव्हां उठी । रजोगुणु ॥ २०० ॥
तेव्हलां कर्मे वांचूनि काहीं । आन सौंदर चि नाहीं ।
ऐसें मानी देहीं । देहराजु ॥ १ ॥
पैं रजतमविजैयें । सत्व गा देहीं इये ।
वाढतां चिन्हि तियें । ऐसीं होंति ॥ २ ॥

**सर्वद्वारेषु देहेस्मिन्प्रकाश उपजायते ॥**
**ज्ञानं यदा तदा विद्याद्विवृद्धं सत्वमित्युत ॥ ११ ॥**

जें प्रज्ञा आंतुलीकडे । न समांत बाहिरि बोसंडे ।
वसंतिं पद्मखंडें । द्रुति जेवि ॥ ३ ॥
सर्वेंद्रियां आंगणीं । विवेकु करी राबणी ।
साच चि करचरणीं । होंति डोळे ॥ ४ ॥

राजहंसा पुढें । चांचु वेंची आगरडे ।
तोडी जेवि झगडे । क्षीरानिराचे ॥ ५ ॥
तेवि दोषादोषविवेकीं । इंद्रियें चि होंति पारखीं ।
नियमु बा रे पाइकी । उल्गे तैं ॥ ६ ॥
नाइकणें तें कानू चि वाळी । न पाहाणें तें दीठी चि गाळी ।
अवाच्य तें तें टाळी । जीभ चि गा ॥ ७ ॥
वाती पुढां जैसें । पळों लागे काळवखें ।
निषिद्ध इंद्रियां तैसें । समोर नोहे ॥ ८ ॥
धाराधरकाळें । महानदी उचंबळे ।
तैसी बुद्धि पघळे । शास्त्रजातीं ॥ ९ ॥
आगा पूर्णिमेचां दिसिं । चंद्रप्रभा आकाशिं ।
ज्ञानवृत्ति तैसी । फांके सैघ ॥ २१० ॥
वासना एकावटे । प्रवृत्ति वोहटे ।
मन वावटे । सुखा वरि ॥ ११ ॥
एवं सत्व वाढे । तैं हें चिन्ह फुडें ।
आणि निधन हीं घडे । तेव्हळां जरि ॥ १२ ॥
तरि जैं चि घरिं संपत्ति । तैं चि उदार मनोवृत्ति ।
मां परत्र आणि कीर्त्ति । होये पैं गा ॥ १३ ॥
कां पाहालेनि सुयाणें । जालेयां परगुणें ।
पढियंतें ये पाहुणे । स्वर्गौनियां ॥ १४ ॥
मग गोमटेया तेया । जावलि आर्शी धनंजया ।
तेवि सत्वीं जाणें देहियां । कें आथि गा ॥ १५ ॥
जें परगुणीं उद्भट । घेउनि सत्व चोखट ।
नीगे सांडूनि कोंपट । भोगक्षाम हें ॥ १६ ॥
अवचटें ऐसा जो जाये । तो सत्वाचा चि नवा होये ।
किंबहुना जन्म लाहे । ज्ञानियां माझि ॥ १७ ॥

सांघ पां धनुर्द्धरा । राऊ रायेपणें डोंगरा ।
गेलेया अपुरा । होये काइ ॥ १८ ॥
नातरि एथिचा दीवा । नेला सेजेया गावां ।
तो तेथ तरि पांडवा । दीपू चि किं ॥ १९ ॥
तैसी तेथ सत्वशुद्धी । आगलें ज्ञानासि उधी ।
तरंगाऊं लागे बुद्धी । विवेका वारि ॥ २२० ॥
पैं महदादिपरिपाटी । विचारूनु सेवटीं ।
विचारा सकट पोटीं । जिरे जेया ॥ २१ ॥
सत्तिसां सत्तातिसांवें । चोविस पंचविसावें ।
तिहिं पुरौनि स्वभावें । चतुर्थ जें ॥ २२ ॥
ऐसें सर्व जें सर्वोत्तम । जालें असे सुगम ।
तेया सवें निरूपम । लाहे देह ॥ २३ ॥

**लोभः प्रवृत्तिरारंभः कर्मणामशमस्पृहा ॥**
**रजस्येतानि जायंते विवृद्धे भरतर्षभ ॥ १२ ॥**

मग इया चि परीं देख । तमसत्वा अधोमुख ।
बैसौनि जैं आगलीक । धरी रज ॥ २४ ॥
आपुलेया कार्याचा । धुमाडु गावि देहाचां ।
माजवी तैं चिन्हाचा । उदो ऐसा ॥ २५ ॥
पांजरली कां वाहुटली । करी वेगल वेटाली ।
तैसी विषइं सरली । इंद्रियां होये ॥ २६ ॥
परदारादि करावें पडे । परि विरुद्ध ऐसें नावडे ।
मन सेलियेचेनि तोंडें । सैघ चारी ॥ २७ ॥
हा ठावो वेन्हीं लोभु । करी स्वैरत्वाचा राबु ।
वेटालितां अलाभु । तें तें उरे ॥ २८ ॥
आणि आड पडिलेयां । उद्यमजातां भलेतेया ।
प्रवृत्ति धनंजया । हातु न कढी ॥ २९ ॥

तेवि चि एकाधा प्रसादु । कां करावा अश्वमेधु ।
ऐसा अचाट्र चि संदू । घेउनि उठी ॥ २३० ॥
नगरें चि रचावीं । महावनें चि लावावीं ।
जलाशयें निर्मावीं । नानाविधें ॥ ३१ ॥
ऐसैसां अफांटीं कर्मीं । समारंभ-उपक्रमीं ।
आणि दृष्टादृष्टकामीं । पुरें नाहीं ॥ ३२ ॥
सागरु ही सांडी पडे । आगी न लाहे तीनि कवडे ।
ऐसें अभिलाषीं जोडे । दुर्भरत्व ॥ ३३ ॥
स्पृहा मनां पुढपुढां । आशेचा घे दवडा ।
विश्व घापे चाडा । पायां तळीं ॥ ३४ ॥
इत्यादि वाढतां रजीं । इयें चिन्हें होंति सहजीं ।
आणि ऐसेया माझि । वेचे जरि ॥ ३५ ॥
तरि आघवां इहीं । परिवारला देहीं ।
रिगे परि योनी हीं । मानुषे चि ॥ ३६ ॥
सुरवाडेंसिं भिखारी । वसो पां राजपुरीं ।
तऱ्हीं तो काइ अवधारीं । राउ होईल ॥ ३७ ॥
बैलासि कडबाडें । हें न चुके गा फुडें ।
नेइजो पां वऱ्हाडें । भले तैसां ॥ ३८ ॥
ह्मणौनि व्यापारा हातीं । उकलु दिहा ना राती ।
तैसेयांचिये पांती । जुंपिजे तो ॥ ३९ ॥
कर्मजडांचां ठांइं । किंबहुना होये देहीं ।
जो रजोवृद्धिचां डोहीं । बुडौनि निमे ॥ २४० ॥

**अप्रकाशो प्रवृत्तिश्च प्रमादो मोह एव च ॥**
**तमस्येतानि जायंते विवृद्धे कुरुनंदन ॥ १३ ॥**

मग तैसा चि पुडुती । रजा सत्ववृत्ती ।
गीळूनि जैं ये उन्नती । तमोगुणु ॥ ४१ ॥

तैं जियें लिंगें । देहाचें सबाह्य सांघे ।
तें परियस चांगें । श्रोत्रबळें ॥ ४२ ॥
तरि ऐसें होये मन । जैसें रविचंद्रें हीन ।
रातिचें गा गगन । अवंसेचिये ॥ ४३ ॥
तैसें अंतर असोस । होये स्फूर्तिहीन उद्वस ।
विचाराची भास । हारपे तैं ॥ ४४ ॥
बुद्धि मेचुवे ना ढोंडी । हा ठाउ मौवाळै सांडी ।
आठउ देशधडी । जाला दीसे ॥ ४५ ॥
अविवेकाचेनि माजें । सपाई शरीर गाजे ।
एकलेनि घेपे दीजे । मौढ्यें तेथ ॥ ४६ ॥
आचारभंगाचीं हाडें । रूपति इंद्रियां पुढें ।
मरे जरि तेणें कडें । क्रिया जाये ॥ ४७ ॥
पैं आणिक ही एक दीसे । जे दुष्कृतीं चित्त उसासे ।
आंधारीं देखणें जैसें । डुडुळांचें ॥ ४८ ॥
निषिद्धाचेनि नावें । भलेतें हीं भरें हांवे ।
तिये विषिं धावे । घेंति करणें ॥ ४९ ॥
मदिरा नेघतां ढुळे । सन्निपातें विण बोले ।
निःप्रेमें चि भूले । पींसें जैसें ॥ २५० ॥
चित्त तरि गेलें आहे । परि उन्मनी ते नोहे ।
ऐसें माल्हांथिलें मोहें । माजिरेनि ॥ ५१ ॥
किंबहुना ऐसींऐसीं । चिन्हें गा तमा पासीं ।
जैं वाढे आइतिसिं । आपुलिया ॥ ५२ ॥
आणि हें चि वायप्रसंगें । मरणाचें जरि खागें ।
तरि तेतुलेन हीं निगे । तमेंसिं तो ॥ ५३ ॥
राई रायिपण बीजीं । सांटौनि आंग त्यजी ।
मग विरूढे तैं दूजी । गोठि आहे ॥ ५४ ॥

पैं होउनि दीपकलिका । एरु आगि विझो कां ।
ते लागेल तेथ असिका । तो चि आहे ॥ ५५ ॥
ह्मणौनि तमाचिये लोथे । बांधौनियां संकल्पातें ।
देह जाये मागुतें । तमाचें होये ॥ ५६ ॥
आतां काइ येणें बहुवें । तो तमोवृद्धी मृत्यु लाहे ।
तो पशु कां पक्षी होये । झाड क्रिमि ॥ ५७ ॥

**यदा सत्वे प्रवृद्धे तु प्रलयं याति देहभृत् ॥**
**तदोत्तमविदाल्लोकानमलान्प्रतिपद्यते ॥ १४ ॥**

येणें चि कारणें । जें निफजे सत्वगुणें ।
तें सुकृत ऐसें ह्मणे । श्रौतसमो ॥ ५८ ॥
ह्मणौनि तेया निर्मळ । सुखज्ञानीं सरल ।
अपूर्व एक फल । सात्विक तें ॥ ५९ ॥

**रजसि प्रलयं गत्वा कर्मसंगिषु जायते ॥**
**तथा प्रलीनस्तमसि मूढयोनिषु जायते ॥ १५ ॥**

मग राजसा क्रिया । तिया इंद्रावणी सांसिनालिया ।
जें सुखें चितारूनियां । फलति दुःखें ॥ २६० ॥
कां निंबोलियेचें पीक । वरि गोड आंतु विष ।
तैसें राजस देख । क्रियाफल ॥ ६१ ॥
तामस कर्म तेतुकें । अज्ञानफलें चि पीके ।
विषांकुर विषें । जिया परीं ॥ ६२ ॥

**कर्मणः सुकृतस्याहुः सात्विकं निर्मलं फलं ॥**
**रजसस्तु फलं दुःखमज्ञानं तमसः फलं ॥ १६ ॥**

ह्मणौनि बा रे अर्जुना । एथ सत्व चि हेतु ज्ञाना ।
जैसा कां दिना । सूर्यु हा ॥ ६३ ॥
आणि तैसें चि हें जाण । लोभासि रज कारण ।
आपुलें विस्मरण । द्वैता जेवि ॥ ६४ ॥

मोहो अज्ञाना प्रमादा । एयां मिळालेयां दोषवृंदां ।
पुडुतीं पुडुतीं प्रबुद्धा । तम चि मूळ ॥ ६५ ॥
ऐसें विचाराचां डोळां । तीन्हीं गुण हे वेळोवेळां ।
पाहिजे जैसा आवळा । तळहातिचा ॥ ६६ ॥

**सत्वात्संजायते ज्ञानं रजसो लोभ एव च ॥**
**प्रमादमोहौ तमसो भवतोज्ञानमेवच ॥ १७ ॥**

तवं रजतमें दोन्हीं । देखिलीं प्रौढें पतनीं ।
आणि सत्व वांचूनि नेनीं । ज्ञानाकडे ॥ ६७ ॥
ह्मणौनि सात्विकी चि वृत्तीं । एक जाले जन्मव्रती ।
सर्वत्यागें चतुर्थी । भागवत जैसे ॥ ६८ ॥ भागवंत
तैसे सत्वाचेनि नडनाचें । असणें जाणें तेयांचें ।
ते तनूत्यागीं स्वर्गिचे । राये होंति ॥ ६९ ॥
इया चि परी पैं रजें । जिहिं कां जीजे मरिजे ।
तिहिं मनुष्यां होइजे । मृत्युलोकिं ॥ २७० ॥
तेथ सुखदुःखाचें खिचटें । जेविजे येकें चि ताटें ।
जेथ इये मरणवटे । पडिलें नूठी ॥ ७१ ॥
आणि तिया चि स्थिती तमीं । जे वाढौनि मोडौनि क्षमीं ।
ते येंति नरकभूमी । मूळपत्र ॥ ७२ ॥
एवं वस्तुचिया सत्ता । त्रिगुणासि पांडुसुता ।
दाविली साकार्यता । आघवी चि हे ॥ ७३ ॥

**ऊर्ध्वं गछंति सत्वस्था मध्ये तिष्ठंति राजसाः ॥**
**जघन्यगुणवृत्तिस्था अधो गछंति तामसाः ॥ १८ ॥**

पैं वस्तु वस्तुत्वें असिकें । तें आपण चि गुणां सारिखें ।
देखौनि कार्यविशेषें । अनुकरे गा ॥ ७४ ॥
राजे जैसें कां स्वप्नीं पारिव्राजें । जैं राऊ मीं हें देखिजे ।
तैं हारि जैत होइजे । आपण चि ॥ ७५ ॥

तैसें मध्य ऊर्ध्व अध । हे जे गुणत्रिभेद ।
ते वृत्ती वांचूनि शुद्ध । वस्तु चि असे ॥ ७६ ॥
पारि हे वाहणी असो । तऱ्हीं तुज आन न दीसो ।
परियसैं ते सांघतसों । मागिलि गोठि ॥ ७७ ॥

**नान्यं गुणेभ्यः कर्त्तारं यदा द्रष्टानुपश्यति ॥**
**गुणेभ्यश्च परं वेत्ति मद्भावं सोधिगच्छति ॥ १९ ॥**

तरि ऐसें निजनिजें । सामर्थ्यें तीन्हीं सहजें ।
होंति देहव्याजें । गुण चि हे गा ॥ ७८ ॥
इंधनाचेनि आकारें । अग्नि जैसा अवतरे ।
कां आवगे तरुवरें । भूमिरसु ॥ ७९ ॥
नाना दहियांचेनि मीसें । परिणामे दूध जैसें ।
कां मूर्त्त होये ऊंसें । गोडी जेवि ॥ २८० ॥
तैसें हें सांतष्करण । देह चि होंति गुण ।
म्हणौनि बंधा कारण । घडे किर ॥ ८१ ॥
पारि चोज हें धनुर्द्धरा । जें येवडां इये गुंपिरां ।
मोक्षाचा सवसारा । गुणा न्हवे ॥ ८२ ॥
गुण आपुलालेनि धर्में । देहिचें माघुतसाउमें । उगे
चालितां न खोमे । गुणातीतता ॥ ८३ ॥
ऐसी मुक्ति असे सहज । आतां परियसौं तुज ।
तें तूं ज्ञाना बुझ । द्विरेफु किं ॥ ८४ ॥
आणि गुणीं गुणां जोगें । चैतन्य नोहे हें मागें ।
बोलिलें तें खागें । तेविं चि हें ॥ ८५ ॥
तरि पार्थातें ऐसें । बोधलेनि जीवें दीसे ।
स्वप्न कां जैसें । चेइलेनि ॥ ८६ ॥
नातरि आपणपें जळीं । बिंबलें तीरींहुनि कळी ।
चलन होंत कल्लोळीं । अनेकधा ॥ ८७ ॥

कां नटलेनि लाघवें । नट्टु जैसा न झंकवे ।
तैसे गुणजात देखवे । न्हवौनियां ॥ ८८ ॥
रितुत्रय आकाशें । धरुनियां जैसें ।
नेंदिजे चि येऊं वोसें । वेगलेपणें ॥ ८९ ॥
तैसें गुणीं गुणां परौतें । जें आपणपें असे आइतें ।
तिये अहं बैसे अहंते । मूलिके चि जैं ॥ २९० ॥
तैं तेथौनि मग पांतां । ह्मणे साक्षी मी अकर्त्ता ।
हे गुण चि क्रियाजाता । नियोगी ना ॥ ९१ ॥
सत्वरजतमाचां । भेदीं पसरु कर्मांचा ।
होंतसे तो गुणाचा । विकारु हा ॥ ९२ ॥
एया माझि मीं ऐसा । वनीं कां वसंतु जैसा ।
वनलक्ष्मीविलासा । हेतुभूत ॥ ९३ ॥
कां तारागणीं लोपावें । सूर्यकांतें उद्दीपावें ।
कमलीं विकाशावें । जावें तमें ॥ ९४ ॥
इयें कोण्हाचीं काजें कहीं । सविता जैसीं नाहीं ।
तैसा अकर्त्ता मीं देहीं । सत्तारूपु ॥ ९५ ॥
मी दाउनि गुण देखें । गुणता हे मियां पोखे ।
एयाचेनि निःशेषें । उरे तें मीं ॥ ९६ ॥
ऐसेनि विवेकें जेया । उदौ होये धनंजया ।
ये गुणातीतत्व तेया । ऊर्धपंथें ॥ ९७ ॥
आतां निर्गुण असे आणिक । तें तो जाणे हें अचूक ।
जें ज्ञान केलें ठीक । तेया चि वरि ॥ ९८ ॥
किंबहुना पांडुसुता । ऐसा तो माझिया सत्ता ।
पावे जैसी सरिता । सिंधुत्व गा ॥ ९९ ॥
नलिके वरौनु उठिला । जैसा शुकु शाखे बैसला ।
तैसा मूळअहंते ठेला । तो ह्मणौनि ॥ ३०० ॥

आगा अज्ञानांचिया नीदा । घोरतु होंता तत्वधा ।
तो सत्त्वरूपिं प्रबोधा । चेइला किं ॥ १ ॥
पैं बुद्धिभेदाचा आरिसा । तेया हातूनि पडिला वीरेशा ।
ह्मणौनि प्रतिमुखाभासा । मूकला तो ॥ २ ॥
देहाभिमानाचा वारा । आतां वाजों ठेला वीरा ।
तैं एक्यवीचिसागरा । जीवेशा होये ॥ ३ ॥
ह्मणौनि मद्भावेंसिं । पाविजे तेणें सारिसिं ।
वरिषांतिं आकाशीं । घनें जेवि ॥ ४ ॥
तेवि मी होउनि निरुता । मग देहीं चि इये असतां ।
नांगवे देहसंभूतां । गुणासि तो ॥ ५ ॥
जैसा भिंगाचेनि घरें । दीपप्रकाशु नावरे ।
कां न विझे चि सागरें । वडबानलु ॥ ६ ॥
तैसा आलां गेलां गुणांचा । बोधु न मैले तेयाचा ।
तो देहीं जैसा व्योमिचा । चंद्र जलीं ॥ ७ ॥

**गुणानेतानतीत्य त्रीन्देही देहसमुद्भवान् ॥**
**जन्ममृत्युजरादुःखैर्विमुक्तोमृतमश्नुते ॥ २० ॥**

तीन्ही आपुलिया प्रौढी । देह नाचवीतिं बागडी ।
तो पाहों न घडी । अहंतेतें ॥ ८ ॥
हा ठाउ॰ वेन्हीं । निहटौनि गेला अंतरीं ।
आतां काइ वर्त्ते शरीरीं । कांहीं नेणे ॥ ९ ॥
सांडूनि आंगिची खोली । सर्पु रिगालेयां पातालीं ।
ते त्वचा कोण सांभाली । तैसें जालें ॥ ३१० ॥
कां सौरभ्यजीर्णु जैसा । आमोदु मीलौनियां आकाशा ।
माघारा कमलकोशा । ऐ चि ना ॥ ११ ॥
पैं सत्स्वरूपसमरसें । तेया ही गा जालें तैसें ।
तेथ किंधर्म हें ऐसें । नेणे देह ॥ १२ ॥

ह्मणौनि जन्मजरामरण । इत्यादि साई गुण ।
ते देहीं चि ठेले कारण । नाहीं तेया ॥ १३ ॥
घटाचिया खापरिया । घटाचां भागीं फोडिलेयां ।
मा आकाश आपैसेया । जालें चि असे ॥ १४ ॥
तैसी देहबुद्धि जाये । जैं आपणपें आठौ होये ।
तैं आन काहिं आहे । तें वांचूनि ॥ १५ ॥
येणें थोरें बोधलेपणें । तेया गा देहीं असणें ।
ह्मणौनि तो मी ह्मणें । गुणातीतु ॥ १६ ॥
येया देवाचेया बोला । पार्थु अति सुखावला ।
मेघें संबोखिला । मयूरु जैसा ॥ १७ ॥

**अर्जुन उवाच ॥**

> **कैर्लिंगैस्त्रीन्गुणानेतानतीतो भवति प्रभो ॥**
> **किमाचारः कथं चैतांस्त्रीन्गुणानतिवर्त्तते ॥ २१ ॥**

तेणें तोषें वीरु पूसे । जी कोणी चिन्हि तो दीसे ।
जेया माझि वसे । ऐसा बोधु ॥ १८ ॥
तो निर्गुणु काइ आचेरे । कैसेनि गुण निस्तरे ।
सांघिजो हें माहेरें । कृपेचेनि ॥ १९ ॥

**श्रीभगवानुवाच ॥**

> **प्रकाशं च प्रवृत्तिं च मोहमेव च पांडव ॥**
> **न द्वेष्टि संप्रवृत्तानि न निवृत्तानि कांक्षति ॥ २२ ॥**

येया अर्जुनाचेया प्रश्ना । तो षड्गुणाचा राणा ।
परिहारु आकर्णा । बोलतु असे ॥ ३२० ॥
ह्मणे हे पार्था तूझी नवाई । येतुलें चि पूससी काई ।
तें नावं चि तेया पाईं । साचल ठेलें ॥ २१ ॥

गुणातीतु जेया नावं । तो गुणाधीनु तरि न्हवे ।
मा होये तरि नांगवे । गुणा येथां ॥ २२ ॥
परि आधीनु कां नांगवे । हें चि कैसेनि जाणावें ।
गुणाचिये उरवरेवे । माझि असतां ॥ २३ ॥
हा संदेहो जरि वाहांसी । तरि सुखें पूसों लाहासि ।
परियस आतां तेयासि । रूप करुं ॥ २४ ॥
तरि रजाचेनि माजें । देहिं कर्माचें आणोजें ।
प्रवृत्ती जैं घेइजे । वेंटाळुनि ॥ २५ ॥
तैं मीं चि ना कर्मठु । ऐसा नैये श्रीमाठु ।
कां दरिद्रबुद्धी वीटु । तो ही नाहिं ॥ २६ ॥
अथवा सत्वें चि अधिकें । जैं सर्वेंद्रीं ज्ञान फांके ।
तैं सुविद्यता न तोखे । उभजे ही ना ॥ २७ ॥
कां वाढिनलेनि तमें । गीळिजे मोहभ्रमें ।
तैं अज्ञानत्वें श्रमे । घेणें हिं नाहिं ॥ २८ ॥
पैं मोहाचां अवसरीं । ज्ञानाची चाड न धरी ।
ज्ञानीं कर्में नादरी । होंतां ना दुःखी ॥ २९ ॥
सायंप्रातमध्यान्हा । येथां तीहीं काळांची गणना ।
नाहिं जेवि तपना । तैसा असे ॥ ३३० ॥
तेया वेगळें चि काइ प्रकाशे । ज्ञानित्व येयावें असे ।
काइ जलार्णउ पाउसें । साजा होए ॥ ३१ ॥
नां प्रवर्त्तलेनि कर्में । कर्मित्व तेया कां गमे ।
सांघैं हिमवंतु हीमें । कांपे काइ ॥ ३२ ॥
नातरि मोहो आलेयां । काइ पां हसिजैल तेया ।
हांगा आगितें उन्हालेया । जाळवतसे ॥ ३३ ॥
तैसें गुणकार्य हें । आघवें आपण चि आहे ।
म्हणौनि येकैकें नोहे । ताडातोडि ॥ ३४ ॥

येवढिया गा प्रतीती । जो देहा आला असे वस्ती ।
वाटे जातां गुंती । पांथि जैसा ॥ ३५ ॥

उदासीनवदासीनो गुणैर्यो न विचाल्यते ॥
गुणा वर्तंत इत्येवं योऽवतिष्ठति नेंगते ॥ २३ ॥

तो जीणता ना हारवी । तैसा गुण न्हवे ना करवी ।
जैसी कां सोपणी । संग्रामीं तैसा ॥ ३६ ॥
आणि गुणांचा यावाजावा । ढळे चळे ना पांडवा ।
मृगजळाचा हेलावा । मेरु जैसा ॥ ३७ ॥
हें बहू काइ बोलिजे । ऊर्मी आरेनि न वचिजे ।
कां सूर्यु न गिळिजे । अंधकारें ॥ ३८ ॥
स्वप्न गा जैसा परी । जागतेयातें न सिंतरी ।
गुणीं तैसा अवधारीं । न छळिजे तो ॥ ३९ ॥
गुणा किर नातुडे । परी दुरौनि पाहे जैं कोडें ।
तैं गुण देखे सांडे । [illegible] जैसा ॥ ३४० ॥
सत्वधर्म सात्विकीं । रज तें रजोविशेषीं ।
तम मोहादिकीं । वर्तत असे ॥ ४१ ॥
परि माझिया सत्ता । हा गुणक्रिया समस्ता ।
हें फुडें जाणे सविता । लौकिका जेवि ॥ ४२ ॥
समुद्र चि भरति । सोमकांत चि द्रवति ।
कुमुदें परसरति । चंद्रु तो उगा ॥ ४३ ॥
कां वारा चि वाजे वोजें । गगनें निश्चळ असिजे ।
तैसा गुणाचिये गजबजे । डोले ना जो ॥ ४४ ॥

समदुःखसुखः स्वस्थः समलोष्टाश्मकांचनः ॥
तुल्यप्रियाप्रियो धीरस्तुल्यनिंदात्मसंस्तुतिः ॥ २४ ॥

अर्जुना येणें लक्षणें । तो गुणातीतु गा जाणणें ।
परिस आतां आचरणें । [illegible] तियें ॥ ४५ ॥

तरि वस्त्रासि पाठीपोटीं । नाहिं सुत वांचूनि किरीटी ।
तैसेनि सुये दीठी । चराचरें ॥ ४६ ॥
ह्मणौनि सुखदुःखा सरिसें । कांटाळें आचरे ऐसें ।
रिपुभक्तां जैसें । हरिचें देणें ॥ ४७ ॥
यऱ्हविं तऱ्हीं साहाजें । सुखदुःख तें चि व्यंजे ।
देहजळीं होइजे । मासळी जैं ॥ ४८ ॥
आतां तें तव तेणें सांडिलें । आणि स्वरूपें चि मांडिलें ।
सस्यांतीं निवडिलें । बीज जैसें ॥ ४९ ॥
कां ओघु सांडूनि गंगा । रिगाली समुद्राचेया आंगा ।
ते निस्तरे लगबगा । खळाळांची ॥ ३५० ॥
तेवि आपणपें चि जेया । वसति जाली गा धनंजया ।
तेया देहीं आपैसेया । सुख तैसें दुःख ॥ ५१ ॥
रात्रि तैसें पाहालें । हें आत्मया नाहीं एक जालें ।
आत्मारामा देहा आलें । द्वंद्व तैसें ॥ ५२ ॥
पैं निद्रिताचेनि आंगेंसि । सापु तैसी उर्वशी ।
तेवि स्वरूपस्था सरिसीं । देहीं दोन्हीं ॥ ५३ ॥
ह्मणौनि तेयाचां ठांइं । सेणा सोनेया विशेषु नाहिं ।
रत्ना गुंडेया काहिं । नेणिजे भेदु ॥ ५४ ॥
घरा येऊ पां स्वर्गु । कां वरिपडो वाघु ।
परि आत्मबुद्धिसंभोगु । विरसु नोहे ॥ ५५ ॥
निवटलें नुपहुडे । जळिलें न विरूढे ।
साम्यबुद्धि न मोडे । तिया परी ॥ ५६ ॥
हा ब्रह्मा ऐसेनि स्तुतिजो । कां नीचु ह्मणौनि निंदिजो ।
परि नेणे जळों विझों । राख जैसें ॥ ५७ ॥
तैसा निंदा आणि स्तुती । नेणे दोन्ही चि व्यक्ती ।
नाहिं आंधारेया वाती । सूर्या घरा ॥ ५८ ॥

**मानापमानयोस्तुल्यस्तुल्यो मित्रारिपक्षयोः ॥**
**सर्वारंभपरित्यागी गुणातीतः स उच्यते ॥ २५ ॥**

ईश्वरबुद्धी पूजिला । चोरु ह्मणौनि गाजिला ।
वृषगजीं वेढिला । केला राउ ॥ ५९ ॥
सुन्हृद पासिं आले । अथवा वैरी वर जाले ।
परि नेणे रात्रि पाहलें ॥ तेज जेवि ॥ ३६० ॥
षडरितू येतां आकाशें । लिंपिजे चि ना जैसें ।
तेवि वैषम्य मानसें । जाणिजे चि नां ॥ ६१ ॥
आणिकु ही येकु पाहीं । आचारु तेयाचां ठांइं ।
तरि व्यापारां नाहीं । जालें दीसे ॥ ६२ ॥
सर्वारंभा उटकलें । प्रवृत्तिचें तेथ मावले ।
जलति कां कर्मफलें । तें तें चि योजी ॥ ६३ ॥
दृष्टादृष्टाचेनि नावें । भाउ चि जीवीं नुगवे ।
सेविजे स्वभावें । पैं तें होये ॥ ६४ ॥
सुखा ना सीणु नेणे । पाखाणु जेणें मानें ।
तैसी सांडिमांडि मनें । वर्जिली असे ॥ ६५ ॥
आतां केती हा चि विस्तारु । जाणे ऐसा आचारु ।
तेयातें तो चि साचारु । गुणातीतु ॥ ६६ ॥
गुणातें अतिक्रमणें । घडे उपायें जेणें ।
तो आतां आइक ह्मणे । कृष्णनाथु ॥ ६७ ॥

**मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते ॥**
**स गुणान्समतीत्यैतान्ब्रह्मभूयाय कल्पते ॥ २६ ॥**

तरि व्यभिचाररहितें । भक्तियोगें मातें ।
सेवी तो गुणातें । जाकलूं सके ॥ ६८ ॥
परि कोणु मी कैसी भक्ति । व्यभिचारा काइ व्यक्ति ।
हे आघवी चि निरुति । होआवी लागे ॥ ६९ ॥

तरि पार्था परियसां । मीं तवं एथ ऐसा ।
रत्नीं कीलाउ जैसा । रत्न चि तो ॥ ३७० ॥
कां द्रवपण चि नीर । अवकाशु चि अंबर ।
गोडी ते चि साकर । दोनि नाहिं ॥ ७१ ॥
वन्हि ते चि जाल । दला चि नावं कमल ।
रूंखु ते चि डाहाल- । फलादिक ॥ ७२ ॥
आगा हींवं आलिखलें । तें हिमवंतु जेवि जालें ।
नाना दूध मुरालें । दध्याकारें ॥ ७३ ॥
तैसें विश्व एणें नावें । हें मिं चि पैं आघवें ।
आतां चंद्रबिंब सोलावें । न लगे जेवि ॥ ७४ ॥
घृताचें थिनलेपण । न मोडितां घृत चि जाण ।
कां नाटितां कांकण । सोनें चि तें ॥ ७५ ॥
नुकलितां पटु । तंतू चि आहे स्पष्टु ।
नवा विरचता घटु । पृथ्वी न्हवे ॥ ७६ ॥
ह्मणौनि विश्वपण जावें ।, मग मातें घेयावें ।
तैसा न्हवे आघवें । सकट चि मीं ॥ ७७ ॥
ऐसेनि मातें जाणिजे । तें जाणीवभक्ति ह्मणिजे ।
एथ भेदु काहिं देखिजे । व्यभिचारु तो ॥ ७८ ॥
येया कारणें भेदातें । सांडूनि अखंडें चित्तें ।
आपणेयां सकट मातें । जाणावें गा ॥ ७९ ॥
पार्था सोनेयां टीक । सोनां चि लागली देख ।
तैसें आपणपें आणिक । मानावें ना ॥ ३८० ॥
तेजाचा तेजौनि निगाला । परि तेजीं असे लागला ।
तेया रश्मी ऐसा भला । बोधु होआवा ॥ ८१ ॥
पैं परिमाणु भूतलीं । हिमकणु हिमाचलीं ।
मज माझि निहालीं । आहे तैसें ॥ ८२ ॥

हो कां तरंगु लाहानु । परि सिंधुसि नाहिं भिन्नु ।
तैसा ईश्वरीं मीं आनु । नोहें चि नां ॥ ८३ ॥
ऐसेनि गा समरसें । दृष्टि जैं उल्हासे ।
ते पैं भक्ति ऐसें । आम्हि ह्मणों ॥ ८४ ॥
आणि ज्ञानाचें चांगावें । इये चि दृष्टी नावें ।
योगाचें हिं आघवें । सर्वस्व हें ॥ ८५ ॥
सिंधू आणि जळधरा । माझि लागलिया जेवि धारा ।
तैसी वृत्ति वीरा । प्रवर्ते ते ॥ ८६ ॥
कां कुहेंसि आकाशा । तोंडि सांदा नाहिं जैसा ।
तो परमरसु तैसा । एकवटे ॥ ८७ ॥
पैं प्रतिबिंबौनि बिंब वेरीं । प्रभेची जैसी उजिरी ।
ते सोहंवृत्ति अवधारीं । तैसी होये ॥ ८८ ॥
ऐसेनि मग परस्परें । ते सोहंदृष्टि जैं अवतरे ।
तैं तिये ही सकट सरे । आपैसेया ॥ ८९ ॥
जैसा सैंधवाचा रवा । सिंधू माझि पांडवा ।
विरालेयां विरावा । हें इं ठाकें ॥ ३९० ॥
नातरि जाळूनि तृण । वन्हि वीझे आपण ।
तैसें भेदु नासूनि जाण । ज्ञान घडे ॥ ९१ ॥
माझें पैलपण जाये । भक्तु हें अइल ठाए ॥
अनादि ऐक्य जें आहे । तें चि निवडे ॥ ९२ ॥
आतां गुणातीतु तें किरीटी । जाण इया न्हवंति गोठी ।
जें एकपणा ही मीठी । पडों सरली ॥ ९३ ॥
किंबहुना ऐसी दशा । तें ब्रह्मत्व गा सुदंसा ।
हें तो पावे जो ऐसा । मातें भजे ॥ ९४ ॥
पुडुतीं इहीं लिंगीं । भक्तु जो माझा जगीं ।
हे ब्रह्मता तेया लागि । पतिव्रता ॥ ९५ ॥

जैसें गंगेचेनि ओघें । ढळमळीत जें निगे ।
सिंधुपद तेया जोगें । आन नाहीं ॥ ९६ ॥
तैसा ज्ञानाचिये दीठी । जो मातें सेवी किरीटी ।
इये ब्रह्मतेचां मुगुटीं । चूडारत्न तो ॥ ९७ ॥
येया ब्रह्मत्वासी चि पार्था । सायुज्य ऐसी व्यवस्था ।
येया चि नावं चौथा । पुरुषार्थु गा ॥ ९८ ॥
परि माझें आराधन । ब्रह्मत्वीं होये सोपान ।
येथ मीं हान साधन । गमैल हें ॥ ९९ ॥

**ब्रह्मणो हि प्रतिष्ठाहममृतस्याव्ययस्य च ॥**
**शाश्वतस्य च धर्मस्य सुखस्यैकांतिकस्य च ॥ २७ ॥**

तरि झनें ऐसें । तूझां चित्तीं प्रवेशे ।
पैं ब्रह्म आन असे । मीं वांचूनि ॥ १०० ॥
पैं मंडळ आणि चंद्रमा । दोनि न्हवति सुवर्मा ।
तैसा मज आणि ब्रह्मा । भेदु नाहीं ॥ १ ॥
आगा नित्य जें निष्कंप । अनव्रत धर्मरूप ।
सुख जें उमप । अद्वैत जें ॥ २ ॥
विवेकु आपुलें काम । सांडूनि ठाकिजे धाम ।
तें निकर्षाचें निःसीम । किंबहुना मीं ॥ ३ ॥
ऐसेंऐसें हें अवधारा । अनन्याचा तो सोयरा ।
सांघतसे धनुर्द्धरा । पार्थासि ॥ ४ ॥
तेथ धृतराष्ट्रु ह्मणे । संजया हें तूतें कवणें ।
पूसिलें पैं वायाणें । कां गा बोलिलासि ॥ ५ ॥
माझी अवसरचिंता फेडीं । सांघें विजयाची गुढी ।
तवं येरु ह्मणे सांडीं । हे गोठि आतां ॥ ६ ॥
संजया विस्मयो मानसीं । मग आहा करुनि स्वशरीरेंसिं ।
ह्मणे कैसा पैं देवेंसीं । द्वेषु एथा ॥ ७ ॥

तऱ्हीं कृपाळु तो तुष्टो । विवेकु यया घोंटो ।
मोहाचा फीटो । माहारोगु ॥ ८ ॥

संजया ऐसें चिंतितां । संवादु तो चि भावितां ।
हर्षाचा येंतु चित्ता । महापूरु ॥ ९ ॥
ह्मणौनि आतां तेणें । उत्साहाचेनि अवतरणें ।
श्रीकृष्णाचें बोलणें । सांघिजैल तेया ॥ ४१० ॥
तेयां अक्षरां आंतूलु भाउ । पाववीन मी तुमचा ठाउ ।
आइकां ह्मणे ज्ञानदेउ । निवृत्तिचा ॥ ४११ ॥

ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे **गुणत्रयविभागयोगो** नाम चतुर्दशोऽध्यायः ।

श्रीकृष्णे सर्वात्मनीश्वरेर्पणमस्तु ॥



# ज्ञानेश्वरी

## अध्याय पंधरावा

**श्रीगणेशायनमः ॥**

आतां हृदय हें आपुलें । चौफळौनि भलें ।
वरि बैसउं पाउलें । श्रीगुरुचीं ॥ १ ॥
ऐक्यभावाची आंजुलि । सर्वेंद्रियकुड्मलिं ।
भरौनि पुण्यांजलि । अर्घ्यु देऊं ॥ २ ॥
अनन्योदकधुवट । वासना जे तन्निष्ठ ।
तें लागलेंसे अबोट । चंदनाचें ॥ ३ ॥
प्रेमाचेनि भांगारें । निर्वाळनि नेपुरें ।
लेवउं सुकुमारें । पदें तियें ॥ ४ ॥
घनावलि आवडी । अव्यभिचारें चोखडीं ।
तियें घाळूं जोडीं । आंगुलिया ॥ ५ ॥
आनंदमोदबहळ । सात्विकाचें मुकुळ ।
तें उमललें अष्टदळ । ठेउं वरि ॥ ६ ॥
तेथ अहंधूपु जाळूं । सोहंतेजें ओवाळूं ।
सामरस्यें पोटाळूं । निरंतर ॥ ७ ॥
माझि तनु आणि प्राण । इया दोन्ही पाउवां लेवउं **श्रीचरण** ।
करूं भोगमोक्षीं निंबलोण । पायां तेयां ॥ ८ ॥

इया गुरुचरणसेवा । हों पात्र तेया दैवा ।
जें सकलार्थाचा मेळावा । पाटु बांधों ॥ ९ ॥
अहिर्चे विसवणें वेऱ्हीं । उन्मेखु लाहे उजरि ।
जें वाचेतें इयें करि । सुधासिंधु ॥ १० ॥
पूर्णचंद्राचां कोडि । वक्तृत्वा घापे कुरौंडी ।
तैसी आणी गोडी । अक्षरांतें ॥ ११ ॥
सूर्ये अधिष्ठिली प्राची । जगा राणिवं दे प्रकाशाची ।
तैसी वाचा श्रोतेयां ज्ञानाची । दिवाळि करी ॥ १२ ॥
नादब्रह्म खुजें । कैवल्य हिं तैसें न सजे ।
ऐसा बोलु देखिजे । जेणें दैवें ॥ १३ ॥
श्रवणसुखाचां मांडविं । विश्व भोगवी माधवी ।
तैसी सांसिनली बरवी । वाचावेली ॥ १४ ॥
ठाउ न पवेतां जेयाचा । मनेंसिं मुरडली वाचा ।
तो देउ होये शब्दाचा । चमत्कारु ॥ १५ ॥
जें ज्ञानासि न चोजवें । ध्यानासि हिं नागवे ।
तें अगोचर फांवे । वोवी माझि ॥ १६ ॥
एव्हडें एक सौभग । वळघे वाचेचें आंग ।
गुरुपदपद्मपराग । लाहे जैं कां ॥ १७ ॥
तरि बहू बोलों काइ । आजि तें अना ठांइं ।
मातें वांचूनि नाहिं । ज्ञानदेउ ह्मणे ॥ १८ ॥
जें तान्हेनि मियां अपलें । आणि माझें गुरु एकलौतें ।
ह्मणौनि कृपेसिं एकहातें । जालें तिये ॥ १९ ॥
पाहा पां भरोवरी आघवी । मेह्नु चातकासि रिचवी ।
मज लागि गोसांवीं । तैसें केलें ॥ २० ॥
ह्मणौनि रिकामें तोंड । करुं गेलें बडबड ।
किं गीता ऐसें गोड । आंतुडलें ॥ २१ ॥

होए अदृष्ट आपैतें । तैं वाळू चि रत्नें परौतें ।
उजू आउख तैं मारितें । लोभु करी ॥ २२ ॥
आघणिं घातले हरळ । होति अमृताचे तांदुळ ।
जरि भुकेची राखे वेळ । जगन्नाथु ॥ २३ ॥
तिया परी गुरु । करिति जैं अंगीकारु ।
तैं होउनि ठाके सर्वसारु । मोक्षमयु ॥ २४ ॥
पाहा पां काइ नारायणें । तेयां पांडवांचें ऊणें ।
कीजे चि ना पुराणें । विश्ववंद्यें ॥ २५ ॥
तैसें श्रीनिवृत्तिराजें । अज्ञानपण हें माझें ।
आणिलें बोजे । ज्ञानाचिये ॥ २६ ॥
पारि असो हें आतां । प्रेम रुळतसे बोलतां ।
कें गुरुगौरवु वर्णितां । उन्मेखु आथि ॥ २७ ॥
आतां तेणें चि पसायें । तुह्मां संताचे पायें ।
बोलगैन मीं अभिप्रायें । गीतेचेनि ॥ २८ ॥
तारि तो चि प्रस्तुतिं । चौदावेया अध्यायाचां अंतीं ।
निर्णयो कैवल्यपती । ऐसा केला ॥ २९ ॥
जें ज्ञान जेयाचां हातिं । तो चि समर्थु मुक्ती ।
जैसा शतमखु संपत्ती । स्वर्गीचिये ॥ ३० ॥
कां शत एक जन्मां । जो जन्मौनि ब्राह्मकर्मा ।
कूरी तो चि ब्रह्मा । आनु नोहे ॥ ३१ ॥
नाना सूर्याचा प्रकाशु । लाहे जेविं डोळसु ।
तैं ज्ञानें चि सौरसु । मोक्षाचा तो ॥ ३२ ॥
तरि यया चि ज्ञाना लागि । कव्हणी पां योग्यता आंगिं ।
हें पांतां जगिं । देखिला एकु ॥ ३३ ॥
जेविं पातािळचें धन । दावी किर अंजन ।
पारि होआवे लोचन । पायलाचे ॥ ३४ ॥

तैसें मोक्षु देईल ज्ञान । एथ किर नाहिं आन ।
पारि तें चि थारे ऐसें मन । शुद्ध होआवें ॥ ३५ ॥
तारि विरक्तु वांचूनि कें हीं । ज्ञानासि तगणें नाहिं ।
हें विचारुनि ठांइं । ठेविलें देवें ॥ ३६ ॥
आतां विरक्तिची कव्हणी परी । जे एउनि मनातें वरी ।
हें इं सर्वज्ञें श्रीहरी । देखिलें असे ॥ ३७ ॥
जैं विषें रांधिली रसोये । जेवणारा ठाउवें होए ।
तैं ताट सांडूनि जाए । जिया परी ॥ ३८ ॥
तैसी संसारा एया समस्ता । जाणवे जैं अनित्यता ।
तैं वैराग्य दवडितां । पाठी लागे ॥ ३९ ॥
आतां अनित्यत्व कैसें । तें चि रुखाकारें मिसें ।
साधिजत असे विश्वेशें । पंचदशीं ॥ ४० ॥

**श्रीभगवानुवाच ॥**

**ऊर्ध्वमूलमधः शाखमश्वत्थं प्राहुरव्ययं ॥**
**छंदांसि यस्य पर्णानि यस्तं वेद स सर्ववित् ॥ १ ॥**

उपडिलें कवृतिकें । झाड येरी मोहरा ठाके ।
तें वेगें जैसें सूके । तैसें हें न्हवे ॥ ४१ ॥
इया एकी परी । रूपकाचिया कुसरी ।
सारितसे वारी । संसाराची ॥ ४२ ॥
करुनु संसारु वाउ । स्वरूपिं अहंते ठाउ ।
होआविआ अध्यायो । पंधरावा हा ॥ ४३ ॥
आतां हें चि आववें । ग्रंथगर्भिचें सांघावें ।
उपलव्हिलें जीवें । आकर्णिजो ॥ ४४ ॥
तन्हि महानंदसमुद्रु । जो पूर्णु पूर्णिमाचंद्रु ।
तो द्वारकेचा नरेंद्रु । ऐसें ह्मणे ॥ ४५ ॥

आगा पैं पांडुकुवंरा । एतां स्वरूपाचेआ घरा ।
करीतुसे आडवारा । विश्वाभासु जो ॥ ४६ ॥
तो हा जगडंबरु । न्हवे एथ सवंसारु ।
हा जाणैं महातरु । थांवला असे ॥ ४७ ॥
परि एरां सुखां सारिखा । तळिं मूळें वरि शाखा ।
तैसा न्हवे ह्मणौनु लेखा । नैए कव्हणा ॥ ४८ ॥
आगी कां कुऱ्हाडी । होए रिगावा जरि बुडिं ।
तरि हो कां भले तेव्हडी । वरिचिली वाढि ॥ ४९ ॥
जें तूटलेया मूळा पासिं । उलंडैल शाकांसिं ।
तरि तैसी गोठि काइसी । हा सोहपा नोहे ॥ ५० ॥
अर्जुना हें कवतिक । सांघतां असे अलौलिक ।
जें वाढि अधोमुख । रुखा एया ॥ ५१ ॥
जैसा भानु उंची नेणों कें । रश्मिजाळ तळिं फांके ।
सवंसारु हें कावरुखें । झाड तैसें ॥ ५२ ॥
आणि आथिनाथि तेतुकें । रुंधलें एणें चि एकें ।
कल्पान्तिचेन उदकें । व्योम जैसें ॥ ५३ ॥
कां रविचां अस्तमानीं । अंधारेन कोंदें रजनी ।
तैसा हा चि गगनीं । मांडला असे ॥ ५४ ॥
एया फळ ना चुंबितां । फुळ ना तुरुंबितां ।
जें काहिं पांडुसुता । तें रुख चि हा ॥ ५५ ॥
हा ऊर्ध्वमूळ आहे । परि उन्मळला नोहे ।
एणें चि हा होये । शाडुळु गा ॥ ५६ ॥
आणि ऊर्ध्वमूळ ऐसें । निगदिलें कीरु असे ।
परि अधिं हीं असोसें । मूळ यया ॥ ५७ ॥
* पैं बळबचेन महामारी । पिंपळावडाचिया परी ।
जेवि पारंबियां माझारि । डाहाळिया ॥ ५८ ॥

तेवि गा धनंजया । संसारतरू येया ।
अधीं चि आथि खांदिया । हें इं नाहिं ॥ ५९ ॥
तरि ऊर्ध्वा हि कडे । शाखांचे मांदोडे ।
दीसताति अपाडें । सांसिनले ॥ ६० ॥
जालें गगन चि पां वेलिये । कां वारा मांडला रुखाचेनि आयें ।
नाना अवस्थे त्रायें । उदैली असे ॥ ६१ ॥
ऐसा हा एकु । विश्वाकारु विटंकु ।
उदैला जाणें रूखु । उर्धमूलु ॥ ६२ ॥
आतां उर्ध येया कोण । तेथ मूल तें किंलक्षण ।
कां अधोमुखपर्णेन । शाखा कैसिया ॥ ६३ ॥
अथवा द्रुमा एया । अधिं जिया मूलिया ।
तिया कोण्ही कैसिया । उर्ध शाखा ॥ ६४ ॥
आणि अश्वत्थु ऐसी । प्रसिद्धि काइसी ।
आत्मविद्विलासीं । निर्णो केला ॥ ६५ ॥
हें आघवें चि बरवें । तूझिये प्रतीती फावें ।
तैसेनि सांघों सोलिवें । विन्यासें गा ॥ ६६ ॥
परि आइकैं सूभगा । हा प्रसंगु तुज चि जोगा ।
कान चि करीं सर्वांगां । हियें आथिलेयां ॥ ६७ ॥
ऐसें प्रेमरसें सुरफुरें । बोलिलें जवं यादवेश्वरें ।
तवं अवधान अर्जुनाकारें । मूर्त्त जालें ॥ ६८ ॥
देउ निरोपीति तें थेकुलें । येसणें श्रोतेपण फांकलें ।
जैसें आकाशें खेंव पसरिलें । दाहिं दिशिं ॥ ६९ ॥
श्रीकृष्णसूक्तिसागरा । तो अगस्ति चि पां दूसरा ।
ह्मणौनि घोंटु भरुं पाहे एकसरा । आघवेयाचा ॥ ७० ॥
ऐसी सोये संडौनु खवलली । आवडि अर्जुनें देवें देखिली ।
तेथ जालेन सुखें केली । कुरौंडि तेया ॥ ७१ ॥

मग ह्मणे धनंजया । तें उर्ध गा तरु येया ।
येणें रुखें चि कां जेया । ऊर्ध्वत्व गमे ॥ ७२ ॥
यऱ्हवीं मध्योर्धअध । हे नाहिं जेथ भेद ।
अद्वयेसिं एकवद । जिये ठांई ॥ ७३ ॥
जो नाइकिजतां नादु । जो असौरम्यमकरंदु ।
जो आंगाथिला आनंदु । सुरतें विण ॥ ७४ ॥
जेया जें अऱ्हां परौतें । जेया जें पुढां मागौतें ।
दिसतेन विण दिसतें । अदृश्य जें ॥ ७५ ॥
उपाधिचा दूसरा । धालितां उंपासिरा ।
नावां रूपां सवंसारा । नां होए जेया ॥ ७६ ॥
ज्ञातृज्ञेयविहीन । नसुधें चि जें ज्ञान ।
सुखा भरलें गगन । गांलिव जें ॥ ७७ ॥
ऐसी वस्तु जे साचे । ते उर्ध गा एया तरुचें ।
तेथें आर घेणें मूळाचें । तें ऐसें असे ॥ ७८ ॥
तऱ्हीं माया ऐसी ख्याति । नसती च यया आथि ।
कां वांझेची संतती । वानों ए जैसी ॥ ७९ ॥
तैसी संत ना असंत होए । जे विचाराचें नावं न साहे ।
ऐसिया परी आहे । अनादि ह्मणति ॥ ८० ॥
जे भवद्रुमबीजिका । प्रपंचाची भूमिका ।
विपरीतज्ञानदीपिका । सांचली जे ॥ ८१ ॥
जे नानाशक्तिची मांदुस । जे जगद्भ्रमाचें आकाश ।
जे आकारजाताचें दुस । घडी केली ॥ ८२ ॥
ते माया वस्तुचां ठांइं । असे जैसेनि नाहिं ।
मग वस्तुप्रभा चि पाहिं । प्रकट होए ॥ ८३ ॥
जेऱ्हलिं आपणयां आली नींद । कां आपणें जेविं मुग्ध ।
कां काजळि आणि मंद । प्रभा दिवे ॥ ८४ ॥

स्वप्निं प्रिया पुढां तरुणांगी । निदेली चेववउनि वेगिं ।
आलंगितेन विण अलंगी । सकाम करी ॥ ८५ ॥
तैसी स्वरूपिं जाली माया । आणि स्वरूप नेणणें धनंजया ।
ते चि तरु यया । मूळ पहिलें ॥ ८६ ॥
वस्तूसि आपुला जो अबोधु । तो उर्धी आठुलैजे कंदु ।
वेदांतिं हिं हा प्रसिद्धु । बीजभाउ ॥ ८७ ॥
घन अज्ञान सुषुप्ति । तो बीजांकुरभाउ ह्मणति ।
एर स्वप्न हान जागृति । फळभावो तेयाचा ॥ ८८ ॥
ऐसिया इया वेदांतिं । निरूपणभाषाप्रतीति ।
परि ते असो प्रस्तुतिं । अज्ञान मूळ ॥ ८९ ॥
तें ऊर्द्धि आत्मा निर्मळें । अधोर्द्ध सूचीति मूळें ।
बळिया बांधौनि आलें । मायायेगाचे ॥ ९० ॥
मग अधमूळासि देहांतरें । उठति जियें अपारें ।
तें चौंपासिं घेउनु अगारें । खोळाविति ॥ ९१ ॥
ऐसें भवद्रुमाचें मूळ । हें ऊर्द्धि करी बळ ।
मग अणियांचे बेंबुळ । अधीं चि दावी ॥ ९२ ॥
तेथीं चिद्वृत्ति पहिलें । महातत्व उमळलें ।
तें मान वाल्हेंदुल्हें । एक निगे ॥ ९३ ॥
मग सत्वरजतमात्मकु । त्रिविधु अहंकारु जो एकु ।
तो तिवना अधोमुखु । डिरु फुटे ॥ ९४ ॥
तो बुद्धिची वेउनि आगारी । भेदाची वृत्ति करी ।
तेथ मनाची डाळ धरी । साजेपणें ॥ ९५ ॥
ऐसा मूळाचिया गाढिका । विकल्परस कोंवळिका ।
चित्तचतुष्टय डाहाळिका । कोंभैजे तो ॥ ९६ ॥
मग आकाश वायु दीतक । अप पृथ्वी हे पांचे फोंक ।
महाभूतांचें सारीक । सरळ होति ॥ ९७ ॥

तैसीं चि श्रोत्रादितन्मात्रें । तियें आंगवसा गर्भपत्रें ।
लुललुलितें विचित्रें । उमलती गा ॥ ९८ ॥
तेथ शद्वांकुर वरिपडी । श्रोत्रां वाढि देव्हडि ।
होंता कारितीं कांडीं । आकांक्षेची ॥ ९९ ॥
आंगत्वचेचे वेलपालव । स्पर्शांकुरिं घेति धांव ।
तेथ बांबळ पडे अभिनव । विकाराचें ॥ १०० ॥
पाठिं रूपपत्रपेलोवोर्लि । चक्षु लांब तें कांडें बुद्धि घाली ।
तेव्हलिं व्यामोहता भली । पाल्हेली जाए ॥ १ ॥
आणि रसाचे आंगवसे । वाढतां वेगें बहुवसें ।
जिव्हे आर्तिचीं असोसें । निगति बेचें ॥ २ ॥
तैसिं चि कोंभैलेन गंधें । घ्राणाची डिरि थांऊं बांधे ।
तेथ तलु घे सानंदें । प्रलोभाचा ॥ ३ ॥
एवं महदहंबुद्धि । मनें महाभूतसमृद्धि ।
इया संसाराचिया अवधी । सासन जें ॥ ४ ॥
किंबहुना इहिं आठें । आंगिं अधिक हा फांटे ।
परि सिंपी चि एव्हडें उमटे । रूपें जेवि ॥ ५ ॥
कां समुद्राचेनि पैसारें । वरि तरंगता आसारे ।
तैसें ब्रह्म चि होये वृक्षाकारें । अज्ञानमूल ॥ ६ ॥
आतां ययाचा हा विस्तारु । हा चि यया पैसारु ।
जैसो आपणपें स्वप्निं परिवारु । ऐकाकिया ॥ ७ ॥
परि तें असो हें ऐसें । कावरें झाड उससे ।
यया महदादि हे आरवसें । अधोशाखा ॥ ८ ॥
आणि अश्वत्थु ऐसें ययातें । ह्मणति जे जाणते ।
तें हिं परिस हो येथें । सांविजैल ॥ ९ ॥
तरि अश्वत्थु ह्मणिजे उखा । तवं वरि एकसारिखा ।
नाहिं निर्वाहो यया रुखा । प्रपंचरूपासि ॥ ११० ॥

जैसा न लोटतां क्षणु । मेघु होए नानावर्णु ।
कां विजु नसे संपूर्णु । निमेषु भरि ॥ ११ ॥
ना कांपतेया पद्मदला । वरिला बैसका नाहिं जला ।
कां चित्त जैसें व्याकुला । माणुसाचें ॥ १२ ॥
तैसी ययाची स्थिती । नासत जाये क्षणा प्रति ।
ह्मणौनि ययातें ह्मणति । अश्वत्थु गा ॥ १३ ॥
आणि अश्वत्थु एणें नावें । पिंपलु ह्मणति स्वभावें ।
परि तो अभिप्राउ नोहे । श्रीहरिचा ॥ १४ ॥
यऱ्हविं पिंपलु घडतां विखिं । मियां गति देखिली नीकी ।
परि तें असो काइ लौकिकिं । हेतु काज ॥ १५ ॥
ह्मणौनु हा प्रस्तुतु । अलौकिकु परियसां ग्रंथु ।
तरि क्षणिकत्वें चि अश्वत्थु । बोलिजे हा ॥ १६ ॥
आणिक हिं एकु थोरु । यया अव्ययत्वाचा डगरु ।
आथि परि तो भीतरु । ऐसा असे ॥ १७ ॥
जैसा मेघांचेनि तोंडें । सिंधु एकें आंगें घटे ।
आणि नदी एरी कडे । भरती चि असती ॥ १८ ॥
एथ वोहटे ना चढे । ऐसा परिपूर्ण चि आवडे ।
परि तें फुली जवं नुघडे । मेघांनदींचि ॥ १९ ॥
तैसें यया रुंखाचें होणें जाणें । तर्के होंतेनि वहिलेपणें ।
ह्मणौनि लोकु ययातें ह्मणे । अव्ययो हा ॥ १२० ॥
यऱ्हविं दानसीलु पुरुषु । वेचकपणें संचकु ।
तैसा व्ययें चि हा रुंखु । अव्ययो हा ॥ २१ ॥
जातां वेगें बहुवसें । न वचे कां भुइं रुतलें असे ।
तें रथाचें चक्र दीसे । जिया परी ॥ २२ ॥
तैसें कालातिक्रमीं जे वाले । ते भूनशाखा जेथ गले ।
तेथ कोडि वारें उमाळे । उठिति आणिक ॥ २३ ॥

परि एकि केधवां गेली । शाखाकोडि केधवां जाली ।
हें नेणवे जेविं उमललीं । आखाडअभ्रें ॥ २४ ॥
महाकल्पाचां सेवटिं । प्रकटिया उमलती सृष्टि ।
तैसें चि आणिकिचें दांग उठि । सांसीनलें ॥ २५ ॥
संहारवातें प्रचंडें । पडति प्रलयांतिचिं सालडें ।
तवं कल्पादिचिं ज़ुंबाडें । पाल्हैजति ॥ २६ ॥
रिगे मन्वंतर मनू पुढें । वंशा वरि वंशाचे मांडें ।
जैसी इक्षुवृद्धि कांडेनकांडें । जींके जेवि ॥ २७ ॥
कलियुगांतीं कोरडीं । चहुं युगांचीं डालें सांडी ।
तवं कृतयुगाची पेली देव्हडी । पडे पुढुतीं ॥ २८ ॥
वर्त्ततें वरिष जाए । तें पुढिलां मुल्हारि होए ।
जैसा दिवसु जांतु किं एतु आहे । हें चोजवे नां ॥ २९ ॥
जैसिया वारियाचिया झुलुका । सांदा ठाउवा नव्हे देखां ।
तैसिया उठिति पडति शाखा । नेणों केति ॥ १३० ॥
एकी देहाची डिरी तुटे । तवं देहांकुरिं बहुविं फुटे ।
ऐसेन भवतरु हा वाटे । अव्ययो ऐसा ॥ ३१ ॥
जैसें वाहातें पाणीं जाए वेगें । तैसें चि आणिक मिले मागें ।
तेविं असंत चि असिजे जगें । मानिजे ते ॥ ३२ ॥
कां लागौनि डोला उघडे । तवं कोडि वरि घडे मोडे ।
तें नेणतियां तरंगु आवडे । नित्य ऐसा ॥ ३३ ॥
वायसा एकें बुबुलें दोहिं कडे । डोला चालितां अपाडें ।
दोन्हि आथि ऐसा पडे । भ्रमु जेवि ॥ ३४ ॥
परि भिंगोरि निधिये पडिली । गमे भूमीसि जडली ।
ऐसा वेगातिसो भुली । हेतु होए ॥ ३५ ॥
हें बहू असो झडती । आंधारिं भवंडितां कोलिती ।
ते दीसे जैसी आइती । रेख सैंभ ॥ ३६ ॥

हा संसारवृक्ष तैसा । मोडतु मांडतु सहसा ।
नेदखौनि लोकु पींसा । अव्ययो मानी ॥ ३७ ॥

परि एयाचा वेगु देखे । जो हा क्षणिकु ऐसा वोळखे ।
जाणे कोडि वेळ निमिखें । होंतु जांतु ॥ ३८ ॥

नाहिं अज्ञान वांचूनि मूळ । एयाचें असिलेपण हें टवाळ ।
ऐसें झाड चि सीनसाळ । देखिलें जेणें ॥ ३९ ॥

तेयातें गा पांडुसुता । मी सर्वज्ञु हिं ह्मणे जाणता ।
पैं वाग्ब्रह्मसिद्धांता । वेद्य तो चि ॥ १४० ॥

योगजाताचें जोडलें । तेया एकासि चि उपेगा गेलें ।
किंबहुना जिआलें । ज्ञान हिं तेणें ॥ ४१ ॥

असो हें बहू बोलणें । वानिजैल तो कवणें ।
जें भवरुंखु हा जाणे । उशि ऐसी ॥ ४२ ॥

**अधश्चोर्ध्वं प्रसृतास्तस्य शाखाः । गुणप्रवृद्धा विषयप्रवालाः ॥**
**अधश्च मूलान्यनुसंततानि । कर्मानुबंधीनि मनुष्यलोके ॥ २ ॥**

मग यया चि प्रपंचरूपा । अधःशाखिया पादपा ।
डाहालिया जांती उमपा । ऊर्धा हिं उजू ॥ ४३ ॥

आणि अधिं फांकलीं डाळे । ऊर्धि हिं तिष्ठति मूळें ।
तेया तळिं पवळे । वेलु पालों ॥ ४४ ॥

ऐसें जें आह्मीं । ह्मणितलें उपक्रमीं ।
तें परियसें सुगमीं । बोलिं सांवों ॥ ४५ ॥

तरि बद्धमूळें अज्ञानें । महदादिकिं सासनें ।
वेदांचि थोरवणें । घेउनियां ॥ ४६ ॥

परि अधिं तवं स्वेदज । जारजें उद्भिज मणिज ।
हे बुढौनि महाभुज । उठिति च्यान्हि ॥ ४७ ॥

एया एकएकांचेन अनगटें । चोरासी लक्ष धाकुटे ।
तेव्हळि जीवशाखीं फांटे । सैंघ चि होंति ॥ ४८ ॥
प्रसवतु शाखा सरलिया । नानासृष्टि डाहालिया ।
आडफांटति मालिया । जातींचिया ॥ ४९ ॥
स्त्रीपुरुषनपुंसकें । हे व्यक्तिभेदांचे टकें ।
आंदोलति आंगिकें । विकारभारें ॥ १५० ॥
जैसा वर्षाकालु गगनीं । पल्हैजे नवघानीं ।
तैसें आकारजात अज्ञानिं । वेळि जाए ॥ ५१ ॥
मग शाखांचेनि आंगभरें । लवौनि गुंपति परस्परें ।
गुणक्षोभाचें वारें । उदैजति ॥ ५२ ॥
तेथ तेणें अचाटें । तिहिं ठांइं हा फांटे ।
गुणाचेन झडझडाटें । ऊर्ध्वमूलु ॥ ५३ ॥
ऐसा रजाचिया झुलुका । झडाडितां आगलिका ।
मनुष्यजातिशाखा । थोरावति ॥ ५४ ॥
तिया ऊर्ध ना अधिं । माझारि चि कोंदाकोंदि ।
आडफांटति खांदिं । चतुर्वर्णांचां ॥ ५५ ॥
तेथ विधिनिषेधीं सपलुव । वेदवाक्यांचे अभिनव ।
पालव डोलति बरव । आणिति तियां ॥ ५६ ॥
अर्थकामपसरें । अग्रवणें घेंति थोरें ।
तेथ क्षणिकें पदांतरें । इहभोगाची ॥ ५७ ॥
तेथ प्रवृत्तिचेनि वृद्धिलोभें । खांखरैजति शुभाशुभें ।
नाना कर्मांचे खांबे । नेणों केती ॥ ५८ ॥
तेवि चि क्षणे भोग मागिलें । पडति देहांची बुडसलें ।
तवं पुढां वाढु पेले । नवेयां देहांचा ॥ ५९ ॥
आणि शब्दादिक सुहावे । साहाजें रंगें हवाळें ।
विषयपल्लव नवे । नीच होंति ॥ १६० ॥

ऐसें रजोवातेंप्रचंडे । मनुष्यशाखांचे मांदिडे ।
वाढति तो एथ रूढे । मनुष्यलोकु ॥ ६१ ॥
तैसा रजाचा तो वारा । नावेक धरी वोसरा ।
मग वाजों लागे घोरा । तमाचा जो ॥ ६२ ॥
तेधवां इया चि मनुष्यशाखा । नीच वासना अधिं देखां ।
पाल्हैजति डालुका । कुकर्माचिया ॥ ६३ ॥
अप्रवृत्तिचें खनुवाले । फोंक निगति सरले ।
घेंत पान पालव डालें । प्रमादिचीं ॥ ६४ ॥
बोलति निषेध नियमें । जिया ऋग्यजुःसामे ।
तो पाला तेयां घुमे । टकेयां वरि ॥ ६५ ॥
प्रतिपादिति अभिचार । आगम जे परमार ।
ते हिं पानिं वेंति पसर । वासनावेलि ॥ ६६ ॥
तवं तवं होंति थोरांडें । अकर्माची तरुबुडें ।
आणि जन्मशाखा पुढपुढें । घेंति धांवा ॥ ६७ ॥
तेथ चांडालादि निकृष्टां । दोषजातींचा थोर फांटा ।
जाल पडों लागे कर्मभ्रष्टां । भुलौनियां ॥ ६८ ॥
पशु पक्षी शूकर । व्याघ्र वृश्चिक विखार ।
हे आडशाखानिकर । थोरावती ॥ ६९ ॥
परि ऐसिया शाखा पांडवा । सर्वांगिं हिं नीच नवा ।
नरकभोगु यावा । फलाचा तो ॥ १७० ॥
आणि हिंसाविषय पुढारिं । कुकर्मसंगें धुरु धरी ।
जन्म वेरि अगारीं । वाढती चि असे ॥ ७१ ॥
ऐसीं होंति तरु तृणें । लोह लोष्ट पाखाणें ।
इया खांदिया तेविं जाणें । फलें हें चि ॥ ७२ ॥
अर्जुना गा इया परीं । मनुष्यां लागौनि अवधारीं ।
वृद्धि स्थावरान्त वेन्हीं । अधोशाखांची ॥ ७३ ॥

ह्मणौनु जें माणुसें डालें । इयें चि जाणें अधीं मूलें ।
एथौनि मग पघले । संसारतरू ॥ ७४ ॥
यन्हवि उर्धिचें पार्था । मुद्‌ल मूल पांतां ।
आधिचिया मध्यस्था । शाखा इया ॥ ७५ ॥
परि तामसीसात्विकीं । सुकृतदुष्कृतात्मकिं ।
विरूढति इया शाखिं । अधोर्धीचां ॥ ७६ ॥
आणि वेदत्रयीचेया पाना । नैए अन्यत्र लागौं अर्जुना ।
जे मनुष्यें वांचौनु विधाना । विषो नाहिं ॥ ७७ ॥
ह्मणौनि तनुमानुषां । इया उर्धमूलौनि शाखा ।
तन्हि कर्मवृद्धिसि देखां । इया चि मूलैं ॥ ७८ ॥
आणि आणिकां हिं झाडिं । शाखा वाढतां मूलें गाढिं ।
मूलें गाढें तवं वाढि । पैसु आथि ॥ ७९ ॥
तैसें चि यया शरीरा । कर्में देहसंसारा ।
आणि देह तवं व्यापारा । नां ह्मणों नैए ॥ १८० ॥
ह्मणौनि देहें मानुषें । इयें मूलें होंति न चुके ।
ऐसें जगज्जनकें । बोलिलें तेणें ॥ ८१ ॥
मग तमाचें तें दारुण । थिरावलेयां वाउधाण ।
सत्वाची सूटे सत्राण । वाहुटली ॥ ८२ ॥
तें इया मनुष्याकारा । मूलिं सुवासना निगति आरा ।
घेउनि सूटति कोंभारा । सुकृतांकुरीं ॥ ८३ ॥
उकलतेन उन्मेखें । प्रज्ञाकुशलतेचां तिखें ।
डिरिया रिगति निमिखें । बांबलैजौनि ॥ ८४ ॥
तेथ मेधारसें सगर्भ । आस्थापात्रें सवांब ।
सरले निगति कोंभ । सद्‌वृत्तिचे ॥ ८५ ॥
सदाचारांचिया सहसा । टके उठिती बहुवसा ।
घुमघुमिति घोसां । वेदपक्षांचां ॥ ८६ ॥

शिष्टागमनविधानें । विविधयागवितानें ।
तियें पाना वरि पानें । पांजरति ॥ ८७ ॥
ऐसीं यमदमिं घोंसालियां । उठिति तपाचिया डाहालिया ।
देंति वैराग्यशाखा कोंवलिया । वेल्हालपणें ॥ ८८ ॥
विशिष्टां व्रतांचे फोंक । धीराचां अणगटिं तीख ।
जन्मवेगें उर्धमुख । उंचावती ॥ ८९ ॥
माजि वेदांचा पाला दाट । तो करी विद्यांचा झडझडाट ।
जवं वाजे अचाट । सत्वानिलु तो ॥ १९० ॥
तेथ धर्मडाहालेबाहालिं । दीसति जन्मशाखा पालवी ।
तिया आडफुटती फलीं । स्वर्गादिकिं ॥ ९१ ॥
पुढां उपरतिरागें लोहिविं । धर्ममोक्षाची शाखा सरली ।
लाहातलाहाती नीच नवी । वाढती चि असे ॥ ९२ ॥
पैं रविचंद्रादि ग्रहवर । पितृ ऋषि विद्याधर ।
हे आडशाखाप्रसुर । पैसु घेंति ॥ ९३ ॥
एया हि हूनि उंचपडे । गूढले फलाचेनि बुडें ।
इंद्रादिक ते मांदींडे । थोर शाखांचे ॥ ९४ ॥
मग तेया हिं उपारें डाहालिया । तपोज्ञानिं उंचावलिया ।
मरीचिकश्यपादिया । उपरिशाखा ॥ ९५ ॥
एवं पालोवालि उत्तरोत्तरु । उर्धशाखांचा हा पैसारु ।
बुडिं साना अग्रि थोरु । फलाढ्यपणें ॥ ९६ ॥
वारि उपरिशाखा हिं पाठीं । एंति फलभारें जे किरीटी ।
ते ब्रह्मेशान्तअणगटिं । कोंभ निगति ॥ ९७ ॥
फलाचेनि उज्झीलपणें । ऊर्ध्वी उव्हांडेल दूणें ।
जवं मावौतें बैसणें । मूलिं चि होए ॥ ९८ ॥
प्राकृतां तर्‍हीं रुंखां । जे फलें दाटिली होये शाखा ।
ते उव्हांडिली देखां । बूडासि ए ॥ ९९ ॥

तरि जेथौनि हा आघवा । संसारतरुचा उठावा ।
तियें मूळिं टेंकति पांडवा । वाढतीं ज्ञानें ॥ २०० ॥
ह्मणौनि ब्रह्मेशाना परौतें । वाढणें नाहिं जीवातें ।
तेथौनि मग वरौतें । ब्रह्म चि किं ॥ १ ॥
परि हें असो ऐसें । ब्रह्मादिक तें आंगवसें ।
उर्धमूळा सरिसे । न तूकति गा ॥ २ ॥
आणिक हिं शाखा उपरता । जिया सनकादि नामें विख्याता ।
तिया फळिं मूळि नाडळतां । भरलिया ब्रह्मिं ॥ ३ ॥
ऐसीं मनुष्या लागौनि जाणावी । उर्ध्व ब्रह्मादि शेष पालवी ।
शाखांची वाढि बरवी । उंचावे पैं ॥ ४ ॥
पार्था उर्धिचेया ब्रह्मादि । मनुष्यत्व चि होए आदिं ।
ह्मणौनि इयें अधिं । ह्मणितलीं मूळें ॥ ५ ॥

**न रूपमस्येह तथोपलभ्यते । नान्तो न चादि र्न च संप्रतिष्ठः ॥**
**अश्वत्थमेनं सुविरूढमूलं । असंगशस्त्रेण दृढेन छित्वा ॥ ३ ॥**

एवं तुज अलौलिकु । हा अधोर्धशाखु ।
सांघितला भवरुखु । उर्धमूळ ॥ ६ ॥
आणि अधिचीं हीं मूळें । उपरातिं दाविलीं सविवळें ।
आतां परियसैं उन्मूळे । कैसेनि हा ॥ ७ ॥
परि तूझा हान पोटिं । ऐसें गमैल किरीटी ।
जे एवडें झाड उत्पाटी । ऐसें काइ असे ॥ ८ ॥
कें ब्रह्माचआ सेवट वेन्हीं । उर्ध शाखांची थोरी ।
आणि मूळें तवं निराकारिं । उर्धि असे ॥ ९ ॥
हा स्थावरां हिं तळिं । फांकतसे अधिचा डाळिं ।
माजि धांवतसे दूजां मूळिं । मनुष्यरूपिं ॥ २१० ॥
ऐसा गाढा आणि अफांटु । कोण करी यया सेवटु ।
तरि ज्ञानें हा हलवटु । घरिसी माऊ ॥ ११ ॥

पैं हा उन्मलावेया दोखें । सायास चि काइसे ।
काइ बाला बागुलु देखें । देव्हडा वाहे ॥ १२ ॥
गंधर्वदुर्ग कां न पाडावे । काइ शशविषाण मोडावें ।
होआवें मग तोडावें । खपुष्प किं ॥ १३ ॥
तैसा संसारु हा वीरा । रुंखु नाहिं साचोकारा ।
मा उन्मूलनि दरारा । काइसा तऱ्हीं ॥ १४ ॥
आह्मीं सांघितली जे परी । मूळडाहाळांची उजिरी ।
ते वांझेचें घर भारें । लेंकुरुवें जैसीं ॥ १५ ॥
कां कीजति चेइलेपणीं । स्वप्निंचि तियें बोलणीं ।
जैसी जाणें ते काहाणी । दुबलेयाची ॥ १६ ॥
ह्मणौनु पैं धनंजया । आह्मीं वानिली ते रूपगाया ।
कासविएचेनि तूपें राया । उन्गरिलें ॥ १७ ॥
मूळ अज्ञान तें चि लटिकें । मा तयाचें काज केतुकें ।
ह्मणौनु संसाररुंखु सतिकें । वाऊ चि पैं ॥ १८ ॥
आणि अंतु यया नाहिं । ऐसें वाखाणिजे जें काहिं ।
ते हिं साचें चि पाहिं । परी एकी ॥ १९ ॥
तरि प्रबोध जवं नोहे । तवं नींदे काइ अंतु आहे ।
किं राति सरैल पाहे । तेया आरौतें ॥ २२० ॥
तेवि जवं पार्था । विवेकु नुधवी माथा ।
तवं अंतु नाहिं अश्वत्था । भवरूपा एया ॥ २१ ॥
तैसें चि हा अनादि । ऐसी आहे शाब्दी ।
ते आळुकी नोहे नुरोधिं । बोलातें एया ॥ २२ ॥
जन्मे ना होए । ऐसेयां सांवीं कव्हणी माए ।
एया लागि नाहिंपणें आहे । अनादि हा ॥ २३ ॥
आदि ना अंतु स्थिति । ना रूप ययासि आथि ।
काइसी कुंथाकुंथी । उन्मूळनीं गा ॥ २४ ॥

आपुलेया अज्ञाना साठिं । नव्हतां थांवला किरीटी ।
तरि आत्मज्ञानाचेनि लोटिं । खंडिनि गा ॥ २५ ॥
वांचौनि ज्ञानेन् विण एकें । उपायें कारिसि तेतुके ।
तिहिं गुंपसि अविकें । रुखि इयें ॥ २६ ॥
मग केतिकां खांदोखांदिं । येया हिंडावें उर्धि अधिं ।
ह्मणौनि मूल चि अज्ञान छेदीं । सम्यग्ज्ञानें ॥ २७ ॥
यऱ्हविं दोरिएचेया उरगा । डांगा मेळवितां पैं गा ।
तो वाउ चि फारु गा । केला होए ॥ २८ ॥
तरावेया मृगजळाची गंगा । डोणी लागि धांवतां दांगा ।
माजि वाहलें बुडिजे पैं गा । साचें जेविं ॥ २९ ॥
तेविं नाथिलेयां संसारा । उपाइं जाचतेया वीरा ।
आपणपें लोपें वारा । विकोपिं जाए ॥ २३० ॥
ह्मणौनि स्वप्निचेया घाया । उखदें चेउ धनंजया ।
तेविं अज्ञानमूला यया । ज्ञान चि खड्ग ॥ ३१ ॥
परि तें चि लीला परजवें । तैसें वैराग्याचें नीच नवें ।
अभंग बळ होआवें । बुद्धीसि गा ॥ ३२ ॥
उठिलेनि वैराग्यें एणें । त्रिवर्गु हा कैसा संडणें ।
जैसें वमौनियां सुणें । आतां चि गेलें ॥ ३३ ॥
हा ठाउ पांडवा । पदार्थजातीं आघवा ।
विटंबी तो होआवा । वैराग्यलोटु ॥ ३४ ॥
मग देहअहंतेचें दळें । सांडुनि एकें वेळें ।
प्रत्यग्बुद्धिकरवालें । हातवसावें ॥ ३५ ॥
निसले विवेकुसाहाणें । जें ब्रह्मास्मिबोधें सणाणे ।
मग पुरतेन बोधें उठणें । एकलें चि ॥ ३६ ॥
परि निश्चयाचिये मुठी बळ । होआवेया एकि दोनि वेळ ।
मग तुळावें अतिचोखाळ । मनन वेन्हीं ॥ ३७ ॥

पाठिं हातियरां आपणेयां । निदिध्यासें एक जालेयां ।
पुढां नुरैल घाया । पुरतें गा ॥ ३८ ॥
तें आत्मज्ञानाचें खांडें । अद्वैतप्रमेचेनि वाढें ।
नेंदील उरों कव्हणी कडे । भवरुंखासि ॥ ३९ ॥
तेव्हांळिं उर्ध कां उधिं मूल । ना अधिचें हान शाखाजाल ।
तें कहीं चि न दीसे मृगजल । चांदिणां जेवि ॥ २४० ॥
ऐसेन गा वीरनाथा । आत्मज्ञानाचिया खड्गलता ।
छेदौनियां भवाश्वत्था । उर्धमूलातें ॥ ४१ ॥
मग इदंतेसि वाळलें । मीपणें विण डाहारलें ।
तें रूप पाहिजे आपुलें । आपण चि ॥ ४२ ॥
पारि दर्पणाचेनि आधारें । एक चि करुनि दूसरें ।
मुख पांति गावारें । तैसें नको हो ॥ ४३ ॥
आपण चि आपणेयातें । पाहिजे जें अद्वैतें ।
तें ऐसें होए निरुतें । बोलिजतु असे ॥ ४४ ॥

**ततः पदं तत्परिमार्गितव्यं । यस्मिन्गता न निवर्त्तन्ति भूयः ॥
तमेवचाद्यं पुरुषं प्रपद्ये । यतः प्रवृत्तिः प्रसृता पुराणी ॥ ४ ॥**

जें पाहिजेतेन विण पाहिजे । कांहिं नेणतां चि जाणिजे ।
आद्यपुरुखु म्हणिजे । जेया ठायातें ॥ ४५ ॥
तेथ उपाधिचा वोथंबा । घेउनि श्रुती धांवति जीभा ।
मग नावारूपाचां बडंबा । करिती वायां ॥ ४६ ॥
पैं भवस्वर्गा उबगळे । मुमुक्षु योगज्ञान् वळघले ।
पुडुतीं नैयों इया निगाले । पैजा जेथ ॥ ४७ ॥
संसाराचेयां पायां पुढां । पळती वीतराग होडां ।
उल्लंडौनि ब्रह्मपदाचा कर्मकडा । घालति मागो ॥ ४८ ॥
अहंतादिभावां आपुलेयां । झाडा देउनि आघवेयां ।
पत्र घेंति ज्ञानिये जेया । मूळघरासि ॥ ४९ ॥

जिये कां वस्तुचें नेणणें । आणिलें जगा थोर जाणणें ।
नाहिं तें चि नांदविलें जेणें । मी तूं जगिं ॥ २५० ॥
पैं जेथौनि हे एव्हडी । विश्वपरंपरेची वेलींडी ।
वाढती आस जैसी कोरडी । निदैवाची ॥ ५१ ॥
पार्था तें वस्तु पहिलें । आपणपें पैं आपुलें ।
पाहिजे जैसें हिवंलें । हिवं हिवें ॥ ५२ ॥
आणिक हिं एक तेया । उऺलखणें असे धनंजया ।
तरि जेया कां भेटलेयां । एणें चि नाहिं ॥ ५३ ॥
परि तेया भेटति ऐसें । जें ज्ञानें सर्वत्र सरिसें ।
महाप्रलयांबुचें जैसें । भरलेपण ॥ ५४ ॥

**निर्मानमोहाजितसंगदोषा अध्यात्मनित्या विनिवृत्तकामाः ॥**
**द्वंद्वै विंमुक्ताः सुखदुःखसंगै गंछंत्यमूढाः पदमव्ययं तत् ॥ ५ ॥**

जेयां पुरुषांचें मन । संडौनि गेलें मोहमान ।
वरिखा अंतिं जैसे घन । आकाशातें ॥ ५५ ॥
निकवडेया निष्ठुरा । उबगिजे जेविं सोइरा ।
तैसे नांगवति विकारां । वेटालों जे ॥ ५६ ॥
फळती केळि उन्मळे । तैसी आत्मलाभें प्रबळें ।
तेयांची क्रिया ढाळें ढाळें । गळती आहे ॥ ५७ ॥
आगि लागलेयां रुंखिं । देखौनि सैरा पळति पक्षी ।
तैसें सांडिलें असेखिं । विकल्पि जे ॥ ५८ ॥
आइकें सकळदोषतृणीं । अंकुरैजति मेदिनी ।
तिये भेदबुद्धिची काहाणी । नाहिं जेयांतें ॥ ५९ ॥
सूर्योदया सरिसी । राति पळैनि जाए आपैसी ।
गेली देहाहंता तैसी । अविद्ये सवें ॥ २६० ॥
आयुष्यहीना जीवातें । देह संडी जेविं अवचितें ।
तेवि निदसुरें द्वैतें । संडिलें जे ॥ ६१ ॥

लोहाचें सांकडें परिसा । न जोडे आंधारु रवि जैसा ।
द्वैतबुद्धिचा तैसा । जेयां दुकलु ॥ ६२ ॥
आगा सुखदु:खाकारें । द्वंद्वें देहिया जियें गोचरें ।
तियें जेयां समोहरें । होंति चि ना ॥ ६३ ॥
स्वप्निचेया राज्य कां मरण । नोहे हर्षशोकासि कारण ।
प्रबोधलेयां जाण । जिया परी ॥ ६४ ॥
तैसें सुखदु:खरूपिं । दंदिं जे पुण्यपापिं ।
नेघपिजति सर्पि । गरुडु जैसा ॥ ६५ ॥
आणि अनात्मवर्गु नीर । संडूनि आत्मरसाचें क्षीर ।
चरताति जे सविचार । राजहंस ॥ ६६ ॥
जैसा वरिखौनु भूतालिं । आपुला रसु अंशुमाली ।
माघुता आणी रश्मिजालिं । बिंबासि चि ॥ ६७ ॥
तैसें आत्मभ्रांति साटिं । वस्तु विखुरली बारैं वाटिं ।
ते एकत्रटिति आत्मदृष्टि । अखंड जे ॥ ६८ ॥
किंबहुना आत्मेयाचां निर्द्धारिं । जेयां विवेकु शुद्ध अंतरिं ।
गंगेचा ओघ सागरिं । बुडाला जैसा ॥ ६९ ॥
पैं आघवें चि जालेपणें । नुरे चि जेयां अभिलाखणें ।
जैसें एथौनि पऱ्हां जाणें । नाहिं आकाशासि ॥ २७० ॥
जैसा आगिचा डोंगरु । नेघे कोण्हीं बीजें अंकुरु ।
तैसा मनिं जेयां विकारु । उदैजे नां ॥ ७१ ॥
हें केती बोलों असंघडें । जेविं परमाणु नुरे वायू पढें ।
तैसें विषयांचें नावडे । नावं जेयां ॥ ७२ ॥
एवं जे जे कोण्ही ऐसे । केले ज्ञानहुताशें ।
तेथ मिलति ते तैसे । हेमिं हेम ॥ ७३ ॥
तेथ ह्मणिजे कोण्हीं ठांइ । ऐसें पूसशील जऱ्हि काहिं ।
तऱ्हि तें तें पद नाहिं । वेचु जेया ॥ ७४ ॥

दृश्यपणें देखिजे । कां ज्ञेयत्वें जाणिजे ।
अमुकें ऐसें ह्मणिजे । तें जें नोहे ॥ ७५ ॥
पैं दीवियांचेयां बंबाळिं । कां चांदु हान उजळी ।
हें काइ बोलों अंशुमाळी । प्रकाशी जें ॥ ७६ ॥
तें आघवें चि दीसणें । जेयातें कां नेदखणें ।
विश्व आभासतसे जेणें । लपालेनि ॥ ७७ ॥
जैसें सिंपीपण हारपे । तवं तवं खरें होए रूपें ।
कां दोरी लोपतां सांपे । फारां होइजे ॥ ७८ ॥

**न तद्भासयते सूर्यो न शशांको न च पावकः ॥**
**यद्गत्वा न निवर्त्तंते तद्धाम परमं मम ॥ ६ ॥**

तैसिं चंद्रसूर्यादि थोरें । इयें तेजें जियें फारें ।
तियें जेयाचेनि आधारें । प्रकाशति ॥ ७९ ॥
ते वस्तु किं तेजोराशि । सर्वभूतात्मक सरिसी ।
चंद्रसूर्याचां मानसीं । प्रकाशे जे ॥ २८० ॥
ह्मणौनि चंद्रसूर्य कडवसां । पडाति वस्तुचेया प्रकाशा ।
यया लागिं तेज जें तेजसां । तें वस्तुचें आंग ॥ ८१ ॥
आणि जेयाचेयां प्रकाशिं । जग हारपे चंद्रार्केसिं ।
चांदिं ऋखें जैसिं । दिनोदइं ॥ ८२ ॥
नातरि प्रबोधलिए वेळे । स्वप्नडिंब माळवे ।
कां नुरे चि सांजोळे । मृगतृष्णिका ॥ ८३ ॥
तैसा जेया वस्तुचां ठांइं । कोण्ही चि कां आभासु नाहिं ।
तें माझें निजधाम पाईं । पाटाचें गा ॥ ८४ ॥
पुडुतीं जेथ गेले । नेघति चि कां माघौतीं वाउलें ।
महोदधी मीनले । स्रोत जैसे ॥ ८५ ॥
कां लवणाची कुंजरी । सूदली साती सागरीं ।
होए ना माघारी । परतौनु गा ॥ ८६ ॥

नाना गेलिया अंतराळां । न एंति चि वन्हिज्वाळा ।
नाहिं तप्तलोहौनि जळा । निगणें जैसें ॥ ८७ ॥
तेविं मजसि एकवट । जालेन ज्ञानें चोखट ।
तेयां पुनरावृत्तिची वाट । मोडोनु ठेली ॥ ८८ ॥
एथ प्रज्ञापृथिविचेचा राउ । पार्थु ह्मणे जी जी पसाउ ।
विनतिए एकिए देउ । चित्त देंतु ॥ ८९ ॥
तरि देवेंसिं स्वयें एक होंति । मार्घौतें जे नेयंति ।
ते देवेंसिं भिन्न आथि । अभिन्न वा ॥ २९० ॥
जन्हीं भिन्न चि अनादिसिद्ध । तन्हिं नेयंति हें असंबद्ध ।
जे फुलीं लागेले षट्पद । काइ फुलें चि होंतु ॥ ९१ ॥
पैं लक्ष्याहूनि अनारिसे । बाण लक्ष्य सिवौनि जैसे ।
मार्घौतें पडति तैसे । एंति चि ते पैं ॥ ९२ ॥
ना तरि तूं चि ते स्वभावें । तरि कव्हणें कव्हणासिं मिळावें ।
आपणेयांसिं चि रूपावें । शस्त्रें केविं ॥ ९३ ॥
ह्मणौनि तुजासिं अभिन्नां जीवां । तूझा संयोगु वियोगु देवा ।
नैए बोलों अवेवां । शरीरेंसिं ॥ ९४ ॥
आणि जे सदा वेगळे तुजसिं । तेयां मिळणें नाहिं कोण्हे देशिं ।
मा येंति नयेंति हे कायिसी । वाया बुद्धि ॥ ९५ ॥
तरि कोण गा ते तूतें । पावौनि नेएंति मार्घौतें ।
हें विश्वतोमुखा मातें । बुझाविं जी ॥ ९६ ॥
एयां आक्षेपीं अर्जुनाचां । तो शिरोमणि सर्वज्ञांचा ।
तोखला बोधु शिष्याचा । देखौनियां ॥ ९७ ॥
मग ह्मणे गा महामती । मातें पावौनि नेयंति पुडुतीं ।
ते भिन्न अभिन्न पैं रीती । दोनी आहाति ॥ ९८ ॥
जें विवेकें खोलीं पाहिजे । तरि मीं चि ते साहाजें ।
ना आहाचबाहाच दूजे ॥ ऐसे गमति ॥ ९९ ॥

जैसे पाणियां हिं वेगळे । आपजतां दीसति कल्लोळे ।
यऱ्हविं तरि निखळें । पाणीं चि तें ॥ ३०० ॥
कां सुवर्णा होउनि आनें । लेणीं गमति भिन्नें ।
मग पाहिजे तवं सोनें । आघवें चि तें ॥ १ ॥
तैसें ज्ञानाचियें दीठी- । माझि अभिन्न चि तें किरीटी ।
एर भिन्नपणें ते उठी । अज्ञाना तव ॥ २ ॥
साचोकारेनि वस्तुविचारें । कैंचें एकासि मज दूसरें ।
जें भिन्नाभिन्नव्यवहारें । उमसिजैल ॥ ३ ॥
आघवें चि आकाश सूनि पोटिं । बिंब चि जैं आते खोटी ।
तैं प्रतिबिंब कैं उठी । कें रश्मि सिरे ॥ ४ ॥
कां कल्पांतिचेया पाणियां । काइ ऊन्त भरताति धनंजया ।
ह्मणौनि कैंचे अंश अविक्रिया । एका मज ॥ ५ ॥
परि ऊघाचेनि मेळें । पाणीं उजू परि वांकुडें जालें ।
खी दूजेपण आलें । तोयबगें ॥ ६ ॥
व्योम किं चौफळ वाटौलें । हें ऐसें काइसेया हिं मिळे ।
परि घटमठिं वेंटाळलें । तैसें हिं आथि ॥ ७ ॥
हांगा नीदेचेनि आधारें । काइ एकलेनि जग न भरे ।
स्वप्निचेनि जैं अवतरे । रायेपणें ॥ ८ ॥
कां मीनलेनि कीडाळें । वानिभेदासि ए सोळें ।
तैसा स्वमाया वेटाळें । शुद्ध जैं मीं ॥ ९ ॥
तैं अज्ञान हें रूढे । तेणें कोहंविकल्पाचें मांडे ।
मग बिवरौनि कीजे फुडें । देहो मीं ऐसें ॥ ३१० ॥

**ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः ॥**
**मनःषष्ठानींद्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति ॥ ७ ॥**

ऐसें शरीरा चि एवडें । आत्मज्ञान वेगळें पडे ।
तो माझा अंशु ऐसें आवडे । थोडेपणें ॥ ११ ॥

समुद्रु कां वायुवसें । तरंगाकारु उल्हासे ।
तो समुद्रांशु ऐसा दीसे । सानिवां जेविं ॥ १२ ॥
तेविं जडातें जीववीता । देहअहंता उपजावीता ।
मीं जीउ गमे पांडुसुता । जीवलोकिं ॥ १३ ॥
पैं जीवाचेया बोधा । गोचरु हा धांधा ।
तो जीवलोकुशब्दा । अभिप्राउ ॥ १४ ॥
आगा उपजणें निमणें । हें साच काइ मानणें ।
तो जीवलोकु मीं ह्मणें । संसारु हान ॥ १५ ॥
एवंविधिं जीवलोकिं । तूं मातें ऐसेयां अवलोकिं ।
जैसा चांदु कां उदाकिं । उदकातीतु ॥ १६ ॥
पैं काश्मिरीचा रवा । कुंकुमा वारि पांडवा ।
आणिकां गमे लोहिवां । तो तरि नव्हे ॥ १७ ॥
तैसें अनादिपणें नोमोडे । माजि अक्रियत्व न खांडे ।
पारि कारिता भोक्ता आवडे । ते जाण गा भ्रांत ॥ १८ ॥
किंबहुना आत्मा चोखटु । होउनि प्रकृतीसिं एकवटु ।
बांधे प्रकृतिधर्माचा पाटु । आपणपेयां ॥ १९ ॥
पैं मनादि साहीं इंद्रियें । श्रोत्रादि प्रकृतिकार्यें ।
तियें माझीं ह्मणौनि होए । व्यापारिं रूढ ॥ ३२० ॥
जैसें स्वप्निं परिव्राजें । आपणपेयां कुटुंब होइजे ।
मग तेयाचेनि धांविजे । मोहें सैरा ॥ २१ ॥
तैसें आपुलिया विस्मृती । आत्मा आपण चि प्रकृती ।
सरिसा गमौनि पुडुतीं । तिसिं चि भजे ॥ २२ ॥
मनाचां रथिं वलघे । श्रवणाचेनि द्वारें निगे ।
मग शब्दाचेया रिंगे । राना माजि ॥ २३ ॥
तो प्रकृतिचा वागौरा । करी त्वचेचिया मोहरा ।
आणि स्पर्शाचेया घोरा । वना जाए ॥ २४ ॥

कोणिंह एकिं अवसरिं । निगौनि नेत्रांचां द्वारिं ।
रूपाचां डोंगारिं । हिंडतु असे ॥ २५ ॥
कां रसनेचिया वाटा । निगौनि गा सुभटा ।
रसांचा दारकुटा । भरौनि ठाके ॥ २६ ॥
नातरि एणें चि घ्राणें । हा मदंशु करी निगवणें ।
मग गंधाचिं दारुणें । आडवें लंघी ॥ २७ ॥
ऐसें देहेंद्रियनायकें । धरुनु मन जोवलिके ।
भोगिजति शब्दादिकें । विखाभरणें ॥ २८ ॥

**शरीरं यदवाप्नोति यच्चाप्युत्क्रामतीश्वरः ॥**
**गृहीत्वैतानि संयाति वायु गंधानिवाशयात् ॥ ८ ॥**

परि करिता भोक्ता ऐसें । हें जीवाचें तैं चि दीसे ।
जैं शरीरिं पैसें । एकाधिए ॥ २९ ॥
जैसा आथिला आणि विलासिया । तैं चि ओळखों ए धनंजया ।
जैं राज्यसेव्या ठाया । वस्तिसिं ए ॥ ३३० ॥
तैसा अहंकर्तृत्वाचा वाडु । विषयेंद्रियांचा धुमाडु ।
हा जाणिजे तैं निवाडु । जैं देहो पावे ॥ ३१ ॥
अथवा शरीरातें संडी । तऱ्हीं चित्तइंद्रियांची तांडी ।
आपणेंपेया सवें काढि । घेउनि जाए ॥ ३२ ॥
जैसा अपमानिला अतिथि । ने सुकृताची संपति ।
कां साएखेडेयाची गति । सूत्रतंतु ॥ ३३ ॥
नाना माळवतेनि तपनें । नेइजति लोकाचिं दर्शनें ।
हें असो द्रुति पवनें । नेइजे जैसी ॥ ३४ ॥

**श्रोत्रं चक्षुः स्पर्शनं च रसनं घ्राणमेव च ॥**
**अधिष्ठाय मनश्चायं विषयानुसेवते ॥ ९ ॥**

तेविं मनःषष्ठां एयां । इंद्रियांतें धनंजया ।
देहराजु ने देहा । पासौनु घाला ॥ ३५ ॥

मग एथ अथवा स्वर्गीं । जेथ देह अपंगी ।
तेथ तैसिं चि पुडुतीं पांगीं । मनादिकें ॥ ३६ ॥
जैसा माल्हवलेयां दिवा । प्रभेसिं जाए पांडवा ।
मग उजळिजे तेथ तेव्हां । तैसा चि फांके ॥ ३७ ॥
परि ऐसिया इया राहाटी । अविवेकियाचिये दीठी ।
एतुलें हें किरीटी । गमे चि गा ॥ ३८ ॥
जें आत्मा देहा आला । आणि विखो एणें चि भोगिला ।
अथवा देहौनु गेला । हें साच चि नां ॥ ३९ ॥
यऱ्हवि एणें जाणें । करणें हान भोगणें ।
हें प्रकृतिचें तेणें । मानियलें ॥ ३४० ॥
परि देहाचें मोटकें उभें । चेतना तेथ उपलभे ।
तिये चळवळेचेनि मोहें । आला ह्मणति ॥ ४१ ॥

**उत्क्रामंतं स्थितं वापि भुंजानं वा गुणान्वितं ॥**
**विमूढा नानुपश्यंति पश्यंति ज्ञानचक्षुषा ॥ १० ॥**

तैसीं चि तिया संगति । इंद्रियें आपुलालां अर्थीं ।
वर्त्तति तेया नावं सुभद्रापति । भोगणें जेया ॥ ४२ ॥
पाठिं भोगक्षइं आवैसें । देह गेलेयां तें न दीसे ।
एथ तवं गेला ऐसें । बोंभाति गा ॥ ४३ ॥
पैं रुंखु डोलतु देखावा । तरि वारा वाजतु मानावा ।
रुंखु नसे तेथ पांडवा । नाहिं चि काइ ॥ ४४ ॥
कां आरिसा संमोहुर ठेविजे । आणि आपणपें तेथ देखिजे ।
तरि तेव्हां चि जाला मानिजे । काइ आदिं नाहिं ॥ ४५ ॥
कां तो परौता केला आरिसा । लोपु जाला तेया आभासा ।
तरि आपणपें नाहिं ऐसा । निश्चो करावा ॥ ४६ ॥
सादु तरि आकाशाचा । परि कपाळिं पीटे मेघांचा ।
कां चांदिं वेगु अभ्राचा । आरोपिजे ॥ ४७ ॥

तैसें होइजे जाइजे देहें । तें आत्मसत्ते अविक्रियें ।
निष्टंकिति मोहें । आंधळे ते गा ॥ ४८ ॥
एथ आत्मा आत्मेयांचे ठांइं । देखिजे देहाचा धर्म देहिं ।
ऐसें देखणें ते पाहिं । आन आहाति ॥ ४९ ॥
ज्ञानें कां जेयाचे डोळे । देखौनि नन्हांति देहिचे खोळे ।
सूर्यरश्मि आणियाळें । ग्रीष्मि जैसें ॥ ३५० ॥
तैसें विवेकाचेनि पैसें । जेयाची स्फूर्ति स्वरूपिं बैसे ।
ते ज्ञानियें देखति ऐसें । आत्मेयातें ॥ ५१ ॥
जैसें तारांगण भरलें । गगनसमुद्रिं बिंबलें ।
परि हें तूटौनि नाहिं पडिलें । ऐसें निवडे ॥ ५२ ॥
गगन गगन चि आहे । हें आभासतसे तें वायें ।
तैसा आत्मा देखति देहें । गंवसिला हिं ॥ ५३ ॥
खळाळांचेयां लगबगिं । फेडौनि खळाळांचेयां भागिं ।
देखिजे चंद्रिका ते उगी । चंद्रिं जेविं ॥ ५४ ॥
कां थिलर सोखे जैसें । सूर्यो जैसा तैसा असे ।
देह होंता जांता तैसें । देखति मातें ॥ ५५ ॥
घटमठें घडले । ते चि पाठिं मोडले ।
परि आकाश तें संचलें । असत चि असे ॥ ५६ ॥
तैसीं अखंडे आत्मसत्ते । अज्ञानदृष्टिकल्पितें ।
इयें देहें चि होंतें जांतें । जाणति फुडें ॥ ५७ ॥

**यतंतो योगिनश्चैनं पश्यंत्यात्मन्यवस्थितं ॥**
**यतंतोप्यकृतात्मानो नैनं पश्यंत्यचेतसः ॥ ११ ॥**

चैतन्य चढे ना ऊ्हटे । चेष्टवी ना चेष्टे ।
ऐसेनि आत्मज्ञानें चोखटें । जाणति ते ॥ ५८ ॥
आणि ज्ञान हिं आपैतें होइल । प्रज्ञा परिमाणु हिं उगाणा घेइल ।
सकळ शास्त्रां एइल । सर्वस्व हातां ॥ ५९ ॥

पारि ते व्युत्पत्ति ऐसी । विरक्ति न रिगे मानसीं ।
तरि सर्वात्मका मजसिं । नोहे भेटि ॥ ३६० ॥

पैं तोंड भरो कां विचारा । आणि अंतष्करण विषयांसि थारा ।
तरि नातुडे धनुर्द्धरा । त्रिशुद्धि मीं ॥ ६१ ॥

हांगा ऊसणातियांचां ग्रंथिं । काइ तूटति संसारगुंति ।
किं परिवसिलियां पोथि । वाचिली होए ॥ ६२ ॥

नाना बांधौनियां डोळे । घ्राणिं लाविजति मुक्ताफळें ।
तरि तेयांचें काइ केलें । मोलमान ॥ ६३ ॥

तैसा चित्तिं अहंते ठाऊ । आणि जीभे सकलशास्त्रांचा सराऊ ।
ऐसेनि कोडी एकी जन्म जाऊ । परि न पविजे मातें ॥६४॥

जो एकु मीं कां समस्तिं । व्यापकु असे भूतजातिं ।
आइकैं तिये व्यक्ती । रूप करुं ॥ ६५ ॥

**यदादित्यगतं तेजो जगद्भासयतेखिलं ॥**
**यच्चंद्रमसि यच्चाग्नौ तत्तेजो विद्धि मामकं ॥ १२ ॥**

तरि सूर्या सकट आघवी । हे विश्वरचना जे दावी ।
ते दीप्ति माझी जाणावी । आद्यंन्ति हे ॥ ६६ ॥

जल सोखुनु गेलेयां सविता । उल्हासु पुरवितसे माघौता ।
ते चांदिं पांडुसुता । ज्योत्स्ना माझी ॥ ६७ ॥

आणि दहन पचन सिद्धि । करितसे जे निरवधि ।
ते हुताशिं तेजोवृद्धि । माझी चि गा ॥ ६८ ॥

**गामाविश्य च भूतानि धारयाम्यहमोजसा ॥**
**पुष्णामि चोषधीः सर्वाः सोमो भूत्वा रसात्मकः ॥१३॥**

मी रिगाला असे भूतलिं । ह्मणौनि समुद्रमहाजलिं ।
ई पांसूची ढेंपुली । वीरे चि नां ॥ ६९ ॥

आणि भूतें हिं चराचरें । हे धरीतसे अपारें ।
तें मीं चि धरिं धरें । रिगौनियां ॥ ३७० ॥

गगनिं मीं पांडुसुता । चंद्राचेन मीसें अमृता ।
भरला जालां चालता । सरोवरु ॥ ७१ ॥
तेथौनि फांकिति रश्मिकर । ते पाट पेलौनि अपार ।
सर्वोषधींचे आगर । भरीतुसें मीं ॥ ७२ ॥
ऐसेनि सस्यादि सकळा । करीं धान्यजाति रसाळा ।
दें अन्नद्वारां जिव्हाला । भूतजातां ॥ ७३ ॥

**अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः ॥**
**प्राणापानसमायुक्तः पचाम्यन्नं चतुर्विधं ॥ १४ ॥**

आणि निफजविलेयां अन्न । तरि तैसें कैंचें पां दीपन ।
जेणें जिरौनि समाधान । भोगिति जीव ॥ ७४ ॥
ह्मणौनि प्राणिजाताचां घटिं । करुनि कंदा वारि आगिठी ।
दीप्ति जठरिं किरीटी । मीं चि जालां ॥ ७५ ॥
प्राणापानाचां जोडभातीं । फुंकफुंकौनियां अहोराती ।
आटितसे नेणों केती । उदरा माजि ॥ ७६ ॥
शुष्कें अथवा स्निग्धें । सुपक्कें कां विदग्धें ।
परि मीं चि गा चतुर्विधें । अन्नें पचीं ॥ ७७ ॥
एवं मीं चि आघवें जन । जना मीं चि जीवन ।
जीवनीं मुख्य साधन । वन्हि मीं चि ॥ ७८ ॥
आतां ऐसेया वेरि काइ । सांघों व्याप्तिची नवाई ।
एथ दूजें नाहिं चि घेइं । सर्वत्र मीं ॥ ७९ ॥
तरि कैसेन पां वेखें । सदा सुखियें मानुषें ।
एक आक्रांत दुःखें । भूतजात ॥ ३८० ॥
जैसें सगळिए पाटणी । एकें चि दीपें दिवेलावणी ।
जालियां का नेदेखणीं । उरलीं एकें ॥ ८१ ॥
ऐसी हान उखिविखि । करितु आहासि मानसिकी ।
तरि ते हिं परियस नीकी । शंका फेडूं ॥ ८२ ॥

पैं आघवा चि मीं असें । एथ नाहिं किं अनारिसें ।
परि प्राणियांचां ठांइं उल्हसे । बुद्धि ऐसी ॥ ८३ ॥
जैसें एकी चि आकाशध्वनि । वायेंविशेषिं अनानीं ।
वाजावें पडे भिन्नि । नादांतरिं ॥ ८४ ॥
कां लोकचेष्टिं वेगळाला । जो हा एकु चि भानु उदैला ।
तो अनाना पारि गेला । उपेगासि ॥ ८५ ॥
नाना बीजधर्मा अनुरूप । झाडिं उभाविलें आप ।
तैसें परिणमलें रूप । माझें जीवां ॥ ८६ ॥
आगा नेणा आणि चतुरा । पुढां निलेयाचा दूसरा ।
नेणा सर्पत्वें जाला एरा । सुखा लागि ॥ ८७ ॥
हें असो स्वातिचें उदक । शुक्ति मोतिएं विआलीं विख ।
तैसें सज्ञानासि मीं सुख । दुःख तें अज्ञानासि ॥ ८८ ॥

**सर्वस्यचाहं हृदि सन्निविष्टो मत्तः स्मृति र्ज्ञानमपोहनं च ॥**
**वेदैश्च सर्वै रहमेव वेद्यो वेदांतकृद्वेदविदेव चाहं॥ १५ ॥**

पार्था सर्वांचां हृदयदेशिं । अमुका हे स्फूर्ति ऐसी ।
जे स्फुरत अहिर्णिशिं । ते वस्तु गा मीं ॥ ८९ ॥
परि संतां सर्वे वसतां । योगज्ञानिं पैसतां ।
गुरुचरण उपासितां । वैराग्येंसि ॥ ३९० ॥
एणें चि सत्कर्में । अशेष हिं अज्ञान विरमे ।
जेयाचें अहं विश्रमे । आत्मरूपिं ॥ ९१ ॥
तें आपें आपु देखौनि देखि । मियां आत्मेन सदा सुखी ।
एथ मीं वांचौनि अवलोकिं । आन हेतु असे ॥ ९२ ॥
आगा सूर्योदयो जालेयां । सूर्यो सूर्यें चि पाहावा धनंजया ।
तेविं मातें मीं जाणावेया । मीं चि हेतु ॥ ९३ ॥
ना शरीरप्रियातें सेवितां । संसारगौरव आइकतां ।
देहिं जेयाची अहंता । तुटौनि ठेली ॥ ९४ ॥

ते स्वर्गसंसारा लागिं । धांवता कर्माचेयां मार्गिं ।
दुःखाचां सेलभार्गिं । भागीन होंति ॥ ९५ ॥
परि हें इं होणें अज्ञानां । मज चि तव तेया अर्जुना ।
जैसी जागृती चि हेतु स्वप्ना । निद्रिता होए ॥ ९६ ॥
पैं अभ्रें दिवसु हारतला । तो हिं तेणें चि जाणों आला ।
तेविं मीं नेणौनि विखो देखिला । मज चि तव भूतिं ॥ ९७ ॥
एवं नीदे कां जागणेया । प्रबोधु हेतु धनंजया ।
तेविं ज्ञानाज्ञानां जीवाचेया । मीं चि मूळ ॥ ९८ ॥
ह्मणौनु जैसा असें तैसेया । मातें नेणौनि धनंजया ।
वेदु जाणों गेला तवं तेया । जालिया शाखा ॥ ९९ ॥
तन्हि तिन्हीं शाखाभेदिं । मीं चि जाणिजे त्रिशुद्धि ।
जैसा पूर्वापरां नदीं । समुद्रु चि ठी ॥ ४०० ॥
आणि महासिद्धांतापासिं । श्रुती हारपती शब्देंसिं ।
जैसिया सगंधा आकाशीं । वातलहरिया ॥ १ ॥
तैसें समग्र हिं श्रुतिजात । ठाके लाजिलें ऐसें निवांत ।
तें मीं चि करीं यथावत । प्रकटौनियां ॥ २ ॥
पाठिं श्रुतिसहित अशेख । जग हारपे जेथ निशेख ।
तें निजज्ञान हिं चोख । जाणता मीं ॥ ३ ॥
जैसें निदेलेयां जागिजे । तेंव्हाळिं स्वप्निचें किर नाहिं दूजें ।
परि एकत्व हिं देखों पाविजे । आपुलें चि ॥ ४ ॥
तैसें आपुलें अद्वयपण । मीं जाणतु असें दूजेन विण ।
तेया हिं बोधा कारण । जाणतां मीं चि ॥ ५ ॥
तरि आगि लागलेया कापुरा । काजळी ना वैश्वानरा ।
उरणें नाहिं वीरा । जिया परी ॥ ६ ॥
तेविं समूळ अविद्या खाए । तें ज्ञान हि जैं बुडौनि जाए ।
तैं जें नाहिं किर नोहे । आणि असे हि नां ॥ ७ ॥

पैं विश्व घेउनि गेला मागेंसि । तेया चोरातें कव्हण गिंवसी ।
जे कोण्ही एकी दशा ऐसी । शुद्धा ते मीं ॥ ८ ॥
ऐसी जडाजडें व्याप्ति । रूप करितां कैवल्यपती ।
ठी केली निरुपहितीं । आपुलां रूपीं ॥ ९ ॥
तो आघवा चि बोधु सहसा । अर्जुनीं उमटला कैसा ।
व्योमिचा चंद्रोदयो जैसा । क्षीरार्णवीं ॥ ४१० ॥
कां प्रतिभींती चोखटे । समोरिला चित्र उमटे ।
तैसा अर्जुने आणि वैकुंठें । नांदतुसे बोधु ॥ ११ ॥
तऱ्हि बापु वस्तुस्वभाउ । फांवे तवं तवं गोडिये थाउ ।
ह्मणौनि अनुभवियांचा राउ । अर्जुनु ह्मणे ॥ १२ ॥
जी व्यापकपण बोलतां । निरुपाधिक जें अनंता ।
स्वरूप प्रसंगता । बोलिले देउ ॥ १३ ॥
तें एकु वेलु अवेंगवाणें । कीजो कां मज सांघणें ।
एथ द्वारकानाथु ह्मणे । भलें केलें ॥ १४ ॥
पैं आह्मासिं हें कोडें । अखंड बोलों आवडे ।
परि काइ किजे न जोडे । पूसतें तैसें ॥ १५ ॥
आजि मनोरथासि फल । जोडलासि तूं केवल ।
जैं तोंड भरुनि निखल । आलासि पूसों ॥ १६ ॥
जें अद्वैता वरि भोगिजे । तिये अनुभविचें तूं विरजें ।
पूसौनि मज माझें । देंतासि सुख ॥ १७ ॥
जैसा आरिसा आलेयां जवलां । दीसे आपणपेयां आपुला डोला ।
तैसा संवादियां तूं निर्मला । शिरोमणि ॥ १८ ॥
तुवां नेणौनि पुसावें । मग आह्मि परिसौनि वैसावें ।
तो पाडु एथ न मिरवे । सोइरेया ॥ १९ ॥
ऐसें ह्मणौनि आलंगिलें । कृपादृष्टी अवलोकिलें ।
मग मावौतें आदारिलें । बोलों अर्जुनेंसि ॥ ४२० ॥

दों होंटिं एक बोलणें । दोहिं चरणिं एक चालणें ।
तैसें पूसणें सांघणें । तूझें माझें ॥ २१ ॥
एवं आह्मि तुह्मि बो एथें । देखावे एकार्थायें ।
सांघतें पूसतें तेथें । दोन्हीं एक ॥ २२ ॥
ऐसा भूलला मोहें । देउ आलंगिला ऱ्हाए ठायें ।
मग बिहाला ह्मणे नोहे । आवडी अर्जुनेंसिं ॥ २३ ॥
जालें इक्षुरसाचें डाल । तन्हि लवण देणें किडाल ।
जें संवादसुखाचें रसाल । नासैल थितें ॥ २४ ॥
आदिं चि आह्मां यया काहिं । नरनारायणा सीनें नाहिं ।
परि आतां जिरों माझां ठांइं । वेगु साझा ॥ २५ ॥
इया बुद्धी सहसा । श्रीकृष्णु ह्मणे वीरेशा ।
पैं गा तो तुवां कैसा । प्रश्णु केला ॥ २६ ॥
जो अर्जुनु कृष्णिं विरत होता । तो परतौनियां माघौता ।
प्रश्नावलिची कथा । आइकों धांवला ॥ २७ ॥
एथ सगद्गदें बोलें । अर्जुनें जी ह्मणितलें ।
निरुपाधिक आपुलें । स्वरूप सांवां ॥ २८ ॥
एया बोला तो शांर्ङ्गि । तें चि सांघावेया लागि ।
उपाधि दोहिं भागिं । निरूपितु असे ॥ २९ ॥
पूसलेयां निरुपहित । उपाधि कां सांघे प्रस्तुत ।
हें कोण्हां हिं एथ । गमे जरि ॥ ४३० ॥
तरि ताकाचे अंश फेडणें । यया चि नावं लोणीं काढणें ।
चोखाचियें शुद्धि तोडणें । कीड चि जेविं ॥ ३१ ॥
बाबुलि सारावी हातें । परि पाणीं असे आइतें ।
अभ्र गेलेयां गगन तें । सिद्ध चि किं ॥ ३२ ॥
वरिलु कोंडेयाचा गुंडाला । संडुनु केलेयां वेगला ।
कणु घेतां विरंगुला । असे काहिं ॥ ३३ ॥

तैसा उपाधि उपहिला । सेवटु जेथ विचारितां ।
तें कोण्हां हिं न पूसतां । निरुपाधिक ॥ ३४ ॥
जैसें न संघणें वरि । बाला पतिसि रूप करी ।
बोलु निमालेपणें विवरी । अचर्च्यातें ॥ ३५ ॥
पां सांघणेया जोगें नव्हे । तेथिचें सांघणें ऐसें आहे ।
ह्मणौनि उपाधि लक्ष्मीनाहें । बोलिजे आदिं ॥ ३६ ॥
पाडिवेयाची चंद्ररेखा । निरुता दाविवेया शाखा ।
दाविजे तेविं औपाधिका । बोली इया ॥ ३७ ॥
मग ह्मणे गा सव्यसाची । पैं इयें संसारपाटणिची ।
वस्ति सवियां टांची । दुपुरुखीं ॥ ३८ ॥

**द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च ॥**
**क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोक्षर उच्यते ॥ १६ ॥**

जैसिं आघवां चि गगनिं । नांदतें दिवोराती दोनी ।
तैसे संसारराजधानिं । दोन्ही चि हे ॥ ३९ ॥
आणीकु हि तीजा पुरुखु आहे । परि एयां दोहिंचें नावं न साहे ।
जो उदैला गांवेंसिं खाए । दोन्हितें युयां ॥ ४४० ॥
परि ते तवं गोठि असो । आदिं दोनी चि हे परियसों ।
जे संसारग्रामु वसों । आले असति ॥ ४१ ॥
एकु आंधला वेडा पंगु । एकु सर्वांगिं पुरता चांगु ।
पारि ग्रामगुणें संगु । घडला दोघां ॥ ४२ ॥
तेयां माजि एका नावं क्षरु । एरातें ह्मणिजे अक्षरु ।
इहिं दोहिं चि पारि संसारु । कोंदला असे ॥ ४३ ॥
आतां क्षरु तो कवणु । अक्षरु किंलक्षणु ।
हा अभिप्राउ संपूर्णु । विवंचूं गा ॥ ४४ ॥
तरि महदहंकारा । लागौनि धनुर्द्धरा ।
तृणांतिचा पांगोरा । वेन्हि पैं गा ॥ ४५ ॥

जें काहिं साने थोर । चालतें अथवा थिर ।
किंबहुना गोचर । मनबुद्धिसि ॥ ४६ ॥
जेतुलें पांचभौतिक घडतें । जें जें नावंरूपा सांपडतें ।
गुणत्रयाचां पडतें । कामठां जें ॥ ४७ ॥
भूताकृतिचें नाणें । घडत भांगारें जेणें ।
काळासिं जुं खेळणें । जिहिं कवडा ॥ ४८ ॥
जाणणेनि चि विपरीतें । जें जें काहिं जाणिजतें ।
तें प्रतिक्षणिं निमतें । होउनियां ॥ ४९ ॥
आगा काढौनि भ्रांतिचे दांग । उभवी स्रिष्टिचे आंग ।
हें असो बहू जग । जेया नावं ॥ ४५० ॥
पैं अष्टधा भिन्न ऐसें । जें दाविलें प्रकृतिमीसें ।
जें क्षेत्रद्वारें सतिसें । भागिं केलें ॥ ५१ ॥
हें मागिलें सांघों केती । आगा आतां चि जें प्रस्तुतिं ।
रुखाकारुरूपकरीती । निरूपिलें ॥ ५२ ॥
तें आववें चि साकारें । कल्पौनि आपणापेयां पूरें ।
जालें असे तदनुसारें । चैतन्य चि ॥ ५३ ॥
जैसा कुहां आपण चि बिंबे । सींहु प्रतिबिंब पांतां खोभे ।
खोभला समारंभे । वळी तेथ ॥ ५४ ॥
कां सलिलिं असत चि असे । व्योमा वारि व्योम बिंबे जैसें ।
अद्वैत होउनि तैसें । द्वैतें घेपें ॥ ५५ ॥
अर्जुना गा यया परी । साकारु कल्पौनि पुरी ।
आत्मा विस्मृतिची करी । नींद तेथ ॥ ५६ ॥
पैं स्वप्नि सेजारु देखिजे । मग पहुडणें जैसें कीजे ।
तैसें पूरि शयन जाणिजे । आत्मेयासि ॥ ५७ ॥
पाठिं तिये नीदेचेनि भरें । मिं सुखी दुःखी ह्मणतु घोरें ।
अहंममाधिचेन थोरें । उन्मसणाए सादु ॥ ५८ ॥

हा जनकु हे माता । हा मीं गौरु हीनु पुरता ।
पुत्र वित्त कांता । माझी हीं नां ॥ ५९ ॥
ऐसेया वेंधौनि स्वप्ना । धांवतु भवस्वर्गाचिया राना ।
तेया चैतन्या नावं अर्जुना । क्षरु पुरुखु गा ॥ ४६० ॥
आतां क्षेत्रज्ञु नावें एणें । जेयातें बोलणें ।
जगिं जीउ ह्मणणें । जिये दशेतें ॥ ६१ ॥
जो आपुलेन विसरें । सर्व भूतत्वें अनुकरे ।
तो आत्मा बोलिजे क्षरें । पुरुखु नावें ॥ ६२ ॥
जो वस्तुस्थिती पुरता । ह्मणौनि आली पुरुषता ।
वरि देहपुरीं निदैजता । पुरुषु नावें ॥ ६३ ॥
आणि क्षरपणाचा नाथिला । आलु यया ऐसेनि आला ।
तिये उपाधी आतला । ह्मणौनियां ॥ ६४ ॥
जैसी खलालिचेया उदका । सरिसी उदलें चंद्रिका ।
तैसा विकारां औपाधिकां । ऐसा चि गमे ॥ ६५ ॥
कां खलाल मोटका सोसे । आणि चंद्रिका तैसी चि भ्रंशे ।
तैसा उपाधिनाशिं न दीसे । औपाधिकु फुरे ॥ ६६ ॥
ऐसें उपाधिचेनि पाडें । क्षणिकत्व यया जोडे ।
तेणें खोंकरपणें घडे । क्षरु नावं ॥ ६७ ॥
एवं जीवचैतन्य आघवें । हें क्षरु पुरुखु जाणावें ।
आतां रूप करुं बरवें । अक्षरासि ॥ ६८ ॥
तरि अक्षरु जो दूसरा । पुरुषु पैं धनंजया ।
तो मध्यस्थु गा गिरिवरा । मेरु जैसा ॥ ६९ ॥
जें तो पृथ्विपातालस्वर्गिं । इहिं न भेदे तिहिं भागिं ।
तैसा ज्ञानाज्ञानांगिं । पडे ना जो ॥ ४७० ॥
नां यथार्थज्ञानें एक होणें । ना अन्यार्थत्वें दूजें घेणें ।
ऐसें देहिं निखल जें नेणणें । तें तें चि रूप ॥ ७१ ॥

पांसुता निःशेष जाए । नां घटभांडादिकिं होए ।
तेया मृत्पिंडा ऐसें आहे । मध्यस्थु जो ॥ ७२ ॥
पैं आटौनि गेलेयां सागर । मग तरंग ना नीर ।
तया ऐसिया अनाकार । जे कां दशा ॥ ७३ ॥
पार्था जागणें तरि बुडे । परि स्वप्नाचें कांहिं न मांडे ।
तैसीये नीदे सांकुडें । निहाळिजे ॥ ७४ ॥
विश्व आघवें मावळें । आणि आत्मबोधु नुजळे ।
तिये अज्ञानदशे केवळे । अक्षरु नावं ॥ ७५ ॥
सर्वां कळिं सांडिलें जैसें । चांदपण उरलें अवसे ।
रूप जाणैं तैसें असे । अक्षराचें ॥ ७६ ॥
पैं सर्वोपाधिविनासें । हे जीवदशा जेथ पैसे ।
फळपाकिं तैसें । झाड बीजिं ॥ ७७ ॥
तैसें उपाधिसिं उपहित । थोकौनि ठाके जेथ ।
तेयातें अव्यक्त । बोलति गा ॥ ७८ ॥
जेयासि गा बीजभाउ । वेदान्तिं केला ऐसा आहो ।
तो तेया पुरुषा ठाउ । अक्षराचा ॥ ७९ ॥
जेथौनि अन्यथा ज्ञान । फांकौनि जागृति स्वप्न ।
नानाबुद्धिचें रान । रिगालें असे ॥ ४८० ॥
जीवत्व जेथौनि किरीटी । विश्व उठवित चि उठी ।
ते उभयबुद्धिची मीठी । अक्षरु पुरुषु ॥ ८१ ॥
एरु क्षरु पुरुषु कां जनिं । जिहिं खेले जागृतिस्वप्निं ॥
तिया अवस्था जिया दोन्हिं । वियाळा गा ॥ ८२ ॥
पैं अज्ञान घनसुषुप्ति ॥ ऐसैसी जे ख्याति ।
इया उणिवे प्राप्ति । ब्रह्माची जे ॥ ८३ ॥
साच चि पुडुतीं वीरा । जरि नेयंता स्वप्नजागरा ।
तरि ब्रह्मभाउ साक्षात्कारा । ह्मणौं येता ॥ ८४ ॥

परि प्रकृतिपुरुषें दोन्हि । अभ्रें जालिं जियें गगनिं ।
क्षेत्रक्षेत्रज्ञु स्वप्निं । देखिलीं जियें ॥ ८५ ॥
हे असो अधोशाखा । यया संसाररूपा रुखा ।
मूळ तें पुरुखा । अक्षराचें ॥ ८६ ॥
हा पुरुषु कां ह्मणिजे । जें पूर्णपणें चि निजे ।
पैं मायापुरिं पहुडिजे । तेणें हिं बोलें ॥ ८७ ॥
आणि विकारांची जे वारी । ते विपरीतज्ञानाची परी ।
नेणिजे तिये माझारिं । ते सुषुप्ति हा ॥ ८८ ॥
ह्मणौनियां आपैसें । क्षरणें यया नसे ।
आणि कहीं चि हा न नसे । ज्ञाना उणें ॥ ८९ ॥
यया लागि हा अक्षरु । ऐसा वेदांतिं डौरु ।
केला देशिं थोरु । सिद्धांतांचां ॥ ४९० ॥
ऐसें जीवकार्यकारणीं । जेया मायासंगु चि लक्षणीं ।
अक्षरु पुरुषु जाणीं । चैतन्य तें ॥ ९१ ॥
आतां अन्यथाज्ञानिं । दोनी अवस्था जिया जनिं ।
तिया हारपति घनिं । अज्ञानतत्विं ॥ ९२ ॥
तें अज्ञान ज्ञानिं बुडालेयां । ज्ञानें कीर्तिमुखत्व केलेयां ।
जैसा वन्हि काष्ठ जाळौनियां । स्वयें जळे ॥ ९३ ॥
तैसें अज्ञान ज्ञानें नेलें । आपण वस्तु होउनु ठेलें ।
ऐसें जाणणेन विण उरलें । जाणतें जें ॥ ९४ ॥

उत्तमःपुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः ।।
यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्ययमीश्वरः ॥ १७ ॥

आगा तो उत्तमु पुरुखु । जो तृतीयु कां निष्कर्षु ।
दोहीं इं हुनु आणिकु । आदिला जो ॥ ९५ ॥
सुषुप्ती आणि स्वप्ना । पासौनु बद्ध अर्जुना ।
जागणें जैसें आना । बोधाचें चि ॥ ९६ ॥

कां रश्मि हान मृगजला । पासौनि अर्कमंडला ।
अफाटु तैसा वेगला । उत्तमु गा ॥ ९७ ॥
नातरि काष्टिचा काष्टीहूनि । अनारिसा जैसा वन्हि ।
तैसा क्षराक्षरा पासौनि । आनु चि तो ॥ ९८ ॥
पैं ग्रसौनि आपुलिया मर्यादा । एक करीतु नदीनदां ।
उठिला कल्पांतिचा उदावादा । एकार्णवाचा ॥ ९९ ॥
तैसें स्वप्न ना सुषुप्ति । जागराची गोठि चि नाथि ।
जैसी गलिली दिवोराती । प्रळयतेजें ॥ ५०० ॥
मग आपण ना दुजें । असे नसे हें नेणिजे ।
अनुभौ निर्बुजें । बुडाला जेथ ॥ १ ॥
ऐसैसें आथि काहिं । तें तो उत्तमु पुरुषु पाहिं ।
जें परमात्मा इहिं । बोलिजे नामीं ॥ २ ॥
तें हिं एथ न मिसलतां । बोलिलें जीवत्वें पांडुसुता ।
जैसी बुडणेयाची वार्त्ता । थडिए किजे ॥ ३ ॥
तैसें विवेकाचिये कांठिं । उभें केलेयां किरीटी ।
पारावाराचिया गोठि । करणें वेदां ॥ ४ ॥

**यस्मात्क्षरमतीतोहमक्षरादपि चोत्तमः ॥**
**अतोस्मि लोके वेदे च प्रथितः पुरुषोत्तमः ॥ १८ ॥**

ह्मणौनि पुरुष क्षराक्षर । दोन्हि देखौनि अनावर ।
ययातें ह्मणति पर- । आत्मरूप ॥ ५ ॥
अर्जुना ऐसिये परी । परमात्माशब्दें वेन्हि ।
सूचिजे गा अवधारिं । पुरुषोत्तमु ॥ ६ ॥
यन्हविं नबोलणेन बोलणें । जेथिचें सर्व नेणिवां जाणणें ।
काहिं चि नहोउनि होणें । जें वस्तु गा ॥ ७ ॥
सोहं तें हिं अस्तवलें । जेथ सांघणें चि मूकावलें ।
द्रष्टत्वेंसिं विरालें । द्रश्य जेथे ॥ ८ ॥

आतां बिंबा आणि प्रतिबिंबा । माजि कैंची ही ह्मणौं नेए प्रभा ।
जऱ्हि कैसेन हिं लाभा । जाए चि ना ॥ ९ ॥
कां घ्राणा आणि फुला दोहिं । वृत्ति असे माझारिलां ठांइं ।
न दीसे तऱ्हि नाहिं । बोलों नेए ॥ ५१० ॥
तेसें द्रष्टा दृश्य हें जाए । मग कोणु ह्मणे काइ आहे ।
हें अनुभवें चि पाहे । रूप जेया ॥ ११ ॥
जो प्रकाश्यें विण प्रकाशु । जो ईशितव्यें विण ईशु ।
आपणीन चि अवकाशु । वसवितु असे ॥ १२ ॥
जो नादें आइकिजता नादु । स्वादें चाखविजता स्वादु ।
जो भोगिजतु असे आनंदु । आनंदें चि ॥ १३ ॥
सुखासि सुख जोडलें । जें तेज तेजासि सांपडलें ।
शून्य हिं बुडालें । शून्यि जियें ॥ १४ ॥
तो पूर्णतेचा परिणामु । पुरुषु गा सर्वोत्तमु ।
विश्रांतिचा विश्रामु । विराला जेथ ॥ १५ ॥
जो आकाशा हि वारि उरता । ग्रासातें हिं ग्रासुनि पुरता ।
जो बहुतें पाडें बहुता । पासौनि बहू ॥ १६ ॥
पैं नेणतेया प्रती । रूपेपणाची प्रतीती ।
रूपें नोहौनि शुक्ति । दावी जेविं ॥ १७ ॥
कां नाना अलंकारदसे । सोनें न लपतां आलें असे ।
विश्व नोहौनि तैसें । विश्व जो धरी ॥ १८ ॥
हें असो जळतरंगा । नाहिं सिनानेपण जेविं गा ।
तेविं सत्ताप्रकाशु जगा । आपण चि जो ॥ १९ ॥
आपुलेयां संकोचविकासा । आपण चि रूप वीरेशा ।
हा जळिं चांदु हान जैसा । समूठ गा ॥ ५२० ॥
तैसा विश्वपणें काहिं होए । नां विश्वलोपिं कें हि जाए ।
जैसा रातीदिहो नोहे । दिपा रवि ॥ २१ ॥

तैसा काहिं चि कोण्ही कडे । काइसेन हि वेचिं न पडे ।
जेयाचें सांकडें । जेयासि चि ॥ २२ ॥
जो आपणपें चि आपणेयां । प्रकाशितुसे धनंजया ।
काइ बहु बोलों जेया । नाहिं दूजें ॥ २३ ॥
तो गा मीं निरुपाधिकु । क्षराक्षरोत्तमु एकु ।
ह्मणौनु ह्मणे वेदलोकु । पुरुषोत्तमु ॥ २४ ॥

**यो मामेवमसंमूढो जानाति पुरुषोत्तमं ॥**
**स सर्वविद्भजति मां सर्वभावेन भारत ॥ १९ ॥**

परि असो ऐसेया । मज पुरुषोत्तमातें धनंजया ।
जाणे जो पाहालेयां । ज्ञानमित्रें ॥ २५ ॥
चेइलेयां आपुलें ज्ञान । जैसें नाहिं चि होए स्वप्न ।
तैसें फुरतें जेया त्रिभुवन । वाऊं जालें ॥ २६ ॥
कां हातिं घेतली माळा । फीटे सर्पाभासाचा कांटाळा ।
तैसें माझेन बोधें टवाळा । नांगवे जो ॥ २७ ॥
लेणें सोनें चि जो जाणे । तो लेणेपण तें वाऊं ह्मणे ।
तेविं जाणौनि जेणें । वाळिला भेदु ॥ २८ ॥
मग सर्वत्र सच्चिदानंदु । मीं चि एकु स्वतःसिद्धु ।
जो आपणेनसिं भेदु । नेणौनि जाणे ॥ २९ ॥
तैसें चि सर्व जाणितलें । हें इं ह्मणणें थेकुलें ।
जें तेया सर्व उरलें । द्वैत नाहिं ॥ ५३० ॥
ह्मणौनि माझेया भजना । उचित तो चि अर्जुना ।
गगन जैसें आलंगना । गगनाचेया ॥ ३१ ॥
क्षीरसागरा परगुणें । किजे क्षीरसागरपणें ।
कां अमृत चि होउनि मिळणें । अमृतिं जेविं ॥ ३२ ॥
साडेपन्हरां मिसळावें । तारि पन्हरें चि जेविं होआवें ।
तेविं मीं जालेयां संभवे । भक्ति माझी ॥ ३३ ॥

हां गा सिंधुसि आनी होंति । तरि गंगा कैसेन फिरे माघौती ।
ह्मणौनि मीं नोहतां भक्ति । अन्वयो आहे ॥ ३४ ॥
ऐसेया लागि सर्वि प्रकारिं । जैसा कल्लोळु अनन्यु सागरिं ।
तैसा मातें अवधारीं । भजिनला तो ॥ ३५ ॥
सूर्यां आणि प्रभे । एकवंकै जेणें लोभें ।
तो पाडु मानुं लाभे । भजना तेया ॥ ३६ ॥
एवं कथिलेयादारम्य । जें हें सर्वशास्त्रैकलभ्य ।
उपनिषदां सौरम्य । दशदळांचें ॥ ३७ ॥
हें जें ब्रह्माचेनि नवनीतें । व्यासुप्रज्ञेचेनि हातें ।
मथुनि काढिलें आइतें । सार आह्मि ॥ ३८ ॥

**इति गुह्यतमं शास्त्रमिदमुक्तं मयानघ ॥**
**एतद्बुद्ध्वा बुद्धिमान्स्यात्कृतकृत्यश्च भारत ॥ २० ॥**

जे ज्ञानामृताची जान्हवी । जे आनंदचंद्रिची सतरावी ।
विचारक्षीरार्णविची नवी । लक्ष्मी जे हे ॥ ३९ ॥
ह्मणौनि आपुलेनि पदें वर्णें । अर्थाचेनि जीवें प्राणें ।
मीं वांचौनि होऊं नेणें । आन काहिं ॥ ५४० ॥
क्षराक्षरखें संमोहर जालें । तें पुरुषत्वें वाळिलें ।
मग मज सर्वस्व दीधलें । पुरुषोत्तमिं ॥ ४१ ॥
ह्मणौनि जागिं गीता । मियां आत्मेन पतिव्रता ।
जे हे प्रस्तुतिं आतां । तुवां आकर्णिली ॥ ४२ ॥
साच चि बोलाचें नोहे शास्त्र । पैं संसारु जीणतें हें शस्त्र ।
आत्मा अवतरावितें मंत्र । अक्षरें इयें ॥ ४३ ॥
पारि तुज पुढां सांवितलें । तें अर्जुना ऐसें जालें ।
गोप्य धन काढिलें । माझें आजि ॥ ४४ ॥
मज चैतन्यशंभुचां माथां । जो निक्षेपु होता पार्था ।
तेया गौतमु जालासि आस्था । निधि तुं गा ॥ ४५ ॥

चोखटिवां आपुलिया । पुढिला उगाणा घेयावेया ।
तेया दर्पणाची परी धनंजया । केली आह्मां ॥ ४६ ॥
कां भरलें चंद्रतारांगणीं । नभ सिंधु आपणेयां आणी ।
तैसा गीतेसिं मीं अंतष्करणीं । सूदलां तुवां ॥ ४७ ॥
जें त्रिविधमलकटां । संडिलासि सूभटा ।
ह्मणौनि गीतेसिं मज वसैठा । जालासि गा ॥ ४८ ॥
परि हें काइ बोलों गीता । जे हे माझी उन्मेखलता ।
जाणे तो समस्तां । मोहां मूके ॥ ४९ ॥
सेविली अमृतसरिता । रोगु दवडुनि पांडुसुता ।
अमरपण उचिता । देउनि घली ॥ ५५० ॥
तैसी गीता हे जाणितलियां । काइ विस्मो मोहो जावेया ।
परि आत्मज्ञानें आपणेपेयां । मीलिजे एथ ॥ ५१ ॥
जेया आत्मज्ञानाचां ठांइं । कर्म आपुलेया जीविता पाईं ।
होउनियां उतराई । लया जाए ॥ ५२ ॥
हारपलें दाउनि जैसा । मागु सरे वीरविलासा ।
ज्ञानें कलसु वलघे तैसा । कर्मप्रासादा ॥ ५३ ॥
ह्मणौनि ज्ञानियां पुरुखां । कृत्य करुं सरलें देखां ।
ऐसा अनाथाचा सखा । बोलिला तो ॥ ५४ ॥
तें श्रीकृष्णवदनामृत । पार्थु भरुनि असे अखंडत ।
तवं व्यासकृपा एंत । संजयासि ॥ ५५ ॥
तो धृतराष्ट्रा राया । सूत असे पान करावेया ।
ह्मणौनि जीवितांतु तेया । नव्हे चि भारी ॥ ५६ ॥
यऱ्हवि गीताश्रवणअवसरिं । आवडों लागतां अनधिकारी ।
पारि सेखिं ते चि उजिरी । पांति लाभली ॥ ५७ ॥
जेधवां द्राक्षिं दूध घातलें । तेधवां वायां गेलें गमलें ।
परि फलपाकिं दूणावलें । देखिलें जेविं ॥ ५८ ॥

तैसिं हरिवक्त्रिचीं आखरें । संजयें सांघितलिं आदरें ।
तिहिं अंधु तो अवसरें । सुखिया जाला ॥ ५९ ॥
तें चि मऱ्हाटेनि विन्यासें । मियां उन्मेखें ठसेंठोमसें ।
जाणों नेणों तैसें । निरोपिलें ॥ ५६० ॥
सेवंतिए अरसिकां हिं । आंग पांतां विशेषु नाहिं ।
परि सौरम्य नेलें तिहिं । भ्रमरिं जाणिजे ॥ ६१ ॥
तैसें धड तें प्रमेय घेइजे । न्यून तें तें मज देइजे ।
जें नेणणें हें साहाजें । रूप किं बाळा ॥ ६२ ॥
परि नेणतें जन्हि होए । तन्हि देखौनि बापु किं माए ।
हरिखु कें हिं न माए । चोज करिति ॥ ६३ ॥
तैसें संत माहिएर माझें । तुह्मि मीनलेयां मीं लाडैजे ।
तें चि ग्रंथाचेनि व्याजें । जाणिजो जी ॥ ६४ ॥
आतां विश्वात्मकु माझा । स्वामी श्रीनिवृत्तिराजा ।
तो अवधारु वाक्यपूजा । ज्ञानदेवो ह्मणे ॥ ६५ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे

श्रीकृष्णार्जुनसंवादे **पुरुषोत्तमयोगो**

नाम पंचदशोऽध्यायः ।

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥



# ज्ञानेश्वरी

## अध्याय सोळावा

**श्रीकृष्णाय नमः ॥**

मावळवितु विश्वाभासु । उवल उदैजेला चंडांशु ।
अद्वयाब्जिनीविकाशु । वंदूं आतां ॥ १ ॥
जो अविद्ये राती रुसौनियां । गिळी ज्ञानअज्ञानाचिया चांदणियां ।
जो सुदीनु करी ज्ञानियां । स्वबोधाचा ॥ २ ॥
जेणें विवळतिये सवळे । लाहूनि आत्मज्ञानाचे डोळे ।
सांडीति देहअहंतेचें आंविसाळें । जीवपक्षी ॥ ३ ॥
लिंगदेहकमळाचा । पोटीं वेचतेया चिद्भ्रमराचा ।
बंदि मोक्षु जेयाचा । उदैला होये ॥ ४ ॥
शब्दाचिया अशंकडी । भेदनदिचां दोहीं थडीं ।
अरडांते विरहवेडी । बुद्धि बोधीं ॥ ५ ॥
तें याचकाचें मिथुन । संमरस्याचें समाधान ।
भोगवि जो चिद्गगन । भवनदिवा ॥ ६ ॥
जेणें पहालेनि पाहाटे । भेदाची चोखेल फीटे ।
रीगति आत्मानुभववाटे । पंथिक योगी ॥ ७ ॥
जेयाचेनि विवेककिरणसंगें । उन्मेखसूर्यकांत–स्फुलिंगें ।
दीपले जाळीति दांगें । संसाराचीं ॥ ८ ॥

जेयाचा रश्मिपुंजु निबरु । होंतां स्वस्वरूपउबारीं स्थीरु ।
ये महासिद्धिचा पूरु । मृगजळाचा ॥ ९ ॥
जो प्रत्यग्बोधाचेया माथेया । सोहंतेचां मध्यान्हीं आलेयां ।
लपे आत्मभ्रांतिछाया । आपणपां चि ॥ १० ॥
तेव्हळिं विश्वस्वप्नें सहितें । कोण अन्यथामतिनिदेतें ।
सांभाळिं नुरे चि जेथें । मायाराति ॥ ११ ॥
ह्मणौनि अद्वयबोधपाटणीं । महानंदाचिया दाटणीं ।
मग सुखानुभौ तिहिं घेणीं । मंदवों लागे ॥ १२ ॥
किंबहुना ऐसैसें । मुक्ततें कैवल्यसुदिसें ।
सदा लाळिजे कां प्रकाशें । जेयाचेनि ॥ १३ ॥
जो निजधामव्योमिचा राउ । उदैला चि उदैजतखेउ ।
फेडी पूर्वादिदिशांचा ठावो । उदोअस्तूंचा ॥ १४ ॥
न दिसणें दीसणेनसिं मावळवी । दोहों झांकलें सैध पघळवी ।
काइ बोलों आघवी । उखा चि ते आनी ॥ १५ ॥
तो अहोरात्राचा पैलकडु । कोणें देखावा ज्ञानमार्तंडु ।
प्रकास्यें विण सुरवाडु । प्रकाशाचा ॥ १६ ॥
तेया चित्सूर्या श्रीनिवृत्ती । आतां नमो चि ह्मणें पुडुतीं ।
जो बाधकां येइजताहे स्तुती । बोलाचिया ॥ १७ ॥
वेदांचें माप पाउनियां । स्तुती तरि एइजे चांगावेया ।
जरि स्तव्यबुद्धिसिं लया । जायिजे कां ॥ १८ ॥
जो सर्व नेणियां जाणिजे । मौनाचिया मिठिया वर्णिजे ।
काहिं चि नोहुनि आणिजे । आपणेयां जो ॥ १९ ॥
जेया तुझेया उद्देशा साठिं । पश्यंती मध्यमापोटीं ।
सूनु परेसीं हीं पाठीं । वैखरी विरे ॥ २० ॥
तेया तूतें मीं सेवकपणें । लेवविं बोलिकेयां स्तोत्रांचें लेणें ।
हें उपसाहावें हीं ह्मणतां उणें । अद्वयानंदा ॥ २१ ॥

परि रंकें अमृतसागरु । देखिलेयां पडे उचिताचा विसरु ।
मग करुं धांवे पाहुणेरु । शाकांचा तेया ॥ २२ ॥
तेथ शाकु किरु बहुतु ह्मणावा । तेयाचा हर्षवेगू चि तो वेयावा ।
उजळुं दिव्यतेजा हाथेवा । ते भक्ति पावी ॥ २३ ॥
बाळा उचित जाणणें होये । तरि बाळपण चि कें आहे ।
परि साच चि एरि माए । ह्मणौनि तोषे ॥ २४ ॥
हां गा गावंरसेया भरलें । पाणी पाये देंत वरि आलें ।
तें गंगा काइ देखिलें । आनी दीठी ॥ २५ ॥
जी चांगु कैसा अपकारु । किं तो मानूनि प्रियउपकारु ।
तोषे चि ना सारंगधरु । पूतनेसि ॥ २६ ॥
कां आंधारेनि खतैलें अंबर । जालेयां दिवसनाथा समोर ।
तेणें तें परतें सर । ह्मणितलें कायी ॥ २७ ॥
तेथि भेदबुद्धिचिये तुलें । घालूनि सूर्यश्लेषाचें कांटालें ।
तूकिलासि तें अल्हें । पुरें करीं जी ॥ २८ ॥
जिहीं ध्यानाचां डोळां पाहिलासि । वेदादिवाचा वानिलासि ।
जें उपसाहिलें तेयांसि । तें आह्मां करीं ॥ २९ ॥
परि आजि मीं तूझा गुणीं । लांचवलां अपराधु न गणीं ।
भलेतें करीं आधघणी । नूठिं कदा ॥ ३० ॥
मियां गीता येणें नावें । तूझें यश हें अमृत सुहावें ।
वानुं लाधलेति तें दूणेनि थावें । दैवलदैवं ॥ ३१ ॥
माझिया सत्यवाचा तप । केलें बहुत कल्प ।
तेया फळाचें हें महाद्वीप । पातली प्रभू ॥ ३२ ॥
पुण्यें पोसिलिं असाधारणें । तियें तुझे गुण वानणें ।
देउनि मज उरिणें । जालिं आजि ॥ ३३ ॥
जी जीविताचां आडवीं । आंतुडलेयां मरणगावीं ।
ते अवदशा चि आघवी । फीटली हे ॥ ३४ ॥

जे गीतापणें नावणिगी । जे अविद्या जीणौनि दाटुगी ।
ते कीर्ति तूझी आह्मां जोगी । वानावेया जाली ॥ ३५ ॥
पैं निर्धनां घरीं वानवसें । महालक्ष्मी एउनि बैसे ।
तेया ही वरतें निर्द्धन ऐसें । ह्मणों ए कायि ॥ ३६ ॥
अंधकाराचेया ठाया । दैवें सूर्यो आलेयां ।
तैं आंधारु चि जगा येया । प्रकाशु नोहे ॥ ३७ ॥
जेया देवाची पाहातां थोरी । विश्व परमाणु हिं दशा न धरी ।
तो भक्ताचेया सरोभरी । नव्हे चि कायि ॥ ३८ ॥
तैसें मीं गीता वाखाणीं । ये खपुष्पाचीं किर तुरंबणी ।
परि समर्थें तुवां सिरियाणीं । फेडिली ते ॥ ३९ ॥
ह्मणौनि तूझेनि प्रसादें । मी गीता पद्यें अगाधें ।
निरोपीन जी विशदें । ज्ञानदेउ ह्मणे ॥ ४० ॥
तरि अध्यायिं पन्हरावां । श्रीकृष्णें तेया पांडवा ।
शास्त्रसिद्धांतु आघवा । उगाणिला ॥ ४१ ॥
जें वृक्षरूप परिभाषा । केलें उपाधिरूप अशेषा ।
सद्वैद्यें जैसें दोषां । आंगलीनां ॥ ४२ ॥
आणि कूटस्थु जो अक्षरु । दाविला पुरुषाकारु ।
तेणें उपहिता ही आकारु । चैतन्या केला ॥ ४३ ॥
पाठिं उत्तमु पुरुषु । शब्दाचें करुनि मीष ।
दाविलें चोख । आत्मतत्त्वीं ॥ ४४ ॥
आत्मविषयीं आंतुवट । साधन गा आंगदट ।
ज्ञान होये हें इं स्पष्ट । चावललां ॥ ४५ ॥
ह्मणौनि ये अध्याइं । निरूप्य उरे चि काहीं ।
आतां गुरुशिष्यां दोहीं । स्नेहो लाहाणां ॥ ४६ ॥
एवं ये विशिं किर । तेयातें बुझाविलें अपार ।
परि मुमुक्ष इतर । साकांक्ष जाले ॥ ४७ ॥

जे मज पुरुषोत्तमा । ज्ञानें भेटे सुवर्मा ।
तो सर्वज्ञ ते चि सीमा । भक्तिची ही ॥ ४८ ॥
ऐसें जें त्रैलोक्यनायकें । बोलिलें अध्यायांतश्लोकें ।
तेथ ज्ञान चि बहू येकें । तोषें वानिलें ॥ ४९ ॥
भरुनु प्रपंचा घोंटु । कीजे देखतां चि देखतेया द्रष्टु ।
आनंदसाम्राज्यीं पाटु । बांधिजे जीवा ॥ ५० ॥
एवढेया लाभाचा उपावो । आनु नाहिं चि ह्मणे देऊ ।
सम्यग्ज्ञाना हो राऊ । उपाया पुडुतीं ॥ ५१ ॥
ऐसे आत्मजिज्ञास जे होंते । तोखलेनि चित्तें ।
आदरें तेया ज्ञानातें । वोत्रालिलें जीवें ॥ ५२ ॥
आतां आवडि जेथ पडे । तेयाची अवसरी पुढें पुढें ।
रिगो लागे हें घडे । प्रेम ऐसें ॥ ५३ ॥
ह्मणौनि जिज्ञासुचां पैकीं । ज्ञानीं प्रीति होये नां जवं नीकी ।
तवं योगक्षेमु ज्ञानविषिं । स्फुरला चि ॥ ५४ ॥
ह्मणौनि तें चि सम्यग्ज्ञान । कैसेनि होये स्वाधीन ।
जालेयां वाडजतन । केवि निफजे ॥ ५५ ॥
कां उपजों चि जेणें न लाहे । जें उत्पन्न हीं अव्हांटा सुये ।
तें ज्ञान काइ वोखटें आहे । हें जाणावें ॥ ५६ ॥
मग जाणों तेयाचें वीरुं । तेया ही वाटवाहाणी विचारुं ।
ज्ञाना हित तें चि करुं । सर्वभावें ॥ ५७ ॥
ऐसा जिज्ञासु तुह्मीं समस्तीं । भावो जो धरिला असे चित्तीं ।
तो पुरवावेया लक्ष्मीपती । बोलिजैल ॥ ५८ ॥
ज्ञानासि पुनर्जन्म जोडे । आपुली विश्रांति ही वारि वाढे ।
जिया संपत्ती तें पवाडे । सांघैल दैवी ॥ ५९ ॥
साहाजें इष्टानिष्टकरणीं । दोघी चि या कवतिकिणी ।
हे नवमाध्यायीं उद्याणीं । केली होंती ॥ ६० ॥

श्रीभगवानुवाच ॥

अभयं सत्वसंशुद्धिर्ज्ञानयोगव्यवस्थितिः॥
दानं दमश्च यज्ञश्च स्वाध्यायस्तप आर्जवम् ॥ १ ॥

तेथ साउमा घेआवा उवावो । तवं मांडला आनु प्रस्ताउ ।
तरि त्या प्रसंगें देवो । निरोपितसे ॥ ६१ ॥
तेया निरोपणाचेनि नावें । अध्यायपद सोळावें ।
लावणीं पाहातां जाणावें । मागिला वरि ॥ ६२ ॥
तरि हें असो प्रस्तुतीं । ज्ञानाचां हिताहितीं ।
समर्था या संपत्ती । दोन्हीं गा ॥ ६३ ॥
जे जे मुमुक्षां मार्गें बोलावी । मोहोरात्रिची धर्मदिवी ।
ते आदि तवं दैवी । संपत्ति आइक ॥ ६४ ॥
एथ एकु एकातें पोखी । ऐसे बहुत पदार्थ एकिं ।
संपजति ते लोकीं । संपत्ति ह्मणिपे ॥ ६५ ॥
दैव–सुखसंभवी । येथ दैवगुण–येकोपजीवी ।
जाली ह्मणौनि जाण दैवी । संपत्ति हे ॥ ६६ ॥
आतां तेया चि दैवगुणां । माझि धूरेचा बैसणां ।
बैसे तो आकर्णा । अभय ऐसे ॥ ६७ ॥
तरि न घलुनि महापुरीं । नेघपे बुडणेयांची सियारी ।
रोगु न गणिजे धारें । पथ्याचिया ॥ ६८ ॥
तैसा कर्माअकर्माचेया मोहरा । उठूं नेंदूनि अहंकारा ।
संसाराचा दरारा । सांडणें कां ॥ ६९ ॥
अथवा अव्ययभावनेचेनि पैसें । दूजें मातुनु आत्मा ऐसें ।
भववार्त्ता देशें दिसें । दवडणें जें ॥ ७० ॥
पाणी बुडऊं ये मीठातें । तवं मीठ चि पाणी आते ।
तेवि आपण जालेनि द्वैतें । नासे भय ॥ ७१ ॥

आगा अभय येणें नावें । बोलिजे तें हें जाणावें ।
सम्यग्ज्ञानाचें आघवें । भावणें हें ॥ ७२ ॥
आतां सत्वशुद्धि ह्मणिजे । ते पैं ऐसी जाणिजे ।
तरि जळे ना विझे । वन्हि जैसा ॥ ७३ ॥
कां पाडिवां वाढि न मगे । अवसा तूटि सांडूनि मागे ।
माझि हरिणु चंद्र आंगें । जैसा राहे ॥ ७४ ॥
ना तरि वार्षिया सांडिली । ग्रीष्में नाहिं मांडिली ।
ते नदी जैसी निवडली । निजरूपें ॥ ७५ ॥
तैसी संकल्पविकल्पाची वोढी । सांडूनि रजतमाची कावडी ।
भोगीति निजधामाची आवडि । बुद्धि उरे ॥ ७६ ॥
इंद्रियवर्गे दाखविलेयां । विरुद्धा अथवा भलेया ।
विस्मो काहिं केलेयां । नुठी चित्तीं ॥ ७७ ॥
गावां गेलेयां वल्लभु । पतिव्रतेचा विरहक्षोभु ।
भलेतैसा हानिलाभु । न मनी जेवि ॥ ७८ ॥
तेवि स्वरूप रुचलेपणें । बुद्धि जे ऐसें होणें ।
ते सत्वशुद्धि ह्मणे । कंसहंता ॥ ७९ ॥
आतां आत्मलाभविषिं । ज्ञानयोगा माझि येकीं ।
जे आपुलिया टाकी । हांवे भरे ॥ ८० ॥
तेथ सगळिये चित्तवृत्ती । त्यागु करणें या रीती ।
निष्कामीं कां पूर्णाहुति । हुताशीं जैसी ॥ ८१ ॥
कां सकुलिनें आपुली । आत्मजा कुळिंची दीधली ।
हे असो लक्ष्मी राहिली । मुकुंदिं जेवि ॥ ८२ ॥
तैसें निविकल्पेपणें । संयमाग्नीचा वृत्तिकां होणें ।
तो तीजा गुणु ह्मणे । कृष्णनाथु ॥ ८३ ॥
आतां देहें वाचा चित्तें । यथासंपन्नें वित्तें ।
परि जालेयां आर्त्तातें । न वंचणें जें कां ॥ ८४ ॥

फूलीं फळीं छाया । मूळीं पत्रीं हीं धनंजया ।
वाटेचा न वंचे आलेयां । रुंखु जैसा ॥ ८५ ॥
तैसें मानौनि धन वेन्हीं । विद्यमानें आपुलां अवसरीं ।
श्रांताचेया मनोहारी । उपेगा जाए ॥ ८६ ॥
तेया नावें जाण दान । जें मोक्षनिधानिचें अंजन ।
हें असो आइक चिन्ह । दमाचें जें ॥ ८७ ॥
तरि विषयां इंद्रियांचे मिळणीं । जो उदैजत सुये विभुटणी ।
तोडिजे खड्गपाणी । पारकेयां ॥ ८८ ॥
तैसा विषयजाताचा वारा । वाजों नेदीं इंद्रियां द्वारां । द्वा
यमें बांधौनि प्रत्याहारा । वोपिजति ॥ ८९ ॥
आंतुला चित्ताचें आंग वेन्हीं । प्रवृत्ति पळौनि माघारी ।
आगि सुइजे दाहें द्वारीं । वैराग्याची ॥ ९० ॥
श्वासोश्वासा होउनि बहुवसें । कृच्छ्रादि व्रतें खरपुसें ।
उसंतितां रातिदिवसें । नाराणुक जें ॥ ९१ ॥
पैं दमु ऐसें ह्मणिपे । तो हा जाण स्वरूपें ।
यज्ञार्थु ही संक्षेपें । सांवों आतां ॥ ९२ ॥
तरि ब्राह्मण करूनि धूरे । स्त्रियादिक पैली मेरे ।
माझारि अधिकारें । आपुलालेनि ॥ ९३ ॥
जेया जें सर्वोत्तम । भजनीय देवताधाम ।
तें तेणें यथागम— । विधी यजिजे ॥ ९४ ॥
जैसे द्विजु षट्कर्मे करी । शूद्र तेयातें नमस्कारी ।
किं दोघां सरोभरी । निफजे यागु ॥ ९५ ॥
तैसें अधिकारपर्यालोचें । हें यज्ञकरणें सर्वांचें ।
विषयफळ आशेचें । नेघपे माजि ॥ ९६ ॥
आणि मी करिता हा भावो । नेंदिजे देहाचेनि द्वारें जाओं ।
नां वेदाज्ञेसि तरि ठावो । होइजे स्वयं ॥ ९७ ॥

अर्जुना एवंसंज्ञ । सर्वत्र जाण यज्ञ ।
कैवल्यमार्गींचा अभियज्ञ । सांघति हा ॥ ९८ ॥
आतां चेंडुवें भुइं हाणिजे । हें नोहे तो हाता आणिजे ।
कां सेतीं बीं विखुरिजे । परि पीकीं लक्ष ॥ ९९ ॥
ना तरि ठेविलें देखावेया । आदरु कीजे दीवेया ।
कां शाखा फळावेया । सिंपिजे मूळ ॥ १०० ॥
हें असो बहू आरिसा । आपणपेयां दिसावेया जैसा ।
पुडुतीं पुडुतीं बहुवसा । प्रीती पाहिजे ॥ १ ॥
तैसा प्रतिपाद्यु जो ईश्वरु । तो होआवेया लागि गोचरु ।
श्रुतींचा निरंतरु । अभ्यासु करणें ॥ २ ॥
तेवि द्विजांसि ब्रह्मसूत्र । येरां स्तोत्र कां नाममंत्र ।
आवर्त्तवणें पवित्र । पावेया तत्व ॥ ३ ॥
पार्था गा स्वाध्यायो । बोलिजे तो हा ह्मणे देवो ।
तपशब्दा अभिप्रावो । आइक सांघों ॥ ४ ॥
ज्ञानें सर्वस्व जाणे । परि रक्षणें मरणा येणें ।
कां फळौनि शुष्कां होणें । औषधींचे ॥ ५ ॥
नाना धूपाचा अग्निप्रवेशु । कनका तूका तूंकाचा नाशु ।
पितृपक्षु पोखतां भ्रंशु । चंद्रा जैसा ॥ ६ ॥
तैसे सर्वधर्माचेया प्रसरा । लागि प्राणें हीं या शरीरा ।
आटणी करणें जें वीरा । तें चि तप ॥ ७ ॥
अथवा अनारिसें । तपाचें रूप असे ।
तरि सूदली दूधीं हंसें । चांचु जैसी ॥ ८ ॥
तैसे देहजीवाचियें मिळणीं । जो उदैजत सुवे पाणीं ।
तो विवेकु अंतष्करणीं । जागविजे ॥ ९ ॥
पांतां आत्मेया कडे । परबुद्धिचा पैसु सांकडे ।
सनिद्रा स्वप्न बुडे । जागणां जैसें ॥ ११० ॥

तैसां आत्मपर्यालोचु । प्रवर्ते तो साचु ।
तपाचा निर्वचु । धनुर्द्धरा ॥ ११ ॥
आतां बाळाचां हिं चित्तिं स्तन्य । जैसे नाना दृष्टिचां चैतन्य ।
तैसे प्राणिमात्रीं सौजन्य । आर्जव तें ॥ १२ ॥

**अहिंसा सत्यमक्रोधस्त्यागः शांतिरपैशुनम् ॥**
**दया भूतेष्वलोलुप्त्वं मार्दवं ऱ्हीरचापलम् ॥ २ ॥**

आणि जगाचेया सुखा चि दोसें । शरीरें वाचा मानसें ।
राहाटणें तें अहिंसे । रूप जाण ॥ १३ ॥
आतां चोख होउनि मौवाळ । जैसे जातिचें मुकुळ ।
कां तेज परि शीतळ । शशांकाचें ॥ १४ ॥
शके दाविलें चि रोगु फेडूं । आणि जीभे तरि नव्हे कडू ।
तें वोषध नाहिं पाडु । उपमां केवि ॥ १५ ॥
तऱ्हीं मौपणें बुबुळें । झगटितां हीं परि नाडळे ।
यऱ्हवि फोडी कराळें । पाणी जैसें ॥ १६ ॥
तैसें तोडावेया संदेह । तीख जैसें काळ लोह ।
स्राव्यत्वें तरि माधुर्य । पाहिं घाली ॥ १७ ॥
आयिकों ठांतां कवतिकें । कानातें करी मूंकें ।
ना साचारैवें मीखें । ब्रह्म हीं भेदी ॥ १८ ॥
किंबहुना प्रियपणें । कोण्हातें हिं झांकउं नेणे ।
यथार्थु तऱ्हीं खुपणें । नाहिं कव्हणां ॥ १९ ॥
यऱ्हवि गोरी किर गायन गोड । परि साचाचां पाखाळीं कीड ।
आगिचें करणें उघड । परि जळो तें साच ॥ १२० ॥
कां जीभे लगतां मद्दुर । अर्थें विभांडी जिव्हार ।
ते वाचा नव्हंति सुंदर । लावां चि कां तिया ॥ २१ ॥
परि अहितिं कोपैनि सोफ । लाळनीं मौ जैसें पुष्प ।
तिये मातेचें स्वरूप । जैसें होये ॥ २२ ॥

जैसें श्रवणसुख चतुर । परिणामौनि साचार ।
बोलणें अविचार । सत्य येथें ॥ २३ ॥
आतां लाविलेयां हिं पाणीं । जैसा पाखाणु नेघे आणी ।
कां मथिलेयां हिं लोणीं । कांजी नेंदी ॥ २४ ॥
त्वचा पाये चीरी । आलेयां हिं फडे न करी ।
सेवींते हीयारी । नोहंति फुलें ॥ २५ ॥
नाना रंभेचेनि हिं रूपें । शुकिं नुठिजे चि कंदर्पे ।
कां भस्मीं वन्हि नाटोपे । घृतें हिं जेवि ॥ २६ ॥
तेवि कुमारु क्रोधु भरे । तैसेयां मंत्रांचि बीजाक्षरें ।
तियें निमित्यें हीं अपारें । मीनलेयां ॥ २७ ॥
परि धाता ही पायां पडतां । नूठी गतायु पांडुसुता ।
तैसा नुपजे उपजवितां । क्रोधोर्मि तो ॥ २८ ॥
अक्रोधत्व ऐसें । नावं तिये दशे ।
ऐसें श्रीनिवासें । ह्मणितलें तेथ ॥ २९ ॥
आतां मृत्तिकात्यागें घटु । तंतुत्यागें पटु ।
त्यजिजे जेवि वटु । बीजत्यागें ॥ १३० ॥
कां त्यजूनि भींतिमात्र । त्यजिजे आघवें चित्र ।
निजत्यागें विचित्र । स्वप्नजाल तें ॥ ३१ ॥
नाना जलत्यागें तरंग । वरिषात्यागें मेघ ।
त्यजिजति जेवि भोग । दानत्यागें ॥ ३२ ॥
तेवि बुद्धिमंतीं देहीं । अहंता सांडौनि पाहीं ।
सांडिजे अशेष ही । संसारजात ॥ ३३ ॥
तेया नावं त्यागु । ह्मणे तो यज्ञांगु ।
हें मानुनि सुभगु । पार्थु पूसे ॥ ३४ ॥
आतां शांतिचें जी लिंग । व्यक्त मज सांघ ।
देवो ह्मणति चांग । अवधान दे ॥ ३५ ॥

तरि गीळूनि ज्ञेयातें । ज्ञान ज्ञाता चि माघौतें ।
हारपे तें निरुतें । शांति पैं गा ॥ ३६ ॥
जैसा प्रळयांबुचा उभडु । बुडऊनि विश्वाचा पवाडु ।
हें आपणपां निवाडु । आपणपां चि ॥ ३७ ॥
मग उगडं वोघ सिंधू । हा नुरे व्यवहारभेदु ।
परि जळवाच्यबोधु । तो ही कैंचा ॥ ३८ ॥
तैसी ज्ञेया देतां मीठी । ज्ञातृत्व पडे पुटीं ।
मग उरे तें चि किरीटी । शांति पुढुतीं ॥ ३९ ॥
आतां कदर्थत व्याधी । बळीकरणेयांचिया आधी ।
आपु पर न शोधी । सद्वैद्यु जैसा ॥ १४० ॥
कां चिखलीं रुपली गाए । धड भाखड न पाहे ।
जो तियेचिया ग्लानीं होये । काळाबुळा ॥ ४१ ॥
नाना बुडतेयातें सकरुणु । न पुसे उत्तमहीनु ।
काढी राखे प्राणु । हें चि जाणे ॥ ४२ ॥
पैं माहेवणी निदैवें । उघडी केली विपायें ।
ते सलज्जु न पाहे । न पांघुरवितां ॥ ४३ ॥
तैसें अज्ञानप्रमदादिकिं । कां प्राक्तनीं हीं सदोषीं ।
निंदित्वाचा साविखिं । देखिलें जें ॥ ४४ ॥
तेया अंगिक आपुलें । देउनियां भलें ।
विसरविजति सलें । सलतीं तियें ॥ ४५ ॥
आगा पुढिलाचा दोखु । करूनि आपुलिया दीठी चोखु ।
मग घेपे अवलोकु । तेया वरि ॥ ४६ ॥
जैसा पुजुनि देउ पाहिजे । पेरूनि सेता जाइजे ।
तोखौनि आशिर्वादु घेइजे । अतिथिचा ॥ ४७ ॥
तैसें आपुलेनि गुणें । पुढिलाचें उणें ।
फेडूनियां पाहाणें । तेया कडे ॥ ४८ ॥

वांचूनि न विंधिजे वर्मी । नांतुडविजे कर्मी ।
न बोलाविजे नामी । सदोषिं तिहिं ॥ ४९ ॥
वरि कोण्हें येकें उपायें । पडिलें उभें होये ।
तें चि कीजे घाये । न घलावें वर्मी ॥ १५० ॥
पैं उत्तमाचिया साठीं । पावलेयां तें किरीटी ।
देतां जाइ दीठी । दोषु न घेपे ॥ ५१ ॥
आगा अपैशून्याचें लक्षण । अर्जुना हें फुडें जाण ।
मोक्षा थंतें सोखासन । मुख्य हें गा ॥ ५२ ॥
आतां तेया दशी । अर्जुना जाण आपैसी ।
निवडितां न कडसी । सानेंथोरें ॥ ५३ ॥
तैसें दुःखिताचें सीणणें । हिरतां सकणवपणें ।
उत्तमाधम नेणें । विवंचूं गा ॥ ५४ ॥
पैं सर्व जीवना सारिखें । वस्तु आंगें वर उपखे ।
परि जातें जीवित राखे । तृणाचें हिं ॥ ५५ ॥
तैसें पुढिलाचेनि तापें । कलवलैलिये कृपें ।
दीधलें हिं आपणपें । थोडें चि गमे ॥ ५६ ॥
निम्न भरलेयां उणें । तें पाणी ढलों चि नेणे ।
तेवि अनतोखौनि जाणे । सामोरे यां ॥ ५७ ॥
पैं पाइ कांटा निहटे । तवं व्यथा जीविं उमटे ।
तैसा पोळे संकष्टें । पुढिलाचेनि ॥ ५८ ॥
कां पावो सीतल लाहे । किं तें डोलेयां चि लागि होये ।
तैसा परसुखें जाये । सुखावतु ॥ ५९ ॥
किंबहुना आर्त्ता चि लागि । पाणीं आराइलें असे जगीं ।
तैसें दुःखिताचां भागीं । जीणें जेयाचें ॥ १६० ॥
तो पुरुषु वीरराया । मूर्त्त जाण दया ।
मीं उदैजत तेया । रिणियां कीजे ॥ ६१ ॥

आतां सूर्यासि जीवें । अनुसरलीं राजिवें ।
परि तो लें न सिवे । सौरम्य जैसें ॥ ६२ ॥
कां वसंताचिया वाहाणी । आलेयां वना अक्षौणी ।
न करीतु घेणीं । निगाला तो ॥ ६३ ॥
हें असो महासिद्धिसिं । लक्ष्मी आलेयां पासिं ।
परि महाविष्णु जैसी । गणी चि ना ॥ ६४ ॥
तैसें इहिक कां स्वर्गिचे । भोग पाइक आलेयां इछेचे ।
परि भोगावें हें न रुचे । मना माजि ॥ ६५ ॥
बहुवे काइ क्वतिर्कि । जीउ नोहे विषयविषिं ।
अलौल्य सदा ठाउकी । जाण ते हे ॥ ६६ ॥
आतां जैसें कां मौवाल । जळचरांसि जळ ।
कां पक्षांसि अंतराल । मोकळें हें ॥ ६७ ॥
नातरि बालका दोसें । मातेचें स्नेह जैसें ।
कां वसंतिचा स्पर्शे । मारुतु मौ ॥ ६८ ॥
डोलेयां प्रियाचिये भेटी । पीलेयां कूर्मीची दीठी ।
तैसी भूतमात्रि राहाटी । मौवाळ ते ॥ ६९ ॥
स्परिसें आतिमृदु । मुखिं घातलेयां स्वादु ।
घ्राणासि सुगंधु । उजलु आंगें ॥ १७० ॥
तो आवडे तवं घेतां । विरुद्ध जरि नव्हंता ।
तरि उपमे येंता । कापुरु किर ॥ ७१ ॥
परि महाभूतें पोटीं वाहे । आणि परमाणू माजि माए ।
तेया विश्वानुसार होये । गगना ऐसा ॥ ७२ ॥
कायि सांघों ऐसें जीणें । जें जगाचें चि जीवें प्राणें ।
तेया नावं ह्मणें । मार्दव मी ॥ ७३ ॥
आतां पराजयें राजा । जैसा कदर्थिजे लाजा ।
कां मानिया निस्तेजा । निकृष्टा तव ॥ ७४ ॥

* आतां ईश्वरप्राप्तीलागी । प्रवर्तता ज्ञानयोगी । धैर्यसैथ्याचा का अंगी । ओसिजे वृत्ती ॥



नाना चांडाल स्त्रीमदिरेसिं । आलेयां संन्यास्या पासि ।
मग लाज जैसी । उत्तमां तेया ॥ ७५ ॥
क्षत्रिया पलौनि जीणें । तें कोण साहे लाजीरवाणें ।
कां वैधव्यें वेलु नेणे । महासती जैसी ॥ ७६ ॥
रूपसा उदैलें कुष्ट । संभाविता कूटिचें बोट ।
तेया लाजा प्राणसंकट । होये जैसें ॥ ७७ ॥
तैसें आउठहातेपणें । हें शव होउनि जीणें ।
उपजों उपजों मरणें । नावां नावां ॥ ७८ ॥
तिये गर्भमेदमूसे । रक्तमूत्ररसे ।
वोतिवां होउनि तैसें । लाजणें जें ॥ ७९ ॥
बहू असो देहपणें । नावां रूपासि येणें ।
नाहिं लाजीरवाणें । या ही हुनु ॥ १८० ॥
ऐसीया इया अवकला । घेपे शरीराचा कांटाला ।
ते लाज पैं गा निर्मला । निसुगै एरि ॥ ८१ ॥
आतां सूत्रतंतु तूटलेयां । चल्ल चि ठाके साइखेडेया ।
कां प्राणु गेलेया कर्मइंद्रियां । खुंटे गति ॥ ८२ ॥
किं मावललेयां दिनकरु । सरे किरणाचा पसरु ।
तैसा मनोजयें प्रचारु । बुद्धिइंद्रियां ॥ ८३ ॥
एवं मनपवननियमें । होंति दाही इंद्रियें अक्षमें ।
तें अचापल्यधर्में । येणें जाणैं ॥ ८४ ॥

**तेजः क्षमा धृतिः शौचमद्रोहो नातिमानिता ॥**
**भवंति संपदं दैवीमभिजातस्य भारत ॥ ३ ॥**

*
वोखटें मरणाऐसें । तें हिं आलें अग्निप्रवेशें ।
परि प्राणेश्वरा दोसें । न गणी सती ॥ ८५ ॥
तैसी आत्मनाथाचिया आधी । लालुनि विषयविषाचां बांधि । (क्षु)
धावों आवडे पाणधी । शून्याचिया ॥ ८६ ॥

न टके निषेधु आड । न पडे विधिची भीड ।
नुपजे जिविं कोड । महासिद्धिचें ॥ ८७ ॥
ऐसें ईश्वरा कडे निज । धांवे आपैसेया साहाज ।
तेया नावं गा तेज । आध्यात्मिक तें ॥ ८८ ॥
आतां सर्वै साहांतिया गरिमा । गर्वा नैये चि ते क्षमा ।
जैसें देह वाहूनि रोमा । वाहणें नेणे ॥ ८९ ॥
आणि मातलेयां इंद्रियांचे वेग । कां प्राचीनें खवळले रोग ।
अथवा योगवियोग । प्रियाअप्रियाचे ॥ १९० ॥
यां आववेयांचा चि थोरु । एकें वेळें आलेयां पूरु ।
अगस्ति होउनि कां धीरु । उभा ठाके ॥ ९१ ॥
आकासीं धूमाची रेखा । उठिली बहुवा आगलिका ।
ते गीळी जेवि झुलुका । वारेयाचिया ॥ ९२ ॥
तैसें अधिभूतां आधिदैवां । अध्यात्मकीं उपद्रवां ।
पातलेयां ते पांडवा । पीउनि घाली ॥ ९३ ॥
आतां निर्वाळुनि कनकें । भरिला गंगापीयूखें ।
तेया कळशाचें सारिखें । शौचासि गा ॥ ९४ ॥
जें आंगि निष्कामु आचारु । जीविं विवेकु साचारु ।
सबाह्य जाण आकारु । शुचित्वाचा ॥ ९५ ॥
जैसें चित्तक्षोभाचां अवसरीं । उचलुनि धैर्या चांगावें करी ।
धृति ह्मणिपे अवधारीं । तेयातें गा ॥ ९६ ॥
फेडीति पापें ताप । पोसीति क्षितीचे पादप ।
समुद्रा जाये आप । गांगेय जैसें ॥ ९७ ॥
जगाचें आंध्य फेडितु । श्रियेचिं राउळें उघडितु ।
निगे जैसा भास्वतु । प्रदक्षिणे ॥ ९८ ॥
तैसिं बांधळि सोडितां । बुडालीं कढितां ।
सांकडी फेडितां । आर्त्ताचिया ॥ ९९ ॥

किंबहुना दिवसें राती । पुढिलाचें चि सुख उन्नती ।
आणितआणितां स्वार्थी । प्रवेसिजे ॥ २०० ॥
वांचौनि आपुलेया काजा लागि । प्राणिजाताचां हितभागीं ।
संकल्पाची ही आडवंगी । न करणें जें ॥ १ ॥
पैं अद्रोहत्व ऐसिया गोठी । आइकसि जिया किरीटी ।
तें सांवितलें हें दीठी । पाहों ए तैसें ॥ २ ॥
आणि गंगा शंभूचां माथां । संकोचली जेवि पार्था ।
तेवि मान्यपदें सर्वथा । लाजणें जें ॥ ३ ॥
हें पुडतपुडुतीं । अमानित्व जाण सुमती ।
मागां सांवितलेंसे केती । तें चि बोलों ॥ ४ ॥
एवं यें हिं सविसें । ब्रह्मगुणि हे वसतसे ।
मोक्षचक्रवर्त्तिचें तैसें । अग्राहार ॥ ५ ॥
नाना हे संपत्ति दैवी । या गुणतीर्थांची नवी ।
निर्विषसागरिची दैवी । गंगा आली ॥ ६ ॥
किं गुणकुसुमाची माला । हे वेडनि मुगुतीबाला ।
वैराग्यभाग्या गला । गिवसीतसे ॥ ७ ॥
किं सविसें गुणज्योतीं । इहीं उजलूनि हे आरती ।
गीता आत्मेयां निजपती । नीराजना आली ॥ ८ ॥
उगलिती निर्मलें । गुणमय मुक्ताफलें ।
दैवी सुति कले । गीतार्णविची ॥ ९ ॥
काइ बहू वानूं ऐसी । अभिव्यक्त ये पैसेंसीं ।
केली दैवी गुणराशी । शांतिरूप ॥ २१० ॥

**दंभो दर्पोऽभिमानश्च क्रोधः पारुष्यमेव च ॥**
**अज्ञानं चाभिजातस्य पार्थ संपदमासुरीम् ॥ ४ ॥**

आतां दुःखाची अतूट वेली । देखां काललोहाची भाली ।
तन्हीं निजावधानीं घाली । आसुरी ते ॥ ११ ॥

पैं त्याज्य त्यजावेया लागी । जाणावें जन्हीं अनुपयोगी ।
ह्मणोनि आइक तें चांगीं । श्रोत्रशक्ती ॥ १२ ॥
तारि नरकव्यथा थोरी । आणावेया दोखीं अघोरीं ।
मेळु केला ते आसुरी । संपत्ति हे ॥ १३ ॥
विषवर्गु एकवटु । तेया नावं जैसा बासटु ।
आसुर संपति हा खोटु । दोखांचा तैसा ॥ १४ ॥
तरि तेयां चि आसुरां । दोखां माजि जेयां वीरा ।
वाडपणाचा गारा । तो दंभु ऐसा ॥ १५ ॥
जैसी आपुली जननी । नग्न दाविलेयां जनीं ।
तारि तीर्थ परि पतनीं । कारण होए ॥ १६ ॥
कां विद्या गुरूपदिष्टा । बोबाइलेयां चौहटां ।
तरि इष्टदा चि अनिष्टा । हेतु होंति ॥ १७ ॥
पैं आंगें दाटली पुरी । जे तारी पैल तीरीं ।
ते नाव चि बांधलयां सिरीं । बुडली जैसी ॥ १८ ॥
कारण जें जीविता । तें वानिलें जरि सेवितां ।
तारि अन्न चि पांडुसुता । होये विष ॥ १९ ॥
तैसा दृष्टाअदृष्टाचा सखा । धर्मु जाला फोकारिजे देखां ।
तरि तारिता तो चि दोखां । लागि होये ॥ २२० ॥
ह्मणौनि वाचेचां चौबारां । घातलेयां धर्मांचा पसारा
धर्मु अधर्मु होये तो वीरा । दंभु जाण ॥ २१ ॥
आतां मूर्खांचिये जीभे । आखरांचे आबुखे शुभे ।
आणि तो ब्रह्मसभे । न रिझे जैसा ॥ २२ ॥
कां मांदुरी लोकाचां घोडा । गजपति महिमे थोडा ।
कां कांटिये चरिला सरडा । व्योम नीच ॥ २३ ॥
तृणांचेनि इंधनें । आगि धांवे गगनें ।
थिलरबळें मीनें । न गणिजे सिंधु ॥ २४ ॥

तैसा माजे स्त्रिया धनें । विद्या स्तुति बहूमानें ।
एकी दीचेनि परान्नें । अल्पकु जैसा ॥ २५ ॥
घनछायेचिया जोडी । निदैवुं घर मोडी ।
मृगांभ देखौनि फोडी । पाणियड मूर्ख ॥ २६ ॥
किंबहुना ऐसैसें । माजणें जें संपत्तिमीसें ।
तो दर्पु गा अनारिसें । न बोलों घेइं ॥ २७ ॥
आणि जगा वेदीं विश्वासु । जगा पूज्यु ईशु ।
जगीं एकु तेजसु । सूर्यो हा ॥ २८ ॥
जगस्पृहे आस्पद । एक सार्वभौमपद ।
न मरणें निर्विवाद । जगा पढियें ॥ २९ ॥
ह्मणौनि जरि उत्साहें । यातें वानूं जाये ।
कि आइकौनि मत्सरु वाहे । एयां लागि ॥ २३० ॥
ह्मणे ईश्वरातें खाए । तेया वेदा कायि विष सुए ।
गोखा माजि आये । भंगितसे ॥ ३१ ॥
पतंगा नावडे वाति । खद्योता भानुची खंति ।
टिटिभें अपांपती । वैरी केला ॥ ३२ ॥
तैसा अहंमानाचेनि मोहें । ईश्वराचें हिं नावं न साहे ।
वेदातें हिं ह्मणे मज हे । सवति जाली ॥ ३३ ॥
ऐसा मानितेचा गंडु । तो अभिमानु जाणैं कुडु ।
रौरवाचा रूढ । मार्गु हा ॥ ३४ ॥
आणि पुढिलाचें सुख । देखणेयांचें होये मीख ।
चढे क्रोधाग्निचें विष । मनोवृत्ती ॥ ३५ ॥
सितलाचिये भेटी । तातलां तेलिं आगि उठी ।
चंद्र देखौनि पोटीं । जळे कोल्हा जैसा ॥ ३६ ॥
विश्वाचें आयुष्य सगळें । सूर्यु उदैला देखौनि सवळे ।
पापियां फुटति डोळे । डुडुळांचे ॥ ३७ ॥

जगाची सुखपाहाट । चोरां मरणांहुनु कष्ट ।
दूधाचें कालकूट । होये व्यालां ॥ ३८ ॥
अगाधें समुद्रजळें । पींतां अधिकु जळे ।
वडवानळु न मिळे । शांति कहीं ॥ ३९ ॥
तैसा विद्याविनोदविभवें । देखे पुढिलाची दैवें ।
तवं तवं रोखु दुणावे । क्रोधु तो जाण ॥ २४० ॥
आणि मनसर्पाची सृष्टी । डोळे नाराजांची सूटी ।
बोले ते वृष्टि । इंगळांची ॥ ४१ ॥
येर जें क्रियाजात । तें तिखेयाचें करवत ।
ऐसें सबाह्य घसासित । तेयाचें गा ॥ ४२ ॥
तो मनुष्य अधमु जाण । पारुष्य अवतरण ।
आतां आइकें खुण । अज्ञानाची ॥ ४३ ॥
तरि शीतोष्णस्पर्शा । निवाडु नेणे पाखाणु जैसा ।
कां रात्रि आणि दिवसा । जात्यंधु तो ॥ ४४ ॥
आगि उठिला आरोगणे । जैसा खाद्याखाद्य नेणे ।
कां परिसु पाडु न ह्मणे । सोनेयां लोहाचा ॥ ४५ ॥
नातरि नानारसीं । रिघौनि दर्वी जैसी ।
अभिज्ञ मीठासि । नव्हे चि तिये ॥ ४६ ॥
कां वारा जैसा पारखी । नव्हे चि गा मार्गामार्गविशेषीं ।
तैसें कृत्याकृत्यविवेकीं । अधमपण जें ॥ ४७ ॥
हें चोख हें मैळ । ऐसें नेणौनि बाळ ।
देखिलें तें केवळ । मुखीं चि घाली ॥ ४८ ॥
तैसें पापपुण्याचें खिचटें । करूनि खांतां बुद्धिचेष्टे ।
कडू महुर न वटे । ऐसी जे दशा ॥ ४९ ॥
तिये नांवं अज्ञान । या बोला नाहिं आन ।
एवं साई दोषांचें चिन्ह । सांघितलें ॥ २५० ॥

इहिं साई दोषांगिं । हे आसुरी संपत्ति दाटुगी ।
जैसें थोर विष भूवंगीं । आंग सानें ॥ ५१ ॥
कां तीव्रां वन्हि पांती । पांतां धाकुटी चि मीति ।
परि विश्वाची ही आहुती । करुं न पुरे ॥ ५२ ॥
धात्रेया ही गेलेयां शरण । त्रिदोषिं न चुके मरण ।
तेया तिहींची हे दूण । लागली आहे ॥ ५३ ॥
जैं साहिं दोषिं संपूर्णी । जाली इहिं चि उभारणी ।
ह्मणौनि आसुरी उणी । संपदा नोहे ॥ ५४ ॥
क्रूरग्रहांची जैसी । मांदी मिळे येकी राशी ।
कां येति निंदका पासिं । अशेषें पापें ॥ ५५ ॥
मरुणारुवाचें आंग । पडिघांति आघवे रोग ।
कां कुमुहूर्त्तिं दुर्योग । एकवटति ॥ ५६ ॥
कां आयुष्य जांतिये वेळे । सेलिए सातवेउली मिळे । सेउलि
तैसे साई दोष सगळे । जोडति तेथें ॥ ५७ ॥
आंतुडलेया चोरा । सीणला सुइजे पुरां ।
तैसें दोषिं इहिं नरां । कीजे तेयां ॥ ५८ ॥
जेया मोक्षमार्गा कडे । यावेया आखुरवा पडे । ख
न निगे ह्मणौनि बुडे । सवंसारिं जो ॥ ५९ ॥
अधमा योनिचा पाउटीं । उतरतु जो किरीटी ।
स्थावरां हिं तळवटीं । बैसणें वे ॥ २६० ॥
हें असो तेयाचां ठांइं । मिळौनि साई दोषिं इहीं ।
आसुरी संपत्ति पाहीं । वाटुवीजे ॥ ६१ ॥ ट

**दैवी संपद्विमोक्षाय निबंधायासुरी मता ॥**
**मा शुचः संपदं दैवीमभिजातोऽसि पांडव ॥ ५ ॥**

ऐसिया दोन्हीं । संपत्ती प्रसिद्धा जनिं ।
सांघितलिया चिन्हीं । वेगळाळां ॥ ६२ ॥

यां दोहिं माजि पहिली । दैवी जे ह्मणितली ।
ते मोक्षसुखा पाहाली । उखा जाण ॥ ६३ ॥
एरि जे दुसरी । संपत्ति कां आसुरी ।
लोभमोहाची खरी । सांखळ जीवां ॥ ६४ ॥
परि हें आइकौनि झनें । कदरसी हो मनें ।
कायि रात्रि चांदिणें । धाकु धरिजे ॥ ६५ ॥
हे आसुरी संपत्ति तेया । बंधा लागि धनंजया ।
जो साहिं दोषां ययां । आश्रो होए ॥ ६६ ॥
तूं तवं पांडवा । सांवितलेयां दैवां ।
गुणाचा वोलावा । जन्मलासि ॥ ६७ ॥
ह्मणौनि पार्था तुत्रां । दैवसंपत्तिस्वामियां ।
होउनि यावें उवाया । कैवल्याचा ॥ ६८ ॥

**द्वौ भूतसर्गौ लोकेस्मिन् दैवआसुर एव च ॥**
**दैवो विस्तरशः प्रोक्त आसुरं पार्थ मे शृणु ॥ ६ ॥**

आणि दैवां आसुरां । संपत्तिवंतां नरां ।
अनादिसिद्ध उजरा । राहाटिचा आहे ॥ ६९ ॥
जैसें रात्रिचां अवसरीं । व्योम व्यापिजे निशाचरीं ।
दिसां सुव्यापारीं । मनुष्यादिकिं ॥ २७० ॥
तैसिया आपुलिया राहाटी । वर्त्तति दोन्हीं सृष्टी ।
दैवी आणि किरीटी । आसुरी एथ ॥ ७१ ॥
तेविं चि विस्तारुनि दैवी । ज्ञानकथनादिप्रस्तावि ।
मागिलें ग्रंथें बरवी । सांवितली ॥ ७२ ॥
आतां आसुरी सृष्टी । तेथिची उपलउं गोठी ।
अवधानाची दीठी । दे पां नीकी ॥ ७३ ॥

**प्रवृत्तिं च निवृत्तिं च जना न विदुरासुरा ॥**
**न शौचं नापि चाचारो न सत्यं तेषु विद्यते ॥ ७ ॥**

तरि वाद्यें विण नादु । दूजेन विण शद्बु ।
कां अपुष्प मकरंदु । न लभे जैसा ॥ ७४ ॥
तैसी प्रकृति हे आसुर । येकली नव्हे गोचर ।
जवं येकाधें शरीर । लाहे ना ॥ ७५ ॥
मग आविष्कारला लाकुडें । पावकु जैसा जोडे ।
तैसी प्राणिदेहीं सांपडे । आटोपली हे ॥ ७६ ॥
तेधवां वाढि जे उंसा । ते चि आंतुला रसा ।
देहाकारु होये तैसा । प्राणियांचा ॥ ७७ ॥
आतां तेयां चि प्राणियां । रूप करुं धनंजया ।
घडिलें जें जें आसुरिया । दोष रिद्धी ॥ ७८ ॥
तरि पुण्या लागि प्रवृत्ति । पापा लागि निवृत्ति ।
या जाणणेयांची राति । तेयाचां मनीं ॥ ७९ ॥
निगणेयां आणि प्रवेशा । चित्त नेंदितु आविसा ।
कोशकारु जैसा । जाचिनला ॥ २८० ॥
कां दीधलें मावौतें येइल । किं न ये हें पुढिल ।
न पांतां दे भांडवल । मूर्खु चोरा ॥ ८१ ॥
तैसिया प्रवृत्ति निवृत्ति दोन्हीं । नेणिजति आसुरीं जनीं ।
आणि शौच तें स्वप्नीं । नेदखति ते ॥ ८२ ॥
कालिमा सांडील कोलिसा । वर चोखि होईल वायसा ।
राक्षसु ही मांसा । विटों सके ॥ ८३ ॥
परि आसुरा प्राणियां । शूचि नाहिं धनंजया ।
पवित्रत्व जेवि भांडेया । मद्याचआ ॥ ८४ ॥
आणि वाढवितां विधिची आश । कां पाहांतां वडिलांची वास ।
आचरिजे हे भास । नेणति ते ॥ ८५ ॥
जैसें चरणें सेलियेचें । कां धावणें वारेयाचें ।
जळणें आगिचें । भले तेउतें ॥ ८६ ॥

तैसें पुढां सूनि शरीर । आचरति ते आसुर ।
सर्व्वेसिं कीर वैर । सदा चि तेयां ॥ ८७ ॥
नांगिया आपुलिया । विंचू करी गुतकुलिया ।
तरि साच बोलिया । बोलति ते ॥ ८८ ॥
अपानाचेनि तोंडें । जरि सुगंधा येणें घडे ।
तरि सत्य तेयां जोडे । आसुरांतें ॥ ८९ ॥

**असत्यमप्रतिष्ठंते जगदाहुरनीश्वरम् ॥**
**अपरस्परसंभूतं किमन्यत्कामहैतुकम् ॥ ८ ॥**

ऐसें ते न करितां कांहिं । आंगिं चि बोखटें पाहिं ।
आतां बोलती ते नवाई । सांघिजैल ॥ २९० ॥
यऱ्हविं कऱ्हेयाचा खांदु चांग । मग येर काइ आंग ।
परिस जो प्रसंग । प्राप्ती कीं ॥ ९१ ॥
उधधिचें तोंड । उगलीत धूमाचे उभड ।
हें जाणिजे तऱ्हीं उघड । सांघों ते बोल ॥ ९२ ॥
तरि विश्व हा अनादि ठावो । एथ नियंता ईश्वरु राउ ।
चाउडिये न्यायान्याउ । निवडी वेदु ॥ ९३ ॥
वेदें अन्यायीं पडे । तें निरयभोगें दंडे ।
सन्यायी तो सुरवाडे । स्वर्गीं जिये ॥ ९४ ॥
ऐसी विश्ववेवस्था । अनादि जे पार्था ।
ते ह्मणति तें वृथा । आघवें हें ॥ ९५ ॥
यज्ञमूढ मुसिले यागीं । देवपिंसे प्रतिमे लागि ।
नागविले भगवे योगी । समाधिभ्रमें ॥ ९६ ॥
एथ आपुलेनि बळें । भोगिजे जें वेगळें ।
हें वांचौनि नीकें आगळें । शून्य आहे ॥ ९७ ॥
ना असक्तपणें अंगिकें । वेगळ वेंटाळी न टके ।
ऐसा गादिजे दुःखें । तें चि पाप ॥ ९८ ॥

प्राण घेति संपन्नाचे । तें पाप जरि साचें ।
तरि सर्वस्व तेयाचें । हें पुण्यफल किं ॥ ९९ ॥
बली अबलातें खाये । हें चि बाधितें होये ।
तरि मासेया कां नोहे । निसंतान ॥ ३०० ॥
कुलें शोधूनि दोन्हि । कुमारें चि सुलग्नीं ।
मेळविलीं प्रजासाधनीं । हेतु जरि ॥ १ ॥
तरि पशुपक्षादि जाती । तेयां मीति नाहिं संतती ।
तेयां कोणीं प्रतिपत्ती । विवाह केले ॥ २ ॥
चोरियेचें धन आलें । तें कोणासि विष जालें ।
वालभाचिये रती जालें । कोढी कोण ॥ ३ ॥
ह्मणौनि देवो गोसांविं । तो धर्माधर्म भोगवी ।
आणि परत्राचां गाविं । करि तो भोगी ॥ ४ ॥
तरि परत्र ना देवो । न दिसति ह्मणौनि वावो ।
आणि करितां निमे ठावो । मा भोगी कोणु ॥ ५ ॥
येथ उर्वसिया इंद्र सुखी । जैसा कां स्वर्गलोकीं ।
तैसा क्रिमि नरकीं । लोलतु श्लाघ्यें ॥ ६ ॥
ह्मणौनि नरकु स्वर्गु । नोहे पुण्यपापभागु ।
जें दों ठांइं भोगु । कामा चि तव ॥ ७ ॥
या कारणें कामें । स्त्रीपुरुषयुग्में ।
मिलति तेथ जन्मे । आघवें जग ॥ ८ ॥
आणि निजें अभिलाखें । स्वार्था लागलें हें पोखे ।
पाठिं परस्परद्वेषें । कामु चि नाशी ॥ ९ ॥
एवं कामु वांचूनि काहीं । जगा मूळ चि आन नाहिं ।
ऐसें बोलति ते पाहीं । आसुर गा ॥ ३१० ॥
आतां असो हें कीडाळ । बोलिं न करुं पघळ ।
सांघतां चि सपोल । होतसे वाचा ॥ ११ ॥

आणि ईश्वराचिया खेती । नसुदिया करिति चांथी ।
हें इं नाहिं चित्तीं । हा चि निश्चयो ॥ १२ ॥
किंबहुना उवड । आंगिं भरूनि पाखांड ।
नास्तिपणाचें हाड । रोविलें जीभे ॥ १३ ॥
तेथवां स्वर्गा लागि आदरु । कां नरकाचा अडदरु ।
ये वासनेचा अंकुरु । जळौनि गेला ॥ १४ ॥

**एतां दृष्टिमवष्टभ्य नष्टात्मानोल्पबुद्धयः ॥**
**प्रभवंत्युग्रकर्माणः क्षयाय जगतोहिताः ॥ ९ ॥**

मग केवळ ये खोडां । अमेध्योदकाचा बुडडा ।
विषइं चि सुहाडा । बुडाले गा ॥ १५ ॥
जैं आटावे जळचर । तैं डोहिं मिळति ढिवर ।
कां पडावें शरीर । तैं रोगां उदयो ॥ १६ ॥
उदैलें केतुचें जैसें । विश्वा अनिष्टा चि दोसें ।
ते जन्मति ते तैसे । लोकां आटु ॥ १७ ॥
विरूढलेयां अशुभ । फूटति ते चि कोंभ ।
पापाचे कीर्तिस्तंभ । चालते ते ॥ १८ ॥
आणि मागां पुढां जाळणें । वांचूनि आगि आन नेणे ।
तैसें विरुं चि करणें । आथि तेयां ॥ १९ ॥
परि तें चि गा करणें । आदरीति संभ्रमें जेणें ।
तो आइक पार्था ह्मणे । श्रीनिवासु ॥ ३२० ॥
तरि जाळ पाणियें न भरे । इंधनीं आगि न पुरे ।
तेया दुर्भर चि धूरे । मुख जालें ॥ २१ ॥

**काममाश्रित्य दुष्पूरं दंभमानमदान्विताः ॥**
**मोहाद्गृहीत्वासद्ग्राहान्प्रवर्त्तंते शुचिव्रताः ॥ १० ॥**

तैं या कामाचा उ्ल्लावा । जीविं धरुनि पांडवा ।
दंभमानाचा मेळावा । मेळवीति ॥ २२ ॥

मातलेया कुंजरा । आगली जाली मदिरा ।
तैसा मदाचा तुवं जरा । चढत आंगीं ॥ २३ ॥
आणि आग्रया तो चि ठाउ । वरि मौढ्य ऐसा सावाउ ।
मग काइ वानूं निर्वाहो । निश्चयाचा ॥ २४ ॥
जिहिं परोपतापु घडे । परावा जीउ रगडे ।
तिहिं कर्मि होउनि गाढे । जन्मव्रती ॥ २५ ॥
आपुलें केलें फोकरिति । जगातें धिकरिति ।
दाहें दिशीं पसरिति । स्पृहाजाल ॥ २६ ॥
ऐसेनि गा आटोपें । थोरिये आणिति पापें ।
धर्मधेनु खुरपें । सूटलें जैसें ॥ २७ ॥

**चिंतामपरिमेयां च प्रलयांतामुपाश्रिताः ॥**
**कामोपभोगपरमा एतावदिति निश्चिताः ॥ ११ ॥**

इया एकी आइती । तेयाचिया कर्मप्रवृत्ती ।
आणि जीणेयां परौती । वाहाति चिंता ॥ २८ ॥
पाताल होंनि निम्न । जिये उंचिये सानें गगन ।
जें पाहांतां त्रिभुवन । अणु हीं नोहे ॥ २९ ॥
ते योगपटाची मवणी । जीविं अनियम चिंतवणी ।
जें सांडूं नेणे मरणीं । वल्लभा जैसी ॥ ३३० ॥
तैसी चिंता अपार । वाढवीति निरंतर ।
दीठि सूनि असार । विषयादिक ॥ ३१ ॥
स्त्रिया गाइलें आइकावें । स्त्रीरूप डोलां देखावें ।
सर्वइंद्रियें हिं आश्लेषावें । स्त्रियातें चि ॥ ३२ ॥
कुरवंडी कीजे अमृतें । ऐसें सुख स्त्रिये परौतें ।
नाहिं चि ह्मणौनि चित्तें । निश्चित जालें ॥ ३३ ॥
मग तेया चि स्त्रीभोगा । लागि पातालस्वर्गा ।
धावंति दिग्विभागा । परौतें हीं ॥ ३४ ॥

**आशापाशशतैर्बद्धाः कामक्रोधपरायणाः ॥**
**ईहंते कामभोगार्थमन्यायेनार्थसंचयान् ॥ १२ ॥**

एकु कवलु बहुतीं मासां । तोंडुनु नेयिजे जैसा ।
तैसें चि कीजे विषयाशा । तेयासि चि गा ॥ ३५ ॥
वांछित तवं न पवति । मा रोकडी चि आशसंतति ।
वाढौ वाढौं होंति । कोशकीट ॥ ३६ ॥
आणि पसरला अभिलाखु । अपूर्ण तो चि होये द्वेखु ।
एवं कामक्रोधांचा अधिकु । पुरुषार्थु नाहीं ॥ ३७ ॥
दिहा खोलणें रात्रीं जागोवा । ठाणांतरिया जैसा पांडवा ।
अहोरात्रिं विसांवां । भेटे चि ना ॥ ३८ ॥
तैसें उंचौनि लोटिलें कामें । नेहटित क्रोधाचिये द्रुमे ।
तेथ रागद्वेष प्रेमें । न माति केहीं ॥ ३९ ॥
तेवि चि जीविचेया हांवां । विषयवासनांचा मेळावा ।
केला परि तो भोगावा । अर्थें किं ना ॥ ३४० ॥
ह्मणौनि भोगावेया जोगा । पूर्त्ता अर्थु पैं गा ।
आणावेया जगा । झोंबति सैरा ॥ ४१ ॥
एकांतें सावधां मारीति । एकांचीं सर्वस्वें हरीति ।
एकां लागि उभारिति । अपाययंत्रें ॥ ४२ ॥
पाशिकें पोतीं वागुरा । सूणे ससाणे काठी सोंचारा ।
घेउनि निगति डोंगरा । पारधी जैसे ॥ ४३ ॥
तें पोसावेया हें पोट । मारुनि प्राणियांचे संघाट ।
आणिति ऐसें निकृष्ट । तें हिं करिति ॥ ४४ ॥
परप्राणघातें । मेळवीति वित्तें ।
मिळलेयां चित्तें । तोखणें कैसें ॥ ४५ ॥

**इदमद्य मया लब्धमिमं प्राप्स्ये मनोरथम् ॥**
**इदमस्तीदमपि मे भविष्यति पुनर्धनं ॥ १३ ॥**

ह्मणे आजि मियां । संपत्ति बहुतां एकाचिया ।
आपुलिया होंतिया केलिया । धन्यु ना मीं ॥ ४६ ॥
ऐसा श्लाघों जवं जाये । तवं मन आणिका हिं वाहे ।
सवें चि ह्मणे पाहे । बहू चि आणूं ॥ ४७ ॥
हें जेतुलें असे जोडलें । तेयाचेनि भांडवलें ।
लाभा घेईन उरलें । चराचर ॥ ४८ ॥
ऐसेनि धनें विश्वाचेयां । मीं चि होईन स्वामियां ।
मग दीठि पडे तेयां । उरों नेंदी ॥ ४९ ॥

**असौ मया हतः शत्रुर्हनिष्ये चापरानपि ।**
**ईश्वरोऽहमहं भोगी सिद्धोऽहम् बलवान्सुखी ॥ १४ ॥**

हे मारिले ते थोडे । आणिक ही साधीन गाढे ।
मग नांदैन पवाडें । एकला चि ॥ ३५० ॥
माझीं होंति कामारीं । तियें वांचौनि येरें मारीं ।
किंबहुना चराचरीं । ईश्वरु मीं ॥ ५१ ॥
मीं भोगभूमीचा राऊ । आजि सर्व सुखांसि ठाऊ ।
ह्मणौनि इंद्र वावो । मातें पाउनि ॥ ५२ ॥
मीं मनें वाचा देहें । करि तें कें नोहे ।
मज वांचूनि आहे । आनु आज्ञासिद्धु ॥ ५३ ॥
तवं चि बलिया कालु । न दिसे जवं मीं अतुलु ।
सुखाचा किर निखलु । राशी चि मीं ॥ ५४ ॥

**आढ्योऽभिजनवानस्मि कोऽन्योऽस्ति सदृशो मया ॥**
**यक्ष्ये दास्यामि मोदिष्य इत्यज्ञानविमोहिताः ॥ १५ ॥**

कुबेरु आथिला होए । परि तो नेणे चि माझी सोये ।
संपत्ति माझीं नोहे । श्रीनिवासु ॥ ५५ ॥
माझेया कुलाचा उजालु । कां ज्ञातिगोत्राचा मेलु ।
पाहांतां ब्रह्मा हिं अल्प । उणा चि दीसे ॥ ५६ ॥

म्हणौनि मिरवति नावें । नाहिं मजसिं सरि पावे ।
वायां ईश्वरादिकें सावें । तैसें कोण्हीं ॥ ५७ ॥
आतां लोपला अभिचारु । तेया करीन जीर्णोद्धारु ।
प्रतिष्ठीन मरमारु । याग वारि ॥ ५८ ॥
मातें गांती वानिती । नाचें नटें रिझविती ।
तेयां देईन मागती । ते ते वस्तु ॥ ५९ ॥
माजिरां अन्नपाणीं । प्रमदाचां आलिंगनीं ।
होईन मीं त्रिभुवनीं । आनंदकरु ॥ ३६० ॥
कायि बहू सांघों ऐसे । ते आसुर प्रकृतिपींसे ।
तुरंबित असौसें । गगनौलेयां ॥ ६१ ॥

**अनेकचित्तविभ्रांता मोहजालसमावृताः ॥**
**प्रसक्ताः कामभोगेषु पतंति नरकेशुचौ ॥ १६ ॥**

अज्ञानें आंतलें धूळि । म्हणौनि आशा वाहुंटली ।
भवंडित अंतरालीं । मनोरथाचां ॥ ६२ ॥
जराचेनि आटोपें । रोगी भलेतैसें जल्पे ।
चंवळित संकल्पें । जाण तैसें ॥ ६३ ॥
अनिम आखाडमेव । कां समुद्रोर्मि अभंग ।
तैसे कामीति अनेग । अखंड हे ॥ ६४ ॥
मग पैं कामना तिया । जिवीं जाले वेलरिया ।
चोरपिलीं कांटिया । कमळें जैसीं ॥ ६५ ॥
कां पाखाणाचां माथां । हांडी फूटली पार्था ।
जीविं तैसे सर्वथा । कूट जाले ॥ ६६ ॥
तेव्हां चडतिये रयणीं । तमाची होये पुरवणी ।
तैसा मोहो अंतष्करणीं । वाढों लागे ॥ ६७ ॥
आणि वाढे जवं मोहो । तवं तवं विषइं रोहो ।
विषय तेथ ठावो । पातकांसि ॥ ६८ ॥

पापें आपुलेन थावें । करितिं जन्ममेळावे ।
तवं जिंतां चि आघवे । यंति नरका ॥ ६९ ॥
ह्मणौनि गा सुमती । हे कुमनोरथ पाळिति ।
ते आसुर जांति । तेया ठाया ॥ ३७० ॥
जेथ असीपत्र तरुवर । खदिरांगाराचे डोंगर ।
तातलां तेलीं सागर । उततातिं ॥ ७१ ॥
जेथ यातनेची श्रेणी । ये तरि जांत वैतरणी ।
पडति तिये दारुणीं । नरकलोकीं ॥ ७२ ॥
ऐसे नरकाचिये सेले । भागीन जे जन्मले ।
ते ही देखों भूलले । जैत यागीं ॥ ७३ ॥

**आत्मसंभाविता स्तब्धा धनमानमदान्विताः ॥**
**यजंते नाम यज्ञैस्ते दंभेनाविधिपूर्वकम् ॥ १७ ॥**

यन्हविं यागादिकीं क्रिया । आहाण ते चि धनंजया ।
परि विपुळांति आचरौनियां । नाटकी जैसे ॥ ७४ ॥
बाळभाचिया उजरिया । आपणेयां प्रति कुस्त्रिया ।
जोडूनि तोखविति जैसिया । ऐहेवपणे ॥ ७५ ॥
तैसे आपणेयां आपण । मानितां महंतपण ।
फुगे असाधारण । गर्वें तेणें ॥ ७६ ॥
मग लवों नेणति कैसे । आटिंवं लोहखांब जैसे ।
कां उधवली आकाशें । शिळाराशि ॥ ७७ ॥
तैसें आपुलिये बरवे । आपण चि रिझति जीवें ।
तृणाहूनि आघवें । मानिति नीच ॥ ७८ ॥
वरि धनाचिया मदिरा । माजौनि धनुर्द्धरा ।
कृत्याकृत्यविसरा । सवते केले ॥ ७९ ॥
जें आंगिं आइति ऐसी । तेथ यज्ञाची गोठि कायिसी ।
तन्हीं काइ काइ पीसीं । न करिति गा ॥ ३८० ॥

ह्मणौनि कोण्हें येकें वेळें । मौढ्यमदाचेनि बळें ।
यागाचें हिं टवाळें । आदरीति ॥ ८१ ॥
ना कुंडें मंडप वेदी । कां उचितसाधनसमृद्धी ।
आणि तेयांसी चि तवं विधि । दंद चि किर ॥ ८२ ॥
देवांब्राह्मणाचेनि नावें । तेउते वारेन हीं नोहावे ।
ऐसें तेथ देयावें । लागैल कवणां ॥ ८३ ॥
पैं वांसुरुवांचा भोकसा । गायी पुढां ठेउनि जैसा ।
उगाणा घेंति क्षीररसा । बुद्धिमंत ॥ ८४ ॥
तैसें यागाचेनि नावें । जगा वाउनि हांवे ।
नागवीति आघवें । ऐहेरा वाऱ्हीं ॥ ८५ ॥
ऐसा काहिं आपुलिया । होमीति जे उजरिया ।
तेणें कामिति प्राणियां । सर्वनाशु ॥ ८६ ॥

**अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं च संश्रिताः ॥**
**मामात्म परदेहेषु प्रद्विषंतोभ्यसूयकाः ॥ १८ ॥**

मग पुढां भेरी निसाण । लाउनि तैं दीक्षितपण ।
जगीं फोकरीति आग । वायों वायों ॥ ८७ ॥
तेधवां महत्वें तेणें अधमां । तेयां सगरवां हिं चढे महिमा ।
जैसे लेवे दीधले तमा । काजळाचे ॥ ८८ ॥
तैसे मौढ्य घणावे । अहंकारु दुणावे ।
औद्धत्वें उंचावे । अहंभाउ ॥ ८९ ॥
मग दुजेयाची भाक । नुरावेया निःशेष ।
बलियेपणें आणिक । होये बळ ॥ ३९० ॥
ऐसा अहंकारा बळा । जालेयां एकवळा ।
दर्पसागरु वेळा । सांडुनि उते ॥ ९१ ॥
मग बोसंडलेनि दर्पें । कामां हिं पीत्त कुरुपे ।
तेया धगी सैघ पलिपे । क्रोधाग्निची ॥ ९२ ॥

तेथ उन्हाळा आगे पुरा । तेलतूपाचेया घठारा । ४।
लागला आणि वारा । सूटला जैसा ॥ ९३ ॥
तैसा अहंकारु आलाबला । दर्पु कामक्रोधीं रूढला ।
एयां दोहींचा मेळा । जेयाचां ठांइं ॥ ९४ ॥
तो आपुलिया स्वैछा । मग कोणी कोणीं ठांइं हिंसा ।
यां प्राणियांतें वीरेषा । न सधीति गा ॥ ९५ ॥
पहिलें तवं धनुर्द्धरा । आपुलिया मांसा रुधिरा ।
वेचु करिति अभिचारा । लागौनियां ॥ ९६ ॥
-ज्वा तेथ जालितु तियें देहें । तेयां माझि मीं आहें ।
तेया आत्मेयां मज घाए । वाजति ते ॥ ९७ ॥
आणि अभिचारिकिं तिहीं । उपद्रवीति जेतुलें काहीं ।
चैतन्य मीं चि पाहिं । सीणु पावें ॥ ९८ ॥
ऐसें अभिचारा वेगळें । विपायें जें अवगळे ।
ते टाकीति एटाळें । पैशून्याचिं ॥ ९९ ॥
सतिया संतपुरुष । दानशील याज्ञिक ।
तपस्वी अलौलिक । सन्यासी जे ॥ ४०० ॥
कां भक्त ज्ञान महात्म्ये । तियें माझीं निजधामें ।
निर्वाळलीं होमें धर्में । श्रौतादिकीं ॥ १ ॥ ...
तेया द्वेषाचेनि काळकूटें । बासटूनि तीखटें ।
कुबोलाचिं सदटें । सिंथिति कांडें ॥ २ ॥

**तानहं द्विषतः क्रूरान्संसारेषु नराधमान् ॥**
**क्षिपाम्यजस्रमशुभानासुरीष्वेवयोनिषु ॥ १९ ॥**

ऐसें आघवेया चि परीं । प्रवर्त्तले माझां वैरीं ।
तेयां पापियां मीं करी । तें आइक पां ॥ ३ ॥
तरि मनुष्यदेहाचा तागा । घेउनि रुसति जगा ।
ते पदवी हिरौनि पैं गा । ऐसे ठेवीं ॥ ४ ॥

क्लेशगावींचां उकरडां । भवपुरिचां पाणवाडां ।
ते तमोयोनि तेयां कुडां । वृत्ति मीं दें ॥ ५ ॥
मग आहाराचेनि नावें । तृण हीं जेथ नुगवे ।
ते व्याघ्र वृक अडवे । तैसियां करिं ॥ ६ ॥
तेथ क्षुधादुःखें बहुतें । तोडुनि खांतां आपणपेयांतें ।
मरों मरों माघौते । होंते चि असति ॥ ७ ॥
कां आपुलां गरलज्वाळीं । जाळीं तेयां आंगाचिं पेंदळीं ।
ते सर्प चि करीं बिळीं । निरुंधलां ॥ ८ ॥
परि घेउनि श्वासु घापे । येतुलेन हिं मापें ।
विसांवां तेयां लिपे । अर्जुना गा ॥ ९ ॥
ऐसेनि कल्पांचिया कोडी । गणितां हीं संख्या थोडी ।
तेतुला वेळु न कढीं । क्लेशौनि तेयां ॥ ४१० ॥
तऱ्हीं तेयां जेथ जाणें । तेथिचें हें पहिलें पेणें ।
ते पाहुनु यें दारुणें । नव्हंति दुःखें ॥ ११ ॥

**आसुरीं योनिमापन्ना मूढा जन्मनि जन्मनि ॥**
**मामप्राप्यैव कौंतेय ततो यांत्यधमां गतिम् ॥ २० ॥**

हा ठाउ॰ वेन्हीं घरीं । संपत्ति ते आसुरी ।
अधोगति अवधारिं । जोडिली तिहीं ॥ १२ ॥
पाठिं व्याघ्रादि तामसा । योनि तो अल्पमाल्प ऐसा ।
देहाधाराचा उसासा । आथि जो हा ॥ १३ ॥
तो ही मीं वोलावा हिरें । मग तम चि होंति यकसरें ।
तेथ गेलें आंधारें । काळवंडिजे ॥ १४ ॥
जेयाचिया चिळसी । नरक घेंति विवसी ।
सीणु जाये मूसीं । साणे जेणें ॥ १५ ॥
मळु जेणें मैळे । तापु जेणें पोळे ।
जेयाचेनि नावें सळे । महाभय ॥ १६ ॥

ऐसे विश्वाचेया खटेया । अधम जे धनंजया ।
ते ते होंति भोगावेया । तामसा योनी ॥ १७ ॥
आहा सांवतां वाचा रडे । आटवितां मन खिरडे ।
कट रे मूर्खि केवडें । जोडिलें होणें ॥ १८ ॥
काइसेया ते आसुर । संपत्ति जोडावी वाउर ।
जिया दीधलें थोर । पतन ऐसें ॥ १९ ॥
ह्मणौनि तुवां धनुर्द्धरा । न व्हावें गा तिया मोहरा ।
जेउता वासु असुरा । संपत्तिवंतां ॥ ४२० ॥

**त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः ॥**
**कामः क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्त्रयं त्यजेत् ॥२१॥**

आणि दंभादि दोष साई । हे संपूर्ण जेयाचां ठांइं ।
ते त्यजावें हें चि काई । ह्मणों किर ॥ २१ ॥
परि काम क्रोध लोभ । येयां तिहींचें बिंब ।
थांवे तेथ अशुभ । प्रकाशलें जाण ॥ २२ ॥
सर्वदुःखा आपुलेया । दर्शन धनंजया ।
पाढाउ भलेया । दिधलें आथि ॥ २३ ॥
कां पापिया नरकभोगीं । सुत्रावेया लागि जगीं ।
पातकांची दाटुगी । सभा चि हे ॥ २४ ॥
ते रौरव गा तवं वेरि । आइकिजति गा अपटांतरीं ।
जवं तीन्हीं अंतरीं । उठीति नां हे ॥ २५ ॥
अपायें येणें आसलग । यातना इहिं सवंघ ।
हाणि हाणि नोहे तीव । हे चि हाणी ॥ २६ ॥
काइ बहू बोलों सूभटा । सांवितलेयां निकृष्टां ।
नरकाचा दारवठा । त्रिसांकु हा ॥ २७ ॥
ययां कामक्रोधां लोभां । माजि जीवें जो होये उभा ।
तो निरयपुरिची सभा । पातला जाण ॥ २८ ॥

ह्मणौनि पुडुतीं किरीटी । हे कामादिदोषत्रिपुटी ।
त्यजावी गा वोखटी । आघवां विखीं ॥ २९ ॥

**एतैर्विमुक्तः कौंतेय तमोद्वारैस्त्रिभिर्नरः ॥**
**आचरत्यात्मनः श्रेयस्ततो याति परां गतिम् ॥ २२ ॥**

धर्मादिक चहूं आंतु । पुरुषार्थांची तैं चि मातु ।
करावी जैं सांघातु । सांडील हा ॥ ४३० ॥
हे तीन्ही जिवीं जागती । आणि निकेयाचि प्राप्ति ।
हे माझे कान नाइकती । देवो ह्मणे ॥ ३१ ॥
जें आपणपें पढिये । आत्मनाशा जो भिये ।
तें तेणें न धरावी सोये । निश्चयेंसीं ॥ ३२ ॥
पोटीं बांधौनि पाखाण । समुद्रिं बाहिं आंगवण ।
कां जियावेया जेवण । काळकूटाचें ॥ ३३ ॥
इहीं कामक्रोधलोभेंसीं । कार्यें सिद्धति तैसीं ।
ह्मणौनि ठावो चि पूसीं । येयांचा गा ॥ ३४ ॥
जैं काहीं अवचटें । हे तिकडी सांखळ फीटे ।
तैं सुखें आपुलिये वाटे । चालों लाभे ॥ ३५ ॥
त्रिदोषीं सांडिलें शरीर । त्रिकुटी फीटलेयां नगर ।
दोष त्रिदाघ निमालेयां अंतर । जैसें होए ॥ ३६ ॥
तैसा कामादिकिं तिघीं । सांडिला सुखा पावे जगीं ।
संगु लाहे मोक्षमार्गीं । सज्जनाचां ॥ ३७ ॥
मग सत्संगें प्रबळें । सत्शास्त्राचेनि बळें ।
जन्ममृत्युचिं निमाळें । निस्तरे रानें ॥ ३८ ॥
तेव्हां आत्मानंदें आघवें । जे सदा वसतें बरवें ।
तें तैसें चि पाटण पावे । गुरुकृपेचें ॥ ३९ ॥
तेथ प्रियाची पैली सीमा । ते भेटे माउली आत्मा ।
क्षेमीं तिये क्षेवीं खाटे डिंडिमा । संसारिक हे ॥ ४४० ॥

जो कामक्रोधलोभां । झाडि करुनि ठाके उभा ।
तो एवडेया येया लाभा । गोसांवि होए ॥ ४१ ॥

**यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः ॥**
**न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम् ॥ २३ ॥**

ना हें नावडौनि काहीं । कामादिकाचां ठांइं ।
दाटिलें जेणें डोईं । आत्मचोरें ॥ ४२ ॥
जो जगीं समान सकृपु । हिताहितु दाविता दीपु ।
तो अमान्यु केला बापु । वेदु जेणें ॥ ४३ ॥
न धरी चि विधिची भीड । न करि चि आपुली चाड ।
वाढवीतु गेला कोड । इंद्रियांचें ॥ ४४ ॥
कामक्रोधलोभाची कास । न सोडी चि पालिली भास ।
स्वैराचाराचें असोस । रान रिगाला ॥ ४५ ॥
संसारबंधु जाये । हें किर तेयाचें कें आहे ।
परि तो इहिकीं न लाहे । विषय भोगूं ॥ ४६ ॥
ते सूटिकेचिया वाहाणी । मग पियों न लाहे पाणी ।
स्वप्नीं हीं ते काहाणीं । दूरी चि तेया ॥ ४७ ॥
तरि मांसा लागि भूलला । ब्राह्मणु पाणवाडां रिगाला ।
किं तेव्हां चि तेथ लागला । आगि जैसा ॥ ४८ ॥
तैसें विषयांचेनि कोडें । जेणें परत्रा केलें उबडें ।
तवं तो चि आनी कडे । मरणें नेला ॥ ४९ ॥
एवं परत्र ना स्वर्गु । इहिक ना विषयभोगु ।
तेथ केउता प्रसंगु । मोक्षाचा तो ॥ ४५० ॥
म्हणौनि कामाचेनि बलें । विषयो चरों पाहे ढालें ।
तेया विषयो ना स्वर्गु मिळे । ना उद्धरे तो ॥ ५१ ॥

**तस्मात् शास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ ॥**
**ज्ञात्वा शास्त्रं विधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि ॥ २४ ॥**

या कारणें पैं बापा । जेया आपुली आथि कृपा ।
तेणें वेदांचेया निरोपा । आन न कीजे ॥ ५२ ॥
पतिचेया व्रता । अनुसरे पतिव्रता ।
अनायासें आत्महिता । भेटे जेवि ॥ ५३ ॥
नातरि श्रीगुरुवचना । दीठि देंतु जतना ।
शिष्यु आत्मभवना । माझि पैसे ॥ ५४ ॥
हें असो आपुला ठेवा । जरि हाता आथि यावा ।
तरि आदरें जेवि दीवा । पुढां कीजे ॥ ५५ ॥
तैसा अशेषां पुरुषार्थां । जो गोसांवि हों ह्मणे पार्था ।
तेणें श्रुती स्मृती माथा । बैसों थापे ॥ ५६ ॥
शास्त्र ह्मणैल सांडावें । तें राज्य ही तृण मानावें ।
जें वेववि तें न मनावें । विष ही वीरुं ॥ ५७ ॥
ऐसी वेदैक निष्ठा । जालेयां सूभटा ।
तरि कें आहे अनिष्टां । भेटणें गा ॥ ५८ ॥
पैं अहिता पासौनि काढिती । हित देउनि वाढविती ।
नाहिं श्रुती परौती । माउली जगीं ॥ ५९ ॥
ह्मणौनि ब्रह्मेंसि मेळवी । तवं हे कोण्हीं न संडावी ।
अगा तुह्मां ऐसां भजावीं । विशेषेंसीं ॥ ४६० ॥
जें आजि तूं अर्जुना एथें । करावेया शास्त्रें सार्थें ।
जन्मलासि ब्रलार्थें । धर्माचेनि ॥ ६१ ॥
आणि धर्मा अनुज हि ऐसें । हें बोधें चि आलें पैसें ।
ह्मणौनि अतारिसें । करुं न ये ॥ ६२ ॥
कार्याकार्यविवेकीं । शास्त्रें चि करावी पारखी ।
अकृत्यत्व तें कुडें लोकीं । वाळावें गा ॥ ६३ ॥
मग कृत्यपणें खरें निगे । ते तुवां आपुलेनि आंगें ।
आचरौनि आदरें चांगें । सारावें चि ॥ ६४ ॥

जे विश्वप्रमाणिची मुदी । आजि तूझां हातीं सुबुद्धी ।
लोकसंग्रहाची त्रिशुद्धी । योग्यु होंसी ॥ ६५ ॥
एवं आसुरवर्गु आववा । सांघोनि तेथिचा निगावां ।
तो ही देवें पांडवा । निरोपिला ॥ ६६ ॥
या वरि तो पांडुचा । कुमरु भाऊ जीवाचा ।
पूसेल तें चैतन्याचां । कानीं आइकां ॥ ६७ ॥
संजयें व्यासाचेया निरोपा । तो वेलु फेडिला तेया नृपा ।
तैसा मी हीं निवृत्तिकृपा । सांघैन तुझां ॥ ६८ ॥
तुह्मीं संत माझिया कडा । दीठिचा कराल बहु वाडा ।
तरि तुह्मां मानें येवढा । होईन मीं ॥ ६९ ॥
ह्मणौनि निज अवधान । मज ऊलगे पसायदान ।
दीजो जी क्षमीं होईन । ज्ञानदेऊ ह्मणे ॥ ४७० ॥

ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां
योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे **दैवासुरविभागयोगो**
नाम षोडशाध्यायः ।

श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ छ ॥



# ज्ञानेश्वरी

## अध्याय सतरावा

**श्रीगणनाथायनमः ॥**

विश्वविकासिनी मुद्रा । जेया सांडे तूझी निद्रा ।
तेया नमो जी गणेंद्रा । गुरु तुज ॥ १ ॥
त्रिगुणत्रिपुरीं वेढिला । जीवत्वदुर्गें अडिला ।
तो आत्माशंभु सोडिला । तूझिया स्मृती ॥ २ ॥
म्हणौनि शिवेंसिं कांटाला । गुरुत्वें तूं चि आगला ।
तऱ्हीं हल्ह मायाजाला । माजि तारिता ॥ ३ ॥
जे तूझां विषीं मूढ । तेयां लागि तुं वक्रतुंडु ।
ज्ञानियां तरि अखंडु । उजु चि असिस ॥ ४ ॥
दैविकी दीठि पांतां सानीं । तऱ्हीं निमिलोन्मीलनीं ।
जगा आदि प्रलयो दोन्हीं । लीला चि करिसी ॥ ५ ॥
प्रवृत्तिकरणाचां चाली । उठिलीं मदाचां गंधानीलीं ।
पूजिजासि नीलोत्पलीं । जीवभृंगाचां ॥ ६ ॥
पाठिं निवृत्तिकर्णतालें । अहलि तें पूजा विधुलें ।
तेन्हलें मिरविसि मोकलें । आंगाचें लेणें ॥ ७ ॥
वामांगिचा लास्यविलासु । जो हा जगद्रूपु आभासु ।
तो तांडवमीषें कळासु । दावीसी तूं ॥ ८ ॥

हें असो विस्मो दातारा । तूं होसि जेयांचा सोयरा ।
सोइरिकेचिया वेव्हारा । मूंके चि तो ॥ ९ ॥
फेडितां बंधनाचा ठाऊ । तूं जगद्बंधु ऐसा आहो ।
धरूं बोलणे उवाऊ । तूझां चि आंगीं ॥ १० ॥
दूजेयाचेनि नावें तेया । देह ही नूरे चि राया ।
जाणों आपणपेंयां । केलासि दूजा ॥ ११ ॥
तूतें करुनि पुढें । जे उपायें घेति दवडे ।
तेयां ठाकसि बहुवें पाडें । मागां चि तूं ॥ १२ ॥
जो ध्यानें सुयें मानसीं । तेया लागि तूं नाहिं देशीं ।
ध्यानें चि सरे तेणेंसीं । वालभ तुज ॥ १३ ॥
तूतें सावध चि जो नेणे । तो नांदे सर्वज्ञपणें ।
वेदां हिं येवडें बोलणें । नेघसि कानीं ॥ १४ ॥
मौन गा तूझें राशिनावं । आतां स्तोत्रिं कें भांजे हावं ।
दीससि तेतुली भाव । भजों कायि ॥ १५ ॥
दैविकें सेवक हों पाहों । तरि भेदितां द्रोहो लाहों ।
ह्मणौनि आतां काहिं चि नोहों । तुज लागि जी ॥ १६ ॥
जैं सर्वथा सर्व ही नोहिजे । तैं अद्वया तूतें लागिजे ।
हें जाणें मीं वर्म तूझें । आराध्यलिंगा ॥ १७ ॥
तरि नूरौनि वेगळेपण । रसिं भजिनलें लवण ।
तैसें नमन माझें जाण । बहू कायि बोलों ॥ १८ ॥
आतां रीता समुद्रीं रिगे । तो उचंबलतु कुंभु निगे ।
कां दसी दीपा संगें । दीपू चि होए ॥ १९ ॥
तैसा तूझेया परिणती । मीं पूर्णु जाला श्रीनिवृत्ती ।
आतां आणीन व्यक्ती । गीतार्थु तो ॥ २० ॥
तरि षोडशाध्याइं शेखीं । तिये समाप्तिचां श्लोकीं ।
जो ऐसा निर्णयो निष्टंकीं । केला देवें ॥ २१ ॥

जें कृत्याकृत्यव्यवस्था । अनुष्ठावेया पार्था ।
शास्त्र चि एक सर्वथा । प्रमाण तुज ॥ २२ ॥
तेथ अर्जुनु ह्मणे मानसें । हें ऐसें कैसें ।
जें शास्त्रें विण नसे । सूटिका मां ॥ २३ ॥
तरि तक्षकाची फडे । टाकूनि कैं तें माणिक काढे ।
कैं नाकिचा केंसु जोडे । सिंहाचिये ॥ २४ ॥
मग तेणें तो वोविजे । तरी चि लेणें पाविजे ।
यऱ्हविं काइ असिजे । रिक्तकंठां ॥ २५ ॥
तैसि या शास्त्रां मोकली । इया कैं वेंटाली ।
जे येकवाक्यतेचां फलीं । पैसिजे कैं ॥ २६ ॥
जालेयां हिं येकवाक्यता । कां लाभे वेलु अनुष्ठितां ।
कैंचा पैसार जीविता । एतुलालेया ॥ २७ ॥
आणि शास्त्रें अर्थें देसें कालें । इंहिं चौंहिं एक जें फले ।
तें वावो किं कामिलें । आघवें चि ॥ २८ ॥
ह्मणौनि शास्त्राचें वडतें । नोहे प्रकारें बहुतें ।
तरि मूर्खां मुमुक्षां एथें । काइ गति ॥ २९ ॥
हा पूसावेया अभिप्राउ । अर्जुनु करील प्रस्ताउ ।
तो सतरावेया ठाउ । अध्याया येथ ॥ ३० ॥

**अर्जुन उवाच ॥**

**ये शास्त्रविधिमुत्सृज्य यजंते श्रद्धयान्विताः ॥**
**तेषां निष्ठा तु का कृष्ण सत्वमाहो रजस्तमः ॥ १ ॥**

तरि सर्वविषयिं वितृष्णु । जो सकलकालिं सनुष्णु ।
कृष्णा हिं नवल कृष्णु । अर्जुनत्वें जो ॥ ३१ ॥
शौर्यें जोडिला आधारु । जो सोमवंसिचा शृंगारु ।
सुखादिउपचारु । जेयाची लीला ॥ ३२ ॥

जो प्रज्ञेसि प्रियोत्तमु । विद्यांचा विश्रामु ।
सहचरु मनोधर्मु । देवांचा जो ॥ ३३ ॥
तो ह्मणे गा तमालश्यामा । इंद्रियां फावलेयां ब्रह्मा ।
तूझा बोलु येकु आह्मां । साकांक्षु पैं जी ॥ ३४ ॥
जे शास्त्रें वांचौनि आणिकें । प्राणियां स्वमोक्षु न देखे ।
ऐसें जें कैपक्षें । बोलिलें देवें ॥ ३५ ॥
तरि न मिळे चि तो देशु । नोहे चि काळ अवकाशु ।
जो करवि शास्त्राभ्यासु । तो ही दूरि ॥ ३६ ॥
अभ्यासीं विरजिया । होंति जिया सामग्रिया ।
तेया ही नाहिं आपैतिया । तेणें वेळें ॥ ३७ ॥
उजू नोहे चि प्राचीन । नेंदी चि प्रज्ञा संवाहन ।
ऐसें ठेलें आपादान । शास्त्रांचें जेया ॥ ३८ ॥
किंबहुना शास्त्रविखि । एकि ही न लाहांती चि नाखी ।
ह्मणौनि उखीविखी । सांडिली जिहिं ॥ ३९ ॥
परि निर्द्धारुनि शास्त्रें । अर्थानुष्टानें पवित्रें ।
नांदताति पुरत्रें । आचारें जे ॥ ४० ॥
तेयां ऐसें आह्मिं होआवें । ऐसी चाड बांधौनि जीवें ।
घेंति तेयाचे मागावे । आचरावेया ॥ ४१ ॥
घडेयांचेयां आखरा । तळिं बाळ लिहे दातारा ।
कां पुढां सूनि काठिकारा । अक्षमु चाले ॥ ४२ ॥
तैसें सर्वशास्त्रनिपुण । तेयांचें जें आचरण ।
तें चि करीति प्रमाण । आपुलिये श्रद्धे ॥ ४३ ॥
मग शिवादिकें पूजनें । भूम्यादिकें महादानें ।
अग्निहोत्रादि यजनें । करीति जे श्रद्धा ॥ ४४ ॥
तरि तिया सत्वरजतमां । माजि कोणि पुरुषोत्तमा ।
गति होये ते आह्मां । सांडिजो जी ॥ ४५ ॥

**श्रीभगवानुवाच ॥**

**त्रिविधा भवति श्रद्धा देहिनां सा स्वभावजा ॥**
**सात्विकी राजसी चैव तामसी चेति तां शृणु ॥ २ ॥**

जो निगमपद्माचें पराग । जो वैकुंठपीठिचें लिंग ।
जिये जेयाचिया जग । अंगछाया ॥ ४६ ॥
काळु सवियां चि वाडु । लोकोत्तरु प्रौढु ।
अद्वितीयु गूढु । आनंदघनु ॥ ४७ ॥
इयें श्लाघ्यजती जेणें बीकें । जेयाचेनि आकाशअंग असिकें ।
तो श्रीकृष्णु स्वमुखें । बोलतुसे ॥ ४८ ॥
ह्मणे पार्था तूझा अतिसो । घेइं गा आह्मि जाणतसों ।
शास्त्रअभ्यासाचा आडसो । मानितोसि किं ॥ ४९ ॥
नसुदिया चि श्रद्धा । झोंबों पाहांसि परमपदा ।
तरि तैसें हें प्रबुद्धा । सोहपें नोहे ॥ ५० ॥
श्रद्धा ह्मणितलेया चि साठीं । पातिजों न ये किरीटी ।
कायि द्विजु अंत्यजुवृष्टी । अंत्यजु नोहे ॥ ५१ ॥
गंगोदक जऱ्हीं जालें । तऱ्हीं मद्यभांडां आलें ।
घेऊं ये काहिं केलें । विचारि पां ॥ ५२ ॥
चंदनु होये शीतळु । परि अग्निसिं पात्रे मेळु ।
तो हातिं धरिलेयां जाळुं । न शके काई ॥ ५३ ॥
कां कीडाचिये पुटीं । पडिलें सोने किरीटी ।
घेतलेयां सोळें साठिं । नागवी नां ॥ ५४ ॥
तैसें श्रद्धेचें दळवाडें । आंगें किर चोखडें ।
परि प्राणियां चांपडे । विभागें जैं ॥ ५५ ॥
आणि प्राणिये तव स्वभावें । अनादिमायाप्रभवें ।
गुणाचे चि आवबे । वळिले आथि ॥ ५६ ॥

तेथ ही दोनि गुण खंचति । मग एकु धरी उन्नती ।
तैं तैसी चि होति वृत्ति । जीवांचिया ॥ ५७ ॥
वृत्ती ऐसें मनीं धरिति । मना ये ऐसी क्रिया करिति ।
केलेयां ऐसें वरीति । मरौनि देह ॥ ५८ ॥
बीज मोडे झाड होये । झाड सुकलें बिजिं माये ।
ऐसेनि कल्पकोडी जाये । जाति न नशे ॥ ५९ ॥
तिया परिं इयें अपारें । होंत जांत जन्मांतरें ।
त्रिगुणत्व न व्यभिचरे । प्राणियांचें ॥ ६० ॥
म्हणौनि प्राणियांचां पैकीं । पडिली श्रद्धा अवलोकिं ।
होये गुणा सारिखी । तिहिं येयां ॥ ६१ ॥
विपायें वाढे सत्व शुद्ध । जेधवां ज्ञान चि करी सांध । २
परि येका दोनि वोखद । येर आहाति ॥ ६२ ॥
सत्वाचेनि आंगलगें । ते श्रद्धा मोक्षफला रिगे ।
तवं रजतम उगे । कां पां राहाति ॥ ६३ ॥
मोडूनि सत्वाची त्राये । रजोगुणु आकाशें जाये ।
तेव्हां ते चि श्रद्धा होये । कर्माची सुणी ॥ ६४ ॥
मग तमाची उठी आगि । तेधवां ते चि श्रद्धाभंगी ।
हों लागे भोगा लागि । भलेतेया ॥ ६५ ॥
एवं सत्वरजतमां । वेगळाली श्रद्धा सुवर्मा ।
नाहिं भूतग्रामां । माजि येयां ॥ ६६ ॥
म्हणौनि श्रद्धा स्वाभाविक । असे गुणत्रयात्मक ।
रज तम सात्विक । भेदिं इहिं ॥ ६७ ॥
जैसें जीवन चि उदक । परि विशिं होये मारक ।
कां मिरियां माजि तीख । उंसिं गोड ॥ ६८ ॥
तैसा बहुवसें तमें । जो सदा होये निमे ।
तेथ श्रद्धा परिणमे । तें चि होउनि ॥ ६९ ॥

*मग काजळा आणि मसि । न दिसे विवंचना जैसी ।
ते चि श्रद्धा तामसी । सिनानी नाहिं ॥ ७० ॥
तैसी चि राजसी जीविं । रजोमय जाणावी ।
सात्विकि आघवी । सत्वाचि चि ॥ ७१ ॥
ऐसेनि हा सकलु । जगडंबरु निखलु ।
श्रद्धेचा चि केवलु । वोतिला असे ॥ ७२ ॥
परि गुणत्रयवसें । त्रिविधपणांचें लासें ।
श्रद्धे जें उठिलें असे । तें चि वोळख ॥ ७३ ॥
तरि जाणिजे झाड फूलें । मानस जाणिजे बोलें ।
भोगें जाणिजे केलें । पूर्वजन्मिचें ॥ ७४ ॥
तैसिं जिहिं जिहिं चिन्हि । श्रद्धेचीं रूपें तिन्हीं ।
देखति ते वानी । अवधारि पां ॥ ७५ ॥

**सत्वानुरूपा सर्वस्य श्रद्धा भवति भारत ॥**
**श्रद्धामयो यं पुरुषे यो यच्छ्रद्धः स एव सः ॥ ३ ॥**

तरि सात्विकी श्रद्धा । जेयांचा होये बांधा ।
तेया बह्व करुनु मेधा । स्वर्गींची आथि ॥ ७६ ॥

**यजंते सात्विका देवान्यक्षरक्षांसि राजसाः ॥**
**प्रेतान्भूतगणां श्चान्ये यजंते तामसा जनाः ॥ ४ ॥**

ते विद्याजात पढति । यज्ञक्रिया निवडिति ।
किंबहुना पडति । देवपैंकिं ते ॥ ७७ ॥
आणि श्रद्धा राजसां । घडिजे वीरेशा ।
ते भजति राक्षसां । खेचरां हान ॥ ७८ ॥
जीववधें साधूनि बलि । भूतप्रेतकुळें मौली ।
श्मशानीं संध्याकाळीं । पूजिति जे ॥ ७९ ॥
ते तमोगुणाचें सार । काढूनि निर्मिले नर ।
जाण तामसियेचें घर । श्रद्धेचें तिये ॥ ८० ॥

ऐसां इहिं तिहिं लिंगिं । त्रिविध श्रद्धा जगिं ।
पैं हें इं यया लागि । सांघतसें ॥ ८१ ॥
जे हे सात्विक श्रद्धा । जतना धरावी प्रबुद्धा ।
येरी दोन्हीं विरुद्धा । सांडाविया ॥ ८२ ॥
हे सात्विकी श्रद्धा जेया । निर्वोहाती होये धनंजया ।
बागुल्ठ नाहिं तेया । कैवल्य तें ॥ ८३ ॥
तो न पढो कां ब्रह्मसूत्र । नाळोडू सर्वशास्त्र ।
सिद्धांतु नव्हंतु सतंत । तेयाचां हातीं ॥ ८४ ॥
पारि श्रुतिस्मृतिचे अर्थ । जे आपण होउनि मूर्त्त ।
अनुष्ठानें जगा देंत । वडिल जे गा ॥ ८५ ॥
तेयांचिं आंचरतिं पाउलें । पाह्रुनि सात्विक श्रद्धा चाले ।
तो तें चि फल ठेविलें । ऐसें पावे ॥ ८६ ॥
पैं येकुं दीपुं लावी सायासें । आणिकु फांकावेया तेथ बैसे ।
तरि काइ प्रकाशें । वंचिजे गा ॥ ८७ ॥
कां येकें मोल अपार । वेचुनु बांधलें ढवलार ।
तो सुरवाडु वस्तिकर । न भोगि काइ ॥ ८८ ॥
हें असो जो तलें करी । तेयाची चि तृषा हरी ।
तें सर्वां आन करी । हें विचारि पां ॥ ८९ ॥
हें बहू काइ बोलों पैं गा । एका गौतमासी चि गंगा ।
एरां समस्तां काइ गा । वोहल जाली ॥ ९० ॥
ह्मणौनि आपुलिया परी । शास्त्र अनुष्ठिति कुसरी ।
तेयांतें श्रद्धालु जो वरी । तो मूर्खु ही तरे ॥ ९१ ॥

**अशास्त्रविहितं घोरं तप्यंते ये तपो जनाः ॥**
**दंभाहंकारसंयुक्ताः कामरागबलान्विताः ॥ ५ ॥**

ना शास्त्राचेन किर नावें । खांकरुं हिं न ये थावें ।
परि शास्त्रज्ञा हिं सींवे । टेंकों नेंदी ॥ ९२ ॥

वडिलांचिया क्रिया । छांदसत्वें वांकुलिया ।
दावीति डाकुलिया । वाजवीति ॥ ९३ ॥
आपुलेनी चि आटोपें । धनत्वाचेनि दर्पें ।
साचाचि खंडित तपें । आदरिलीं ॥ ९४ ॥
आपुलिया पुढिलाचेया । आंगा घालूनि कातिया ।
रक्ता मांसा प्राणितिया । भरू भरू देंती ॥ ९५ ॥
रिचवीति जळतां कुंडीं । लावीति चेडेयाचां तोंडीं ।
नवसिये देंत उंडी । बाळकांची ॥ ९६ ॥
आग्रहाचिया उजिरिया । क्षुद्रदेवतां वन्हीयां ।
अन्नत्यागें सातरिया । टाकिति एक ॥ ९७ ॥
आगा आत्मपरपीडा । बीज तमक्षेत्रीं सुहाडा ।
पेरीति मग पुढां । तें चि पीके ॥ ९८ ॥
बाहिं नाहिं जोडि आपुलेया । आंगें न्हवती चि धनंजया ।
मग चिंति तें तेयां । होये कां ऐसें ॥ ९९ ॥
वैद्यातें करीति साला । रसु घाली पांउखला ।
तो रोगिया विन्हला । सोवता होये ॥ १०० ॥
नाना पढिकराचेनि सलें । काढी आपुले डोळे ।
ते वोणवां चाले आंधळें । जैसें ठाके ॥ १ ॥
तैसें तेयां तामसां होये । जें निंदूनि शास्त्रांची सोये ।
सैव धांवति मोहें । आडाइले ॥ २ ॥
कामु करवी तें करिति । क्रोधु मारवी तें मारीति ।
किंबहुना मातें दुखविति । दुःखाचां गुंडां ॥ ३ ॥

**कर्षयंतः शरीरस्थं भूतग्राममचेतसः ॥**
**मां चैवांतःशरीरस्थं तान्विध्यासुरनिश्चयान् ॥ ६ ॥**

आपुलां परावां देहीं । जें वीरु करिति काहिं ।
तें मज आत्मेयां पाहिं । होये सीणु ॥ ४ ॥

पैं वाचेचेनि पाळवें । पापिया तेयां नातळावें ।
परि पडिलें सांघावें । त्यजावेया ॥ ५ ॥
प्रेत बाहिरें घालिजे । कां अंत्यु जैसा भखलिजे ।
हें असो हातें क्षालिजे । कष्मळातें ॥ ६ ॥
तेथ शुद्धिचेया आशा । तो लेपु न मनावा जैसा ।
तेयातें सांडावेया तैसा । अनुवादु हा ॥ ७ ॥
परि अर्जुना तूं तेयातें । देखसी तैं स्मर हो मातें ।
जें आन प्रायश्चित्त येथें । मानैल ना ॥ ८ ॥

**आहारस्त्वपि सर्वस्य त्रिविधो भवति प्रियः ॥**
**यज्ञस्तपस्तथा दानं तेषां भेदमिमं शृणु ॥ ७ ॥**

क्षणौनि श्रद्धा जे सात्विकी । पुडुतिं तिये चि पैं एकी ।
जतन करावी नीकी । सर्वां परीं ॥ ९ ॥
धरावा तैसा संगु । जेणें पोखे सात्विक लागु ।
सत्ववृद्धिचा भागु । आहारु घेपे ॥ ११० ॥
यऱ्हविं तऱ्हीं पाहिं । स्वभावो वृद्धिचां ठांइं ।
आहारु वांचौनि नाहिं । बळि हेतु ॥ ११ ॥
प्रत्यक्ष पाहे पां वीरा । जो सावधु घे मदिरा ।
तो होउनि ठाके माजिरा । तिये चि क्षणीं ॥ १२ ॥
कां जो सर्वान्नरस सेवी । तो व्यापिजे वायुस्वभावीं ।
दाहक जाली निववी । पथ्यादिक ॥ १३ ॥
नातरि अमृत जेया परीं । वेतलें अमरां करी ।
कां आपुलेया ऐसें करी । सेविलें विष ॥ १४ ॥
तेवि घेपे जैसा आहारु । धातू तैसा चि होये आकारु ।
धातू ऐसा अंतरु । भावो पोखे ॥ १५ ॥
जैसें भांडेयाचेनि तापें । आंतुल उदक तापे ।
तैसी धातुवर्ते आटोपे । चित्तवृत्ती ॥ १६ ॥

ह्मणौनि सात्विकु रसु सेविजे । तैं सत्वाची वाढि पाविजे ।
राजसां तामसां होइजे । येरिं रसिं ॥ १७ ॥
तरि सात्विकु कोणु आहारु । राजसा तामसा काइ आकारु ।
हें सांवों करीं आदरु । आकर्णनीं ॥ १८ ॥
आणि येकसरेया आहारा । कैसेनि तिनि मोहरा ।
जालिया तें हिं वीरा । रोकडें दाउं ॥ १९ ॥
तरि जेव्हणाराचिया रुची । निष्पत्ति कीं बोनेयांची ।
आणि जेवितां तवं गुणाची । दासि होये ॥ १२० ॥
जो जीउ कर्त्ता भोक्ता । तो गुणा तव स्वभावता ।
पावौनियां त्रिविधता । चेष्टे त्रिया ॥ २१ ॥
ह्मणौनि त्रिविध आहार । यज्ञ हिं किर त्रिप्रकार ।
देणें हान व्यापार । त्रिविध चि तें ॥ २२ ॥

**आयुःसत्वबलारोग्यसुखप्रीतिविवर्धनाः ॥**
**रस्याः स्निग्धाः स्थिरा हृद्या आहाराः सात्विकप्रियाः ॥ ८ ॥**

परि आहारलक्षण पहिलें । सांघों जें ह्मणितलें ।
तें आइक भलें । रूप करूं ॥ २३ ॥
तरि सत्वगुणा कडे । जैं दैवें भोक्ता पडे ।
तैं मधुरिं रसिं वडे । मेचु तेया ॥ २४ ॥
आंगें चि द्रव्यें सुरसें । जें आंगें चि पदार्थ गोडिसे ।
आंगें चि स्नेह बहुवसें । सुपक्कें जियें ॥ २५ ॥
आकारें नव्हंति डगलें । स्पर्शि अति मौवालें ।
जीभे लागलीं स्नेहालें । स्वादीं जियें ॥ २६ ॥
रसें गाढिं वरि ढिलीं । द्रव भावें आथिलीं ।
ठायें ठाउ सांडिलीं । अग्नितापें ॥ २७ ॥
आंगा सानें परिणामें थोर । जैसें गुरुमुखिचें अक्षर ।
तेमे अल्पें जन्हीं आहार । तृप्ति राहे ॥ २८ ॥

आणि मुखिं जैसें गोडें । तैसीं देहा आंतुली कडे ।
तिहिं अन्नीं प्रीति वाढे । सात्विकाची ॥ २९ ॥
एवंगुणलक्षण । सात्विक भोग्य जाण ।
आयुष्याचें त्राण । नीच नवें ॥ १३० ॥
येणें सात्विकें रसें । जवं देहिं मेहो वरिसे ।
तवं आयुष्यनदी उससे । देहाची देहा ॥ ३१ ॥
सत्वाची किर पालती । करणें हें चि सुमती ।
दिवसाचिये उन्नती । भानु जैसा ॥ ३२ ॥
कां शरीरा आणि मानसा । बलाचा पैंकु वांसा ।
हा आहारु तैं दशा । कैंची रोगां ॥ ३३ ॥
हा सात्विकु होये भोग्य । तैं भोगावें आरोग्य ।
शरीरा भाग्य । उदैलें जाणों ॥ ३४ ॥
आणि सुखाचें घेणेंदेणें । नीकें उवायाये येणें ।
हें असो वाढे साजणें । आनंदेंसीं ॥ ३५ ॥
ऐसा सात्विकु आहारु । परिणमला थोरु ।
करी उपकारु । सबाह्यासि ॥ ३६ ॥

**कट्वम्ललवणात्युष्ण तीक्ष्णरूक्षविदाहिनः ॥**
**आहारा राजसस्येष्टा दुःखशोकामयप्रदाः ॥ ९ ॥**

आतां राजसासि प्रीति । जिहिं रसिं आथि ।
करुं तेया ही व्यक्ती । प्रसंगें गा ॥ ३७ ॥
तारि मारें उणें कालकूट । तेणें मानें कडुवट ।
कां चूनेयांहुनु दासट । अम्लीं हान ॥ ३८ ॥
कणिकेतें जैसें पाणी । तैसें मीठ बांधेयातें आणीं ।
तेतुली चि मेलवणी । रसांतराची ॥ ३९ ॥
ऐसें खार अपाडें । राजसा तेया आवडे ।
उन्हाचेन मीखें तोंडें । अग्नी चि रिगो पां ॥ १४० ॥

वाफेचिये सीगे । वाति ही लागे ।
तैसें उन्ह मागे । राजसु तो ॥ ४१ ॥
वावंदणें पाडुनु पाए । सबलु डाहारला ठायें ।
तैसें तिखट खाये । जें घायें विण लागे ॥ ४२ ॥
आणि राखेहूनु कोरडें । आंतु बाहिरि पांकि जे पोपडे ।
तो जिव्हाडंसु आवडे । बहू तेया ॥ ४३ ॥
परस्परें दांतां । आडलु होये खातां ।
तो गा तोंडिं घेंतां । तोखों लागे ॥ ४४ ॥
आधिं चि द्रव्यें चुरुमुरीं । वरि परितंडिलीं महुरीं ।
जिये घेंतां होये धुवारी । नाकतोंडाची ॥ ४५ ॥
हें असो उगें आगितें । झणे तैसें राइतें ।
पढिये प्राणा परौतें । राजसासि गा ॥ ४६ ॥
ऐसा न पुरौनि तोंडा । जीभा केला वेडा ।
अन्नमीखें भडभडां । आगी चि खाए ॥ ४७ ॥
तैसा चि लवंघा सूटे । मग भुयिं ना सेजे सांटे ।
पाणियांचें न फिटे । तोंडूनि पात्र ॥ ४८ ॥
ते आहार नव्हंति घेतले । व्याधिव्याल सुतले ।
ते चेववावेया घातले । पोटा माझि ॥ ४९ ॥
तैसें येकमेकां सलें । रोग उठिति एकें वेळें ।
ऐसा राजसु फळे । केवल दुःखें ॥ १५० ॥
एवं राजसा आहारा । रूप केलें धनुर्द्धरा ।
परिणामाचा ही विसुरा । सांघितला ॥ ५१ ॥

**यातयामं गतरसं पूतिपर्युषितं च यत् ॥**
**उच्छिष्टमपि चामेध्यं भोजनं तामसप्रियम् ॥ १० ॥**

आतां तेया तामसा । आवडि आहारिं परियसां ।
तें हिं सांघों चिळसा । झणें तुह्मीं ॥ ५२ ॥

तरि कुहिलें उसिटें खातां । न मनी काहिं अनहिता ।
कां साजुका नासका । हैंसि जैसी ॥ ५३ ॥
निफजलें अन्न तैसें । दुपाहारी कां दिवसें ।
अतिकरें तें तामसें । घेइजे तें ॥ ५४ ॥
१ नातरि अधोकढीं ठेलें । कां निन्हां करपौनि गेलें ।
तैसिं हिं खाये चूकलें । रसा जें येवों ॥ ५५ ॥
जेया कां आथि निष्पत्ति । जेथ रसु धरी व्यक्ती ।
तें अन्न ऐसें प्रतीती । तामसा नाहिं ॥ ५६ ॥
ऐसेन काहिं विपायें । सदन्ना वरिपडा होये ।
तरि घाणि सूटे तवं राहे । व्याघ्रु जैसा ॥ ५७ ॥
किं बौहुविं दिसिं वोळांडिलें । सुरसपणें सांडिलें ।
शुष्क अथवा सडिलें । गाभिणें हिं हो ॥ ५८ ॥
तें हिं बाळांचे हात वेन्हीं । चिवडिली जैसी घारी ।
कां सवें बैसौनि नारी । आवैलें करी ॥ ५९ ॥
ऐसेनि कश्मलें जें खाए । तें तेया जेविलें ऐसें होये ।
परि एणें हिं न धाए । पापिया तो ॥ ६० ॥
मग चमतिकारु देखां । निषेधाचा औंबुखा । १
जेया कां सदोषा । कुद्रव्यांसि ॥ ६१ ॥
तेयां अपेयाचां पानीं । अखाद्याचां भोजनीं ।
वाढविजे उतान्ही । तामसें तेणें ॥ ६२ ॥
एवं तामसा जेव्हणारा । ऐसी चि मेचु वीरा ।
याचें फळ दुसरां । क्षणि नाहिं ॥ ६३ ॥
जें जेव्हां चि अपवित्र । सेवी तेयाचें वक्त्र ।
तेव्हां चि पापा पात्र । जाला किं तो ॥ ६४ ॥
एया परौतें जेवी । ते जेविती वोज न म्हणावी ।
पोटीं भरती जाणावी । यातना ते ॥ ६५ ॥

शिरछेदें काइ होये । कां आगी रिघतां केसें आहे ।
हें जाणावें काइ पाहे । वरि साहातु असे जो ॥ ६६ ॥
ह्मणौनि तामसा अन्ना । परिणामु गा सिना ।
न संघों चि गा अर्जुना । देवो ह्मणे ॥ ६७ ॥

**अफलाकांक्षिभिर्यज्ञो विधिदृष्टो य इज्यते ॥**
**यष्टव्यमेवेति मनः समाधाय स सात्विकः ॥ ११ ॥**

आतां एया वरि । आहाराचिया परी ।
यज्ञु हिं अवधारिं । त्रिधा असे ॥ ६८ ॥
परि तिं माजि प्रथम । सात्विक यज्ञाचें वर्म ।
आइक पां सुवर्म । शिरोमणी ॥ ६९ ॥
तरि येकु प्रियोत्तमु । वांचुनु वाढों नेंदी कामु ।
जैसा कां मनोधर्मु । पतिव्रतेचा ॥ १७० ॥
ना सिंधुतें टाकुनि गंगा । पुढां न करी चि निगा ।
कां आत्मा देखौनि उगा । वेदु ठेला ॥ ७१ ॥
तैसें जें आपुला विहिति । वेचौनियां चित्तवृत्ती ।
नुरती चि अहंकृती । फला लागि ॥ ७२ ॥
पांतलेयां झांडांचें मूळ । माघौतें सरों नेणिजे चि जल ।
जिरालें चि कां केवळ । तेयाचां आंगीं ॥ ७३ ॥
तैसें देह मनें दोहीं । निश्चयाचां ठांइं ।
हारपौनि जें काहिं । इछीति ना ॥ ७४ ॥
तें हिं फलवांछात्यागीं । स्वधर्मु वांचौनि विरागीं ।
कीजे जो यज्ञु सर्वांगीं । अलंकृतु ॥ ७५ ॥
परि आरिसा आपणपें । डोळां जैं घेपे ।
कां तळहातिचेनि दीपें । रत्न पाहिजे ॥ ७६ ॥
नाना उदितें दिवाकरें । गमावा मार्गु दीठी भरें ।
तैसा वेदनिर्द्धारें । देखौनियां ॥ ७७ ॥

तिये कुंडमंडपवेदी । आणिक ही संभारसमृद्धी ।
ते मेळवणी जैसी विधी । आपण केली ॥ ७८ ॥
सकळअवयवउचितें । लेणिं पातलिं जैसीं आंगातें ।
तैसे पदार्थ जेथिचा तेथें । विनियोगुनि ॥ ७९ ॥
काइ वानूं बहुतिं बोलिं । जैसी सर्वाभरणीं भरली ।
यज्ञविद्या चि रूपा आली । यजनमीसें ॥ १८० ॥
ऐसा सांगोपांगु । निफजे जो यागु ।
नुरौनियां लागु । महत्वाचा ॥ ८१ ॥
प्रतिपाळु तरि याचा । चौपाटी कीजे तुळसिचा ।
परि फळफूलछायेचा । आश्रयो नाहिं ॥ ८२ ॥
किंबहुना फळाशें विण । ऐसिया निगुतिया निर्माण ।
होये तो यज्ञ जाण । सात्विकु गा ॥ ८३ ॥

**अभिसंधाय तु फलं दंभार्थमपि चैव यत् ॥**
**इज्यते भरतश्रेष्ठ तं यज्ञं विद्धि राजसम् ॥ १२ ॥**

आतां यज्ञ कीर वीरेशा । करी या चि ऐसा ।
परि श्राद्धा लागि जैसा । आवंतिला राउ ॥ ८४ ॥
जें राजा जरि घरासि ए । तरि बहुतु उपेगु होये ।
आणि कीर्त्ति ही होए । श्रद्धा न ठके ॥ ८५ ॥
तैसा धरुनि आवांका । ह्मणे स्वर्गु जोडैल असिका ।
दीक्षितु होईन नीका । घडैल यागु ॥ ८६ ॥
ऐसी केवळ फळा लागि । महत्व फोकरावेया जगीं ।
पार्था निफज चि जे यागीं । राजस पैं ते ॥ ८७ ॥

**विधिहीनमसृष्टान्नं मंत्रहीनमदक्षिणं ॥**
**श्रद्धाविरहितं यज्ञं तामसं परिचक्षते ॥ १३ ॥**

आणि पशुपक्षीं विवाहीं । जोईस कामा परौता नाहिं ।
तैसा तामसा यज्ञा पाहिं । आग्रहो चि मूळ ॥ ८८ ॥

वारेया ऐसा अवाटु होये । कां मरणा मुहूर्त पाहे ।
कां निषिद्धासि न भिये । आगि जैसी ॥ ८९ ॥
तरि तामसांचिया आचारा । विधिचा आथि बोढा वारा ।
ह्मणौनि तो धनुर्द्धरा । उत्संकु खलु ॥ ९० ॥
नाहिं वेदाची चाडा । नैये मंत्रादिक तेया कडा ।
अन्न तें न सुटे तोंडा । मासियेचेया ॥ ९१ ॥
वैराचा बोधु ब्राह्मणां । तेथ कें रिघैल दक्षिणा ।
संतु जाला बाउधणा । वरिपडा जैसा ॥ ९२ ॥
तैसें वायां चि सर्व ही वेचे । मुख नेदखतां श्रद्धेचें ।
नागविलें निपुत्रिकाचें । जैसें घर ॥ ९३ ॥
ऐसा जो यज्ञभासु । जेया नावं यागु तामसु ।
आइकैं ह्मणे निवासु । श्रियेचा तो ॥ ९४ ॥

देवद्विजगुरुप्राज्ञपूजनं शौचमार्जवं ॥
ब्रह्मचर्यमहिंसा च शारीरं तप उच्यते ॥ १४ ॥

आतां गंगेचे एक पाणीं । परि नेलें आनानीं वर्णीं ।
एक मैली एक आणी । शुद्धत्व जैसें ॥ ९५ ॥
तैसें तिहिं गुणिं तप । तेथ जालें असे त्रिरूप ।
तें एक दे पाप । उद्धरी एक ॥ ९६ ॥
तरि तें चि तिहिं भेदीं । कैसेनि पां ह्मणो सुबुद्धी ।
जाणों पाहांसि तरि आदीं । तप चि जाण ॥ ९७ ॥
एथ तप ह्मणिपे तें काइ । तें स्वरूप दाउं पाहीं ।
मग भेदिलें गुणिं तिहिं । तें पाठिं बोलों ॥ ९८ ॥
तरि तप जें कां समैक । तें हिं त्रिविध आइक ।
शारीर मानसीक । शाद्बीक गा ॥ ९९ ॥
आतां यां तिहिं माझारि । शारीर तवं अवधारिं ।
तरि शंभु कां श्रीहरी । पढियंतें होए ॥ २०० ॥

तेया प्रिया देवतालया । यात्रादिकें करावेया ।
आठ पाहारिं एयां पायां । उलिग वापे ॥ १ ॥
प्रांगण मिरवणियां । आंगोपचार पुरवणियां ।
करावेया ह्मणियां । शोभति हात ॥ २ ॥
लिंग कां प्रतिमा दीठी । देखत खेऊं आंगपुष्टी ।
लुंठवीत काठी । पडिली जैसी ॥ ३ ॥
आणि विद्याविनयादिकिं । गुणिं जे वडिल लोकिं ।
तेयां ब्रह्मणांची नीकी । पाइके कीजे ॥ ४ ॥
अथवा प्रवासें कां पीडां । सीणलें जें सांकडां ।
ते जीव सुरवाडा । आणिजति ॥ ५ ॥
सकळां तीर्थांचिये धूरे । जियें कां मातापितरें ।
तियें सेवे किर शरीरें । लोण कीजे ॥ ६ ॥
आणि संसारा ऐसा दारुणु । जो भेटलेयां हरे सीणु ।
तो ज्ञानदानें सकरुणु । भजिजे गुरु ॥ ७ ॥
आणि स्वधर्मांचां आगिठां । देह जाड्याचिया कीटा ।
आवृत्तिपुटीं सुभटा । झाडि कीजे ॥ ८ ॥
देह भूतमात्रीं नमिजे । प्रोपकारिं व्यामिजे ।
स्त्रीविषिं नेमिजे । नावां नावां ॥ ९ ॥
जाततेन प्रसंगें । स्त्रीदेह सिवणें आंगें ।
तेथौनि देह आवघें । अबोटी कीजे ॥ २१० ॥
भूतमात्राचेनि नावें । तृण हिं नासुडावें ।
किंबहुना सांडावे । छेदभेद ॥ ११ ॥
ऐसीसी जे शरीरीं । राहाटिची पडे उजिरी ।
तें शारीरतप धुमरी । आलें जाण ॥ १२ ॥
पार्था समस्त ही हें करणें । देहाचेनि प्रधानपणें ।
ह्मणौनि मीं एयातें ह्मणें । शारीर तप ॥ १३ ॥

**अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत् ॥**
**स्वाध्यायाभ्यसनं चैव वाङ्मयं तप उच्यते ॥ १५ ॥**

येवं शारीर जे तप । तेयाचें दाविलें रूप ।
आतां आइक निष्पाप । वाङ्मय तें ॥ १४ ॥
तरि लोहें आंगतुंक । न तोडितां चि कनक ।
केलें जैसें देख । परिसें तेणें ॥ १५ ॥
तैसें न दुखवितें जें । जवळिलां सुख निफजे ।
ऐसें साधुत्व देखिजे । बोलणां जिये ॥ १६ ॥
पाणी मुदला झाडा जाए । तृण तें प्रसंगें जीहे ।
तैसें येकां बोलिलें होये । सर्वां हीं हित ॥ १७ ॥
जोडे अमृताची सुसरी । ते प्राणातें अमरां करी ।
स्नानें पापताप निवारी । गोडी हीं दे ॥ १८ ॥
तैसा अविवेकु ही फीटे । आपुलें अनादित्व भेटे ।
परि आइकतां रुचि न विटे । पीयूषिं जैसी ॥ १९ ॥
जरि कोण्हीं करी पूसणें । तरि ऐसें होआवें बोलणें ।
नातरि आवर्तणें । निगमाचलीं ॥ २२० ॥
ऋग्वेदादि तीन्हीं । प्रतिष्ठिजति वाग्भुवनीं ।
केली जैसी वदनीं । ब्रह्मशाळा ॥ २१ ॥
नातरि येकाधें नाव । तें चि शैव कां वैष्णव ।
वाचे वसतें वाग्भव । तप जाणावें ॥ २२ ॥

**मनः प्रसादःसौम्यत्वं मौनमात्मविनिग्रहः ।**
**भावसंशुद्धिरित्येतत्तपो मानसमुच्यते ॥ १६ ॥**

आतां तप जे मानसीक । तें हीं सांघों आइक ।
ह्मणे लोकनायक—। नायकु तो ॥ २३ ॥
तरि सरोवर तरंगीं । सांडिलें आकाश मेघीं ।
कां चंदनाचें उरगीं । उद्यान जैसें ॥ २२४ ॥

नाना कलावैषम्यें चंद्रु । कां सांडिला आधी नरेंद्रु ।
नातरि क्षीरसमुद्रु । मंदराचलें ॥ २५ ॥
ऐसें नानाविकल्पजाल । सांडूनु गेलेयां सकल ।
मन राहे केवल । स्वरूपीं जें ॥ २६ ॥
तपनें विण प्रकाशु । जाड्यें विण रसु ।
पोकली विण आशाश । होये जैसें ॥ २७ ॥ का
तैसी आपुली सोये देखे । आणि आपुलेया स्वभावा मूके ।
हींवली जैसी अंगिकें । हिंवों नेदी ॥ २८ ॥
मग नवल तें कलंकें विण । शशिबिंब जैसें पार्वण ।
तैसें चोखिसि थारपण । मनाचें जें ॥ २९ ॥
झ बुडालें वैराग्याचें तप । जिराली मनाचीं धाप ।
तेथ कां होईल वाप । येरीं वृत्तीं ॥ २३० ॥
ह्मणौनि विचारावेया शास्त्र । राहाटवावें जें वक्त्र ।
तें थाचेचें हीं सूत्र । हातीं न धरी ॥ ३१ ॥
तें स्वभावें लोभलेपणें । मनपण हिं वरुं नेणें ।
सीतलें जैसें लवणें । आपुलें निज ॥ ३२ ॥
तेथ कें उठिति ते भाव । जिहिं इंद्रियमार्गिं धांवं ।
घेउनि ठाकावेया गावं । विषयांचें गा ॥ ३३ ॥
ह्मणौनि तिये मानसिं । भावशुद्धी चि असे आपैसी ।
रोमशुद्धि जैसी । तलहातासि ॥ ३४ ॥
काइ बहू बोलों अर्जुना । जैं हे दशा ये मना । देह ऐसें
तैं मनो तपाभिधाना । पात्र होए ॥ ३५ ॥
परि तें असो हें जाण । मानसतपाचें लक्षण ।
देवो ह्मणे संपूर्ण । सांगितलें ॥ ३६ ॥
एवं देहें वाचा चित्तें । जें पातले त्रिविधत्वातें ।
तें साम्यतप तूतें । परिसविलें गा ॥ ३७ ॥

श्रद्धया परया तप्तं तपस्तत्त्रिविधैर्नरैः ॥
अफलाकांक्षिभिर्युक्तैः सात्त्विकं परिचक्षते ॥ १७ ॥

आतां गुणत्रयसंगें । हें चि विशेष त्रिविध्य रिगे ।
तें हीं आइक चांगें । प्रज्ञाबळें ॥ ३८ ॥
तरि हें चि तप पैं त्रिविध । जें दाविलें तुज विषद ।
तें चि करीं प्रसिद्ध । सांडूनि फळीं ॥ ३९ ॥
जैं पुरतिया सत्वशुद्धी । आचरिजे आस्तिकबुद्धी ।
तेयातें चि गा प्रबुद्धीं । सात्विक ह्मणिपे ॥ २४० ॥
नां तपियेपणां लागि । दूजी त्राये जोडुनु जगीं ।
महत्वादिकिचां शृंगीं । बैसावेया ॥ ४१ ॥

सत्कारमानपूजार्थं तपो दंभेन चैव यत् ॥
क्रियते तदिह प्रोक्तं राजसं चलमध्रुवम् ॥ १८ ॥

त्रिभुवनिचेया सन्माना । न वचावेया ठाया आनां ।
धूरेचिया आसनां । भोजना लागी ॥ ४२ ॥
विश्विचेया स्तोत्रा । आपण होआवें पात्रां ।
विश्व आपुलिया यात्रा । करावेया ॥ ४३ ॥
लोकाचिया विविधा पूजा । आश्रयो धरावेया दूजा ।
भोग भोगावेया बोजा । महत्वाचिया ॥ ४४ ॥
आंगा बोल माखुनु तपें । विकावेया आपणपें ।
अंगना हीन पडपें । जिया परीं ॥ ४५ ॥
हें असो धनमानीं आश । बांधौनि तपें कीजे सायास ।
तैं तें चि तप राजस । बोलिजे गा ॥ ४६ ॥
परि पहुरणीं जें दुहिलें । तें गोरुं न दुभे वियालें ।
कां उभें सेत चारिलें । पीकावेया नुरे ॥ ४७ ॥
तैसें फोंकारितां तप । कीजे जें साक्षेप ।
तें फळि लवं सोफ । निर्व्हा जाये ॥ ४८ ॥

ऐसें निष्फल देखौनि करितां । माझारि सांडी पांडुसुता ।
ह्मणौनि नाहिं स्थिरता । तपा तेया ॥ ४९ ॥
यऱ्हविं तऱ्हि आकाशमांडिं । जो गाजौनि ब्रह्मांड फोडी ।
तो अकालमेघु काइ घडी । राहांतु असे ॥ २५० ॥
तैसें राजस तप जें होए । तें फलीं किर वांझ जाये ।
परि आचरणीं हीं नोहे । निर्वाहो तेया ॥ ५१ ॥

**मूढग्राहेणात्मनो यत्पीडया क्रियते तपः ॥**
**परस्योत्सादनार्थं वा तत्तामसमुदाहृतम् ॥ १९ ॥**

आलां तें चि तप पुडुतीं । तामसैयेचिया रींती ।
तें परत्रा आणि कीर्त्ती । रुसौनि कीजे ॥ ५२ ॥
केवल मूर्खपणाचा वारा । जीविं घेउनि धनुर्द्धरा ।
नावं ठेविजे शरीरा । वैरियांचें ॥ ५३ ॥
पंचाग्निचिं हडगीं । खोलविजति शरीरा लागिं ।
किं इंधन कीजे आगि । आंतुल चि ॥ ५४ ॥
माथां जालिति गुगुल । आंगीं घालिजति गलु ।
बंधिं लांबिजति जालु । आपणपां चि ॥ ५५ ॥
श्वा दवडौनि श्वसोश्वास । कीजति वायां चि उपवास ।
कां घेइजति धूमाचे घांस । अधोमुखें ॥ ५६ ॥
हिमोदकें आकंठें । खडकिलां सेविजति तटें ।
जितिया मासाचे चिमुटे । तोडिति जेथ ॥ ५७ ॥
ऐसे नाना परीं हे काया । घाये सूंति धनंजया ।
तप कीजे नाशावेया । पुढैलांतें ॥ ५८ ॥
आंगभारें सूटला ढोंडा । आपा नूकौनियां खांडा ।
वरिपडिलेयां रगडा । करी जैसा ॥ ५९ ॥
किंबहुना हे वोखटी । घेउनि क्लेशाची हातवटी ।
तप निफजे किरीटी । तामस होए ॥ २६० ॥

तेवि आपुलिया आटाणियां । सुखें असतिया प्राणियां ।
जियाविया ही सिराणियां । करिति गा ॥ ६१ ॥
एवं सत्वादिकाचां आंगीं । पडिलें तपभागीं ।
जालें तें तुज चांगी । दाविलें व्यक्ती ॥ ६२ ॥

**दातव्यमिति यद्दानं दीयते नुपकारिणे ॥**
**देशे काले च पात्रे च तद्दानं सात्विकं स्मृतं ॥ २० ॥**

आतां बोलतां प्रसंगा । आलें ह्मणौनि पैं गा ।
करुं रूप दानलिंगा । त्रिविधा तेया ॥ ६३ ॥
तेथ गुणाचेनि बोलें । दान हिं त्रिविध असे जालें ।
तें चि आइक पहिलें । सात्विक ऐसें ॥ ६४ ॥
तरि स्वधर्मा आंतौतें । जें मीळे आपणपेयांतें ।
तें देइजे बहुतें । संमानयोगें ॥
जालेयां सुबीजप्रसंगु । पडे क्षेत्रा वापेचा पांगु ।
तैसा चि दानाचा हा लागु । देखतसों ॥ ६६ ॥
अनर्घ्य रत्न हातु चढे । तैं भांगाराची वोढि पडे ।
दोन्हीं जालीं तरि न जोडे । लेतें आंग ॥ ६७ ॥
परि सणु सुहृदु संपति । यें तिन्हि येकें मिळति ।
जैं भाग्य धरी उन्नती । आपुळां विषिं ॥ ६८ ॥
तैसें निफजवावेया दान । जैं सत्व सुये संवाहन ।
तैं देशु काळ भाजन । द्रव्य ही मिळे ॥ ६९ ॥
तन्हि आधिं तवं प्रयत्नेसिं । होआवें कुरुक्षेत्र कां कासी ।
नातरि तूकें जो इहिंसिं । तो ही देशु हो ॥ २७० ॥
तेथ रवि--चंद्रा राहु--मेळु । होंता पाहावा पुण्यकाळु ।
कां तेया सारिखा निर्मळु । आणिकु ही हो ॥ ७१ ॥
तैसां काळिं तिये दिसिं । होआवी पात्रसंपति ऐसी ।
मूर्त्ति धरिली आहे जैसी । शुचित्वें चि कां ॥ ७२ ॥

आचाराचें मूळपीठ । वेदाची उत्तरवेंठ ।
तैसें द्विजरत्न चोखट । पाहुनियां ॥ ७३ ॥
मा तेयाचां ठांइं चिंता । निवर्तावी स्वसत्ता ।
परि प्रिया पुढें कांता । रिगे तैसेनि ॥ ७४ ॥
कां जेयाचें ठेविलें तेया । देउनि होइजे उतरायियां ।
नाना हडपें विडा राया । दीधला जैसा ॥ ७५ ॥
तैसेनि निष्कामें जीवें । भूम्यादिभावें ।
किंबहुना हांवे । नेंदावें उठूं ॥ ७६ ॥
आणि दान जेया देयावें । तेयातें ऐसेयां पांवें ।
जें घेतलेयां नुमचवे । काइसेन हीं ॥ ७७ ॥
सादु घातलेयां आकाशा । देंदी प्रतिशद्बु जैसा ।
कां पाहिला आरिसा । येरीकडे ॥ ७८ ॥
उदकाचिये भूमिके । आफळिलेन कुंदुकें ।
उफळौनि माघौतें । नैयेजे हाता ॥ ७९ ॥
नाना वसोवा घातला चारु । माथां तुरंबिला बूरु ।
चा न करी प्रत्योपकारु । जेया परी ॥ २८० ॥
तैसें दीधलें दान तेयाचें । जें कोण्ही आंगें नुमुचे ।
अर्पिलेयां श्लाध्य तेयाचें । कीजे पैं गा ॥ ८१ ॥
ऐसिया सामग्रिया । दान निफजे वीरराया ।
तें सात्विक दानवरिया । सर्वां हि जाण ॥ ८२ ॥ आहे

**यत्तु प्रत्युपकारार्थं फलमुद्दिश्य वा पुनः ॥**
**दीयते च परिक्लिष्टं तद्राजसमुदाहृतम् ॥ २१ ॥**

आणि तो चि देशु काळु । घडे तैसा चि पात्रमेळु ।
दानभागु ही निर्मळु । न्यायगतु ॥ ८३ ॥
परि मनीं धरूनि दुभतें । चारीजे जेवि गाइतें ।
कां पेवं करुनि आइतें । फेरुं जाइजे ॥ ८४ ॥

नाना दीठि घाङनि ऐहेरा । आवंतुं जाइजे सोइरा ।
वाण धाडिजे घरा । वोउसेयाचेया ॥ ८५ ॥
पैं कलांतरा गांठि बांधिजे । मग पुढिलाचें काज कीजे ।
पूजा घेउनि रसु दीजे । पीडितासि ॥ ८६ ॥
तैसें जेया जें दान देणें । तो तेणें चि गा जीवणें ।
मुजावा भावें येणें । दीजे जें गा ॥ ८७ ॥
अथवा कोण्हीं एकु वाटे जांता । घेतलें उमचों न सकतां ।
मीळे जारि पांडुसुता । द्विजोत्तमु ॥ ८८ ॥
तरि कवडेया एका साठिं । अशेष गोत्राचें किरीटी ।
सर्व प्रायश्चित्त सुवे मुठी । तेयाचिये ॥ ८९ ॥
तेवि चि पारलौकिकें । फळें वांछिजति अनेकें ।
नांदिजे तें भूके । एक ही नोहे ॥ २९० ॥
तें हिं ब्राह्मण नेवों सरे । शेशीं हाणिचेनि सीणे झांसुरे ।
सर्वस्व जैसें चोरें । नागवुनि नेलें ॥ ९१ ॥
कायि बहू सांघों सुमती । जें दीजे या मनोवृत्ती ।
तें दान गा त्रिजगती । राजस पैं ॥ ९२ ॥

अदेशकाले यद्दानमपात्रेभ्यश्च दीयते ॥
असत्कृतमवज्ञातं तत्तामसमुदाहृतम् ॥ २२ ॥

मग म्लेंछांचें वसैठे । दांगाणें हान कैकटें ।
कां सिहबीरें चौहटे । नगरिचें तें ॥ ९३ ॥
तिहीं तिहिं ठाइं मीळनीं । समो सांजवेळ कां रजनी ।
तेन्हळिं उदारां होणें घुनीं । चोरियेचां ॥ ९४ ॥
पात्रें भाट नागारी । सामान्या स्त्रिया जुवारी ।
जियें मूर्त्तिवंतें भुररीं । भूळवेया ॥ ९५ ॥
रूपनृत्याची पुरवणी । तेयां पुढें डोळेभारणीं ।
गीत भाटीवं श्रवणीं । कर्णजपु ॥ ९६ ॥

तेथ विओइनेयां जग। आणोनि पदार्थ अनेक। ते भातु आगो मागेन। सर्वे तिथे।



तेथा ही वरि अलुमालु । घे फूलागंधाचा परिमलु ।
तवं भ्रमांचा तो वेतालु । अवतरे चि ॥ ९७ ॥
येयां ऐसेन जें जें देणें । तें तामस दान मीं ह्मणें ।
आणि घडे दैंवगुणें । आणिक ही एक ॥ ९८ ॥
विपायें घुणाक्षर उमडे । टालिये काउला सांपडे ।
तैसें तामसा पर्व पडे । पुण्यदेशीं ॥ ९९ ॥
तेथ देखौनि तो आथिला । योग्यु मार्गो हीं आला ।
तो ही द्रव्या चाडैला । भाले जरि ॥ ३०० ॥
तरि श्रद्धा न करी जीवीं । तेया माथा न खलवी ।
स्वयं न करी ना करवी । अर्घ्यादीक ॥ १ ॥ अर्घ्यदान
आलेयां न घली बैसों । तेथ गंधाक्षतांचा अतिसो ।
हा प्रसंगु किर असो । तामसिये नरीं ॥ २ ॥
पैं बोलाविजे रिणायितु । तैसा झांकवी तेयाचा हातु ।
तूंकरणेयांचा बहुतु । प्रयोगु तेथ ॥ ३ ॥
आणि जेया जें दे किरीटी । तेयातें उमाणीं तेया साठिं ।
मग कुबोलें का लोटी । अवज्ञेचां ॥ ४ ॥
हें असो इया परीं । मोल वेचणें जें अवधारीं ।
तेया नावं चराचरीं । तामस दान ॥ ५ ॥
एथ मिं जाणतसे । विपायें तूं गा ऐसें ।
न कल्पीसि मानसें । विचक्षणां ॥ ६ ॥
ऐसिं आपुलालां चिन्हीं । अलंकृतें तीन्हीं ।
दानें दाविलिं अवधानि । राजतनया ॥ ७ ॥
जें भवबंधमोचक । एकलें कर्म सात्विक ।
तरि कां वेखासें सदोष । येर बोलों ॥ ८ ॥
परि सुसंतितां निवसी । भेटि नाहिं निविसिं ।
कां धूं न सांतां जैसी । राति न लगे ॥ ९ ॥

तैसें सुधा सत्वा आड । आहे रजतमाचें कवाड ।
त्रिभुवनीं तें कीड । ह्मणावें गा ॥ ३१० ॥
आह्मी श्रद्धादिदानांत । जें समस्त ही क्रियाजात ।
सांघितलें गा व्यक्त । तिहिं गुणीं ॥ ११ ॥
तेथ भरवसेन तीन्हीं । न संघों चि ऐसें मानीं ।
सत्व दावावेया दोन्हीं । बोलिलों येरें ॥ १२ ॥
जें दोहिं माजि तीजें असे । तें दोन्हिं सांडितां चि दीसे ।
अहोरात्रत्यागें जैसें । संध्यारूप ॥ १३ ॥
तैसें रजतमविनाशें । तीजें जैं उरत दीसे ।
तें सत्व हें आपैसें । फावासि ये ॥ १४ ॥
एवं दावावेया सत्व तुज । निरोपिलें तमरज ।
तें सांडूनि सत्वें काज । साधीं आपुलें ॥ १५ ॥
सत्वें चि येणें चोखाळें । करिं यज्ञादिकें सकलें ।
पावसी तें करतलें । आपुलें निज ॥ १६ ॥
सूर्ये दाखविलें सांतें । काइ एक न दिसे एथें ।
तेवि सत्वें केलें फलातें । काइ नेंदी ॥ १७ ॥

ॐतत्सदितिनिर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः ॥
ब्राह्मणास्तेन वेदाश्च यज्ञाश्च विहिताः पुरा ॥ २३ ॥

हें किर आवडतां विषिं । रीति सत्वीं आथि नीकी ।
परि मोक्षेंसीं एकीं । आथि मिळणें ॥ १८ ॥
तें येक अगाध चि आहे । तेयाचा सावाउ जैं लाहे ।
तैं मोक्षाचां ही होये । गावीं सरतां ॥ १९ ॥
पैं भांगार जन्हीं पन्हरें । तन्हीं राजवलिंचि आखरें ।
लाहे तैं सरें । जिया परीं ॥ ३२० ॥
स्वछें शीतलें सुगंधें । जलें होंति सुखपदें ।
परि पवित्र तें संबंधें । तीर्थांचेनि ॥ २१ ॥

न यों कां भलेतैसी थोरी । परि गंगा जैसी तैसी तिये सागरीं।
विश्वातें उद्धरी । दर्शनमात्रें ॥ २२ ॥
तैसें सात्विका कर्मा किरीटी । यंतां मोक्षाचिये भेटी ।
न पडे आडकाठी । त्रिशुद्धी गा ॥ २३ ॥
हा बोलु आयिकत खेवीं । अर्जुना आधी न माये जीवीं ।
ह्मणे देवें कृपा करावी । सांघावें तें ॥ २४ ॥
तेथ कृपालु चक्रवर्ती । ह्मणे आयिक तेयांची व्यक्ति ।
जे सात्विक शुक्ति । रत्नीं पघले ॥ २५ ॥
तरि अनादि परब्रह्म । जें जगदादिकंदाचें धाम ।
तेयाचें एक नाम । त्रिधा पैं असे ॥ २६ ॥
तें किर अनाम अजाति । परि अविद्यागर्वाचिये राती ।
माजि वोलखावेया श्रुती । खुण केली ॥ २७ ॥
कुटले संसारसीणें । जें देवों एंति गाऱ्हाणें ।
तेयां वो दे नामें जेणें । तो संकेतु हा ॥ २८ ॥
ब्रह्माचा अबोला फीटावा । अद्वैतु द्वैतत्वें भेटावा ।
ऐसा मंत्र देखिला कणवा । वेदें बापें ॥ २९ ॥
मग दाविलेनि जेणें एकें । ब्रह्म आलविलें कवतिकें ।
मागां असतां ठाकें । पुढां उभें ॥ २३० ॥
परि निगमाचलशिखरीं । उपनिषदार्थनगरीं ।
आहाति ब्रह्माचां जे एकहारीं । तेयांसी चि ॥ ३१ ॥
हें इं असो प्रजापति । शक्ति जे सृष्टि करिति ।
तें जेया एका आवृत्ती । नावांचिया ॥ ३२ ॥
पैं सृष्टिचेया उपक्रमा । पूर्वीं गा धीरोत्तमा ।
वेडा ऐसा ब्रह्मा । एकला होंता ॥ ३३ ॥
मग ईश्वरातें नेदखे । ना सृष्टि करुं न शके ।
तो एकु थोरु केला एकें । नावें जेणें ॥ ३४ ॥

जेयाचा अर्थु जीविं ध्यांतां । जें वर्णत्रय जपतां ।
विश्वसृजना योग्यता । आली तेयां ॥ ३५ ॥
तेधवां रचिले ब्रह्मजन । तेयां वेद दीधले सासान ।
यज्ञा ऐसें वर्त्तन । जीवें केलें ॥ ३६ ॥
पाठिं नेणों केती एर । मीनले लोक अपार ।
जालें ब्रह्मदत्त अग्रार । त्रिभुवन ॥ ३३७ ॥
ऐसें नाममात्रें जेणें । धात्रेया अढंच करणें ।
तेयाचें रूप आयिक ह्मणे । श्रीकांतु तो ॥ ३८ ॥
तरि सर्व मंत्रांचा राजा । तो प्रणउ आदिवर्णु बुझा ।
तत्कारु दूजा । तीजा सत्कारु ॥ ३९ ॥
एवं ॐतत्सदाकार । ब्रह्मनाम तें त्रिप्रकार ।
हें फूल तुरंबी सुंदर । उपनिषदातें ॥ ३४० ॥
येणेंसिं होउनि येक । जैं निर्वाळलें कर्म सात्विक ।
तैं कैवल्यातें पाइक । घरिचें करी ॥ ४१ ॥
यऱ्हविं कापुराचें थलिवं । आणुनि दइजैल दैवं ।
घेऊं जाणणें चि अडवं । तेथ असे बाणु ॥ ४२ ॥
तैसें आदरिजैल सत्कर्म । उच्चरिजैल हिं ब्रह्म नाम ।
परि नेणिजे जरि वर्म । विनियोगाचें ॥ ४३ ॥
तरि महंतांचिया कोडी । घरा आणिलेयां हिं वोढि ।
माणु नेणती परिवडी । मुद्दल तूटे ॥ ४४ ॥
कां लेयावेया चोखट । टीक भांगार एकवट ।
घालूनु बांधलीं मोट । गळां जेवि ॥ ४५ ॥
तैसें तोंडिं ब्रह्मनाम । हातिं तें सात्विक कर्म ।
विनियोगें विण काम । निष्फल होए ॥ ४६ ॥
आगा अन्न आणि भूख । पासिं असे परि देख ।
जेउं नेणतां बालक । लंवे चि तें ॥ ४७ ॥

कीं स्नेहा सूत्रा वैश्वानरा । जालेयां जऱ्हीं सवंसारा ।
हातवटी नेणतां वीरा । प्रकाशु नोहे ॥ ४८ ॥
तैसें वेळे कृत्य पावे । तेथिचा मंत्रु ही आठवे ।
परि वेर्थ तें आघवें । विनियोगें विण ॥ ४९ ॥
ह्मणौनि वर्णत्रयात्मक । जें हें ब्रह्मनाम एक ।
विनियोगु तूं आथिक । येयाचा आतां ॥ ३५० ॥

**तस्मादोमित्युदाहृत्य यज्ञदानतपःक्रियाः ॥**
**प्रवर्त्तंते विधानोक्ताः सततं ब्रह्मवादिनां ॥ २४ ॥**

तरि नामिं चि आखरें तीन्हीं । कर्मा आदि मध्यें निदानीं ।
प्रयुंजावि पैं स्थानीं । इहिं तीन्हीं ॥ ५१ ॥
हे चि एकी हातवटी । घडिली लोकिं किरीटी ।
आले ब्रह्मविद भेटी । ब्रह्माचिये ॥ ५२ ॥
ब्रह्मासिं होआवेया येकिं । ते वेंचति यज्ञादिकिं ।
जे चावळले वोळखी । शास्त्रांचिया ॥ ५३ ॥
तें आदि तवं ॐकारु । ध्यानें करिति गोचरु ।
पाठिं आणिति उच्चरु । वाचे ही तो ॥ ५४ ॥
तेणें ध्यानें प्रकटें । प्रणवोच्चारें स्पष्टें ।
लागति मग वाटे । क्रियांचिये ॥ ५५ ॥
आंधारिं अभंगु दिवा । अडविं समर्थु बोळावा ।
तैसा प्रणवु जाणावा । कर्मारंभीं ॥ ५६ ॥
उचितदेवउद्देशें । सुद्रव्यें धर्म्यें बहुवसें ।
द्विजद्वारा हवन हुताशें । त्याजिति पैं ते ॥ ५७ ॥
आहवनीयआदि वन्ही । निक्षेपरूपहवनिं ।
वेचिति पैं निधानीं । फुडे होउनि ॥ ५८ ॥
किंबहुना नाना याग । निष्पत्तिचें घेउनि आंग ।
करिति नावडतेयां त्याग । उपाधिचे ॥ ५९ ॥

कां न्यायें जोडला पवित्रिं । भूमादिकिं स्वतंत्रीं ।
देशकालशुद्धपात्रिं । देंति दानें ॥ ६० ॥
अथवा एकांतरा कृछ्रीं । चांद्रायणें मासोपवासिं ।
शोखुनु गा धातुराशी । करीति तपें ॥ ६१ ॥
येवं यज्ञदानतपें । जियें गाजंति बंधरूपें ।
तैं तें चि होये सोहपें । मोक्षाचें तेयां ॥ ६२ ॥
स्थळिं नावा जिया दाटिजे । जळिं तिया चि जेविं तरिजे ।
तेवि बंधकिं कर्मीं सूटिजे । नावें येणें ॥ ६३ ॥
परि हें असो ऐसिया । यज्ञदानादिक्रिया ।
ॐकारें सावाइलिया । प्रवर्त्तती ॥ ६४ ॥

**तदित्यनभिसंधाय फलं यज्ञतपःक्रियाः ॥**
**दानक्रियाश्च विविधाः क्रियंते मोक्षकांक्षिभिः ॥ २५ ॥**

तिया मोटकिया जेथ फळिं । रिगों पांति जिये काळिं ।
प्रयुंजीति तिये काळीं । तत्छब्दु हा ॥ ६५ ॥
जें सर्व ही जगा परौतें । जें एक सर्व ही देखतें ।
जें तत्छब्दें बोलिजे तें । पैल वस्तु ॥ ६६ ॥
तें सर्वादिकत्वें चित्तीं । तद्रूप ध्याउनि सुमती ।
उच्चारें हिं व्यक्ती । आणीति पुडुतीं ॥ ६७ ॥
ह्मणति तद्रूप ब्रह्म तिया । फळिं येंति क्रिया ।
होंतु आह्मां भोगावेया । काहिं चि तुरो ॥ ६८ ॥
ऐसें तदात्मक ब्रह्म । तेथ उगाणूनु कर्म ।
आंग झाडीति न मम । एणें बोलें ॥ ६९ ॥
आतां ॐकारें आदारिलें । तत्कारें समर्पिलें ।
इया रीतिं जेया आलें । ब्रह्मत्व कर्मीं ॥ २७० ॥
तें कर्म किर ब्रह्माकारें । जालें तेणें हिं न सरे ।
जें करितेनांसिं दूसरें । आहे ह्मणौनि ॥ ७१ ॥

मौठ आंगें जळिं विरे । परि क्षारता वेगळी उरे ।
तैसें कर्म ब्रह्माकारें । जाण तें द्वैत ॥ ७२ ॥
आणि दुजें जवं घडे । तवं संसारभय जोडे ।
हें देऊ आपुलेन तोंडें । बोलति वेदें ॥ ७३ ॥
ह्मणौनि परतत्वें ब्रह्म असे । तें आत्मत्वें परिवसे ।
सच्छद्बु रिणा दोसें । ठेविला देवें ॥ ७४ ॥
तरि ॐकारु तत्कारीं । जें जालें ब्रह्मकर्म शरीरीं ।
जें प्रशस्तादि बोल वरी । वाखाणिले ॥ ७५ ॥

**सद्भावे साधुभावे च सदित्येतत्प्रयुज्यते ॥**
**प्रशस्ते कर्मणि तथा सच्छब्दः पार्थ युज्यते ॥ २६ ॥**

प्रशस्ते कर्मिं तिये । सच्छद्बु विनियोगु आहे ।
तो चि आइकां होये । तैसा सांगों ॥ ७६ ॥
तरि सच्छद्वें एणें । आटूनि असंताचें नाणें ।
दाविजे अव्यंगवाणें । सत्तेचें रूप ॥ ७७ ॥
जें सत्तेचें काळें देशें । हों नेणे चि अनारिसें ।
आपणपां आपणं असे । अखंडीत ॥ ७८ ॥
हें दीसत जेतुलें आहे । तें असंतपणें जें नोहे ।
देखतां रूपिं सोये । लाभे जेयाची ॥ ७९ ॥
तेणेंसिं प्रशस्त तें कर्म । जें जालें सर्वात्मक ब्रह्म ।
देखिजे करुनि सम । ऐक्यबोधें ॥ ८० ॥
तेथ ॐकारु तत्कारें । जें कर्म दाविलें ब्रह्माकारें ।
तें गीळुनु होइजे एकसरें । चिन्मात्र चि ॥ ८१ ॥
ऐसा हा अंतरंगु । सच्छब्दाचा विनियोगु ।
जाण ह्मणे श्रीरंगु । मी न ह्मणें हो ॥ ८२ ॥
ना मी चि जरि ह्मणें । तरि श्रीरंगिं दूजें हें उणें ।
ह्मणौनि हें बोलणें । देवाचें चि ॥ ८३ ॥

**यज्ञे तपसि दाने च स्थितिः सदिति चोच्यते ॥**
**कर्म चैव तदर्थीयं सदित्येवाभिधीयते ॥ २७ ॥**

आतां आणिकी ही परी । सच्छब्दु हा अवधारीं ।
सात्विका कर्मा करी । उपकारु जो ॥ ८४ ॥
तरि संतें चि कर्में चांगें । चालिलिं अधिकारबगें ।
परि एकाधेनि अंगें । हीणावति जैं ॥ ८५ ॥
तैं उणें एक अवेवें । शरीर ठाके आधवें ।
कां अनेग हान भावे । राभस्याची गती ॥ ८६ ॥
तैसें एकें चि गुणें विण । संत चि परि असंतपण ।
कर्म करि गा जाण । जिये वेळे ॥ ८७ ॥
तेधवां ॐकारु तत्कारीं । सावायिला चांगी परी ।
सच्छब्द कर्मी करी । जीर्णोद्धारु ॥ ८८ ॥
तें असंतपण फेडी । आणि सद्भावाचिये रूढी ।
निज सत्वाचिया प्रौढी । सच्छब्दु हा ॥ ८९ ॥
वोषध जैसें रोगिया । कां सावाऊ ये भंगलेया ।
सच्छब्दु कर्मा वेगलेयां । तैसा जाण ॥ ३९० ॥
अथवा काहिं प्रमादें । कर्म आपुलिये मर्यादे ।
चूकौनि पडे निषिद्धे । वाटे हान ॥ ९१ ॥
चालतेया मार्गु सांडे । पारखियासि अखेरें पडे ।
राहाटी माजि न घडे । काइ काइ ॥ ९२ ॥
ह्मणौनि तैसी कर्मा । राभस्यें सांडे सीमा ।
असाधुत्वाचेया दुर्नामा । येवों पाहे जैं ॥ ९३ ॥
तेथ हा गा सच्छब्दु । येरिं दो प्रबुद्धु ।
प्रयुंजिला करी साधु । कर्मातें तेया ॥ ९४ ॥
लोहापरिसाची घृष्टि । वोहलागंगेची भेटि ।
मृत्या जैसी वृष्टि । पीयुषाची ॥ ९५ ॥

पैं असाधु कर्मी तैसा । सद्धु वीरेषा ।
हें असो गौरवु चि ऐसा । नामाचा येया ॥ ९६ ॥
घेउनि येथिचें वर्म । जैं विचारीसि हें नाम ।
तें केवळ हें चि ब्रह्म । जाणसी तूं ॥ ९७ ॥
पाहे पां ॐतत्सत् ऐसें । हें बोलणें तेथ नेत असे ।
जेथौनि कां प्रकाशे । दृश्यजात ॥ ९८ ॥
तें तवं निर्विशिष्ट । परब्रह्म चोखट ।
तेयाचें हें आंतुवट । व्यंजक नाम ॥ ९९ ॥
परि तो आश्रयो आकाशा । आकाश चि कां जैसा ।
येया नामा नामियां तैसा । अभेदु असे ॥ ४०० ॥
उदैला आकाशीं । रवी चि रवीतें प्रकाशी ।
हे नामव्यक्ति तैसी । ब्रह्मा करी ॥ १ ॥
ह्मणौनि त्र्यक्षर हें नाम । नव्हे जाण केवळ ब्रह्म ।
या ही लागि कर्म । जें जें कीजे ॥ २ ॥
ते याग अथवा दानें । तपादिकें हिं गहनें ।
तियें निफजति कां न्यूनें । होउनि ठांतु ॥ ३ ॥
परिसाचां वोरकळीं । नाहिं चोखाकीडाची बोली ।
तैसिं ब्रह्मि अर्पितां केलीं । ब्रह्म चि होंति ॥ ४ ॥
उणेयापुरेयाचिया परी । तुरती चि तेथ अवधारिं ।
निवडूं न यंति सागरीं । जैसिया नदी ॥ ५ ॥
एवं पार्था तुज प्रति । ब्रह्मनामाची हे शक्ति ।
सांघितली उपपत्ती । डोळसा गा ॥ ६ ॥
आणि एका एका ही आखरा । वेगळवेगळा वीरा ।
विनियोगु नागरा । बोलिलों रीती ॥ ७ ॥
आतां एवं सुमहिम । ह्मणौनि हें ब्रह्मनाम ।
जाणितलें किं सुवर्म । राया तुवां ॥ ८ ॥

तरि येथौनि याची श्रद्धा । उपलविली हो सर्वदा ।
जेयाचें जालें बंधा । उरों नेंदी ॥ ९ ॥
जिये कर्मि हा प्रयोगु । अनुष्ठिजे सविनियोगु ।
तेथ अनुष्ठिला होये सांगु । वेदु चि तो ॥ ४१० ॥

**अश्रद्धया हुतं दत्तं तपस्तप्तं कृतं च यत् ॥**
**असदित्युच्यते पार्थ न च तत्प्रेत्य नो इह ॥ २८ ॥**

सांडूनि हे सोए । मोडूनि श्रद्धेची बाहे ।
दुराग्रहाची चि त्राये । वाढउनियां ॥ ११ ॥
मग अश्वमेधां कोडी कीजे । रत्ना भरूनि पृथिवी दीजे ।
एकांगुष्ठि हीं तपिजे । तपसहस्त्रीं ॥ १२ ॥
जलाशयाचेन नावें । समुद्र ही कीजतु नवे ।
परि किंबहुना आघवें । वृथा चि तें ॥ १३ ॥
पाषाणा वरि वर्षलें । जैसें भस्मीं हवन केलें ।
कां खेवं दीधलें । साउलिये ॥ १४ ॥
नातरि जैसें चडकणां । गगन हाणितलें अर्जुना ।
तैसा सामारंभु सुना । गेला चि तो ॥ १५ ॥
घाणा गालिले खडे । तेल ना पेंडि जोडे ।
तैसें दलिद्र तेवडें । ठेलें चि आंगि ॥ १६ ॥
गांठि बांधली खापरी । एथ अथवा पैली तीरीं ।
न सरौनि जैसी मारी । उपवासिं गा ॥ १७ ॥
तैसें कर्मजातें तेणें । नाहिं इहिकिचें भोगणें ।
तेथ परत्र कें कवणें । आक्षेपावें ॥ १८ ॥
ह्मणौनि ब्रह्मनामश्रद्धा । सांडूनि कीजे तो धांधा ।
हें असो सीनु नसुदा । दृष्टादृष्टीं ॥ १९ ॥
ऐसें कलुषकरीकेसरी । त्रितापतिमिरतमोरी ।
२१ श्रीवीखरनरहरी । बोलिलें तेणें ॥ ४२० ॥

तैथ निजानंद—बहुवसा । माजि अर्जुनु तो सहसा ।
हारतला चंद्रु जैसा । चांदिणेन ।। २१ ।।
आहो संग्रामु हा वाणियां । मापें नाराजांचिया अणियां ।
सूनि मांस घे मवणियां । जीवितेंसि ।। २२ ।।
ऐसेयांचा हिं घरिं कर्कसें । भोगिजत स्वानंदराज्य कैसें ।
आजि भाग्यउदो हान असे । आनी ठांइं ।। २३ ।।
संजयो ह्मणे कौरवराया । गुणा रिझों ये रिपुचेया ।
आणि गुरु ही हा आमचेया । सुखाचा स्वामि ।। २४ ।।
हा न पुसता हे गोठि । तरि देवो सोडिते कां गांठि ।
तरि कैसेनि आह्मां भेटि । परमार्थेंसि ।। २५ ।।
होंतों अज्ञानाचा आंधारां । वोसंतीत जन्म वारा ।
तें अत्मप्रकाशमंदिरा । आंतु आणिलों ।। २६ ।।
येवडा आह्मां तुह्मां थोरु । केला एणें उपकारु ।
ह्मणौनि हा व्याससहोदरु । गुरुत्वें होए ।। २७ ।।
तेविं चि संजयो ह्मणे चित्तीं । हा अतिसो या नृपती ।
खुपैल ह्मणौनि केती । बोलों असो ।। २८ ।।
ऐसी बोली सांडिली । मग येरीची गोठि आदरिली ।
जे पार्थे कां पूसिली । श्रीकृष्णातें ।। २९ ।।
तें चि जैसें जाणणें । तैसें मीं हीं करीन बोलणें ।
आइकिजो ज्ञानदेउ ह्मणे । निवृत्तिचा ।। ४३० ।।

ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे **श्रद्धात्रयविभागयोगो** नाम सप्तदशोऽध्यायः ।



# ज्ञानेश्वरी

## अध्याय अठरावा

**श्रीगणेशायनमः ॥**

जय जय देव निर्मला । निजजनाखिलमंगला ।
जन्मजराजलदजाला । प्रभंजना ॥ १ ॥
जय जय देव प्रबला । विदलितामंगलकुला ।
निगमागमद्रुमफला । फलप्रदा ॥ २ ॥
जय जय देव सकला । विगतविषयवत्सला ।
कलितकालकौतूहला । कलातीता ॥ ३ ॥
जय जय देव निश्चला । चलचित्तपानतुंदिला ।
जगदुन्मीलनाविरला । केलिप्रिया ॥ ४ ॥
जय जय देव निष्कला । स्फुरदमंदानंदबहुला ।
निरस्ताखिलामंगला । मूलभूता ॥ ५ ॥
जय जय देव स्वप्रभ । जगदंबुदगर्भनभ ।
भवनोद्भवारंभस्तंभ । भवध्वंस ॥ ६ ॥
जय जय देव शुद्ध । विदुदयोद्यानद्विरद ।
शमदममदनमदभेद । दयार्णव ॥ ७ ॥
जय जय देवैकरूप । अतिकृतकंदर्पसर्पदर्प ।
भक्तभावभुवनदीप । तापापह ॥ ८ ॥

जय जय देव अद्वितीय । परिणतोपरमैकप्रिय ।
निजजयजितभजनीय । मायागम्य ॥ ९ ॥
जय जय देव श्रीगुरो । अकल्पनाप्यकल्पतरो ।
स्वसंविद्रुमबीजप्ररो—। हणावनी ॥ १० ॥
हें एकैक ऐसें । नाना परिं भाषावसें ।
स्तोत्र करुनि तुज दोसें । निर्विशेषा ॥ ११ ॥
जिहिं विशेषणीं विशेषिजे । तें दृश्य नव्हे रूप तूझें ।
हें जाणें ह्मणौनि मी लाजें । वानणां इहीं ॥ १२ ॥
परि मर्यादेचा सागरु । हा तवं तेया डगरु ।
जवं नेदखे सुधाकरु । उदया आला ॥ १३ ॥
सोमकांतु निज निर्झरीं । चंद्रा अर्घ्यादीक न करी ।
तें तो चि अवधारीं । करवी कीं जी ॥ १४ ॥
नेणों कैसें वसंतसंगें । अवचितिं झाडांचि आंगें ।
फूटति तें तेया ही जोगें । धरणें नोहे ॥ १५ ॥
पद्मिनी रविकिरण । लाहे मग लाजे कवण ।
कां जळें सीतळें लवण । आंग भूले ॥ १६ ॥
तैसा तूतें मीं जेथ स्मरें । तेथ मालातिलें जें विसरें ।
मग जाकलिला ढेंकरें । तृप्तु जैसा ॥ १७ ॥
मज तुवां जी केलें तैसें । माझें मीपण दवडूनि देशें ।
स्तुतिमीसें पांचपीसें । बांधलिं वाचे ॥ १८ ॥
ना यऱ्हविं तऱ्हि आठवीं । राहुनि स्तुति जैं करावी ।
तैं गुणां गुणियां धरावी । सरोभरी ॥ १९ ॥
तरि एकरसाचें जी तूं लिंग । केवि करुं गुणागुणि भाग ।
मोति फोडुनु सांधितां चांग । किं तैसें चि भलें ॥ २० ॥
जी जालेनि पाइकें आलें । तें गोसांविंपण केवि बोलें ।
ऐसा उपाधि उसिटिलें । काइ वानूं ॥ २१ ॥

आणि बापु तूं माए । इहिं बोलिं ना स्तुति होये ।
तरि डिंभोपाधिकु आहे । विडाळु तेथ ॥ २२ ॥
तरि आत्मा तूं यकसरा । हें ह्मणों जांतां दातारा ।
आंतौनि बाहिरां । घापतासि ॥ २३ ॥
ह्मणौनि साच तुज लागि । स्तुति नेदखें जगीं ।
मौन वांचौनि लेणें आंगि । सूंसि नामा ॥ २४ ॥
स्तुति काहिं न बोलणें । पूजा काहिं न करणें ।
संनिधि केहीं न होणें । तूझां ठांइं ॥ २५ ॥
तऱ्हीं जींतलें जैसें भूली । पिसे आलव घाली ।
तैसें वानूं तें माउली । उपसाहे तूं ॥ २६ ॥
आतां गीतार्थाची मुदी । लावीं माझिये वाग्रिद्धी ।
जियां माने सभासदिं । सज्जनांसि ॥ २७ ॥
तवं ह्मणितलें श्रीनिवृत्ती । नको हें पुडुतीं पुडुतीं ।
परिसिं लोहवृष्टी केती । वेळा कीजे गा ॥ २८ ॥
तवं विनवीतु ज्ञानदेउ । ह्मणे हो कां जीं पसावो ।
तरि अवधान देतु देउ । ग्रंथा आतां २९ ॥
जी गीतारत्नप्रासादाचा । कळशु अर्थचिंतामणिचा ।
सर्वगीतादर्शनाचा । पाढावो जो ॥ ३० ॥
लोकिं तऱ्हीं आथि ऐसें । जें दूरौनि कळशु दीसे ।
भेटी चि हातवसे । देवतेचिये ॥ ३१ ॥
तैसें चि एथ आहे । जें एकें चि एणें अध्यायें ।
आघवा चि दृष्टु होए । गीतागमु हा ॥ ३२ ॥
मी कळशु या कारणें । अठरावां अध्याउ ह्मणें ।
चाइला बादरायणें । गीताप्रासादासि ॥ ३३ ॥
नाहिं कळशा परौतें काहिं । प्रासादिं काम नाहिं ।
ते सांघतसे गीता ही । संपलेपणें ॥ ३४ ॥

व्यासु साहाजें सूत्रीं बळी । तेणें निगमरत्नाचाळिं ।
उपनिषदाची माळी । माजि खांडिली ॥ ३५ ॥
तेथ त्रिवर्गाचा अणुआरु । आड निगाला जो अपारु ।
तें महाभारतप्राकारु । भवंता केला ॥ ३६ ॥
माजि आत्मज्ञानाचें एकवट । दळवाडें झाडूनु चोखट ।
घडिलें पार्थवैकुंठ— । संवादकुसरी ॥ ३७ ॥
निवृत्तिसूत्रसोडवणियां । सर्वशास्त्रपुरवणियां ।
आवो सांधिला मांडणियां । मोक्षरेखेचा ॥ ३८ ॥
ऐसेन करितां उभारा । पन्हरा अध्याय ते पन्हरा ।
भूमि निर्वाळलेया पुरा । प्रासादु जाला ॥ ३९ ॥
उपरि सोळावां अध्याउ । तो ग्रीवेघंटेचा आउ ।
सप्तदशु तो ठाउ । पडिवाणिये ॥ ४० ॥
तेया ही वरि अष्टादशु । तो आपैसेया मांडला कळशु ।
उपरि गीतादिकिं व्यासु । ध्वजे लागला ॥ ४१ ॥
ह्मणौनि मागील अध्याये । जे चढतेयां भूमीचे आये ।
तेयांचें पुरें दावितु आहे । आपुलां आंगीं ॥ ४२ ॥
जालेया कामा नाहिं चोरी । ते कळशें होये उजिरी ।
तेवि अष्टादशु विवरीं । साद्यंत गीता ॥ ४३ ॥
ऐसा व्यासें विंदाणियें । गीताप्रासादु सोडवणियें ।
आणूनि रक्षिले प्राणियें । नाना परीं ॥ ४४ ॥
एक प्रदक्षिणा जपाचिया । बाहिरौनि करिति एया ।
एक श्रवणमीसें छाया । सेविति येयाची ॥ ४५ ॥
एक अवधानाचा पुरा । विडा पाउड भितरां ।
देउनि रिगति गाभारां । अर्थज्ञानाचां ॥ ४६ ॥
ते निजबोधें उराउरी । भेटति आत्मेयां श्रीहरी ।
परि मोक्षप्रासादिं सरी । सर्वां हीं आथि ॥ ४७ ॥

ऐसा गीतावैष्णउप्रासादु । अठरावां कळशु विशदु ।
मियां ह्मणितला हा भेदु । जाणौनियां ॥ ४८ ॥
आतां सप्तदशा पाठिं । अध्याउ कैसेनि उठी ।
तो संबंधु सांघों दीठी । दीसे तैसा ॥ ४९ ॥
न मोडतां दोन्हीं आकार । घडलें एक शरीर ।
हें अर्धनारीनटेश्वर । पूरें दीसे ॥ ५० ॥
कां गंगायमुनाउदक । वोघवलें वेगळीक ।
दावी होउनि एक । पाणीपणें ॥ ५१ ॥
नाना वांटली दिवसें । कळा बिंबिं बैसे ।
परि वेगळें जैसें । चंद्रिं नाहिं ॥ ५२ ॥
तैसीं सिनानीं च्यारही पदें । श्लोकु श्लोकावबोधें ।
अध्यायो अध्यायभेदें । गमे किर ॥ ५३ ॥
परि प्रमेयाची उजिरी । आनान रूप न धरी ।
नाना रत्नें मणी दोरी । एकी चि जैसी ॥ ५४ ॥
मोतियें मेळउनि बहुवें । एकावळिचा पाडु आहे ।
परि शोभे रूप होये । एक चि जेथि ॥ ५५ ॥
फूलां फुलसरा लेख चढे । द्रुति दूजी आंगुली न पडे ।
श्लोक अध्याय तेणें पाडे । जाणावे हे ॥ ५६ ॥
सातें शतें श्लोक । अध्यायां अठरांचें लेख ।
परि देउ बोलिले एक । जें दुजें नाहिं ॥ ५७ ॥
मिया हिं न संडूनि ते सोए । ग्रंथा व्यक्ति केली आहे ।
प्रस्तुत ही तेणें निर्वाहें । निरूपण आइकां ॥ ५८ ॥
तरि सतरावां अध्याउ । पावतां पुरता ठाउ ।
संपतां श्लोकिं देउ । ऐसें बोलिले ॥ ५९ ॥
अर्जुना ब्रह्मनामाचां विधिं । बुद्धि सांडुनि आस्तिकी ।
कर्मे कीजति जेतुकिं । असंतें होंति ॥ ६० ॥

हा आइकौनि देवाचा बोलु । अर्जुना आला डोलु ।
ह्मणे कर्मनिष्ठा मूलु । ठेला देखों ॥ ६१ ॥
अर्जुनघु तो अज्ञानांधु बापुडा।ईश्वरू चि नेदखे एवडा।
तेथ नावं एक पुढां । कां सुझे तेया ॥ ६२ ॥
आणि रजतमें दोन्हीं । गेलेयां सात्वीक श्रद्धा सानीं ।
ते कां लागे अभिधानीं । ब्रह्माचिये ॥ ६३ ॥
मग कोंतां खेवं देणें । वार्त्ते वरिल धावणें ।
संडीं फडे खेलवणें । नागिणिएची ॥ ६४ ॥
तैसिं कर्मे दुवाडें । तेयां हिं जन्मांतराचि कडे ।
दुर्मेळावे यन्हडे । कर्मा माझि ॥ ६५ ॥
ना विपायें उजू होए । तरि ज्ञानाची योग्यता लाहे ।
यन्हवि येणें चि जाये । निरयासि ॥ ६६ ॥
कर्मि हा ठावो वेन्हीं । आहाति बहुवा अवसरी ।
आतां कर्मठा कैंची वारी । मोक्षाची एथ ॥ ६७ ॥
तरि फीटो कर्माचा पांगु । कां जो आघवा चि त्यागु । कीजो
आदरिजो अव्यंगु । संन्यासु तो ॥ ६८ ॥
कर्मबाधाची काहिं । जेथ भयाची गोठि नाहिं ।
तें आत्मज्ञान जिहीं । स्वाधीन केलें ॥ ६९ ॥
ज्ञानाचे आव्हान मंत्र । जें ज्ञान पीकतें सुक्षेत्र ।
ज्ञान आकर्षिते सूत्र । तंतु जे कां ॥ ७० ॥
दोन्हीं संन्यास त्याग । अनुष्ठूनि सूटो जग ।
तरि आतां हे चि चांग । व्यक्ति पूसों ॥ ७१ ॥
ऐसें ह्मणौनि पार्थें । त्यागसंन्यासव्यवस्थे ।
रूप होआवेया जेथें । प्रश्नु केला ॥ ७२ ॥
तेथ प्रत्युत्तरें बोलि । श्रीकृष्णें जे सांघितली ।
तेया व्यक्ति जाली । अष्टादशो ॥ ७३ ॥

एवं जन्यजनकभावें । अध्यावो अध्यायातें प्रसवे ।
आतां आइकां बरवें । प्रसिलें तें ॥ ७४ ॥
तरि पांडुकुमरें तेणें । देवाचें सरतें बोलणें ।
जाणौनि अंतष्करणें । काणि घेतली ॥ ७५ ॥
यऱ्हविं तत्वविषिं भला । तो निश्चितु किर आहे जाला ।
परि देउ॰ राहे उगला । हें साहावे ना ॥ ७६ ॥
वत्स धालेयां हिं वरि । धेनु न वचावी दूरि ।
अनन्य प्रीतिची परि । ऐसी चि असे ॥ ७७ ॥
तेणें काजें विण बोलावें । तें देखिलें तऱ्हीं पाहावें ।
भोगितां चाड दूणावे । पढियंतां ठांइं ॥ ७८ ॥
ऐसीं प्रेमाची जाति । पार्थु तवं ते चि मूर्त्ति ।
ह्मणौनि करुं लाहे खंति । उगेपणाची ॥ ७९ ॥
आणि संवादाचेनि मीसें । जें अव्यवहारी वस्तु असे ।
तें चि भोगिजे जैसें । आरिसां रूप ॥ ८० ॥
मग संवादु तो चि पारुखे । तरि भोगणें भोगीं थेके ।
हें कां साहावैल सुखें । लांचावलेयां ॥ ८१ ॥
या लागि त्याग संन्यास । पुसावेयाचें घेउनि मीस ।
उपरतविलें दूस । गीतेचें तें ॥ ८२ ॥
अठरावा अध्याउ॰ हा नोहे । हें एकाध्याई गीता चि आहे ।
जैं धांसुरुं चि गाये दुहे । तैं वेळ काइसी ॥ ८३ ॥
तैसें संपतां हिं अवसरिं । गीता आदरविली माघारी ।
स्वामिभृत्याचा न करी । संवादु काई ॥ ८४ ॥

**अर्जुन उवाच ॥**

संन्यासस्य महाबाहो तत्वमिछामि वेदितुं ॥
त्यागस्य च हृषीकेश पृथक्केशिनिषूदन ॥ १ ॥

परि हें असो ऐसें । अर्जुनें पुसिजत असे ।
ह्मणे विनती विश्वेशें । अवधारिजो ॥ ८५ ॥
हां जी संन्यासु आणि त्यागु । यां दोहिं एकि अर्थि लागु ।
जैसा सांघातु आणि संगु । संगातें बोलिजे ॥ ८६ ॥
तैसें त्यागें आणि संन्यासें । त्यागू चि बोलिजत असे ।
अमचेनि तवं मानसें । ऐसें जाणिजे ॥ ८७ ॥
ना काहिं आथि अर्थभेदु । तो देवो करीतु विशदु ।
एथ ह्मणे मुकुंदु । भिन्न चि पैं ॥ ८८ ॥

**श्रीभगवानुवाच ॥**

**काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः ॥**
**सर्वकर्मफलत्यागं प्राहुस्त्यागं विचक्षणाः ॥ २ ॥**

थऱ्हवि अर्जुना तूझां मनिं । त्याग संन्यास दोन्हीं ।
एकार्थ गमले हें मानी । मीं ही साच ॥ ८९ ॥
किर दोहिं इहिं शब्दिं । त्यागु चि बोलिजे त्रिशुद्धी ।
परि कारण एथ भेदीं । एतुलें चि ॥ ९० ॥
जें निपटौनि कर्म सांडिजे । तें सांडणें संन्यासु ह्मणिजे ।
आणि फलमात्र कां तेजिजे । त्याग तो गा ॥ ९१ ॥
परि कोणा कर्माचें फल । सांडिजे कोण वर्म केवल ।
हें इं सांघों विमल । चित्त दे पां ॥ ९२ ॥
तरि आपैसेया दांगें डोंगर । झाडलीं वीति असार ।
तैसे लांबे राजागर । नुठिति ते ॥ ९३ ॥
न पेरितां सैघ तृणें । उठिति तैसें सालिचें होणें ।
नाहिं गा राबाउणें । जेया परीं ॥ ९४ ॥
कां आंग जालें साहाजे । परि लेणें उद्यमें कीजे ।
नई आपैसी आपादिजे । विहिर जेवि ॥ ९५ ॥

तैसें नित्यनैमित्तिक । कर्म होये स्वाभाविक ।
परि न कामितां कामिक । न निफजे जें ॥ ९६ ॥
कामनेचें दळवाडें । जें उभावेया घडे ।
अश्वमेधादिक फुडे । याग जेथ ॥ ९७ ॥
वापी कूप आराम । अग्रहारें दान ग्राम ।
आणिक ही संभ्रम । व्रतांचे जे ॥ ९८ ॥
ऐसें इष्टापूर्त सकळ । जेया कामना एकि मूळ ।
जें केलें भोगवी फळ । बांधौनियां ॥ ९९ ॥
देहाचेया गावां आलेयां । जन्ममृत्युचेया सोहळेया ।
ना ह्मणों नेए धनंजया । जेया परीं ॥ १०० ॥
कां ललाटिचें लिहिलें । न मोडे काहिं केलें ।
काळे—गोरेपण धूतलें । फीटों नेणे ॥ १ ॥
केलें काम्य कर्म तैसें । फळभोगाचें धरणें बैसे ।
न फेडिता रिण जैसें । वोसंडी ना ॥ २ ॥
कां कामना हिं न करितां । अवसांत घडे पांडुसुता ।
परि वायकांड न जुझतां । लागे जैसें ॥ ३ ॥
गुळ नेणतां तोंडीं । घातला दे चि गोडी ।
अग्नि नेणोनि राखौंडी । चेंपिलें पोळी ॥ ४ ॥
काम्य कर्माचें हें एक । सामर्थ्य असे स्वभाविक ।
ह्मणौनि नको कवतिक । मुमुक्षुं एथ ॥ ५ ॥
किंबहुना पार्था ऐसें । जें काम्य कर्म गा असे ।
तें तेजिजें विष जैसें । वोकुनियां ॥ ६ ॥
मग तेया त्यागातें जगीं । संन्यासु ऐसेया भंगी ।
बोलिजे अंतरंगीं । सर्वद्रष्टां ॥ ७ ॥
हें काम्य कर्म सांडणें । तें कामनेतें चि उपडणें ।
धनत्यागें दवडणें । जैसें भय ॥ ८ ॥

सोमसूर्यग्रहणें । एउनि करिति पार्वणें ।
कां मातापितरमरणें । अंकितें जें दीस ॥ ९ ॥
अथवा अतिथी हान पावे । ऐसां पडें जें करावें ।
तें तें कर्म जाणावें । नैमित्तिक गा ॥ ११० ॥
वारिषिया क्षोभे गगन । वसंतें दुणावे वन ।
देहशृंगारीं यौवन । दशा जैसी ॥ ११ ॥
कां सोमकांतु सोमें पाल्हाले । सूर्यें फाकति कमळें ।
एथ असे तें चि पघळें । आन नैए ॥ १२ ॥ देपेर्कि
तैसें नित्य जें कां कर्म । तें नैमित्तिकाचें लाहे नियम ।
एथ उंचावें तेणें नाम । नैमित्तिक होए ॥ १३ ॥
आणि सायंप्रातर्मध्यानीं । जें करणीय प्रतिदिन्हीं ।
परि दृष्टि जैसी लोचनीं । अधिक नोहे ॥ १४ ॥
कां नापादितां गति । चरणीं जैसी आथि ।
नातरि दीप्ति । दीपबिंबि ॥ १५ ॥
वासु नेंदितां जैसें । चंदनीं सुगंधत्व असे ।
अधिकाराचें तैसें । रूप चि जें ॥ १६ ॥
नित्य कर्म ऐसें जनीं । पार्था बोलिजे तें हें मानीं ।
एवं नित्यनैमित्तिकें दोन्हीं । दाविलिं तुज ॥ १७ ॥
हें नित्यनैमित्तिक । अनुष्ठितां आवश्यक ।
ह्मणौनि ह्मणों पांति एक । वांझ ययातें ॥ १८ ॥
परि भोजनीं जैसें होए । तृप्तिलाभें भूक जाए ।
तैसें नित्यनैमित्तिक आहे । सर्वांगिं फळ ॥ १९ ॥
कीड आगिठां पडे । मळ तूटे वानीं चढे । समूळ
या कर्मा तेया सांगडें । फळ जाणावें ॥ १२० ॥
जें प्रत्यवावो तवं गळे । स्वाधिकारु बहुवें उजळे ।
तेथ हातोफळिया मिळे । सद्गतीसिं ॥ २१ ॥

एवडें वेरि ढिसाळ । नित्यनैमित्तिकिं आहे फळ ।
परि त्यजिजे मूळ । नक्षत्रीं जैसें ॥ २२ ॥
लता पीके आघवी । तवं चूतु बांधे पालवी ।
मग हातु न लवी माधवी । सांडुनि घाली ॥ २३ ॥
तैसी नोलांडितां रेखा । चित्त दीजे नित्यनैमित्तिकां ।
पाठिं फला कीजे अशेषा । वांतिची वानी ॥ २४ ॥
एया कर्मफलत्यागातें । त्यागु पैं ह्मणति जाणते ।
एवं संन्यास त्याग तूतें । परिसविले ॥ २५ ॥
हा संन्यासु जैं संभवे । तैं काम्यबाधु न पवे ।
निषिद्ध तवं स्वभावें । निषिद्धें गेलें ॥ २६ ॥
आणि नित्यादिक असे । तें एणें फलत्यागें नासे ।
शिर लोटिलेयां जैसें । एर आंग ॥ २७ ॥
मग सस्य फलपाकांत । तैसें निमालेयां कर्मजात ।
आत्मज्ञान गिवसीत । आपैसें ए ॥ २८ ॥
एसिया निगुती दोन्हीं । त्यागसंन्यासअनुष्ठानीं ।
पडिले गा आत्मज्ञानीं । बांधति पाटु ॥ २९ ॥

**त्याज्यं दोषवदित्येके कर्म प्राहुर्मनीषिणः ॥**
**यज्ञदानतपःकर्म न त्याज्यमिति चापरे ॥ ३ ॥**

नातरि हे निगुति चूके । मग त्यागु कीजे हाततूकें ।
तैं काहिं न त्यजे अधिकें । गोवी चि पडे ॥ १३० ॥
जें ऊखद व्याधी अनोळख । तें घेतलेयां परते चि विष ।
कां जें अन्न न मनीं भूक । तें मारी ना काई ॥ ३१ ॥
ह्मणौनि त्याज्य जें नोहे । तेथ त्यागातें न सुआवें ।
त्याज्या लागि नोहावें । लोभापरां ॥ ३२ ॥
चूकलेयां त्यागाचें बेझें । केला सर्वत्यागु हो वोझें ।
निषिद्धोंसि सर्वत्र जूझें । वीतरागां ॥ ३३ ॥

एकां फलत्यागु न टके । ते कर्मातें ह्मणति बंधकें ।
जैसें आपण नग्न भांडुकें । जगातें ह्मणे ॥ ३४ ॥
कां जिव्हालंपटु रोगिया । अन्नें दुखीं धनंजया ।
नातरि आंगें नरु कुष्ठिया । मासियां कोपे ॥ ३५ ॥
तैसें फलकामिं दुर्बल । ह्मणति कर्म कीडाळ ।
मग निर्णयो देंति केवळ । त्यजावें ऐसा ॥ ३६ ॥
एक ह्मणति यागादिक । करावें आवश्यक ।
हें वांचौनि शोधक । आन नाहिं ॥ ३७ ॥
मनशुद्धिचां मार्गिं । जें विजैयां होआवें जगीं ।
तैं कर्मसंबंधा लागि । आलसु न कीजे ॥ ३८ ॥
भांगार आथि शोधावें । तरि आगी जेवि नुभगावें ।
कां आरिसेया लागि सांचावें । अधिकें रजें ॥ ३९ ॥
ना लुगडीं चोखें होआविं । ऐसें जरि आथि जीविं ।
तरि सवंदणि न मनावी । मळीन ऐसी ॥ १४० ॥
तैसिं कर्में क्लेशाकारें । ह्मणौनि ने नाविं अव्हेरें ।
कां अन्न लाभे अरुवारें । रांधितिए उणे ॥ ४१ ॥
तरि इहिं गा शद्धीं । एक कर्म बांधति बुद्धी ।
ऐसा त्यागु विसंवादीं । पडौनि ठेला ॥ ४२ ॥
परि आतां विसंवादु तो फीटे । हा त्यागाचा निश्चयो भेटे ।
तैसें बोलों गोमटें । अवधान देइं ॥ ४३ ॥

**निश्चयं श्रुणु मे तत्र त्यागे भरतसत्तम ॥**
**त्यागो हि पुरुषव्याघ्र त्रिविधः संप्रकीर्त्तितः ॥ ४ ॥**

तरि त्यागु एथ पांडवा । त्रिविधु पैं जाणावा ।
तेया ही त्रिविधा बरवा । निवाडु सांघों ॥ ४४ ॥
त्यागिचे तीन्ही प्रकार । कीजति जन्हीं गोचर ।
तन्हीं इत्यर्थाचें सार । एतुलें एथ ॥ ४५ ॥

मज सर्वज्ञाचिये बोधीं । जें अलोट माने त्रिशुद्धी ।
तें निश्चित तवं आधीं । विचारि पां ॥ ४६ ॥

**यज्ञदानतपःकर्म न त्याज्यं कार्यमेव तत् ॥**
**यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणां ॥ ५ ॥**

तरि आपुलिये सोडवणे । जो मुमुक्षु जागों ह्मणे ।
तेया सर्वस्वें करणें । हें चि एक ॥ ४७ ॥
जियें यज्ञदानतपादिकें । यें कर्में आवश्यकें ।
तियें न संडावि पांथिकें । पाउलें जैसीं ॥ ४८ ॥
हारतलें न देखिजे । तवं मागु न संडिजे ।
कां न धांतां न लोटिजे । भाणें जेवि ॥ ४९ ॥
नाव थडी न पवतां । न सुंडिजे केळि न फळतां ।
कां ठेविलें न दिसतां । दीपु जैसा ॥ १५० ॥
तैसी आत्मज्ञानविषिं । जवं निश्चिति नाहिं नीकी ।
तवं न व्हावें यागादिकिं । उदासीनां ॥ ५१ ॥
पैं स्वाधिकारानुरूपें । तियें दानयागतपें ।
अनुष्ठावि आक्षेपें । अधिकें वर ॥ ५२ ॥
जें चालणें वेगावत जाए । तो वेगु बैसावेया चि होये ।
तैसा कर्मा अतिसो आहे । निष्कर्मा लागि ॥ ५३ ॥
अधिकिं जवं जवं ओखदीं । सेवनेची मांडे बांधी ।
तवं तवं मूंकिजे व्याधी । तेयाचिया ॥ ५४ ॥
तैसिं कर्में हातोपातीं । पैं कीजति यथानिगुती ।
तैं रजतमें झडती । दोन्हीं एथ ॥ ५५ ॥
मग पाठिचां वाटीं पुटें । भांगारा देणें घटे ।
तैं कीड झडकारि तूटे । निर्व्याज होए ॥ ५६ ॥
तैसें निष्ठा केलें कर्म । सांडूनि रजतम ।
सत्वशुद्धिचें धाम । डोळां दावी ॥ ५७ ॥

ह्मणौनि गा धनंजया । सत्वशुद्धि गिंवसी तेयां ।
तीर्थें यें सावाया । आलिं कर्मे ॥ ५८ ॥
तृषार्त्तो मरुत देसीं । झले अमृतें वोळली जैसी ।
कां अंधा लागि डोळांसिं । सूर्यो आला ॥ ५९ ॥
बुडतेया नइ चि धांविनली । पडतेया पृथ्वी कलवलली ।
मरतेया मृत्यू दीधली । आयुष्यरिद्धी ॥ १६० ॥
तैसें कार्मिं बांधतां । मुमुक्ष सूटले पांडुसुता ।
जैसा रसरीती मरता । राखिला विखें ॥ ६१ ॥
तैसिं येकी हातवटिया । कर्मे केलीं धनंजया ।
बंधकें चि सोडावेया । मुख्य होंति ॥ ६२ ॥

**एतान्यपि तु कर्माणि संगं त्यक्त्वा फलानि च ॥**
**कर्तव्यानीति मे पार्थ निश्चितं मतमुत्तमं ॥ ६ ॥**

आतां ते चि हातवटी । तुज ही सांघों गोमटी ।
जेया कर्मासि किरीटी । कर्म चि रूसे ॥ ६३ ॥
तरि महायागप्रमुखें । कर्मे निफजति अचुकें ।
कर्तेपणाचें न टके । फुंजणें आंगीं ॥ ६४ ॥
जो मोले तीर्था जाये । तेयासि यात्रा करीतु आहें ॥
ऐसिया श्लाध्यता नोहे । तोखु जिवीं ॥ ६५ ॥
कां मुद्रा समर्थाचिया । एकटु झोंबे राया ।
तो मीं जीणतसें येया । न ये जेवि गर्वा ॥ ६६ ॥
जो कासे लागौनि तरे । तेया पव्हती उर्मि नुरे ।
पुरोहितु नाविष्करे । दातेपणें ॥ ६७ ॥
तैसें कर्तुत्व अहंकारें । नेघौनि यथावसरें ।
कृत्यजाताचें मोहिरें । सारिजति ॥ ६८ ॥
आणि केलें कर्म पांडवा । जो आथि फलाचा यावा ।
तेया मोहरा न व्हावा । मनोरथु ॥ ६९ ॥

आदिं चि फळिं आसतूटिया । कर्मे आरंभावीं धनंजया ।
परावें बाळ धाया । पाहिजे जैसें ॥ १७० ॥
पिंपरुवांचेया आशा । न सिंपिजे पिंपळु जैसा ।
तैसिया फळनिराशा । कीजति कर्मे ॥ ७१ ॥
सांडूनि दूधाची टकुली । गोवारी गावंधणें वेंटाळी ।
किंबहुना कर्मफळीं । तैसें कीजे ॥ ७२ ॥
ऐसी हे हातवटी । घेउनि क्रिया जे उठी ।
आपुलिया आपण गांठी । लाहे चि तो ॥ ७३ ॥
ह्मणौनि फळिं लागु । सांडौनि देहिं संगु ।
कर्मे करावि हा चांगु । निरोपु माझा ॥ ७४ ॥
जो जीवबंधें सीणला । सूटिकिं जचे आपुला ।
तेणें पुडुतीं या बोला । आन न कीजे ॥ ७५ ॥

**नियतस्य तु संन्यासः कर्मणो नोपपद्यते ॥**
**मोहात्तस्य परित्यागस्तामसः परिकीर्त्तितः ॥ ७ ॥**

मा आंधाराचेनि रोखें । जैसीं डोळां रोविजति नाखें ।
तैसें कर्मद्वेखें असिकें । कर्म चि सांडी ॥ ७६ ॥
तेयाचें कर्म सांडणें । तें तामस पैं मीं ह्मणें ।
सिसाराचां रागीं लाणें । सीस चि जैसें ॥ ७७ ॥
हांगा मार्गु दोवाडु होए । तऱ्हीं निस्तरतील पाए ।
किं ते चि खांडणें आहे । मार्गापरावें ॥ ७८ ॥
भूकैलेया पुढील अन्न । हो कां भलेतैसें उन्ह ।
तऱ्हीं बुद्धी नेघतां लंघन । कां निवारे गा ॥ ७९ ॥
तैसा कर्माचा बाधु कर्मे । नितरिजैल कारितेन वर्मे ।
हें तामसु नेणे भ्रम । माजविला ॥ १८० ॥
किं स्वभावें आलें विभागा । तें कर्म चि वोसंडी पैं गा ।
परि इनें आतला त्यागा । तामसा तेया ॥ ८१ ॥

दुःखमित्येव यत्कर्म कायक्लेशभयात्त्यजेत् ॥
स कृत्वा राजसं त्यागं नैव त्यागफलं लभेत् ॥ ८ ॥

अथवा स्वाधिकारु बूझे । आपुलें विहित ही सूझे ।
पारि करितेया उभजे । निबरपणां ॥ ८२ ॥
जें कर्म आरंभाची कड । नावं एक होये दुवाड ।
वाहांतिये वेले जड । सिदोरी जैसी ॥ ८३ ॥
निंबु जिव्हे कडुवटु । हिरडा पहिलें तूरटु ।
तैसा कर्मा सेवटु । खणुवाला होए ॥ ८४ ॥
गाई दोवाड सिंग । सेवंतिये अडव आंग ।
भोजनसुख महाग । रांधितां ठांई ॥ ८५ ॥
तैसें पुडुतिं पुडुतिं कर्म । आरंभीं चि अतिविषम ।
ह्मणौनि ते ते श्रम । करितां मानीं ॥ ८६ ॥
एऱ्हविं विहितत्वें मांडी । परि घालितां असुरवाडी ।
एथ पोललें ऐसें सांडी । आदारिलें ही ॥ ८७ ॥
ह्मणे वस्तु देहा सारिखी । आली बहुविं भाग्यविशेषिं ।
मा जाचुकां कर्मादिकिं । पापिया जैसा ॥ ८८ ॥
केलां कर्मि जें देयावें । तें इनें मज होआवें ।
आजि भोगूं ना बरवें । हातिचे भोग ॥ ८९ ॥
ऐसा शरीराचेया क्लेशा । भेण कर्मे वीरेशा ।
सांडी तो परियसां । राजस त्यागी ॥ १९० ॥
यऱ्हविं तेथ ही कर्म सांडे । परि त्यागफल न जोडे ।
जैसें उतलें आगी पडे । परि होमीं न लगे ॥ ९१ ॥
कां बुडौनि प्राण गेले । ते अर्धोदकीं निमाले ।
हें ह्मणों न ए जालें । दुर्मरण चि ॥ ९२ ॥
तैसें देहाचेनि लोभें । जेणें कर्मा पाणी सुभे ।
साच तेणें न लभे । त्यागाचें फल ॥ ९३ ॥

किंबहुना आपुलें । जैं ज्ञान होये उदया आलें ।
तैं नक्षत्रांतें पाहलें । गिळी जैसें ॥ ९४ ॥
तैसिया सकारणा क्रिया । हारपती धनंजया ।
तो कर्मत्याग ये जेया । मोक्षफळासि ॥ ९५ ॥
तें मोक्षुफळ अज्ञाना । त्यागिया नाहिं अर्जुना ।
म्हणौनि तो त्यागु न मना । राजसै ते ॥ ९६ ॥

**कार्यमित्येव यत्कर्म नियतं क्रियतेऽर्जुन ॥**
**संगं त्यक्त्वा फलं चैव स त्यागः सात्विको मतः॥९॥**

तरि कोणें पां एथ त्यागें । मोक्षुफळ घर रिगे ।
तें हिं आइक प्रसंगें । बोलिजैल ॥ ९७ ॥
तरि स्वाधिकाराचेनि नावें । जें वांटे आलें स्वभावें ।
तें आचरिजे गौरवें । शृंगारुनि ॥ ९८ ॥
परि हें मिं करीतु असें । ऐसा आठौ त्यजी मानसें ।
तैसें चि पाणी दे आसे । फळाचिये ॥ ९९ ॥
पैं अवज्ञा आणि कामना । मातेचां ठाइं अर्जुना ।
केलीं दोन्हीं पतना । हेतु होंति ॥ २०० ॥
तरि दोन्हि इयें त्यजावि । मग माता चि भजावी ।
यांचौनि मुखा लागि वाळावी । गाये चि सळगी ॥ १ ॥
आवडतिये ही फळीं । असारें सालि आठोळी ।
तेया साठिं अवगाळी । फळातें कोण्हीं ॥ २ ॥
तैसा कर्तृत्वाचा मद्दु । आणि कर्मफळिचा आस्वादु ।
ययां दोहिं चि नावं बंधु । कर्माचा किं ॥ ३ ॥
तरि यां दोहींचां विखीं । जैसा बापु नातळे लेंकी ।
तैसा होये ना दुःखी । विहितक्रिया ॥ ४ ॥
हा तो त्याग तरुवरु । जो मोक्षफळीं ए थोरु ।
सात्विक ऐसा डगरु । एयासी चि जगीं ॥ ५ ॥

बिं जाळूनि चि जैसें । झाड कीजे निर्वंसें ।
फळ त्यजूनि कर्म तैसें । त्यजिलें जेणें ॥ ६ ॥

**न द्वेष्ट्यकुशलं कर्म कुशले नानुषज्जते ॥**
**त्यागी सत्त्वसमाविष्टो मेधावी छिन्नसंशयः ॥ १० ॥**

तेया लागत खेऊ परिसिं । धातुची गंधिकालिमा जैसी ।
जाये रजतमें तैसीं । तूटलीं दोन्हीं ॥ ७ ॥
मग सत्वें तेणें चोखाळें । उघडति आत्मबोधाचे डोळे ।
तेथ मृगांभ सांजवेळे । होये जैसें ॥ ८ ॥
तैसा बुध्यादिकां पुढां । असतु विश्वाभासु एवडा ।
तो नेदखे कव्हणी कडां । आकाश जैसें ॥ ९ ॥
ह्मणौनि प्राचीनाचेनि बळें । आलिं कृत्यें कुशळाकुशळें ।
तियें व्योमाचां आंगिं अभाळें । जिराली जैसीं ॥ २१० ॥
तैसीं तेयाचिया दृष्टी । कर्में द्रिष्टी चि जाली किरीटी ।
ह्मणौनि सुखदुःखीं तुठी । पडे ना जो ॥ ११ ॥
तेणें शुभ कर्म जाणावें । मग तें हर्षें करावें ।
कां अशुभा लागि होआवें । द्वेषिया नां ॥ १२ ॥
तरि ये विषिचा काहिं । तेया एकु ही संदेहो नाहिं ।
जैसा स्वप्नाचा कां ठांइं । जागिनलेयां ॥ १३ ॥
ह्मणौनि कर्म आणि करिता । यां द्वैतभावांची वार्ता ।
नेणे तो पांडुसुता । सात्विक त्यागीं ॥ १४ ॥

**न हि देहभृता शक्यं त्यक्तुं कर्माण्यशेषतः ॥**
**यस्तु कर्मफलत्यागी स त्यागीत्यभिधीयते ॥ ११ ॥**

ऐसेनि कर्में पार्था । त्यजिलीं त्यजीति सर्वथा ।
अधिकें बांधिजति अन्यथा । सांडिलीं तरि ॥ १५ ॥
हां गा सव्यसाची । मूर्त्ति होउनि देहाची ।
खंति करीति कर्मांची । गावंढीं नां ॥ १६ ॥

मातिएचा वीटु । घेउनि काइ करी घटु ।
केउते तांथू पटु । सांडितील ते ॥ १७ ॥
तेविं चि वन्हित्व आंगीं । आणि ऊबे उबगणें आगी ।
तो दीपु प्रभे लागि । द्वेषु करी काई ॥ १८ ॥
हींगु त्रासला पां घाणीं । तरि सुगंधत्व कैंचें आणी ।
द्रवपण सांडूनि पाणीं । कें राहे तें ॥ १९ ॥
तैसा शरीराचेनि आभासें । नांदतु जवं असे ।
तवं कर्मत्यागाचें पीसें । काइसें तन्हीं ॥ २२० ॥
आपण लाविजे टीला । ह्मणौनि पुसूं ये अवलीला ।
मा घालि फेडि निडला । कां करुं ए गा ॥ २१ ॥
तैसें विहित स्वयें आदरिलें । ह्मणौनि त्यजूं ये त्यजिलें ।
परि कर्में चि देह आतलें । तें कां गा सांडे ॥ २२ ॥
जें श्वासोश्वास वेरि । हाेंत निदेलेया ही वारि ।
कांहिं न करणें चि परि । होंति जेयाची ॥ २३ ॥
एया शरीराचेनि मीखें । कर्म चि लागले असिके ।
जीतां मेलेयां न टके । इया रीती ॥ २४ ॥
एयातें सांडिती एथ परी । एकी चि ते अवधारीं ।
करितां जाइंजे हारि । फळासेचि ॥ २५ ॥
कर्मफळ ईश्वरीं अर्पे । तत्प्रसादें बोधु उद्दीपे ।
तेथ रज्जुज्ञानें लोपे । व्याळशंका ॥ २६ ॥
तेणें आत्मबोधें तैसें । अविद्यासिं कर्म नासे ।
पार्था त्यजिजे जैं ऐसें । त्यजिलें होए ॥ २७ ॥
ह्मणौनि इया परीं जगीं । कर्म त्यजी तो महात्यागी ।
एरु मूर्छने नावं रोगीं । विसांवां जैसा ॥ २८ ॥
तैसा सीणे कर्मीं एकीं । विसांवां पाहे आणिकीं ।
खांडियांचे घाये बुकिं । धाडणें जैसें ॥ २९ ॥

पारे हें असो पुढुतीं । तो चि त्यागी त्रिजगती ।
जेणें फलत्यागें निष्कृती । नेलें कर्म ॥ २३० ॥

**अनिष्टमिष्टं मिश्रं च त्रिविधं कर्मणः फलं ।**
**भवत्यत्यागिनां प्रेत्य न तु संन्यासिनां क्वचित् ॥ १२ ॥**

यऱ्हविं तऱ्हीं धनंजया । त्रिविधा फला गा इया ।
समर्थ तें किं भोगावेया ॥ जें सांडी चि नां ३१ ॥
आपण चि वीउनि दुहिता । न मम ह्मणे पिता ।
किं तो सुटे येरु घेंता । जावाई सिरके ॥ ३२ ॥
विखाचे ही आगर वाहांती । ते वीकितां तूटले जींति ।
परि निमाले जे घेंति । वणिजूनि मोलें ॥ ३३ ॥
तैसें करितां कर्म करू । अकर्त्ता फलआशे न धरू ।
तेथ न शके आवरूं । दोघां तें हिं कर्म्म ॥ ३४ ॥
वाटे पीकलेया रुखाचें । फल आपेक्षी तेयाचें ।
तेवि साधारण कर्माचें । फल घे तेया ॥ ३५ ॥
परि करूनि फल नेघे । तो जगाचां कर्मि न रिघे ।
जें त्रिविध जग आघवें । कर्मफल हें ३६ ॥
देव मनुष्य स्थावर । या नावं किं जगडंबर ।
तरि हें तवं त्रिप्रकार । कर्मफल पैं ॥ ३७ ॥
तें चि एक गा अनिष्ट । एक तें केवल इष्ट ।
आणि एक इष्टानिष्ट । त्रिविध ऐसें ॥ ३८ ॥
पारे विषमता बुद्धी । आगिं सूनि अविधी ।
प्रवर्त्तिजे निषेधीं । कुव्यापारिं ॥ ३९ ॥
तेथ क्रिमि कीटक लोष्ट । हे देहलाभ होंति निकृष्ट ।
तेया नावं तें अनिष्ट । क्रियाफल ॥ २४० ॥
कां स्वधर्मा मानु देंतां । स्वाधिकारु पुढें सूंतां ।
सुकृत कीजे पूसतां । आम्नायातें ॥ ४१ ॥

तैं इंद्रादिकां देवांचीं । देहें लाहिजति सव्यसाची ।
तेया कर्मफलइष्टाची । प्रसिद्धि गा ॥ ४२ ॥
आणि गोड आंबड मिळे । तेथ रसांतर फरसाळें । फळें रसाळें
उठी दोहिं वेगळें । दोहीं जीणतें ॥ ४३ ॥
रेचक चि योगवसें । होये स्तंभावेया दोसें ।
तेवि सत्यासत्यसमरसें । असत्य जिणिजे ॥ ४४ ॥
ह्मणौनि समभागें शुभाशुभें । मिळौनि अनुष्ठानातें उभें ।
तेणें मनुष्यत्व लाभे । तैं मिश्र फळ ॥ ४५ ॥
कर्म एवं त्रिविध या भंगीं । फळ मांडले असे जगीं ।
हें न संडे तेया भोगीं । सूदलें आशा ॥ ४६ ॥
एथ जीभेचा हावु फांटे । तवं जेवितां गमे गोमटें ।
परिणामिं सेवटें । विपायें मरण ॥ ४७ ॥
सवंचोरां मैत्री चांग । जवं न पविजे तें दांग ।
सामान्या भली जवं आंग । न सिवे तवं ॥ ४८ ॥
तैसीं कर्मे करितां शरीरीं । लाहांति महत्वाची फरारी ।
पाठिं निधनीं एकसरीं । पावति फळें ॥ ४९ ॥
समर्थु कां रिणियां । मार्गों आला बाइणियां ।
न लोटे तैसा प्राणियां । पडे तो भोगु ॥ २५० ॥
मग कणिसौनि कणु झडे । तो विरूढला कणिसा चढे ।
पुडुतीं भुइं पडे । पुडुतीं उठी ॥ ५१ ॥
तैसें भोगिं जें फळ होए । तें फळांतरें वीत जाये ।
चालतां पावो पायें । जीणिजे जैसा ॥ ५२ ॥
उताराचिये सांगडी । ठाके ते ऐली चि थडी ।
तेवि न मुकति वोढी । भोग्याचिये ॥ ५३ ॥
पैं साध्यसाधनप्रकारें । फळभोगु तो गा पसरे ।
एवं गोविले सवंसारें । अत्यागि ते ॥ ५४ ॥

॥ अग्हवि जाईचेया फुला फांकणें । तेया चि नावं सूकणें ।
तैसें कर्ममीखें न करणें । केलें जिहीं ॥ ५५ ॥
जैं बीं चि वरोसी वेचे । तैं वाढती कुळवाडि खांचे ।
तेवि फळत्यागिं कर्माचें । सारिलें काम ॥ ५६ ॥
तेया सत्वशुद्धिसहकारें । गुरुकृपामृततुषारें ।
सांसिनलेनि बोधें ऊसरे । द्वैतदैन्य ॥ ५७ ॥
तेधवां जगदाभासमीषें । स्फुरतें त्रिविध फल नासे ।
तेथ भोक्ताभोग्य आपैसें । निमालें होए ॥ ५८ ॥
घडे ज्ञानप्रधानु ऐसा । संन्यासु जेयां वीरेशा ।
ते चि फलभोग हीं सोसा । सूकले गा ॥ ५९ ॥
आणि एणें किर संन्यासें । जैं आत्मरूपिं दीठि पैसे ।
तैं कर्म एक ऐसें । देखणें आहे ॥ २६० ॥
पडौनि ठेलेयां भींति । चित्राची कीजतसे चांथी ।
पाहालेयां राती । आंधारें उरे ॥ ६१ ॥
जैं रूप चि नाहिं उभें । तैं साउली काह्याची शोभे ।
आरिसेन विण बिंबे । वदन कें पां ॥ ६२ ॥
फीटलेयां निद्रेचा ठाऊ । कैंचा स्वप्नासि प्रस्थाऊ ।
मग तें साच कां वावों । हें कोण ह्मणे ॥ ६३ ॥
तैसें गा संन्यासें एणें । तवं अविद्येसी चि नाहीं जीणें ।
मां तियेचें कार्य कोणें । घेपे दीजे कर्म ॥ ६४ ॥
ह्मणौनि संन्यासिं इए पाइं । कर्माची मातु कीजैल काइ ।
परि अविद्या आपुलां देहीं । आहे जैसी कां ॥ ६५ ॥
जैं कर्तेपणाचेनि थावें । आत्मा शुभाशुभीं धांवे ।
द्रिष्टि भेदाचियें राणिवे । बैसली जैसी ॥ ६६ ॥
तैं तन्हीं गा सुवर्मा । वेगली आत्मेया कर्मा ।
अपाडें जैसी पश्चिमा । पूर्वेसिं कां ॥ ६७ ॥

नातरि आकाशा आणि अभाला । सूर्या आणि मृगजला ।
वेगलीक भूतला । वायुसीं जैसी ॥ ६८ ॥
पांगुरौनि नैचें उदक । असे नै चि माजि खडक ।
परि जाणसि किं वेगलीक । कोडिची तेया ॥ ६९ ॥
हो कां पाणियां जवली । परि सिनीं चि ते बाबुली ।
काइ संगा तव काजली । दीपु ह्मणों ए ॥ २७० ॥
जऱ्हीं चंद्रीं जाला कलंकु । तऱ्हीं चंद्रेंसिं न्हवे किं एकु ।
आहे द्रिष्टी डोलेयां विशेकु । अपाडु जैसा ॥ ७१ ॥
नाना वाटे वाटे जांतिया । वोघा वोघीं वाहांतेया ।
आरिसा आरिसेया पाहांतेया । अपाडु जेतुला ॥ ७२ ॥
पार्था गा तेतुलेनि मानें । आत्मेनसिं कर्म सीनें ।
परि घेववि‍जे अज्ञानें । तें किर असो ॥ ७३ ॥

**पंचैतानि महाबाहो कारणानि निबोध मे ॥**
**सांख्ये कृतांते प्रोक्तानि सिद्धये सर्वकर्मणां ॥ १३ ॥**

विकासें रवितें उपजवी । द्रुति अलीं करवि भोगवी ।
ते सरोवरीं कां बरवी । अब्जिनी जैसी ॥ ७४ ॥
पुडुतीं आत्मक्रिया । अन्यकारणका चि तैसिया ।
करूं पांचां हिं तेया । कारणा रूप ॥ ७५ ॥
आणि पांचै कारणें तियें । तूं हीं जाणसील विपायें ।
जें शास्त्रें उभूनि बाहे । बोलती तेयांतें ॥ ७६ ॥
वेदरायाचिये राजधानीं । सांख्यवेदांताचां भुवनीं ।
निरूपणाचां निसाणध्वनीं । गाजति तियें ॥ ७७ ॥
जें सर्वकर्मसिद्धी लागि । इयें चि मुदलें हो जगीं ।
एथ न सुआवा अभंगीं । आत्मराजु ॥ ७८ ॥
एया बोलाचिया डांगुरटीं । तियें प्रसिद्धि आलीं किरीटी ।
ह्मणौनि तूझा कर्णपुटीं । वसौं काज ॥ ७९ ॥

आनी मुखांतारें आइकिजे । ऐसें काइसें हें वोझें ।
मीं चिंतारत्न तूझें । असतां हातीं ॥ २८० ॥
आरिसा पुढां मांडिलेयां । लोकाचेया डोलेयां ।
मानु देयावा पावेया । आपुलें नीकें ॥ ८१ ॥
भक्तु जेथ जैसेनि पाहे । तेथ तें तें चि होंत जाएं ।
तो मीं तूझें जालां आहें । खेलणें आजि ॥ ८२ ॥
ऐसेनि प्रीतिचेनि वेगें । देवो बोलतां से नेघे ।
तवं आनंदा माझि आंगें । विरत एरु ॥ ८३ ॥
चांदिणेयांचा पडिभरु । जालेयां सोमकांताचा डोंगरु ।
विघरौनि सरोवरु । हों पाहे जैसा ॥ ८४ ॥
ऐसें सुख आणि अनुभूती । या भावाची मोडौनि भींती ।
आतैल अर्जुना कृती । सुख चि जेथ ॥ ८५ ॥
तेथ समर्थु ह्मणौनि देवा । अवकाशु जाला आठवा ।
मग बुडतेया धावा । जीवें केला ॥ ८६ ॥
अर्जुना एसणें ढेंढें । प्रज्ञा पसरोंसिं बुडे ।
आलें भरितें एवडें । तें काढुनि पुडुतीं ॥ ८७ ॥
देवो ह्मणे हां गा पार्था । तूं आपणपें देख सर्वथा । निपुण
तवं श्वासौनि एरें माथा । तुकविला ॥ ८८ ॥
ह्मणे तूं हीं जाणासि दातारा । मीं तुसीं व्यक्तिसेजारा ।
उभगलां आदी चि एकाहारा । एऊं पाहें ॥ ८९ ॥
तेया ही हा ऐसैसा । लोभें देया जारि लालसा ।
तरि कां हो घालितसा । आडाड जिवा ॥ २९० ॥
एथ श्रीकृष्णु ह्मणे मीकें । आझुइं नव्हे मा ठाउकें ।
वेडेया चंद्रा चंद्रिके । निमलणें आहे ॥ ९१ ॥
आणि हा इं बोलैनि भाऊ । तुज दाउनि आह्मीं बेहों ।
जें रुसतां बांधे ठांवों । तें प्रेम गा हें ॥ ९२ ॥

एथ एकमेकाचिये खूणे । विसंवादु तवं जीणे ।
ह्मणौनि असो हें बोलणें । इये विषिचें ॥ ९३ ॥
मग कैसी कैसी ते आतां । बोलत होंतों पांडुसुता ।
सर्वकर्मभिन्नता । आत्मेनसीं ॥ ९४ ॥
तवं अर्जुनु ह्मणे देवें । माझिये मनिचें चि स्वभावें ।
प्रस्ताविलें बरवें । प्रमेय तें चि ॥ ९५ ॥
जें सकळ कर्माचें बीज । कारणपंचक तुज ।
सांघैन ऐसी पैंज । घेतली कां ॥ ९६ ॥
आणि आत्मेयां एथ काहिं । सर्वथा लागु नाहिं ।
हें पुढारलासि तें देइं । लाहाणें माझें ॥ ९७ ॥
ऐया बोला विश्वेशें । ह्मणितलें तोखें बहुवसें ।
इये विषीं धरणें बैसे । ऐसें कें जोडे ॥ ९८ ॥
तरि अर्जुना निरूपिजैल । तें किर भाषे चि आंतुल ।
परि मेचु इये होइजैल । रिणियां तुज ॥ ९९ ॥
तवं अर्जुनु ह्मणे देॐ । काइ विसरलेति मागील भाॐ ।
हे गोठी कीं राखत आहों । मीतूंपणांचि ॥ ३०० ॥
एथ श्रीकृष्णु ह्मणति हो कां । आतां अवधाना पसरु नीका ।
करूनि तुह्मीं आइकां । पुढारलों तें ॥ १ ॥
तरि साच चि धनुर्द्धरा । सर्व कर्माचा उभारा ।
होये बाहिरिबाहिरा । कारणीं पांचें ॥ २ ॥
आणि पंचकारणदळवाडें । जेहीं कर्माकार मांडे ।
ते हेतु ही सवंघडे । पांच आथि ॥ ३ ॥
येर आत्मतत्व उदासीन । तें हेतु ना उपादान ।
ना आंगें करी संवाहन । कर्मसिद्धीचें ॥ ४ ॥
तेथ शुभाशुभीं अंशीं । निफजतां कर्मे ऐसीं ।
रात्रिदिॐ कां आकाशीं । जिया परीं ॥ ५ ॥

कां तोय तेज धूमु । एयां वायुसि समागमु ।
जालेयां होये अभ्रागमु । व्योम तें नेणे ॥ ६ ॥
नाना काष्टिं नाव मिळे । ते नावीडेनि चळे ।
चालिजे अनिळें । उदक साक्षी ॥ ७ ॥
कां कोण्हें एकें पिंडें । वेचतां अवतरे भांडें ।
तें भवंडिजे दंडें । भ्रमे चक्र ॥ ८ ॥
आणि कर्तुत्व कुलालाचें । तेथ काइ पृथ्वियेचें ।
आधारु वांचौनि वेचे । विचारि पां ॥ ९ ॥
इयें असो लोकाचिया । राहाटी होंतु आघविया ।
कोण काम सवितेया । आंगा आलें ॥ १० ॥
तैसी पंचहेतुमिळणीं । पांचें चि इहिं करणिं ।
कीजे कर्मलतांची लावणी । आत्मा सिनां ॥ ११ ॥
आतां इयें चि वेगळाळीं । पांचै विवंचूं गा भळीं ।
तूंकूनि घेतलीं । मोतियें जैसीं ॥ १२ ॥

**अधिष्ठानं तथा कर्त्ता करणं च पृथग्विधं ॥**
**विविधाश्च पृथक्चेष्टा दैवं चैवात्र पंचमं ॥ १४ ॥**

तैसि यथालक्षणें । आइका पां कर्मकारणें ।
तरि देह हें मीं ह्मणें । पहिलें एथ ॥ १३ ॥
ययातें अधिष्ठान ऐसें । ह्मणिजे तें यया दोसें ।
जें स्वभोग्येंसीं वसे । भोक्ता एथ ॥ १४ ॥
इंद्रियांचा दाहिं हातिं । जचौनि दिवसें राती ।
सुखदुःखें प्रकृती । जोडिजति जियें ॥ १५ ॥
तियें भोगावेया पुरुषा । आनु ठावो नाहिं चि देखां ।
ह्मणौनि अनुष्ठानभाषा । बोलिजे देह ॥ १६ ॥
हें चोवीसां हिं तत्वांचें । कुटुंबघर वसतिचें ।
तूटे बंधमोक्षाचें । गूंतलें एथ ॥ १७ ॥

किंबहुना अवस्थात्रया । अधिष्ठान धनंजया ।
ह्मणौनि देहा एया । हें चि नावं ॥ १८ ॥
आणि कर्त्ता जें दूजें । कर्मांचें कारण जाणिजे ।
प्रतिबिंब ह्मणिजे । चैतन्याचें जें ॥ १९ ॥
आकाश चि वरिखे नीर । तेथ तळहाटीं बांधे नाडर ।
मग बिंबौनि तदाकार । होये जेवि ॥ ३२० ॥
कां निद्राभरें बहुवें । राया आपणपें ठाउवें नव्हे ।
मग स्वप्निचां मायें । रंकपणीं कां ॥ २१ ॥
तैसें आपुलेनि विसरें । चैतन्य चि देहाकारें ।
आभासौनि आविष्करे । देहपणें जें ॥ २२ ॥
जेया विचाराचां देशीं । प्रसिद्धी गा जीउ ऐसी ।
जेणें भाक केली देहेंसीं । आघवां विषीं ॥ २३ ॥
पैं प्रकृति करी कर्में । तो मियां केलीं ह्मणे भ्रमें ।
एथ कर्त्ता एणें नामें । बोलिजे जीउ ॥ २४ ॥
मग पातेयाचां केंसीं । एकी चि उठी दीठि जैसी ।
मोकली चवरी ऐसी । चिरिवं गमे ॥ २५ ॥
कां घरा आंतु एकु । दीपाचा अवलोकु ।
गवाक्षी भेदें अनेकु । आवडे जेवि ॥ २६ ॥
तेवि बुद्धिचें एक जाणणें । श्रोत्रादिभेदें एणें ।
बाहिरि इंद्रियपणें । फांके जें कां ॥ २७ ॥
तें पृथग्विध करण । कर्मांचें यया कारण ।
तिसरें गा जाण । नृपनंदना ॥ २८ ॥
आणि पूर्वपश्चिमवाहाणी । निगालेयां वोघांचिया मिळणीं ।
होये नदीनदपाणी । एक चि जेवि ॥ २९ ॥
कां एकाएकु चि पुरुषु जैसा । अनुव्रत नवां रसां ।
नवविधु ऐसा । आवडों लागे ३३० ॥

तैसी चि क्रियाशक्ति पवनीं । असे जे अनुपायनी ।
ते पडिली नाना स्थानीं । नाना होए ॥ ३१ ॥
जैं वाचे करी एणें । तैं तें चि होये बोलणें ।
हाता आली घेणें । देणें होए ॥ ३२ ॥
आगा चरणाचां ठांइं । तरि गति ते चि पाइं ।
अधोद्वारीं दोहीं । क्षरण ते चि ॥ ३३ ॥
कंदौनि कां हृदय वेन्हीं । प्राणायामाची उजिरी ।
करितां ते चि शरीरीं । प्राणु ह्मणिपे ॥ ३४ ॥
मग ऊर्ध्वचिया रिगिनिगा । पुडुतीं ते चि शक्ति पैं गा ।
उदानु ऐसिया लिंगा । पात्र जाली ॥ ३५ ॥
अधोरंध्राचेनि वाहें । अपानु हें नावं लाहे ।
व्यापकपणें होये । व्यानु ते चि ॥ ३६ ॥
आरोगिलेन रसें । शरीर भरी सरिसें ।
नाभि न संडितां असे । सर्वसंधी ॥ ३७ ॥
ऐसिया इया राहाटी । मग ते चि क्रिया पाठीं ।
समानु ऐसें किरीटी । बोलिजे गा ॥ ३८ ॥
आणि जांभै सींक ढेंकरु । ऐसैसा होंत व्यापारु ।
नाग कूर्मु कृकरु । इत्यादि होए ॥ ३९ ॥
एवं वायुची हे चेष्टा । एकी चि परीं सूभटा ।
वर्त्तता पालटा । एंतसे जे ॥ ३४० ॥
ते भेदली वृत्तिपंथें । वायुक्रिया गा एथें ।
कर्मकारण चौथें । ऐसें जाण ॥ ४१ ॥
आणि रुतु बरवा शारदु । शारदिं पुडुतीं चंद्रु ।
चंद्रिं जैसा संबंधु । प्रूर्णिमेचा तो ॥ ४२ ॥
कां वसंतिं बरवा आरामु । आरामिं प्रियसंगमु ।
संगमिं आगमु । उपचारांचा ॥ ४३ ॥

नाना कमळीं पांडवा । विकाशु जैसा बरवा ।
विकाशीं यावा । परागांचा ॥ ४४ ॥
वाचे बरवें कवित्व । कवित्वीं बरवें रसिकत्व ।
रसिकत्वीं हि परतत्व । स्पर्श जैसा ॥ ४५ ॥
तैसी सर्ववृत्तिवैभवीं । बुद्धी चि येकली बरवी ।
बुद्धि ही बरव नवी । इंद्रियप्रौढी ॥ ४६ ॥
इंद्रियप्रौढीमंडळा । शृंगारु एकु चि लीळा ।
जें अधिष्ठात्रियांचा मेळा । देवांचा जो ॥ ४७ ॥
ह्मणौनि चक्षुरादिकि दाहें । इंद्रियपीठीं सानुग्रहें ।
सूर्यादिकां कां आहे । सुरांचें वृंद ॥ ४८ ॥
तें देववृंद बरवें । कर्मकारण पांचवें ।
अर्जुना एथ जाणावें । देवो ह्मणति ॥ ४९ ॥
एवं मानें तूझी आयणि । तैसी कर्मजातांचि हे खाणी ।
पंचविध आकरणीं । निरोपिली ॥ ३५० ॥

**शरीरवाङ्मनोभिर्यत्कर्म प्रारभते नरः ॥**
**न्याय्यं वा विपरीतं वा पंचैते तस्य हेतवः ॥ १५ ॥**

आतां हे चि खाणि वाढे । मग कर्माची सृष्टि घडे ।
जिहिं ते हेतु उघडे । दाउं पांचें ॥ ५१ ॥
तरि अवसांत आली माधवी । हेतु होये नवी पालवीं ।
पालवीं पुष्पपुंजु दावी । पुष्प फळातें ॥ ५२ ॥ फळीं
कां वारिषिया आणिजे मेघु । मेघीं वृष्टिप्रसंगु ।
वृष्टी तव भोगु । सस्यसुखाचा ॥ ५३ ॥
नाना प्राची अरुणातें विये । अरुणें सूर्योदयो होये ।
सूर्यें सकळ पाहे । दिवो जैसा ॥ ५४ ॥
तैसें मन हेतु पांडवा । होये कर्मसंकल्पभावा । फळा
तो संकल्पु लावी दीवा । वाचेचा गा ॥ ५५ ॥

मग वाचेचा तो दिवटा । दावी कृत्यजाताचिया वाटा ।
तेव्हां कर्ता रिगे कामठां । कर्तुत्वाचां ॥ ५६ ॥
तेथ शरीरादिदळवाडें । शरीरादिहेतु घडे ।
जैसें लोहकर्म लोखंडें । निर्वाळिजे ॥ ५७ ॥
कां तांथुवाचा ताणा । तांथु घालितां वोइरणा ।
तंतुमय चि विचक्षणा । होये पटु ॥ ५८ ॥
तैसें मनावाचे देहाचें । कर्म मनादि हेतु रचे ।
रत्नीं घडे रत्नाचें । दळवाडें जेवि ॥ ५९ ॥
एथ शरीरादिकें कारणें । तें चि हेतु केवि हें कोणें ।
आक्षेपिजे तरि तेणें । अवधारिजो ॥ ३६० ॥
आइकें सूर्याचेया प्रकाशा । हेतुकारण सूर्यो चि जैसा ।
कां ऊंसाचें कांडें ऊंसा । वाढी हेतू ॥ ६१ ॥
नाना वाग्देवता वानावी । तैं वाचा चि लागे कामवावी ।
कां वेदा वेदें चि बोलावी । प्रतिष्ठा जे ॥ ६२ ॥
तैसिं कर्मा शरीरादिकें । कारण हें किर ठाउकें ।
परि हें चि हेतु न चुके । हें इं एथ ॥ ६३ ॥
आणि देहादिकिं कारणिं । देहादिहेतु मिळणीं ।
होये जेयां उभारणीं । कर्मजातां ॥ ६४ ॥
तें शास्त्रार्थें मानिलेयां । मार्गानुसारें धनंजया ।
तरि न्याऊ तो न्याया । हेतु होए ॥ ६५ ॥
जैसा पर्जन्योदकाचा लोटु । विपायें धरी साळिचा पाटु ।
जऱ्हि जिरे परि अचाटु । उपेगु आथि ॥ ६६ ॥
कां रोसें निगालें अवचटें । पडिलें द्वारकेचिये वाटे ।
तें सीणे तऱ्हीं सुनाटें । न वचती पदें ॥ ६७ ॥
तैसें हेतुकारण मेळें । उठी कर्म आंधळें ।
तें शास्त्रांचे लाहे डोळे । तैं न्याय म्हणिपे ॥ ६८ ॥

ना दूध वाढिता ठाउ न पवे । तवं उलंडौनि जाये स्वभावें ।
तो ही वेचु परि नोहे । वेचलें तें ॥ ६९ ॥
तैसें शास्त्रसाह्यें विण । केलें नोहे अकारण ।
तरि लागो पां नागवण । दानलेखिं ॥ ३७० ॥
आगा बावना वर्णा परौता । कोण्हीं मंत्रु आहे पांडुसुता ।
कां बावना हिं नुच्चारितां । जीउ आथि ॥ ७१ ॥
परि मंत्राची कडसणी । जवं नेणिजे कोदंडपाणी ।
तवं उच्चारफल वाणी । न पवे जेवि ॥ ७२ ॥
तेवि कारणहेतुयोगें । जें बीसाट कर्म निगे ।
तें शास्त्रांचिये न लगे । कुसे जवं ॥ ७३ ॥
कर्म होंतसे तेव्हां ई । परि होणें नव्हे पाहिं ।
तो अन्याउ गा अन्याइं । हेतु जाणावा ॥ ७४ ॥
एवं पंचकारणका कर्मा । पांच ही हेतु हे सुवर्मा ।
आतां पाहे पां आत्मा । सांपडला असे ॥ ७५ ॥

**तत्रैवं सति कर्तारमात्मानं केवलं तु यः ॥**
**पश्यत्यकृतबुद्धित्वान्न स पश्यति दुर्मतिः ॥ १६ ॥**

भानु नोह्वनि रूपें जैसीं । चक्षुरूपातें कां प्रकाशी ।
आत्मा नोहूनि कर्में तैसीं । प्रकटित असे ॥ ७६ ॥
पैं प्रतिबिंब आरिसा । दोन्हीं नोहुनि वीरेषा ।
दोहींतें प्रकाशी जैसा । निहालिता तो ॥ ७७ ॥
कां अहोरात्र हें साविता । नोहुनि करी पांडुसुता ।
तैसा आत्मा कर्मकर्त्ता । नोहोंतु दीवी ॥ ७८ ॥
तरि देहाअहंमानभूली । जेयाची बुद्धि देह आतली ।
जेया आत्मविषीं जाली । मध्यमरात्रि ॥ ७९ ॥
जेणें चैतन्या ईश्वरा ब्रह्मा । देह चि केलें परम सीमा ।
तेया आत्मा कर्त्ता हे प्रेमा । आलोट उपजे ॥ ३८० ॥

जें आत्मा मी कर्मातीतु । सर्वकर्मा साक्षिभूतु ।
हे आपुली कहीं मातु । नाइके चि ॥ ८१ ॥
ह्मणौनि उमपा आत्मेयांतें । देह वरि मवी येथें ।
विचित्र काइ रात्रि देहातें । डुडुल करी ॥ ८२ ॥ न
पैं जेणें आकाशाचा कहिं । साच सूर्यो देखिला नाहिं ।
तो थिलरिचें बिंब काई । मानूं न ल्हाए ॥ ८३ ॥
थिलराचेनि जालेपणें । सूर्यासि आणी होणें ।
तेयाचां नासिं नासणें । कंपें कंपु ॥ ८४ ॥
आगा निद्रिता चेऊ न ये । तवं स्वप्न साच हों ल्हाए । न
दोरी नेणतां सर्पें बिहे । विस्मो कवणु ॥ ८५ ॥
जवं कवलु आथि डोलां । तवं चंद्रु देखावा पीवला ।
काइ मृगीं हीं मृगजला । भावावें ना ॥ ८६ ॥
तैसें शास्त्रागुरूचेनि नावें । जो वारा ही टेंकों नेंदी सींवे ।
केवल मौढ्याचेनि जीवें । जियाला जो ॥ ८७ ॥
तेणें देहात्मदृष्टिमूलें । आत्मेयां घापे देहाचें जालें ।
जैसा अभ्रिचा वेगु कोल्हें । चंद्रीं मानी ॥ ८८ ॥
मग तेया मानणेयां साठिं । देहबंदिसाले किरीटी ।
कर्माचां वज्रगांठीं । कालासे तो ॥ ८९ ॥
पाहे पां बंधभावना दृढा । नलियें वरि तो बापुडा ।
काइ मोकलां हिं चवडां । न ठके चि पूंसा ॥ ३९० ॥
ह्मणौनि निर्मले आत्मरूपीं । जो प्रकृतिचें केलें आरोपी ।
तो कल्पकोडिचां मापीं । मवी कर्में ॥ ९१ ॥

**यस्य नाहंकृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते ॥**
**हत्वापि स इमां लोकान्नहंति न निबध्यते ॥ १७ ॥**

आतां कर्मा माझि असे । परि तेयातें कर्म न स्पर्शे ।
वडवानलातें जैसें । समुद्रोदक ॥ ९२ ॥

तैसें वेगळेपणें । जेयाचें कर्मि असणें ।
तो किर जाणावा कवणें । तऱ्हीं काहिं सांवों ॥ ९३ ॥
जें मुक्तातें निर्द्धारितां । लाभे आपुली चि मुक्तता ।
जैसें दीसे दीपु पांतां । आपुली वस्तु ॥ ९४ ॥
नाना आरिसा जवं उटिजे । तवं आपणेयां आपण भेटिजे ।
कां पाणी पांतां पाणीं होइजे । लवणें जेवि ॥ ९५ ॥
हें असो परतौनि माघौतें । प्रतिबिंब पाहे बिंबातें ।
तवं पाहाणें जाउनि आइतें । बिंब चि उरे ॥ ९६ ॥
तैसें हारतलें आपण पावें । तैं संतातें पांतां गिवसावें ।
ह्मणौनि वानावे आइकावे । ते चि सदा ॥ ९७ ॥
तारि कर्मि असौनि कर्मे । जो नावरे समविषमें ।
चर्मचक्षूचेनि चर्मे । दीठि जैसी ॥ ९८ ॥
तैसा सोडिला जो आहे । तेयाचें रूप आतां पाहे ।
उपपत्तिची बाहे । उभूनि सांवों ॥ ९९ ॥
तरि अविद्येचिया नीदा । विश्वस्वप्नाचा हा धांधा ।
भोगित होंता प्रबुद्धा । अनादि जो ॥ ४०० ॥
तो महावाक्याचेनि नावें । गुरुकृपेचेनि थावें ।
माथां हातु ठेवणें नोहे । थापटिला जैसा ॥ १ ॥
तैसी विश्वस्वप्नेंसि माया । नीद सांडौनि धनंजया ।
सहसा चेइला अद्वया—। नंदपणें जो ॥ २ ॥
तेधवां मृगजलाचे पूर । दीसति एक निरंतर ।
हारपति कां चंद्रकर । फांकतां जैसे ॥ ३ ॥
कां बालकत्व निगौनि जाए । तैं बागुला नाहिं त्राए ।
पैं जळालेयां इंधन नोहे । इंधन जेवि ॥ ४ ॥
नाना चेऊं आलेयां पाठीं । तें स्वप्न न दिसे दीठी ।
तैसें अहंमम गा किरीटी । नुरे चि तेया ॥ ५ ॥

मग सूर्यु आंधारा लागि । रिगो पां भलेतिये सुरंगीं ।
पारि तो तेयाचां मार्गीं । नाहीं चि जैसा ॥ ६ ॥
तैसा आत्मतत्वें वेंठला होए । तो जेया जेया दृश्यातें पाहे ।
तें दृश्य द्रष्टेंसिं होंत जाये । तेयाचें चि रूप ॥ ७ ॥ द्रष्टेपणेंसीं
जैसा वन्हि जेया लागे । तें वन्ही चि जालें आंगें ।
दाह्यदाहकविभागें । सांडिजे तें ॥ ८ ॥
तैसा कर्माकारा दूजेया । तो करितेपणांचा आत्मेया ।
अवल्हाॐ ये तो गेलेयां । काहिं उरे ॥ ९ ॥ नाहीं
तिये आत्मस्थितिचा जो राॐ । तो मग जाणे देहिं इये ठावो ।
काइ प्रलयांबुचा उमाहो । वोघु मानी ॥ ४१० ॥
तैसी ते पूर्णा अहंता । कां देहपणें पांडुसुता ।
आवरे काइ सविता । विंबें धरिला ॥ ११ ॥
पैं मथूनि लोणीं घेपे । तें मागौतें ताकीं घापे ।
तरि तेयाचें पण लिंपे । तेणें चि काइ ॥ १२ ॥
नाना काष्टौनि वीरेषा । वेगळविलेयां हुताशा ।
राहे काष्ठाचेया मांडुसा । कोंडलेपणें ॥ १३ ॥
कां रात्रिचेया पोटा आंतु । रिगाला जो कां भास्वतु ।
तो रात्रि ऐसी मातु । आइके काइ ॥ १४ ॥
तैसें वेद्यवेदकपणेंसिं । पडिलें जेयाचां ग्रासिं ।
तेया देह मीं हे ऐसी । अहंता कैंची ॥ १५ ॥
आणि आकाशें जेथजेथौनि । जावें तेथ असे भरौनि ।
ह्मणौनि ठेलें कां अडौनि । आपें आप ॥ १६ ॥
तैसें जें तेणें करावें । तें तो चि आहे स्वभावें ।
मा कोण्हीं कर्मि वेंठावें । कर्तेपणें ॥ १७ ॥ ठेवावे
नूरे चि गगनाचा ठाॐ । नव्हे चि समुद्रीं वाहो ।
नूठी चि ध्रुवा जावो । तैसें जालें ॥ १८ ॥

ऐसेनि अहंकृतीभावो । जेयाचां बोधिं जाला वाऊ ।
तऱ्हीं देहा जवं निर्वाहो । तवं आथि कर्म ॥ १९ ॥
आगा वारा जऱ्हीं वाजों सरे । तऱ्हीं तो डोलु रूखीं उरे ।
कां सेंदे द्रुति राहे कापुरें । वेचलेनि हीं ॥ ४२० ॥
सरलेयां गीताचा समारंभु । न वचे राहलेपणाचा सोभु ।
भुइं लोलौनि गेलें अंभु । वोल थारे ॥ २१ ॥
आगा मावळलें हीं अर्कें । संध्येचिये भूमिके ।
ज्योति दीप्ति कवतिकें । दीसे जेवि ॥ २२ ॥
पैं लक्ष भेदिलयां हिं वरि । सरु धांवे चि तवं वेऱ्हीं ।
जवं आहे उजिरी । बलाची ते ॥ २३ ॥
नाना चांकिं भांडें जालें । तें कुंभारें परौतें नेलें ।
तऱ्हीं भवे चि तें मागिलें । भवंडिलेपणें ॥ २४ ॥
तैसा देहाभिमानु गेलेयां । देह जेणें स्वभावें धनंजया ।
जालें तो आपैसेया । चेष्टवी चि तें ॥ २५ ॥
संकल्पें विण स्वप्न । न लवितां दांगिचें वन ।
न रचितां गंधर्वभुवन । उठी जैसें ॥ २६ ॥
आत्मेयांचेन उद्यमें विण । तैसें देहादिपंचकारण ।
होये आपणेयां आपण । क्रियाजात ॥ २७ ॥
पैं प्राचीनसंस्कारशेषें । पांचै कारणें सहेतुकें ।
कामविजति गा अनेकें । कर्माकारें ॥ २८ ॥
तेया कर्मा माझि मग । संहारो आथवे जग ।
अथवा नवें चांग । आन करवो ॥ २९ ॥
परि कुमुद कैसें सूके । कैसें तें कमल फांके ।
यें दोन्हीं रवी न देखे । जिया परीं ॥ ४३० ॥
कां वीजु वरिखौनि अभाल । ठिकारिया आंतौनि भुतल ।
अथवा करू साद्रुल । प्रसन्ना वृष्टी ॥ ३१ ॥

परि तेयां दोहींतें जैसें । नेणिजे कां आकाशें ।
तैसा चि देहीं जो असे । विदेहदृष्टी ॥ ३२ ॥
तो देहादिकिं चेष्टीं । घडतां मोडतां हिं सृष्टी ।
न देखे स्वप्न किरीटी । चेइला जैसा ॥ ३३ ॥
यऱ्हविं चामाचे डोळे बेऱ्हीं । जे देखति देहधारी ।
तें किर तो व्यापारीं । ऐसें चि मानीति ॥ ३४ ॥
काइ तणाचा बाउला । जो आगरा मेरे ठेविला ।
तो साचू चि राखता कोल्हां । मानिजे नां ॥ ३५ ॥
पिंसेया नेसलें नागिवें । हें लोकिं येउनि जाणावें ।
ठाणौरियाचे मवावे । आणिकिं घाये ॥ ३६ ॥
कां महासतीयेचे भोग । देखे किर आघवें जग ।
परि ते आगि ना आंग । ना लोकु देखे ॥ ३७ ॥
तैसा स्वस्वरूपें उठिला । जो दृश्येंसिं द्रष्टा आटला ।
तो नेणे काइ राहाटला । इंद्रियग्रामु ॥ ३८ ॥
आगा थोरीं कल्लोळीं साने । लोपतां तिरिचेनि जनें ।
एकिं एक गीलिलें हें मनें । मानिजे जऱ्हीं ॥ ३९ ॥
तऱ्हीं पाणियां कडे पाहिं । कोण्हीं गीलिजतसे काइ ।
तैसें पूर्णा दूजे नाहिं । जें तो मारी ॥ ४४० ॥
सोनेयांची कां चंद्रिका । सुवर्णसूलें चि देखां ।
सोनेयांचिया महिषा । नाशु केला ॥ ४१ ॥
तो देवलविसेंया कडां । व्यवहारु गमला फुडा ।
वांचौनि सूलु महिषु चामुंडा । सोनें चि असे ॥ ४२ ॥
पैं चित्रिचें पाणी हुताशु । तो दीठी चि भागु आभासु ।
पटिं आगि ना वोल्हासु । दोन्ही नाहिं ॥ ४३ ॥
मुक्ताचें देह तैसें । हालत संस्कारवसें ।
देखौनि लोक पींसे । कर्त्ता ह्मणती ॥ ४४ ॥

आणि तेया करणेयां आंतु । घडे तिहिं लोकां घातु ।
परि तेणें केला हे मातु । बोलों नेए ॥ ४५ ॥
तवं आंधारु चि देखावा तेजें । गा तें फेडि हें केवि बोलिजे ।
तैसें ज्ञानियां नाहिं दूजें । करील काई ॥ ४६ ॥
ह्मणौनि तेयाची बुद्धि । नेणे पापपुण्याची गंधि ।
गंगा मीनलेयां नदी । विटाळु जैसा ॥ ४७ ॥
आगी आगि लागलेयां । काहिं पोळे धनंजया ।
किं शस्त्र रूपें आपणेयां । आपणचि काइ ॥ ४८ ॥
तैसें आपणपेयां परौतें । जो नेणे क्रियाजाततें ।
तेथ काइ लिंपवी बुद्धितें । तेयाचिये ॥ ४९ ॥
ह्मणौनि कार्यकर्त्ताक्रिया । हें स्वरूप चि जालें जेया ।
नाहिं शरीरादिकिं तेया । कर्मबंधु ॥ ४५० ॥
जें कर्त्ता जीउ विंदाणीं । काढौनि पांचै खाणी ।
घडीत आहे करणीं । आउतीं दाहें ॥ ५१ ॥
तेथ न्याउ आणि अन्याउ । हा द्विविधु साधूनि आवो ।
उभितां न लवी ठेउ । कर्मभुवनें ॥ ५२ ॥
या थोराडा किर कामां । विरजा नोहे का आत्मां ।
परि ह्मणसी हान उपक्रमां । हातु लावी ॥ ५३ ॥
तो साक्षी चिद्रूपु । कर्मप्रवृत्तिचा संकल्पु ।
उठी तो कां निरोपु । आपण चि दे ॥ ५४ ॥
तरि कर्मप्रवृत्ती ही लागि । तेया आयासु नाहिं आंगीं ।
जे प्रवृत्तिचे उलगीं । लोक चि आथि ॥ ५५ ॥
ह्मणौनि आत्मेयाचें केवल । जो रूप चि जाला निर्मल ।
तेया नाहिं बंदिसाल । कर्माची हे ॥ ५६ ॥

ज्ञानं ज्ञेयं परिज्ञाता त्रिविधा कर्मचोदना ॥
करणं कर्म कर्तेति त्रिविधः कर्मसंग्रहः ॥ १८ ॥

परि अज्ञानाचां पटीं । अन्यथाज्ञानाचें चित्र उठी ।
तेथ चि तारणी हे त्रिपुटी । प्रसिद्ध जे ॥ ५७ ॥
तें चि ज्ञाताज्ञानज्ञेय । हें जें जगाचें बीजत्रय ।
तें कर्मा चि निसंदेह । प्रवृत्ति जाण ॥ ५८ ॥
आतां या चि गा त्रया । व्यक्ती वेगळालिया ।
आइकें धनंजया । करूं रूप ॥ ५९ ॥
तरि जीवसूर्यबिंबिचे । जे रश्मि श्रोत्रादिकिं पांचें ।
धावौनि विषयपद्माचे । फोडिति मढ ॥ ४६० ॥
कां जीवनृपाचे उपलाणे । घेउनि इंद्रियाचिं केंकाणें ।
विषयदेशिचिये नागवणे । आणिती जे ॥ ६१ ॥
हें असो इंद्रिय राहाटे । जें सुखदुःखासीं जीवा भेटे ।
ते सुषुप्तिकालीं पावाटे । जेथ ज्ञान ॥ ६२ ॥
तेया जीवा नावं ज्ञाता । आणि हें जें सांघितलें आतां ।
तें चि एथ पांडुसुता । ज्ञान जाण ॥ ६३ ॥
जें अविद्येचिये पोटीं । उपजत खेउ किरीटी ।
आपणेयांतें वांटी । तिहिं ठांइं ॥ ६४ ॥
आपुलिये धांवे पुढां । घालुनि ज्ञेयाचा गुढा ।
उभारी मागिला कडां । ज्ञातृत्वातें ॥ ६५ ॥
ज्ञातेया ज्ञेया दोघां । तो नांदुणुकेचा बगा ।
माजि जालेनि पैं गा । वाहे जेणें ॥ ६६ ॥
टाकूनि ज्ञेयाची सीवं । पुरे जेयाची धावं ।
सकलपदार्थी नावं । सूतसे जें ॥ ६७ ॥
तें गा सामान्यज्ञान । एथ नाहिं आन ।
ज्ञेयाचें हिं चिन्ह । आइक आतां ॥ ६८ ॥
तरि शब्दस्पर्शु । रूपगंधरसु ।
हा पंचविध आभासु । ज्ञेयाचा जो ॥ ६९ ॥

जैसें एकें चि चुतफळें । इंद्रियां वेगळवेगळें ।
रसें वर्णें परिमळें । भेटिजे स्पर्शें ॥ ४७० ॥
तैसें ज्ञेय तरि एकसरें । परि ज्ञान इंद्रियद्वारें ।
घे ह्मणौनि प्रकारें । पांचें जालें ॥ ७१ ॥
आणि समुद्रीं वोघांचें जाणें । सरे लाणी पासिं धावणें ।
कां फळिं सरे वाढणें । सस्याचें जेवि ॥ ७२ ॥
तेवि इंद्रियांचां वाटीं । धावं तेया ज्ञानासि जेथ ठी ।
होये तें गा किरीटी । विषयज्ञेय ॥ ७३ ॥
एवं ज्ञातेया ज्ञाना ज्ञेया । तिहिं रूप केलें धनंजया ।
ते हे त्रिविध सर्वक्रिया— । प्रवृत्ति जाण ॥ ७४ ॥
जें शद्वादिविषय । हें पंचविध ज्ञेय ।
तें चि प्रिय कां अप्रिय । एकी परिचें ॥ ७५ ॥
ज्ञान मोटकें ज्ञातेया । डावी ना जवं धनंजया ।
तवं स्वीकारा कां त्यजावेया । प्रवर्त्ते चि तो ॥ ७६ ॥
परि मीनातें देखौनि बकु । जैसा निधानातें रंकु ।
कां स्त्री देखौनि कामिकु । प्रवृत्ति धरी ॥ ७७ ॥
जैसें खोलां धांवे पाणी । भवंरु फुलाचिये वाहाणी ।
नाना सूटला सांजवणी । वत्सू चि पां ॥ ७८ ॥
आगा स्वर्गीची उर्वशी । आइकौनि जेवि माणुसिं ।
वरता लागति आकाशीं । यागाचिया ॥ ७९ ॥
पैं पारिवा जैसा किरीटी । चडला नभाचिये पोटीं ।
पारिवी देखौनि लोटी । आंग सगळें ॥ ४८० ॥
हें ना घनगर्जिता सरिसा । मोरु वोवांडे आकाशा ।
ज्ञाता ज्ञेय देखौनि तैसा । धावं चि घे ॥ ८१ ॥
ह्मणौनि ज्ञानज्ञेयज्ञाता । हें त्रिविध गा पांडुसुता ।
होये चि कर्मा समस्तां । प्रवृत्ति एथ ॥ ८२ ॥

तरि तें चि ज्ञेय विपायें । जरि ज्ञातेयाचें प्रिय होये ।
तरि भोगावेया न साहे । क्षणु हिं भरि ॥ ८३ ॥
नातरि अवचटे । तें वीरू होउनि भेटे ।
तरि युगांत वाटे । सोडावेया ॥ ८४ ॥
व्याला कां हारा । वरिपडा जालेयां नरा ।
हरिखु आणि दरारा । सरिसा चि उठी ॥ ८५ ॥
तैसें ज्ञेयें प्रियाप्रियें । देखौनि ज्ञातेया होये ।
मग त्याग स्वीकारीं वाहे । व्यापारातें ॥ ८६ ॥
तेथ रागीं प्रतिमल्लाचां । गोसांविं सर्वदलाचा ।
रथु सांडूनि पायांचा । होये जैसा ॥ ८७ ॥
तैसें ज्ञातेपण जें असे । तें ए कर्त्ता ऐसिये दशे ।
जेवितें बैठलें जैसें । रंधन करु ॥ ८८ ॥
कां भवरें चि केला मला । वोरकलू चि जाला आंकसाला ।
नाना देउ रिगाला देउला— । चेया कामां ॥ ८९ ॥
तैसा ज्ञेयाचिया हावां । ज्ञाता इंद्रियांचा मेलावा ।
राहाटवी तेथ पांडवा । कर्त्ता होए ॥ ४९० ॥
आणि आपण चि होउनि कर्त्ता । ज्ञाना आणी करणता ।
तेथ ज्ञेय चि स्वभावता । कार्य होये ॥ ९१ ॥
ऐसा ज्ञानाचिया युगुती । पालटु पडे गा सुमती ।
डोलेयांची शोभा राती । पालटे जैसी ॥ ९२ ॥
कां अदृष्ट जालेयां उदासु । पालटे श्रीमंतांचा उल्हासु ।
पुनिवे पाठीं शीतांशु । पालटे जैसा ॥ ९३ ॥
तैसें चालितां करणें । ज्ञाता वेंठिजे कर्त्तेपणें ।
तेथिचीं हीं लक्षणें । आइक आतां ॥ ९४ ॥
तरि बुद्धि आणि मन । चित्त अहंकारु हान ।
हें चतुर्विध चिन्ह । अंतष्करणाचें ॥ ९५ ॥

बाहीरिं त्वचा श्रवण । चक्षु रसना घ्राण ।
हें पंचविध जाण । ज्ञानेंद्रिय गा ॥ ९६ ॥
तेथ आंतुलें तवं करणें । कर्त्ता कर्त्तव्या घे उमाणें ।
मग तें चि जरि जाणे । सुखा येतां ॥ ९७ ॥
तरि बाहिरिलें तियें हीं । चक्षुरादिकें दाही ।
उठूनियां लवलाहीं । व्यापारा सुए ॥ ९८ ॥
मग तो इंद्रियकदंबु । करविजे तवं राबु ।
जवं कर्त्तव्याचा लाभु । हातासि ए ॥ ९९ ॥
नातरि कर्त्तव्य जरि दुःखें । फळैल हान ऐसें देखे ।
तरि लावी त्यागमुखें । तियें चि दाही ॥ ५०० ॥
मग फीटे दुःखाचा ठाउ । तवं राहाटवी रातिदिउ ।
विकणु आतें राउ । जिया परीं ॥ १ ॥
तैसेनि त्यागस्वीकारीं । वाहातां इंद्रियाचां धुरीं ।
ज्ञातेयातें अवधारीं । कर्त्ता ह्मणिपे ॥ २ ॥
आणि कर्त्तेयाचां सर्वकर्मीं । आउतांचिया परी क्षमी ।
ह्मणौनि इंद्रियांतें आह्मीं । करणें ह्मणों ॥ ३ ॥
आणि हें चि करण वेरीं । कर्त्ता क्रिया जे उभारी ।
तिया व्यापे तें अवधारीं । कर्म एथ ॥ ४ ॥
सोनाराचिया बुद्धी लेणें । व्यापे चंद्रकरीं चांदिणें ।
कां वेल्हाळपणें । वेलि जैसी ॥ ५ ॥
नाना प्रभा व्यापे प्रकाशु । गोडिया इक्षुरसु ।
हें असो अवकाशु । आकाशें जैसा ॥ ६ ॥
तैसें कर्त्तेयाचिया क्रिया । व्यापलें जें धनंजया ।
तें कर्म गा बोलावेया । नाहीं आन ॥ ७ ॥
एवं कर्त्ताकर्मकरण । इयां तिहिंचें हें लक्षण ।
दाविलें तुज विचक्षण— । शिरोमणी ॥ ८ ॥

**ज्ञानं कर्म च कर्त्ता च त्रिधैव गुणभेदतः ॥**
**प्रोच्यते गुणसंख्याने यथावच्छृणु तान्यपि ॥**

एथ ज्ञाताज्ञानज्ञेय । हें कर्माचें प्रवृत्तित्रय ।
तैसें चि कर्त्ताकरणकार्य । हा कर्मसंचयो ॥ ९ ॥
विहिं घेठला ऐसा धर्मु । आथि बीजिं जेवि द्रुमु ।
कां मनीं जोडे कामु । सदा जैसा ॥ ५१० ॥
तैसें कर्त्ताक्रियाकरणीं । कर्माचें असे जितवणी ।
सोनें जैसें खाणी । सोनेयांचिये ॥ ११ ॥
म्हणौनि हें कार्य मीं कर्त्ता । ऐसें आथि जेथ पांडुसुता ।
तेथ आत्मा दूरिं समस्तां । क्रियां पासीं ॥ १२ ॥
या लागि पुडुतीं । आत्मा वेगला चि सुमती ।
आणि असो हें केती । जाणतासि तूं ॥ १३ ॥
परि सांघितलें जें ज्ञान । कर्म हें कर्त्ता हान ।
तें तिहिं ठांइं भिन्न । गुणीं आथि ॥ १४ ॥
म्हणौनि ज्ञानकर्मकर्त्तेया । पांती एऊ न ये धनंजया ।
जें दोनि बांधति सोडावेया । एक चि प्रौढ ॥ १५ ॥
तें सात्विक होआवें ठाउवें । गुणभेदु सांघों पाहे ।
जो सांख्यशास्त्रिं आहे । उवाइला ॥ १६ ॥
जें विचारा क्षीरसमुद्रु । स्वबोधकुमुदिनीचंद्रु ।
ज्ञानडोलसां नरेंद्रु । शास्त्रांचें जें ॥ १७ ॥
किं प्रकृतिपुरुषें दोन्हीं । मिसलीं दिवोरजनी ।
तियें निवडितां त्रिभुवनीं । मार्तंड जें ॥ १८ ॥
जेथ अपारमोहरासी । तत्वाचां मापीं चौविसीं ।
उमाणें घेउनि परेसीं । सुरवाडिजे ॥ १९ ॥
अर्जुना तें सांख्यशास्त्र । पढे जेयाचें स्तोत्र ।
तें गुणभेदविचित्र । ऐसें आहे ॥ ५२० ॥

जें आपुलेनि अंगिकें । त्रिविधपणाचेनि अंकें
दृश्यजात तेतुकें । अंकित केलें ॥ २१ ॥
एयां सत्वरजतमां । तिहिं एवडी असे महिमा ।
जें त्रिविध आदिब्रह्मा । अतिक्रमीं ॥ २२ ॥
परि विश्विंची आघवी मांदी । जेणें भेदलेनि गुणभेदीं ।
पडिली तें तवं आदीं । ज्ञान सांघों ॥ २३ ॥
जें दीठी जरि चोख कीजे । तरि भलेतें चोख चि सुझे ।
तैसें ज्ञानें शुद्धें लाहिजे । सवैं शुद्ध ॥ २४ ॥
ह्मणौनि तें सात्विकज्ञान । आतां सांघों दे अवधान ।
कैवल्यगुणनिधान । श्रीकृष्णु ह्मणे ॥ २५ ॥

**सर्वभूतेषु येनैकं भावमव्ययमीक्षते ॥**
**अविभक्तं विभक्तेषु तज्ज्ञानं विद्धि सात्विकं ॥ २० ॥**

तरि अर्जुना गा तें फुडें । सात्विकज्ञान चोखडें ।
जेयाचां उदईं ज्ञेय बुडे । ज्ञातेनसिं ॥ २६ ॥
जैसा सूर्यो नेदखे आंधारें । सरिता नेणिजति सागरें ।
कां कवळियां न धरे । आत्मछाया ॥ २७ ॥
तिया परीं जिया ज्ञाना । शिवादि तृणावसाना ।
इया भूतव्यक्ती भिन्ना । नाडळति ॥ २८ ॥
जैसें हातें चित्र पांतां । होये पाणियें मीठ धूंतां ।
कां चेउनि स्वप्ना येंतां । जैसें होये ॥ २९ ॥
तैसें ज्ञानें एणें । करितां ज्ञातव्याचें पाहाणें ।
न जाणतां न जाणणें । जाणावें उरे ॥ ५३० ॥
पैं सोनें आटौनि लेणीं । न कढीति आपुलेया आणी ।
कां तरंग न घेपति पाणीं । गाळुनि जैसें ॥ ३१ ॥
तैसी ज्ञेयाज्ञानाचेया हाता । न लगे हे दृश्यपथा ।
तें ज्ञान जाण सर्वथा । सात्वीक गा ॥ ३२ ॥

आरिसा पाऊं जातां कोडें । जैसें पांतें चि रिघे पुढें ।
तैसें ज्ञेय लोटूनि पडे । ज्ञाता चि जें ॥ ३३ ॥
पुढुतीं तें चि सात्विकज्ञान । जें मोक्षलक्ष्मीचें भुवन ।
हें असो आइकें चिन्ह । राजसाचें ॥ ३४ ॥

**पृथक्त्वेन तु यद्ज्ञानं नानाभावान्पृथग्विधान् ॥**
**वेत्ति सर्वेषु भूतेषु तद्ज्ञानं विद्धि राजसं ॥ २१ ॥**

पारिं पार्था परियस । तें ज्ञान राजस ।
जें भेदाची कास । धरूनि चाले ॥ ३५ ॥
विचित्रता भूतांचिया । आपण आंतूनि ठीकरीया ।
बहुचकें ज्ञातेया । आणिली जेणें ॥ ३६ ॥
जैसें सांचा रूपा आड । घालूनि विसराचें कवाड ।
मग स्वप्निचें काबाड । वोइरी निद्रा ॥ ३७ ॥
तैसें स्वज्ञानाचिये पौली । बाहिरि मिथ्याचां महाखेलीं ।
तिहिं अवस्थांचिया बाहाली । दावी जें जीवा ॥ ३८ ॥
अलंकारपणें झांकलें । बोला सोनें कां वायां गेलें ।
तैसें नामरूपिं दुराविलें । अद्वैत जेया ॥ ३९ ॥
अवतरली गाडुवां घडां । पृथ्वी अनोलख जाली मूढां ।
वन्हि होउनि ठेला कानवडा । दीपा साठिं ॥ ५४० ॥
कां वस्त्रपणाचेनि आटोपें । मूर्खां प्रति तंतु हारपे ।
नाना मुग्धां पटु लपे । दाउनि चित्र ॥ ४१ ॥
तैसी जेया ज्ञाना । जाणों भूतव्यक्ती भिन्ना ।
ऐक्यबोधाची वासना । निमौनि गेली ॥ ४२ ॥
मग इंधनीं भेदला अनलु । फुला वरि परिमलु ।
कां जलभेदें सकलु । चंद्रु जैसा ॥ ४३ ॥
तैसे पदार्थभेद बहुवस । जाणों लाहान वेस ।
आंतलें तें राजस । ज्ञान एथ ॥ ४४ ॥

यत्तु कृत्स्नवदेकस्मिन्कार्ये सक्तमहैतुकं ॥
अतत्वार्थवदल्पं च तत्तामसमुदाहृतम् ॥ २२ ॥

आतां तामसाचें लिंग । सांगैन ओळख चांग ।
डावलावेया मातंग— । सदनु जैसें ॥ ४५ ॥
तरि किरीटी जें ज्ञान । हिंडे विधीचेनि वस्त्रें हीन ।
श्रुति पाठिमोरी नग्न । ह्मणौनि तेया ॥ ४६ ॥
येरें ही शास्त्रबहिकरीं । जें निंदेचे इटाल वेन्हीं ।
बोळविलेंसे डोंगरीं । म्लेंछधर्माचां ॥ ४७ ॥
जें गा ज्ञान ऐसें । गुणाग्रहें तामसें ।
वेतलें भवे पींसें । होउनियां ४८ ॥
जें सोइरीके बंधु नेणे । पदार्थीं निषेध न ह्मणे ।
निरोविलें जैसें सुणें । सुना गावीं ॥ ४९ ॥
तेया तोंडि जें नाडले । कां खांतां जेणें पोळे ।
तें चि एक वाळे । एर घे चि ॥ ५५० ॥
पैं सोनें चोरितां उंदिरु । न ह्मणे थरुविथरु ।
नेणे मांसखाइरु । काळें गोरें ॥ ५१ ॥
नाना वना माझि बोहिरी । कडसणी जेवि न करी ।
कां जींत मेलें न विचारी । बैसतां मासी ॥ ५२ ॥
आगा वांती वाढलेया । साजुकां कां सडिलेयां ।
विवेकु काउलेया । नाहिं जैसा ॥ ५३ ॥
तैसें निषिद्ध सांडूनि जावें । कां विहित आदरें घेयावें ।
हें विषयांचेनि नावें । नेणे चि जें ॥ ५४ ॥
जेतुलें आड पडे दीठी । तेतुलें घे विषयां साठीं ।
मग स्त्री द्रव्य वांटी । सिष्णोदरीं ॥ ५५ ॥
तीर्थ अतीर्थ हे भाषा । उदकिं ना सनोळख । नाहीं
ताहान बोले तें सुख । वांचूनियां ॥ ५६ ॥

तेया चि परीं खाद्याखाद्य । ना न ह्मणे निंद्यानिंद्य ।
तोंडा आवडे तें मेध्य । ऐसा बोधु ॥ ५७ ॥
आणि स्त्रीजात जेतुकें । त्वगिंद्रिय चि ओळखे ।
तियें विखिं सोइरिकें । एकु चि बंधु ॥ ५८ ॥
पैं स्वार्थी जें उपकरे । तेया चि नावं सोयरें ।
देहसंबंधु न सरे । जिये ज्ञानिं ॥ ५९ ॥
मृत्युचें आघवें चिन्ह । आघवें चि आगी इंधन ।
तैसें जग चि आपुलें धन । तामसाज्ञानां ॥ ५६० ॥
ऐसेनि विश्व सकळ । जें विखा आंतुलें केवळ ।
तेया एक जाणे फळ । देहभरण ॥ ६१ ॥
आकाशपतिता नीरा । जैसा सिंधू चि एकु धारा ।
तैसें कृत्यजाता उदरा । ळागि चि बुझे ६२ ॥
वांचूनि स्वर्ग नरक आथि । तेया हेतू प्रवृत्तिनिवृत्ति ।
इये अघवियें चि राती । जाणीवेचि ते ॥ ६३ ॥
देहखंडा नावं आत्मा । ईश्वरु पाखाणप्रतिमां ।
इया परौता प्रेमा । वाढों नेणे ॥ ६४ ॥
ह्मणौनि पडिलेनि शरीरें । केलेनसिं आत्मा चि सरे ।
मा भोगावेया उरे । कोणें वेखें ॥ ६५ ॥
ना ईश्वरु पांतां आहे । तो भोगवी हें जरि होए ।
तरि देव चि खाए । विकूनियां ॥ ६६ ॥
गाविंचे देउलेश्वर । न्यामक चि होंति जर ।
तरि देशिंचे डोंगर । उगे असति ॥ ६७ ॥
ऐसा विपायें देउ मानिजे । तरि पाखाणमात्र चि जाणिजे ।
आणि आत्मा तवं ह्मणिजे । देहासी चि ॥ ६८ ॥
एरें पापपुण्यादिकें । तें आघवें चि करूनि लटिकें ।
हित मानी अग्निमुखें । आचरण जें कां ॥ ६९ ॥

दाविती जें चामल डोले वानिती । जें इंद्रियें गोडी लाविती ।
तें चि साच हे प्रतीती । फुडी जेथ ॥ ५७० ॥
किंबहुना ऐसी पार्था । वाढती देखसी आस्था ।
धूवांचि वेलि वृथा । आकाशीं जैसी ॥ ७१ ॥
कोरडा ना वोला । उपेगा आथि गेला ।
तो वाढौनि मोडला । भेंडु जैसा ॥ ७२ ॥
नाना कां उंसाचीं कणिसें । कां नपुंसकें माणसें ।
वन लागलें जैसें । सावेरीचें ॥ ७३ ॥
नातरि बालकाचें मन । कां चोरावरिचें धन ।
अथवा गळां स्तन । सेळियेचे ॥ ७४ ॥
तैसें जें वायाणें । वोसळ दीसे जाणणें ।
तेयातें मीं ह्मणें । तामसज्ञान ॥ ७५ ॥
तें हिं ज्ञान इया भासा । बोलिजे तो भाउ ऐसा ।
जात्यंधाचा कां जैसा । डोळा वाडु ॥ ७६ ॥
कां बधिराचे नीट कान । अपेया नावं पान ।
तैसें अडिनावं ज्ञान । तमासि तेया ॥ ७७ ॥
हें असो केतीं बोलावें । तर्‍हीं हें ऐसें देखावें ।
ते ज्ञान नव्हे जाणावें । डोळस तम ॥ ७८ ॥
एवं तीन्हीं गुणीं । भेदिलें यथालक्षणीं ।
ज्ञान श्रोतेशिरोमणी । दाविलें तुज ॥ ७९ ॥

**नियतं संगरहितमरागद्वेषतः कृतं ॥**
**अफलप्रेप्सुना कर्म यत्तत्सात्विकमुच्यते ॥ २३ ॥**

आतां या चि त्रिप्रकारा । ज्ञानाचेनि धनुर्द्धरा ।
प्राकाशें होंति गोचरा । कर्त्तेया क्रिया ॥ ५८० ॥
ह्मणौनि कर्म पैं गा । अनुसरे तिभागा ।
मोहोरें जालेयां वोघा । पाणी जैसें ॥ ८१ ॥

तें चि ज्ञानत्रयवशें । त्रिविध कर्म जें असे ।
तेथ सात्विक तवं ऐसें । परियस आदिं ॥ ८२ ॥
तरि स्वाधिकाराचेनि मार्गें । आलें जें मानिलें आंगें ।
पतिव्रतेचेनि परिष्वंगें । प्रियातें जैसें ॥ ८३ ॥
सावलेया आंगा चंदन । प्रमदालोचनीं अंजन ।
तैसें अधिकारासि मंडन । नित्यपणें जें ॥ ८४ ॥
तें नित्यकर्म भलें । होये निमित्तिकें सावाइलें
सोनेयांसि जोडलें । सौरभ्य जैसें ॥ ८५ ॥
आणि आंगा जीवाची संपत्ति । वेचूनि बालाची करी पालति ।
परि जीवनाची खंति । न पाहे माए ॥ ८६ ॥
तैसें सर्वस्वें कर्म अनुष्ठी । परि फल न सूए दृष्टी ।
उखिती क्रिया पैठी । ब्रह्मीं करी ॥ ८७ ॥
आणि प्रिया आलेयां धावें । संबंधा उरों ठाकों जावें ।
तैसें संतप्रसंगें करावें । पारुखे जरि ॥ ८८ ॥
तरि अकुरणाचेनि खेदें । द्वेषातें जीविं न बंधें ।
जालेयाचेनि आनंदें । फुंज नैए ॥ ८९ ॥
ऐसिया हातवटिया । कर्म निफजे जें धनंजया ।
जाण सात्विक तेया । गुण नाम गा ॥ ५९० ॥
या वरि राजसाचें । लक्षण सांघिजैल साचें ।
न करिं अवधानाचें । वाणेपण गा ॥ ९१ ॥

**यत्तु कामेप्सुना कर्म साहंकारेण वा पुनः ॥**
**क्रियते बहुलायासं तद्राजसमुदाहृतं ॥ २४ ॥**

तरि घरिं मातापितरां । धडा बोला नाहिं सर्वसारा ।
एर विश्व भरी आदरां । मूर्खु जैसा ॥ ९२ ॥
कां तुलसीचेया झाडा । दूरौनि घाली सींतोडा ।
द्राक्षीचेया तरि बुढा । दूध चि लाविजे ॥ ९३ ॥

तैसें नित्यनैमित्यकें । कर्में जियें आवश्यकें ।
तेयांचां विखिं न शके । बैसला उठूं ॥ ९४ ॥
येरां काम्याचेनि नावें । देहसर्वस्व आघवें ।
अर्जवितां हिं न मनवे । बहू ऐसें ॥ ९५ ॥
आगा देव्हडी वाढिया लाहिजे । तेथ मोल देतां न धाइजे ।
पेरितां पुरे न ह्मणिजे । ब्रियां जेवि ॥ ९६ ॥
कां परिसु जालेयां हातिं । लोहा लागि सर्व संपत्ति ।
वेचु करितां उन्नती । साधकु जैसा ॥ ९७ ॥
तैसीं फळें देखौनि पुढें । काम्य कर्में दुआडें ।
करी परि तें थोडें । केलें मानीं ॥ ९८ ॥
तेणें फलकामुकें । यथाविधि नेटकें ।
काम्य कीजे जेतुकें । क्रियाजात ॥ ९९ ॥
आणि तेया ही केलेयाचें । तोंडीं लावी डौंडिचें ।
कामिं या नावें पाटाचें । आंक जैसें ॥ ६०० ॥
तैसा भरे कर्मा अहंकारु । मग पिता अथवा गुरु ।
तें न मनी कालज्वरु । ओषध जैसें ॥ १ ॥
तैसेनि साहंकारें । फल अभिलाखियें नरें ।
कीजे गा आदरें । जें जें काहिं ॥ २ ॥
पारि तें करणें बहुवसा । वलघौनि करी आयासा ।
जीवनउपाओ कां जैसा । कोल्हांटियाचा ॥ ३ ॥
एका कणा लागि उंदिरु । असिका उसपे डोंगरु ।
कां सेवाळा दोसें दर्दुरु । समुद्रु डहुळी ॥ ४ ॥
पैं भीके परौतें न लाए । तऱ्हीं गारुडी सर्प वाहे ।
काइ कीजे सीणु होये । गोडु ये कां ॥ ५ ॥
हें असो परिमाणुचेनि लाभें । पाताल लंघीति ओलिंबे ।
तैसें स्वर्गसुखलोभें । विचंब्रणें जें ॥ ६ ॥

तें काम्य कर्म सक्लेश । जाणावें एथ राजस ।
आतां चिन्ह परियस । तामसाचें ॥ ७ ॥

**अनुबंधं क्षयं हिंसामनपेक्ष्य च पौरुषं ॥**
**मोहादारभ्यते कर्म यत्तत्तामसमुच्यते ॥ २५ ॥**

तरि तें गा तामस कर्म । जें निंदेचें काळें धाम ।
निषेधाचें जन्म । साचें जेणें ॥ ८ ॥
जें निफजविलेया पाठिं । काहिं चि फल न दिसे दीठी ।
रेघ काढिलेयां पोटीं । तोयाचां जेवि ॥ ९ ॥
कां कांजी गुसळलेयां । सारकुतु फुंकिलेयां ।
काहिं न दिसे गाळिलेयां । वाळुवेचा घाणा ॥ ६१० ॥
नाना उपणिलेयां भूस । विंधलेयां आकाश ।
मांडिलेयां पाश । वारेयासि ॥ ११ ॥
हें आघवें चि जैसें । वांझें होउनि नाशे ।
जें केलेयां पाठिं तैसें । वायां चि जाए ॥ १२ ॥
यऱ्हवीं नरदेहा एवडें । धन आटाणिये पडे ।
जें निफजवितां मोडे । जगाचें सुख ॥ १३ ॥
जैसा कमळवनीं फांसु । काढिलेयां कांटसु ।
आपण झिजे नाशु । कमळां करी ॥ १४ ॥
कां आपण आंगें जळे । आणि नागवी जगाचे डोळे ।
पतंगु जैसा सळें । दीपाचेनि ॥ १५ ॥
तैसें सर्वस्व वायां जाऊ । वरि देहासि हो घाऊ ।
परि पुढिला अपाऊ । निफजे जेणें ॥ १६ ॥
मासी आपणेयातें गिळवी । परि पुढिलातें वांती सीणवी ।
तें कश्मळ आठवी । आचरण जें ॥ १७ ॥
तें हिं करावेया दोसें । मज सामर्थ्य असे ।
किं नाहिं हें ऐसें । न पांत करी ॥ १८ ॥

केवढा माझा उपाऊ । करितां कोणु प्रस्ताऊ ।
केलेयां आऊ । काइ एथ ॥ १९ ॥
इयें जाणिवेची सोए । अविवेकाचेनि पाएं ।
पूसूनियां होए । साटोपु कर्मीं ॥ ६२० ॥
आपुला वसैठा जाळुनि । बिसाटे जैसा वन्हि ।
कां स्वमर्यादा गीळुनि । सिंधु उठी ॥ २१ ॥
मग नेणे बहु थोडें । न पाहे मागें पुढें ।
मार्गामार्ग एकीवडे । करीतु चाले ॥ २२ ॥
तैसें कृत्याकृत्यें सरकटित । आपु पर न विचारित ।
कर्म होये तें निश्चित । तामस जाण ॥ २३ ॥
ऐसें गुणत्रयें भिन्ना । कर्मासि गा अर्जुना ।
हे केली विवंचना । उपपत्तिसिं ॥ २४ ॥

**मुक्तसंगोऽनहंवादी धृत्युत्साहसमन्वितः ॥**
**सिध्यसिध्योर्निर्विकारः कर्त्ता सात्विक उच्यते ॥ २६ ॥**

आतां या चि कर्मा भजतां । कर्माभिमानियां कर्त्ता ।
तो जीउ ही त्रिविधता । पातला असे ॥ २५ ॥
चतुराश्रमवशें । पुरुषु चतुर्द्धा दीसे ।
कर्त्तेया त्रिविध तैसें । कर्मभेदें ॥ २६ ॥
परि तेयां तिहिं आंतु । सात्विक तवं प्रस्तूतु ।
सांघैन दत्तचित्तु । आकर्णि तूं ॥ २७ ॥
तरि फळउद्देशें सांडिलिया । वाढति जेवि सरलिया ।
शाखा कां चंदनाचेया । बावनेयां ॥ २८ ॥
कां न फलतां हिं सार्थका । जैसिया नागवाल्लिका ।
तैसिया करी नित्यादिका । क्रिया जो गा ॥ २९ ॥
परि फळशून्यता । नाहिं तेया विफलता ।
पैं फळासी चि पांडुसुता । फळ काइसें ॥ ६३० ॥

आणि कृत्यादिकें करी बहुवसें । परि कर्त्ता मी हें नुमसे ।
वर्षाकालिचे जैसे । मेघवृंद ॥ ३१ ॥
तेंविं चि परमात्मलिंगा । समर्पावेया जोगा ।
कर्मकलापु पैं गा । निफजावेया ॥ ३२ ॥
तेया कालातें न लंघणें । देशशुद्धि हान साजणें ।
कां शास्त्राचां वातिं पाहाणें । क्रियानिर्णयो ॥ ३३ ॥
वृत्ती करणें येकवला । चित्त जावों नेंदणें फला ।
नियमाचिया साखला । वाहाणें हान ॥ ३४ ॥
हा निरोधु साहावेया लागि । धैर्याचिया चांगाचांगी ।
चिंतवणी जिंतिया आंगीं । वाहे जो कां ॥ ३५ ॥
आणि आत्मेयांचिया आवडी । कर्म करितां सुरवाडीं ।
देहसुखाचिये परिवडी । येवों न ल्हाये ॥ ३६ ॥
ऐसां निद्रा दुरावें । क्षुधा न बणवे ।
सुरवाडु न पवे । आंगाचा ठाऊ ॥ ३७ ॥
तवं अधिकाअधिक । उत्साहो धरी आगलिक ।
सोनें जैसें पुटीं तूक । तूटलेयां ॥ ३८ ॥
जरि आवडि आथि साच । तरि जीवित्व ही सलंछ ।
आगि घालितां रोमांच । देखिजति ॥ ३९ ॥
मा आत्मेयां एवढिया प्रिया । वालभैला जो धनंजया ।
देहाची सिद्रता तेया । खेदु होइल ॥ ६४० ॥
म्हणौनि सुरवाडू तूटे । जवं हें देह आटे ।
तवं आनंदु दुणावटे । कर्मीं जेया ॥ ४१ ॥
ऐसेन जो कर्म करी । आणि कोण्हीं एकिं अवसरीं ।
आलें तें कर्म ठाके ऐसी सरी । वाहे जरि ॥ ४२ ॥
तरि कडाडि मोडे जो गाडा । तो आपणपेयां न मनीं अवघडा ।
तैसा ठाकलेनि थोडा । न्हवे चि जो कां ॥ ४३ ॥

नातरि आदरिलें । अव्यंग सिद्धी गेलें ।
तरि तें हिं जींतलें । मिरौं नेणे ॥ ४४ ॥
इया खुणा कर्म कारितां । देखिजे जो पांडुसुता ।
तेयातें ह्मणिजे तत्वता । सात्विकु कर्त्ता ॥ ४५ ॥

**रागी कर्मफलप्रेप्सुर्लुब्धो हिंसात्मको शुचिः ॥**
**हर्षशोकान्वितः कर्त्ता राजसः परिकीर्त्तितः ॥ २७ ॥**

आतां राजसा कर्त्तेया । वोळखण हे धनंजया ।
जें अभिलाखा जगिचेया । व्रसैठा तो ॥ ४६ ॥
जैसा गांविंचेया कश्मळा । उकरडां एकवळा ।
कां श्मसानीं अमंगळा । आववेयांसि ॥ ४७ ॥
तिया परीं जो अशेषां । विश्विचेयां अभिलाखां ।
पाये पाखाळणियां दोषां । घरटा जाला ॥ ४८ ॥
ह्मणौनि फळाचा लागु । देखे जो आसलगु ।
तिये कर्मि चांगु । रोहो मांडी ॥ ४९ ॥
आणि आपज़ळिये जोडी । उपखों नेंदी काडी ।
आणि क्षणीं क्षणीं कुरवंडी । जीवाची करी ॥ ६५० ॥
कृपणु ठेवां आपुला । तैसा दक्षु परावेया मोला ।
बकु जैसा खुतला । मासेयांसि ॥ ५१ ॥
आणि गोवि केलेयां जवळि । झगटलियां आंग फाली ।
फळें आंतु पोळी । बोरांटी जैसी ॥ ५२ ॥
तैसा मनें वाचा कायें । भलेतेया दुःख जाये ।
स्वार्थु साधितां न पाहे । परावें हित ॥ ५३ ॥
तोविं चि आंगें कर्मीं । आचरणें न्हवे क्षमी ।
निगे मनोधर्मि । अरोचक ॥ ५४ ॥
कनकाचेया फळा । आंतु माजु बाहिरी मैळा ।
तैसा सबाह्यें दुबळा । शुचित्वें जो ॥ ५५ ॥

आणि कर्मजात केलेयां । फल लाहे जरि धनंजया ।
तरि हरिखें जगा येया । वांकुलिया वाए ॥ ५६ ॥
अथवा तें आदरिलें । हीन फल जरि गेलें ।
तरि शोकें तेणें जियालें । धिक्करुं लागे ॥ ५७ ॥
कर्मि राहाटि ऐसी । जेयातें गा देखसी ।
तो जाण त्रिशुद्धिसीं । राजसु कर्त्ता ॥ ५८ ॥

**अयुक्तः प्राकृतः स्तब्धः शठो नैष्कृतिकोलसः ।**
**विषादी दीर्घसूत्री च कर्त्ता तामस उच्यते ॥ २८ ॥**

आतां येया पाठिं येरु । कुकर्मांचा आगरु ।
तो ही करुं गोचरु । तामसु कर्त्ता ५९ ॥
तरि मीं लागलेयां कैसें । पुढील जलत असे ।
हें नेणिजे हुताशें । जिया परीं ॥ ६६० ॥
पैं शस्त्रें मियां तीखटें । नेणे कैसें निवटें ।
कां नेणिजे कालकूटें । आपुलें केलें ॥ ६१ ॥
तैसा पुढिला आपणपेया । घाये करीतु धनंजया ।
आदरी उभ्खटिया । क्रिया जिया कां ॥ ६२ ॥
तिया करितां वेलीं । काइ जालें हें न संभाली ।
चलला वायु वाहुटली । चेष्टे जैसा ॥ ६३ ॥
पैं करणेयां आणि जेया । मेलु नाहिं धनंजया ।
तो पाहुनि पिंसेया । कैंची त्राये ॥ ६४ ॥
आणि इंद्रियांचें वोइरिलें । चरौनि राखे जो जियालें ।
बैला तलिं वर्त्तलें । पोसणें जैसें ॥ ६५ ॥
कां हांसेया रुदना वेल । नेणतां आदरी बाल ।
राहाटे उछंखल । तिया परी ॥ ६६ ॥
जो प्रकृति आतलेपणें । कृत्याकृत्यसवाढु नेणे ।
फुगे केरें घालेपणें । उकरडें जैसें ॥ ६७ ॥

म्हणौनि मान्याचेनि नावें । ईश्वरा हि परि न लवे ।
स्तब्धपणें न मनवे । डोंगरासि ॥ ६८ ॥
आणि मन जेयाचें काळलें । राहाटि फुडी चोरिली ।
दीठि ते किर बोली । पण्यांगनांची ॥ ६९ ॥
किंबहुना कपटिचें । देह चि वळिलें तेयाचें ।
तें जीणें कीं जुवांराचें । टिटघर ॥ ६७० ॥
न्हवे तेयाचा प्रादुर्भावो । तो साभिलाख भिल्लांचा गावों ।
म्हणौनि न ये येवों जावों । तिया वाटा ॥ ७१ ॥
आणि आणिकाचें नीकें केलें । तें वीरुं होये जेया आलें ।
जैसें पय मीनलें । लवण करी ॥ ७२ ॥
कांहिं विरुद्धे ऐसा पदार्थु । वातला आगी आंतु ।
तिये चि क्षणीं धडाडितु । आगि होए ॥ ७३ ॥
नाना सुद्रव्यें गोमटीं । जालेयां शरीरा पैठीं ।
होउनि ठाकति किरीटी । मलु चि जेवि ॥ ७४ ॥
तैसें पुढिलाचें बरवें । जेयाचा भितरु पावे ।
आणि विरुद्ध चि आघवें । होये चि गा ॥ ७५ ॥
जो गुण घे दे दोष । अमृताचें करी विख ।
दूध पाजिला देख । व्यालु जैसा ॥ ७६ ॥
आणि इहिकीं जियावें । जेणें परत्रां साचा होआवें ।
तें उचित कृत्य पावे । अवसरीं जिये ॥ ७७ ॥
तेधवां जेया आपैसी । नीद ये ठेविली ऐसी ।
दुहवेवारी जैसी । विटाळे लोटे ॥ ७८ ॥
पैं द्राक्षरस कां उसा । वेले तोंड सडे वायसा ।
कां डोले फूटति दिवसा । डुडुळांचें ॥ ७९ ॥
तैसा कल्याणु काळु पाहे । तैं तेया आळसु खाए ।
ना प्रमादीं तरि होए । तो म्हणे तैं ॥ ६८० ॥

तेविं चि सागराचां पोटीं । जळे अखंड आगिठी ।
तैसा विषादु वाहे पोटीं । जिवाचिये ॥ ८१ ॥
आगी धूवां एकावधी । कां अपाना आणि दुर्गंधि ।
तैसा जो जीविता अवधी । विषादें केला ॥ ८२ ॥
आणि कल्पांताचिया पारा । वेगळेया ही जो वीरा ।
सूत्र धरी व्यापारा । साभिलाखें ॥ ८३ ॥
अगा जगा ही परौती । सुचावा हे पैं चित्तीं ।
करितां विषिं हातिं । तृण हिं न लगे ॥ ८४ ॥
ऐसा जो लोका आंतु । पापपुंजु मूर्त्तु ।
देखिजे तो अव्याहतु । तामसु कर्त्ता ॥ ८५ ॥
एवं कर्म कर्त्ता ज्ञान । यां तिहिंचें त्रिधा चिन्ह ।
दाविलें तुज सुजन---। चक्रवर्त्ती ॥ ८६ ॥

**बुद्धेर्भेदं धृतेश्चैव गुणतस्त्रिविधं शृणु ॥**
**प्रोच्यमानमशेषेण । पृथक्त्वेन धनंजय ॥ २९ ॥**

आतां अविद्येचां गावीं । मोहाची वेढूनि मदवी ।
संदेहाचिं आघवीं । लेउनि लेणीं ॥ ८७ ॥
आत्मनिश्चयाची बरव । जिये आरिसां पाहे सावेव ।
तिये बुद्धिची ही धांवं । त्रिधा चि असे ॥ ८८ ॥
अगा सत्वादिगुणिं इहिं । काइ एक तिहिं ठांइं ।
न कीजे चि एथ पाईं । जगा माझि ॥ ८९ ॥
आगि नसतां पोटीं । कोठें काष्ट असे सृष्टी ।
तैसें तें कैंचें दृश्य किरीटी । त्रिधा जें नोहे ॥ ६९० ॥
ह्मणौनि तिहिं गुणिं । बुद्धि केली त्रिगुणीं ।
धृतिसि ही वाटणी । तैसी चि असे ॥ ९१ ॥
तें चि एकैक वेगळालें । एथ चिन्ह अलंकारलें ।
सांघिजैल उपाइलें । भेदलेपणें ॥ ९२ ॥

पारे बुद्धिधृति एयां । दोहीं मार्गी माझि धनंजया ।
आदि रूप बुद्धिचेया । भेदासि करूं ॥ ९३ ॥
तरि उत्तममध्यमनिकृष्टा । संसारासि गा सुभटा ।
प्राणियां यंतिया वाटा । तीनि आथि ॥ ९४ ॥
जे सात्विकराजसतामसनिबद्ध । हे ते मार्ग प्रसिद्ध ।
संसारभयसंबंध । जीवां येयां ॥ ९५ ॥

**प्रवर्त्ति च निवृत्तीं च कार्याकार्ये भयाभये ॥**
**बंधमोक्षं च या वेत्ति बुद्धिः सा पार्थ सात्विकी ॥३०॥**

ह्मणौनि अधिकारें मानलें । जें विधिचेनि ऽऽघें आलें ।
तें एथ चि एक भलें । नित्यकर्म ॥ ९६ ॥
तें चि आत्मप्राप्तिफल । दीठि सूनि केवळ ।
कीजे जैसें कां जळ । सेविजत ताहानें ॥ ९७ ॥
येतुलेनि तें कर्म । सांडी भयजन्म विषम ।
करूनि दे सुगम । मोक्षसिद्धी ॥ ९८ ॥
तें कर्म करी तो भला । संसारभयें सांडिला ।
करणीयत्वें आला । मुमुक्षभागा ॥ ९९ ॥
तेथ जो बुद्धी ऐसा । बळीं बांधे भरवसा ।
मोक्षु ठेविला ऐसा । जोडैल एथ ॥ ७०० ॥
ह्मणौनि निवृत्तिची मांडली । सूनि प्रवृत्ती तळिं ।
ए कर्मि बुडकली । द्यावी किं नां ॥ १ ॥
तृषार्त्ता पाणियें जीणें । कां पुरीं पडिलेयां प्रवाहणें ।
अंध कूपिं गति किरणें । सूर्याचेनि ॥ २ ॥
नाना पथ्येंसिं ऽऽखद लाहे । तरि रोगें दाटिला ही जिये ।
कां मीना जीवाला होए । जळाचा जारे ॥ ३ ॥
तरि तेया जीविता । नाहिं जैसें अन्यथा ।
तैसें कर्मा येया प्रवर्त्तता । जोडे चि मोक्षु ॥ ४ ॥

हें किर जेयाचिये कडे । जें ज्ञान आथि चोखडें ।
आणि करणीं फुडें । ऐसें जाणे ॥ ५ ॥
जियें तिहिं काम्यादिकें । संसारभयदायकें ।
अकृत्यपणाचे आबुखे । पडिले जेयां ॥ ६ ॥
तिये कामिं अकार्थि । जन्ममरणसभयीं । अकार्मिया/७
फळाचिया प्रवृत्तिफळें विपायीं । मागिलीं चि ॥ ७ ॥
पैं गा आगी माझि न रिगवे । अथावि न घलवे ।
धगधगीत नांगवे । शूळ जेवि ॥ ८ ॥
कां कालियाणा धुधुवांतु । देखौनि न पसरवे हातु ।
न वचवे खोंपे आंतु । वाघाचिये ॥ ९ ॥
तैसें कर्म अकरणिय । देखौनि महाभय ।
उपजे निःसंदेह । बुद्धि जेया ॥ ७१० ॥
वाढिलें रांधौनि विखें । तेथ जाणिजे मृत्यु न चुके ।
तेवि निषेधिं कें देखे । बंधातें जो ॥ ११ ॥
मग बंधुभयभारितिं । तिये निषेधीं प्रार्ति ।
विनियोगु जाणे निवृत्ती । कर्माचिये ॥ १२ ॥ कर्मीचीग
ऐसें कार्याकार्यविवेकीं । जे प्रवृत्तिनिवृत्तिमापकीं ।
खराकुडापारखी । जिया परीं ॥ १३ ॥
तैसी कृत्याकृत्यशुद्धी । बुझे जें निरवधी ।
सात्विक ह्मणिपे बुद्धी । ते गा जाण ॥ १४ ॥

**यया धर्ममधर्मं च कार्यं चाकार्यमेव च ॥**
**अयथावत्प्रजानाति बुद्धिः सा पार्थ राजसी ॥ ३१ ॥**

आणि बकाचां गावीं । घेपे क्षीरनीर सकळवी ।
कां अहोरात्राची गोवी । आंधळें नेणे ॥ १५ ॥
जेया फुलाचें गोमटें फावे । तो किं काष्टें कोरूं धांवे ।
परि भ्रमरपण नव्हे । अंव्हा जेवि ॥ १६ ॥

तैसिं इयें कार्याकार्यें । धर्माधर्मरूपें इयें ।
तियें न सुहतां जियें । जाणती जे कां ॥ १७ ॥
आगा डोळां विण मोतियें । घेतां पाडु मिळे विपायें ।
न मिळणें तें आहे । ठेविलें तेथ ॥ १८ ॥
तैसें अकरणीय अवचटें । नोडवे तरी चि लोटे ।
यऱ्हवि जाणे एकवटें । दोन्हीं जे कां ॥ १९ ॥
ते गा बुद्धि ऐसी । जाण एथ राजसी ।
आखत टाकिली जैसी । मांदिएसी ॥ ७२० ॥

**अधर्मं धर्ममिति या मन्यते तमसावृता ॥**
**सर्वार्थान्विपरीतांश्च बुद्धिः सा पार्थ तामसी ॥ ३२ ॥**

आणि राजा जिया वाटा जाए । तें चोरांसि अडवंतावो होये ।
कां राक्षसांसि दिवो पाहे । राति होउनि ॥ २१ ॥
नानां निधान चि निंदेवां । होये कोळिसेयाचा उडवा ।
पैं असतां आपणपें जीवा । नाहिं जालें ॥ २२ ॥
तैसें धर्मजात जेतुकें । जिये बुद्धीसि पातकें ।
साच तें लटकें । ऐसें बुझे ॥ २३ ॥
हे आघवे चि अर्थ । ते करुनि घाली अनर्थ ।
गुणातें व्यवस्थित । दोष मानी ॥ २४ ॥
किंबहुना श्रुतिजातें । प्रतिष्ठौनि केलें सरतें ।
तेतुलें हिं उपरतें । जाणे जे बुद्धी ॥ २५ ॥
ते कोण्हातें हिं न पुसतां । तामसी जाणावी पांडुसुता ।
रात्रि काइ धर्मार्था । साच करावी ॥ २६ ॥
एवं बुद्धीचे भेद । तीन्ही तुज विशद ।
सांवितले स्वयंबोध । कुमुदचंद्रा ॥ २७ ॥

**धृत्या यया धारयते मनःप्राणेंद्रियक्रियाः ॥**
**योगेनाव्यभिचारिण्या धृतिः सा पार्थ सात्विकी ॥३३॥**

आतां इया चि बुद्धिवृत्ति । निष्टंकिली कर्मजातीं ।
बोधु मांडिजे धृती । त्रिविधा जिया ॥ २८ ॥
तियेचे ही विभाग । तीनि यथालिंग ।
सांगिजती चांग । अवधान दे ॥ २९ ॥
तरि उदैला दिनकरु । चोरीसि थोंके अंधकारु ।
कां राजाज्ञा अव्यवहारु । कुंठवी जेवि ॥ ७३० ॥
नाना पवनाचा साटु । उचललेयां नीटु ।
आंगेंसि बोभाटु । सांडिती मेघ ॥ ३१ ॥
कां अगस्तिचेनि दर्शनें । सिंधु घेउनि ठांति मौनें ।
चंद्रोदइं कमलवनें । मीठी देती ॥ ३२ ॥
हें असो पाऊ उचलिला । मदमुखु न ठेवी चि खालां ।
गाजौनि पुढां जाला । सिंहु जरि ॥ ३३ ॥
तैसा जो धीरु । उठिलेयां अंतरु ।
मनादिकें व्यापारु । सांडिति उगीं ॥ ३४ ॥
इंद्रियां विषयांची गांठि । आपैसेया गळति किरीटी ।
मना मायेचां पोटीं । रिगति दाही ॥ ३५ ॥
अधऊर्ध्व गुढें काढी । प्राणु नवां पेंढी ।
बांधौनि घाली उंडी । मध्यमे माझि ॥ ३६ ॥
संकल्पविकल्पाचें लुगडें । सांडूनि मन उघडें ।
बुद्धि ही मागिली कडे । उगें बैसे ॥ ३७ ॥
ऐसें धैर्यराजें जेणें । मनप्राणकरणें ।
स्वचेष्टा संभाषणें । सांडिवीजती ॥ ३८ ॥
मग आघवीं चि संडीं । ध्यानाचां आंतुलीं मढीं ।
कोंडिजति निरवढी । योगाचिया ॥ ३९ ॥
पारि परमात्मेयां चक्रवर्ती । उगाणीति जवं हातीं ।
तवं लांचु नेघतां धृती । धरिजति जिया ॥ ७४० ॥

ते गा धृति एथें । सात्विक हें निरुतें ।
आइक अर्जुनातें । श्रीकांतु ह्मणे ॥ ४१ ॥
आणि होउनियां शरीरी । स्वर्गसंसाराचां दोहीं वरीं ।
नांदे जो पोटभरी । त्रिवर्गोपायें ॥ ४२ ॥

**यया तु धर्मकामार्थान् धृत्या धारयतेऽर्जुन ॥**
**प्रसंगेन फलाकांक्षी धृतिः सा पार्थ राजसी ॥ ३४ ॥**

तो मनोरथाचां सागरीं । धर्मार्थकामाचें तारुं भरी ।
जेणें धैर्यबळें करी । क्रियावाणिज ॥ ४३ ॥
जें कर्मभांडवळ सुए । तेयाची चौगुणां येंती पाहे ।
एवडें सायासें हें साहे । जेया धृति ॥ ४४ ॥
ते गा धृति राजस । पार्था एथ परियस ।
आतां आइकैं तामस । तिसरी जे ॥ ४५ ॥

**यया स्वप्नं भयं शोकं विषादं मदमेव च ॥**
**न विमुंचति दुर्मेधा धृतिः सा पार्थ तामसी ॥ ३५ ॥**

तरि सर्व अधमें गुणें । जेयाचें कां रूपा एणें ।
कोळिसा काळेपणें । घडिला जैसा ॥ ४६ ॥
आहो प्राकृतु आणि हीनु । तेया ही किं गुणसत्वाचा मानु ।
पारि न ह्मणिजे पुण्यजनु । राक्षसु काइ ॥ ४७ ॥
कां ग्रहां माझि इंगळु । तेयातें ह्मणिजे मंगळु ।
तैसा तमिं धसाळु । गुणसंबंधु हा ॥ ४८ ॥
तैसा सर्वदोषांचा वसैठा । तम चि कामौनि सूभटा ।
उभारिला आंगवटा । जेया नराचा ॥ ४९ ॥
तो आलसु सूनि असे काखे । ह्मणौनि निद्रे कहीं न मूंके ।
पापें पोसितां दुःखें । न संडिजे जेवि ॥ ७५० ॥
आणि देहाधनाचिया आवडी । सदा भयातें न संडी ।
विसंभों न शके ढोंढी । काठिन्य जैसें ॥ ५१ ॥

आणि पदार्थजाती स्नेहो । बांधे ह्मणौनि तो शोका ठाऊ ।
केला न पाप जाऊं । कृतघ्न जैसा ॥ ५२ ॥
आणि असंतोखु जीवेसीं । धरूनि ठेला अहर्निशीं ।
ह्मणौनि मैत्र तेणेंसीं । विशादें केलें ॥ ५३ ॥
लसणातें न संडी गंधि । कां अपथ्यशीलातें व्याधि ।
तैसी केली मरणा अवधी । विशादें तेया ॥ ५४ ॥
आणि वयसा वित्तकामु । येयांचा वाढवी संभ्रमु ।
ह्मणौनि मदें आश्रमु । बंधला तेथ ॥ ५५ ॥
आगितें न संडी तापु । सळातें जातिचा सापु ।
कां जगाचा वैरी वासिपु । अखंड जैसा ॥ ५६ ॥
नातरि शरीरातें काळु । न विसंभे कवण्ही वेळु ।
तैसा आथि अढळु । तामसिं मदु ॥ ५७ ॥
एवं पांचै हे निद्रादिक । तामसाचां ठांइं दोष ।
जिया धृती देख । धरिले असति ॥ ५८ ॥
तिये धृती नावें । तामसी एथ हें जाणावें ।
ह्मणितले तेणें देवें । जगाचेनि ॥ ५९ ॥
एवं त्रिविधा जो बुद्धी । कीजे कर्मनिश्चयो आदीं ।
तो धृती इया सिद्धी । नेइजे एथ ॥ ७६० ॥
सूर्यें मार्गु गोचरु होए । आणि तो चालति किर पाए ।
परि चालणें तें आहे । धैर्यें जेवि ॥ ६१ ॥
तैसी बुद्धि कर्मातें दावी । तें करणसामग्र निफजवी ।
परि निफजावेया होआवी । धीरता जे ॥ ६२ ॥
ते हे गा तुज प्रति । सांघितली त्रिविध धृति ।
येया कर्मत्रया निष्पत्ति । जालेयां मग ॥ ६३ ॥

सुखं त्विदानीं त्रिविधं शृणु मे भरतर्षभ ॥
अभ्यासाद्रमते यत्र दुःखान्तं च निगच्छति ॥ ३६ ॥

येथ फल येक जें निफजे । सुख जेयातें ह्मणिजे ।
तें हिं त्रिविध जाणिजे । कर्मवशें ॥ ६४ ॥
तरि फलरूप तें सुख । त्रिगुणि भेदलें देख ।
विवंचूं आतां चोख । चोखीं बोलीं ॥ ६५ ॥
चोखी ते कैसी सांघें । पैं घेऊँ जातां बोलबगे ।
कानिचिये ही लागे । हातिचा मल्लु ॥ ६६
ह्मणौनि जेयाचेनि अव्हेरें । अवधान होये बाहिरें ।
तें आइक हो अंतरें । जिवाचेनि जीवें ॥ ६७ ॥
ऐसें ह्मणौनि देऊ । त्रिविधा सुखाचा प्रस्ताऊ ।
मांडिला तो निर्वाहो । निरोपित असे ॥ ६८ ॥
श्लोक ३८ * ह्मणे सुखत्रया संज्ञा । सांवों ह्मणौनि प्रतिज्ञा । म्हणौनि
बोलिजे तें प्राज्ञा । आइक आतां ॥ ६९ ॥
तरि सुख तें गा किरीटी । दाविजैल तुज दीठी ।
जेणें आत्मेमसीं भेटि । जीवासि होए ॥ ७७० ॥
परि मात्रेचेनि मापें । दिव्योषध जैसें घेपे ।
कां कथिलाचें कीजे रूपें । रसभावनीं ॥ ७१ ॥
नाना लवणाचे जल । होआवेया दोनि च्यारि वेल ।
देउनि सांडिजति ढाल । तोयाचे चि जेवि ॥ ७२ ॥
तेवि जालेनि सुखलेशें । जीउ भाविलेयां अभ्यासें ।
जीवपणाचें नाशे । दुःख जेथ ॥ ७३ ॥
तें येथ आत्मसुख । जालें असे त्रिगुणात्मक ।
तें हिं सांवों येकैक । रूप आतां ॥ ७४ ॥

**यत्तदग्रे विषमिव परिणामे मृतोपमम् ॥**
**तत्सुखं सात्विकं प्रोक्तमात्मबुद्धिप्रसादजम् ॥ ३७ ॥**

तरि चंदनाचें बुढ । सर्पिं जैसें दुवाड ।
कां निधानाचें तोंड । विवंसीतें ही ॥ ७५ ॥

आगा स्वर्गिचें गोमटें । अडव यागसंकटें ।
कां बापपण दासटें । त्रासकाळें ।। ७६ ।।
हे असो दीपाचिये सिद्धी । अवघड धूं आधिं ।
नातरि तो वोषधी । जीभेचा ठाउ ।। ७७ ।।
तिया परी पांडवा । जेया सुखाचा रिगावां ।
विषमु तेया मेळावा । यमदमाचा ।। ७८ ।।
देंत सर्वस्नेहा मीठी । आंगीं ऐसें वैराग्य उठी ।
स्वर्गसंसाराकांटी । काढित चि ।। ७९ ।।
विवेकश्रवणें खरपुसें । जेथ व्रताचरणें कर्कसें ।
करितां जांति भोकसे । बुद्ध्यादिकांचे ।। ७८० ।।
सुषुम्नेचेनि तोंडें । गीळिजे प्राणापानाचे लोंढे ।
बोहणीए चि एवढें । भारी जेथ ।। ८१ ।।
तें सारसां हिं विघडतां । वोहांहूनि वत्स काढितां ।
नव्हे भणग दवडितां । भाणेया वरौनि ।। ८२ ।।
पैं गा माये पुढौनि बाळक । काळें नेंतां जें एक ।
होये कां उदक । तूटतां मीनां ।। ८३ ।।
तैसें विषयांचें घर । इंद्रियां सांडितां थोर ।
युगांत होये तें वीर । वीतराग साहांति ।। ८४ ।।
ऐसा जेया सुखिचा आरंभु । दावी काठिण्याचा क्षोभु । खा
मग क्षीराब्धिलाभु । अमृताचा जैसा ।। ८५ ।।
पहिलेया वैराग्यगरळा । धैर्यशंभु वोडविला गळा ।
तरि ज्ञानामृतें सोहळा । पाहे जेथ ।। ८६ ।।
पैं कोलिता ही हूनु बहुवसें । द्राक्षाचें हिरवेपण असे ।
तें परिपाकीं कां जैसें । माधुर्य होए ।। ८७ ।।
तें वैराग्यादिक तैसें । पीकलें आत्मप्रकाशें ।
मग वैराग्येंसीं हीं नासे । अविद्याजात ।। ८८ ।।

तेधवां सागरीं गंगा जैसी । आत्मा मीनलेयां बुद्धि तैसी ।
अद्वयआनंदाची आपैसी । खाणि उघडे ॥ ८९ ॥
ऐसें स्वानुभवविश्रामें । वैराग्यमूळ जें परिणमे ।
तें सात्विक एणें नावें । बोलिजे सुख ॥ ७९० ॥

**विषयेंद्रियसंयोगाद्यत्तदग्रेऽमृतोपमम् ॥**
**परिणामे विषमिव तत्सुखं राजसं स्मृतं ॥ ३८ ॥**

आणि विषयइंद्रियां । मेळु होतां धनंजया ।
तें सुख जाये थडिया । सांडौनि दोन्हीं ॥ ९१ ॥
अधिकारिया रिगतां गावों । जाला जैसा उत्सावो ।
कां रिणावरि विवाहो । विस्तारिला ॥ ९२ ॥
नाना रोगीं जीभे पासिं । केळें गोडें होंति साखरेसीं ।
कां वत्सनागा जैसी । महुललै ते ॥ ९३ ॥
पहिले सवंचोरां मैत्र । भेटिहाटिचें कलत्र ।
कां लाघविचे विचित्र । विनोद ते ॥ ९४ ॥
तैसें विषयेंद्रियदोखीं । जें सुख जीवातें पोखी ।
मग उपटला खडकीं । राजहंसु जैसा ॥ ९५॥
तैसी जोडि आघवी आटे । जीविताचा ठाउ फीटे ।
सुकृताचेया ही सुटे । धनाची गांठि ॥ ९६ ॥
आणि भोगिलें जें कांहिं । स्वप्न जैसें होये नाहिं ।
मग हाणिचां चि घाइं । लोळावें उरे ॥ ९७ ॥
ऐसें पाहांतिं जें सुख । इहिकिं परिणामे देख ।
परत्रीं किर विष । होउनि परते ॥ ९८ ॥
जें इंद्रियजाता लळा । दींवलेयां धर्मांचा मळा ।
जाळुनि भोगिजे सोहळा । विषयांचा जेथ ॥ ९९ ॥
तेथ पातकें मांधति थाउ । तियें नरकीं देंति ठाउ ।
जेणें सुखें अपाउ । परत्रीं ऐसा ॥ ८०० ॥

पैं नावें विष महुरें । परि मारूनि अंतिखरें ।
तैसें आदि जें गोडिरें । अंतीं कडू ॥ १ ॥
पार्था तें सुख साचें । वळिलें आहे रजाचें ।
म्हणौनि न सीवें तेयाचें । आंग कहीं ॥ २ ॥

**यदग्रे चानुबंधे च सुखं मोहनमात्मनः ॥**
**निद्रालस्यप्रमदोत्थं तत्तामसमुदाहृतं ॥ ३९ ॥**

आणि अपेयाचेनि पानें । अखाद्याचेनि भोजनें ।
स्वैरस्त्रीसंनिधानें । होये जें सुख ॥ ३ ॥
कां पुढिलाचेनि मारें । नातरि पशुप्रहारें ।
जें सुख अवतरे । भांडाचां बोलीं ॥ ४ ॥
जें आलस वारि पोखिजे । निद्रे माझि देखिजे ।
जेयाचां आदीं अंतीं भूलिजे । आपुली वाट ॥ ५ ॥
तें गा सुख पार्था । तामस जाण सर्वथा ।
हें न संगों चि जें कथा । असंभाव्य हे ॥ ६ ॥

**न तदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुनः ॥**
**सत्वं प्रकृतिजैर्मुक्तं यदेभिः स्यात्त्रिभिर्गुणैः ॥ ४० ॥**

ऐसें कर्मभेदें मुदलें । फलसुख ही त्रिधा जालें ।
तें हें एथ मियां केलें । गोचर तुज ॥ ७ ॥
तें कर्त्ता कर्म फल । हे त्रिकुटी एकि केवल ।
वांचूनि कहीं चि असे स्थूल । सूक्ष्मादि ॥ ८ ॥
आणि हे तवं त्रिकुटी । तिहिं गुणिं किरीटी ।
गुंथिली आहे पटीं । तांथुवीं जैसी ॥ ९ ॥
म्हणौनि प्रकृतिचां लोकीं । न बांधिजे सत्वादिकीं ।
तैसी स्वर्गीं नां मृत्युलोकीं । आथि वस्तु ॥ ८१० ॥
कैंचा लोंवे विण कांबला । मातिये विण मोदला ।
कां जलें विण कल्लोलां । होणें आहे ॥ ११ ॥

तैसें नोहोनि गुणागुणाचे । सृष्टिचां रचलां रचे ।
ऐसें नाहिं गा साचें । प्राणिजातां ॥ १२ ॥
या लागि हें सकळ । तिहिं गुणाचें केवळ ।
घडिलें आहे निखळ । ऐसें जाण ॥ १३ ॥

**ब्राह्मणक्षत्रियविशां शूद्राणां च परंतप ॥**
**कर्माणि प्रविभक्तानि स्वभावप्रभवैर्गुणैः ॥ ४१ ॥**

गुणीं देवत्रई मेळविली । लोकिं त्रिकुटी पाडिली ।
चतुर्वर्णा घातली । सिनानिं उर्लिंगें ॥ १४ ॥
ते चि च्यान्ही वर्ण । जरि पूससी कोण ।
तरि ब्राह्मण । मुख्य जे कां ॥ १५ ॥
एर क्षत्री वैश्य दोन्हीं । ते ही ब्राह्मणाचां चि मानीं ।
जें ते वैदिके विधानीं । योग्य ह्मणौनि ॥ १६ ॥
चौथा शूद्रु जो धनंजया । वेदीं लागु किर नाहीं तेया ।
तऱ्हीं वृत्ति वर्णत्रया । आधीन तेयाची ॥ १७ ॥
तिये वृत्तिचिया जवळिका । वर्णा ब्राह्मणादिकां ।
आहो शूद्रु ही देखां । चौथा जाला ॥ १८ ॥
जैसा फुलाचेनि सांघातें । तांथू तुरंबिजे श्रीमंतें ।
तैसें द्विजसंगें शूद्रातें । स्वीकारीति श्रुती ॥ १९ ॥
ऐसीसी गा पार्था । चतुर्वर्णव्यवस्था ।
करूं आतां कर्मपंथा । ययाचेया रूप ॥ ८२० ॥
जे हीं ते वर्ण च्यान्ही । ये जन्ममृत्युची कातरी ।
तूकौनियां ईश्वरीं । पैठे होंति ॥ २१ ॥
जिये आत्मप्रवृत्तिचां इहीं । गुणिं सत्वादिकीं तिहीं ।
कर्में चौघां चौं ठांइं । वांटिलीं वर्णा ॥ २२ ॥
जैसें बापें जोडिलें लेंका । वांटे सूर्य मार्ग पथिकां ।
नाना व्यापार सेवकां । स्वामि जैसा ॥ २३ ॥

तैसें प्रकृतिचां गुणीं । जेया कर्माची वेव्हाणी ।
केली आहे वर्णीं । चौ हीं इहीं ॥ २४ ॥
ते सत्वें आपुलां आंगीं । समुनिनिमुनि भागीं ।
दोघे केले नियोगी । ब्राह्मणक्षत्री ॥ २५ ॥
आणि रज परि सात्विक । तेया ठेविले वैश्य लोक ।
रज चि तमें भेसक । तेथ शूद्रु जाला ॥ २६ ॥
ऐसा एका चि प्राणिवृंदा । भेदु वर्णां चतुर्धा ।
गुणीं चि इहीं प्रबुधा । केला जाण ॥ २७ ॥
मग आपुलें ठेविलें जैसें । आइतें चि दीपें दीसे ।
गुणभिन्न कर्म तैसें । शास्त्र दावी ॥ २८ ॥
ते चि आतां कोण कोण । वर्णविहिताचें लक्षण ।
हें सांघों आइक श्रवण । सौभाग्यनिधी ॥ २९ ॥

**शमो दमस्तपः शौचं क्षांतिरार्जवमेव च ॥**
**ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम् ॥ ४२ ॥**

तरि सर्व इंद्रियांची वृत्ति । घेउनि आपुलां हातीं ।
बुद्धि आत्मेयां मिळे एकांतिं । प्रिया जैसी ॥ ८३० ॥
ऐसा बुद्धिचा उपरमु । तेया नावं ह्मणिपे शमु ।
तो गुणु गा उपक्रमु । जेया कर्माचा ॥ ३१ ॥
आणि बाह्यइंद्रियांचें धांडें । पीटुनि विधिचेनि दंडें ।
नेंदिजे अधर्मा कडे । कहीं चि जाऊं ॥ ३२ ॥
तो पैं गा शमा विरजा । दमगुणु जेथ दूजा ।
आणी स्वधर्मांचिया वोजा । जीणें जें कां ॥ ३३ ॥
तेवि चि सटिवियेचिये राती । न विसंभिजे जेवि वाती ।
तैसा ईश्वरनिर्णयो चित्तीं । वाहाणे जें गा ॥ ३४ ॥
तेया नावं तप । हें तीजेया गुणाचें रूप ।
आणि शौच ही निष्पाप । द्विविध जेथ ॥ ३५ ॥

मन भावशुद्धी भरलें । आंग क्रिया आलंकरलें ।
ऐसें सबाह्य जियालें । साजिरें जें कां ॥ ३६ ॥
तेया नांवं शौच पार्था । तो कर्मी गुणु चौथा ।
आणि पृथ्वीचेया परी सर्वथा । सर्व जें साहाणें ॥ ३७ ॥
ते गा क्षमा पांडवा । गुणु जेथ पांचवां ।
स्वरां माझि सोहावा । पंचमु जैसा ॥ ३८ ॥
आणि वांकुडेनि वोघेंसिं । गंगा हे उजू चि जैसी ।
कां पुटीं वळलां उंसीं । गोडी जेवि ॥ ३९ ॥
तैसा विषमा हिं जीवां । लागि उजुकारु होआवा ।
तें आर्जव गा सावां । तेथिचा गुणु ॥ ८४० ॥
आणि पाणियें प्रयत्नें माळी । अखंड जचे झाडां मुळीं ।
परि तें आववें चि फळीं । जाणे जेवि ॥ ४१ ॥
तैसें शास्त्राधारें तेणें । ईश्वरू चि एकु पावणें ।
हें फुडें जें कां जाणणें । तें एथ ज्ञान ॥ ४२ ॥
ते गा कर्मी जिये । सातवां गुणु होये ।
आणि विज्ञान हें पाहे । एवंरूप ॥ ४३ ॥
तरि सत्वशुद्धिचिये वेळे । शास्त्रें कां ध्यानबळें ।
ईश्वरतत्वीं चि मिळे । निष्टंकबुद्धी ॥ ४४ ॥
हें विज्ञान बरवें । तें गुणें जें आठवें ।
आणि आस्तिक्य जाणावें । नववा गुणु ॥ ४५ ॥
पैं राजमुद्रा आथिलेया । प्रजा भजे भलेतेया ।
तेवि शास्त्रें स्वीकारिलेयां । मार्गमात्रातें ॥ ४६ ॥
आदरें कां वर्त्तणें । तें आस्तिकत्व मी ह्मणें ।
तो नववा गुणु जेणें । कर्म साच ॥ ४७ ॥
एवं नवै शमादिक । गुण जेथ निर्दोख ।
तें कर्म जाण स्वाभाविक । ब्राह्मणाचें ॥ ४८ ॥

तो नवगुणरत्नाकरु । ययां नवां रत्नांचा हारु ।
न फेडित ले दिनकरु । प्रकाशु जैसा ॥ ४९ ॥
नाना चांपाचां पौलीं पूजिला । चंद्रु चंद्रिका धवलिला ।
कां चंदनु निजें चर्चिला । सौरभ्यें जेवि ॥ ८५० ॥
तेवि नव गुण टिकलग । लेणें ब्राह्मणाचें हें अव्यंग ।
कहीं चि न संडी आंग । ब्राह्मणाचें ॥ ५१ ॥

**शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनं ॥**
**दानमीश्वरभावश्च क्षात्रं कर्म स्वभावजं ॥ ४३ ॥**

आतां उचित जें क्षत्रियां । तें हिं कर्म धनंजया ।
सांघों आइक प्रज्ञेचिया । भरोवरी ॥ ५२ ॥
तरि हा भानु तेजें । नापेक्षी जेवि विरजें ।
कां सिंहें न पाहिजे । जावलिया ॥ ५३ ॥
ऐसा स्वयंभु जो जीव लाटु । सावायें विण उद्भटु ।
तो शौर्य गा श्रेष्ठु । पहिला गुणु ॥ ५४ ॥
आणि सूर्याचेनि प्रतापें । कोडि ही नक्षत्रें हारपे ।
ना तो तन्हीं न लोपे । सचंद्रीं तिहीं ॥ ५५ ॥
तैसा आपुलेनि प्रौढ गुणें । जगासि विस्मयो देणें ।
आपण तरि न क्षोभणें । काइसेनि हीं ॥ ५६ ॥
तें प्रागल्भ्य रूप तेजा । जिये कामें गुणु दूजा ।
आणि धीरु तो तीजा । तेथिचा गुणु ॥ ५७ ॥
वरिपडिलेयां आकाश । बुद्धिचे डोले मानस ।
झांकी ना तें साहस । धैर्य जेथ ॥ ५८ ॥
आणि पाणी होये भलेतेतुकें । पारे तें जीणौनि पद्म फांके ।
कां आकाश ऊंचिया जींके । आवडेतेया ॥ ५९ ॥
तेवि विविधा अवस्था । पातलिया जीणौनि पार्था ।
प्रज्ञाफलतेया अर्था । वेझ देणें जें ॥ ८६० ॥

तें दक्षत्व गा चोख । जेथ चौथा गुणु देख ।
आणि जूझ अलौकीक । पांचवां गुणु ॥ ६१ ॥
आदित्याचिं झाडें । ठाकति रविबिंबा कडे । सदा सन्मुख सूर्याकडे
तेवि समोर शत्रू पुढें । होणें जें कां ॥ ६२ ॥
माहेवणी प्रयत्नेंसिं । चुकविजे सेजे जैसी ।
रिपू पाठि नेंदिजे तैसी । रणांगणीं ॥ ६३ ॥
हा क्षत्रियांचां आचारीं । पांचवां गुणेंद्रु अवधारीं ।
चौं हीं पुरुषार्थां शिरीं । भगाति जैसी ॥ ६४ ॥
आणि जालेनि फुलें फलें । शाखिये जैसे मोकले ।
कां उदार परिमलें । पद्माकर ॥ ६५ ॥
नाना आवडिचेनि मापें । चांदिणें भलेतेणें घेपे ।
पुढिलाचेनि संकल्पें । तैसें जें देणें ॥ ६६ ॥
तें उमप गा दान । जेथ सावें गुणरत्न ।
आणि आज्ञे एकायतन । होये जेणें कां ॥ ६७ ॥
पोखुनि अवेव आपुले । करविजति मानविलें ।
तेवि पालणें लोभविलें । जग जें भोगी ॥ ६८ ॥
तेया नावं ईश्वरभावो । जो सर्व सामग्रियेचा ठावो ।
तो गुणा माझि राऊ । सातवां जेथ ॥ ६९ ॥
ऐसे जे शौर्यादिकीं । इहिं सातवां गुणिं विशेषिं ।
अलंकृत सप्तऋषीं । आकाश जैसें ॥ ८७० ॥
तैसें सप्तगुणिं विचित्र । कर्म जें जगीं पवित्र ।
तें साहाजें जाण क्षात्र । क्षत्रियांचें ॥ ७१ ॥
नाना क्षत्री नव्हे नरु । तो सत्वसोनेयांचा चि मेरु ।
म्हणौनि गुणस्वर्गा आधारु । सातां इयां ॥ ७२ ॥
नाना सप्तगुणार्णविं । परिवारली बरवी ।
हे क्रिया नव्हे पृथिवी । भोगीतसे तो ॥ ७३ ॥

कां गुणां सातें वोवीं । हे क्रिया ते गंगा जगीं ।
तेया महोदधीचां आंगीं । विलसत जैसी ॥ ७४ ॥
हे परी बहुवस देख । शौर्यादिगुणात्मक ।
कर्म गा नैसर्गिक । क्षत्रियजातीसि ॥ ७५ ॥

**कृषिगोरक्ष्यवाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजं ॥**
**परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्यापि स्वभावजं ॥ ४४ ॥**

आतां वैश्याचिये जाती । उचित जें महामती ।
तें आइक निरुती । क्रिया सांघों ॥ ७६ ॥
तरि भूमि बीज नांगरु । या भांडवलाचा आधारु ।
घेउनि लाभु अपारु । मेलवणें जें ॥ ७७ ॥
किंबहुना कृषि जीणें । गोधनें राखौनि वर्त्तणें ।
कां सवंगाची वीकणें । महर्गिं वस्तु ॥ ७८ ॥
आणि वैश्यक्षत्रियब्राह्मण । हे द्विजन्मे तीन्ही वर्ण ।
यांचें जें सुश्रूषण । तें शूद्रकर्म ॥ ७९ ॥
पैं द्विजसेवे परौतें । धावणें नाहिं शूद्रातें ।
एवं चतुर्वर्णांचिं उचितें । दाविलिं कर्मे ॥ ८८० ॥

**स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः ॥**
**स्वकर्मनिरतः सिद्धिं यथा विंदति तच्छृणु ॥ ४५ ॥**

आतां यें चि गा विचक्षणा । वेगलालेया वर्णा ।
उचित जैसें करणां । शद्वादिक ॥ ८१ ॥
नातरि जलदच्युता । पाणियां उचित सरिता ।
सरितेसि पांडुसुता । सिंधु उचितु ॥ ८२ ॥
तैसें वर्णाश्रमवशें । जें करणें आलें असे ।
गोरेया आंगा जैसें । गोरेपण ॥ ८३ ॥
तेया स्वभावविहिता कर्मा । शास्त्राचेनि मुखें वीरोत्तमां ।
प्रवर्त्तावेया लागि प्रेमा । अढल कीजे ॥ ८४ ॥

पैं आपुलें चि रत्न थीतें । वेपे पारखियाचेनि हातें ।
तैसें स्वकर्म आपैतें । शास्त्रें करावें ॥ ८५ ॥
जैसी दीठि असे आपुलां ठांइं । परि दीपें विण भोगु नाहिं ।
मार्गु न ल्हांतां काहि पाइं । असतां होए ॥ ८६ ॥
ह्मणौनि जातिवशें साचारु । सहजु असे जो अधिकारु ।
तो आपुलां शास्त्रिं गोचरु । आपणपेयां कीजे ॥ ८७ ॥
मग घरिचा चि ठेवा । आणि डोलां दावी दीवा ।
तरि काइ घेतां पांडवा । आलसु असे ॥ ८८ ॥
तैसें स्वभावें भागा आलें । वरि शास्त्रें खरें केलें ।
तें विहित जो आपुलें । आचरे गा ॥ ८९ ॥
परि आलसु सांडौनि । फलकामु दवडौनि ।
आंगें जीवें मोडौनि । तेथ चि भरु ॥ ९० ॥
वोघीं पडिलेयां पाणीं । नेगें आनानीं वाहाणीं ।
तैसा जिये आचरणीं । व्यवस्थौनि ॥ ९१ ॥
अर्जुना जें इया परीं । तें विहित कर्म करी ।
तो मोक्षाचां ऐली द्वारीं । पैठा होए ॥ ९२ ॥
जें अकरणां आणि निषिद्धा । न वचे चि काहीं संबंधा ।
ह्मणौनि भावा विरुद्धा । मूकला तो ॥ ९३ ॥
आणि काम्यकर्मा कडे । न परते चि तेकडे ।
तेथ चंदनाचे खोडे । न ले चि तो ॥ ९४ ॥
येर नित्य कर्म तवं । फलत्यागें वेचलें सर्व ।
ह्मणौनि मोक्षाची सीवं । टाकूं लाहे ॥ ९५ ॥
ऐसेनि शुभाशुभीं संसारीं । सांडिला तो अवधारीं ।
वैराग्यमोक्षद्वारीं । उभा ठाके ॥ ९६ ॥
जे सकलभाग्याची सीमां । मोक्षलाभाची प्रमां । परभा
नाना कर्ममार्गश्रमा । सेवटु जेथ ॥ ९७ ॥

मोक्षफळें दीधली वोल । जें सुकृततरूचें फूल ।
तिये वैरागीं ठेवी पाउल । भवरु जैसा ॥ ९८ ॥
पैं आत्मज्ञानसुदिनांचा । वाधावा सांघेतेया अरुणाचा ।
उदो तेया वैराग्याचा । ठावो पावे ॥ ९९ ॥
किंबहुना आत्मज्ञान । जेणें हाता ए निधान ।
तें वैराग्य दिव्यांजन । जीवें ले तो ॥ ९०० ॥
ऐसी मोक्षाची योग्यता । सिद्धी जाये पांडुसुता ।
अनुसरौनि विहिता । कर्मा येया ॥ १ ॥
विहित कर्म पांडवा । आपुला अनन्यु वोलवावा । स्वा
आणि हे चि प्रेमसेवा । सर्वात्मकाची ॥ २ ॥
पैं आघवां चि भोगेंसिं । पतिव्रता क्रीडे प्रियेंसिं ।
किं तेया चि नावं जैसीं । तपें तिया केलीं ॥ ३ ॥
कां बाळका एकि माए । वांचौनि जीणें काइ आहे ।
ह्मणौनि सेवा कीं तो होए । पाटाचा धर्मु ॥ ४ ॥
नाना पाणी ह्मणौनि मासा । गंगा न संडीतु जैसा ।
सर्वतीर्थसंवासा । वरिपडा जाला ॥ ५ ॥
तैसा आपुलिया विहिता । उपाऊ असे न विसंबता ।
ऐसा कीजे किं जगन्नाथा । आभारु पडे ॥ ६ ॥
आगा जेया जें विहित । तें ईश्वराचें मनोगत ।
ह्मणौनि केलेया निभ्रांत । परितोखु पावे ॥ ७ ॥
पैं जीवाचां कसीं उतरली । ते दासि किं गोसांविणि जाली ।
तैसी सेवेची तेयां माउली । विहित जेवि ॥ ८ ॥
तैसें ते स्वामिचेया मनोभावा । न चूकिजे हे चि सेवा ।
एरिं ते पांडवा । वणिज करणें ॥ ९ ॥

यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततं ॥
स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विंदति मानवः ॥ ४६ ॥

ह्मणौनि विहितक्रिया केली । नव्हे तेयाची खूण पालिली ।
जेया पासौनि कां आलीं । आकार भूतें ॥ ९१० ॥
जो अविद्येचिया चिंधिया । गुंडाळूनि जीव बाउलिया ।
खेळवीतसे गुणियां । अहंकाररज्जु ॥ ११ ॥
जेणें जग हें समस्त । आंतु बाहिरि भरित ।
जालें आहे दीपजात । तेजें जैसें ॥ १२ ॥
तेया सर्वात्मका ईश्वरा । स्वकर्मकुसुमाची वीरा ।
पूजा केली होये अपारा । तोखा लागि ॥ १३ ॥
ह्मणौनि तिये पूजे । रिझलेनि आत्मराजें ।
वैराग्यसिद्धि दीजे । पसाया तेया ॥ १४ ॥
जैं वैराग्यदशे । ईश्वराचेनि वेधवसें ।
हें सर्व ही नावडे जैसें । वांत होणें ॥ १५ ॥
प्राणनाथाचिये आधी । विरहिणीतें जीणें बाधी ।
तैसें सुखजात त्रिशुद्धी । दुःखा चि लागि ॥ १६ ॥
सम्यग्ज्ञाना उदैजतां । वेधें चि तन्मयता ।
उपजे ऐसी योग्यता । बोधाची लाहे ॥ १७ ॥
ह्मणौनि मोक्षलाभा लागि । जो व्रतें व्हांतसे आंगीं ।
तेणें स्वधर्मु चांगीं । अधिष्ठावा ॥ १८ ॥

**श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनिष्ठितात् ॥**
**स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषं ॥ ४७ ॥**

आगा आपुला हा स्वधर्मु । आचरणें जऱ्हीं विषमु ।
तऱ्हीं पाहावा तो परिणामु । फलैल जेणें ॥ १९ ॥
जैं सुखा लागि आपणपेयां । निंब चि आथि धनंजया ।
तें कडुवटपण तेया । भोगिजे ना ॥ ९२० ॥
फळणेयां ऐली कडे । केळि तें पाहांतां आशा मोडे ।
ऐसें त्यजिलें तरि जोडे । तैसें कें गोमटें ॥ २१ ॥

तेवि स्वधर्मु सांकडु । देखौनि केला जरि कीडु ।
तरि मोक्षसुखाडु । अंतरला ॥ २२ ॥
आणि आपुली माए । कुब्ज जऱ्हीं आहे ।
तऱ्हीं जीणें जीजे तें नोहे । स्नेह कुऱ्हें कीं ॥ २३ ॥
एरी जिया पराविया । रंभेहुनि बरविया ।
तिया काइ कराविया । बालकें तेणें ॥ २४ ॥
आगा पाणियांहूनि बौहें । तूपीं गुणु कीर आहे ।
परि मीनां काइ होए । असणें तेथ ॥ २५ ॥
पैं आघवियां जगीं जें विष । तें कीडेयाचें पीयूष ।
आणि जगा गूळ देख । तेथ मरण तेया ॥ २६ ॥
ह्मणौनि विहित जें जेया जीणें । फीटे संसाराचें धरणें ।
क्रिया कठोर तऱ्हीं तेणें । तें चि करावें ॥ २७ ॥
परि एरा पराचारा बरविया । ऐसें होईल टेंकलेयां ।
पायांचें चालणें डोया । केलें जैसें ॥ २८ ॥ जेथ
यया लागि कर्म आपुलें । जें जातिस्वभावेंसि आलें ।
तें करी तेणें जींतलें । कर्मबंधातें ॥ २९ ॥

**सहजं कर्म कौंतेय सदोषमपि न त्यजेत् ॥**
**सर्वारंभा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः ॥ ४८ ॥**

आणि स्वधर्मू चि पाळावा । परधर्मु तो गाळावा ।
हा नियमु हीं पांडवा । न कीजे चि पां ॥ ३० ॥
तऱ्हीं आत्मा दृष्ट नोहे । तवं कर्म करणें कां ठाए ।
आणि करणें तेथ आहे । आयासु आधीं ॥ ३१ ॥
ह्मणौनि भलेतिये कर्मीं । आयासु जरि उपक्रमीं ।
तरि काइ स्वधर्मीं । दोषु सांघें ॥ ३२ ॥
अगा उजू वाटा चालावें । तऱ्हीं पाये चि सीणवावे ।
ना आडरानें धावांवें । तऱ्हीं तें चि ॥ ३३ ॥

पैं शिला कां सिधोरिया । दाटणें एक धनंजया ।
परि जें वाहातां विसावेया । मिळैल तें वेपे ॥ ३४ ॥
यन्हवि कणा भूसा । कांडितां हिं सोसु सरिसा ।
जें चि रांधणें माणुसा । तें चि हवि ॥ ३५ ॥
परि धर्मपत्नी कां धांगडि । पोसितां जरि एकि वोढि ।
तरि कां अपखडि । आणावी आंगां ॥ ३६ ॥
दधिजळाचेया गुसळणां । व्यापार सारिखा विचक्षणां ।
वाळुवे तिळां घाणा । गाळणें एक ॥ ३७ ॥
आगा पाठीं लागतां घाइं । मरण न चुके चि पाहीं ।
तरि समोरिलां काइं । आगळें कीजे ॥ ३८ ॥
कुळस्त्री दांडेयांचे घाए । निगाली ही जारि साहे ।
तरि स्वपतितें वायें । सांडिलें कीं ॥ ३९ ॥
तैसें आवडतें हिं करणें । न निफजे सीणलेयां हिं उणें ।
तरि विहित बा कोणें । बोलें भारी ॥ ९४० ॥
वरि थोडें चि अमृत घेतां । सर्वस्व वेचो कां पांडुसुता ।
जेणें जोडे जीविता । अक्षयत्व ॥ ४१ ॥
एर काह्या मोलें पुरुनु । विष पियावें घेउनु ।
आत्महत्यासीं निमौनु । जाइजे जेणें ॥ ४२ ॥
तैसिं ज़ाचूनियां इंद्रियें । वेचौनियां आयुष्याचेनि दियें ।
सांचिलीं पापियें आन आहे । दुःख वांचौनि ॥ ४३ ॥
ह्मणौनि करावा चि स्वधर्मु । जो करितां हीरौनि श्रमु ।
उचित देईल परमु । पुरुषार्थराजु ॥ ४४ ॥
या कारणें किरीटी । स्वधर्माची राहाटी ।
न विसंबिजे संकटीं । सिद्धमंत्रु जैसा ॥ ४५ ॥
कां नावेसि जैसें उदधी । महारोगीं दिव्योषधी ।
न विसंभिजे तेया बुद्धी । स्वकर्म एथ ॥ ४६ ॥

असक्तबुद्धिः सर्वत्र जितात्मा विगतस्पृहः ।
नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति ॥ ४९ ॥

मग इया चि गा कपिध्वजा । स्वकर्मांचिया महापूजा ।
तोखला ईशु तमरजां । झाडि करुनि ॥ ४७ ॥
सुधासत्वाचिया वाटा । आणि आपुली उत्कंठा ।
भवस्वर्गा कालकूटा । ऐसें दावी ॥ ४८ ॥
जियें वैराग्य एणें बोलें । मागां संसिद्धी रूप केलें ।
किंबहुना तें आपुलें । मेलवी खागें ॥ ४९ ॥
मग जींतलेयां हें भोए । पुरुषु सर्वत्र जैसा आहे ।
कां जाला ही जें लाहे । तें आतां सांघों ॥ ९९० ॥
तरि दाहीक हें संसारें । सबै मांडिलेंसे जे गुंपिरें ।
तेथ नांतुडे वागुरें । वारा जैसा ॥ ९१ ॥
पैं परिपाकाचिये वेले । फल देंटें ना देंटु फलें ।
तैसें स्नेह खुलें । सर्वत्र होए ॥ ९२ ॥
पुत्रवित्तकलत्र । हें जालेयां हिं स्वतंत्र ।
माझें न ह्मणे पात्र । विष चि जैसें ॥ ९३ ॥
ऐसा हे विषयजातीं । बुद्धि पोलिली जैसी माघुती ।
पाउलें घेंति एकांतीं । हृदइं चि रिगे ॥ ९४ ॥
ऐसेया अंतष्करण । बाहियें येंतां तेयाची आण ।
न मोडी समर्थी भेण । दासि जैसी ॥ ९५ ॥
तैसी ऐक्याचिये मुठी । माझिवडें चित्त किरीटी ।
करूनि वेंधी निहटी । आत्मेयाचां ॥ ९६ ॥
तेथवां दृष्टादृष्टस्पृहे । निमांतें जालें चि आहे ।
आगि दडपिलेयां धूंवें । न्हाइजे काइ ॥ ९७ ॥
ह्मणौनि निर्मलें मानासिं । स्पृहा नाशौनि जाये आपैसी ।
किंबहुना तो ऐसी । भूमिका पावे ॥ ९८ ॥

पैं अन्यथाबोधु आघवा । मावळौनि तेया पांडवा ।
बोधमात्रीं चि जीवा । ठावो होए ॥ ९९ ॥
धारवणी वेचें सरे । तैसें भोगें प्राचीन पुरे ।
नवे तवं नुपकरे । काहिं चि करुं ॥ ६६० ॥
तैसी कर्मसाम्यदशा । होये तेथ वीरेशा ।
श्रीगुरु आपैसा । भेटे चि गा ॥ ६१ ॥
रातिची चौपाहारी । वेचलेयां अवधारीं ।
डोळेयां तमोरी । मिळे जैसा ॥ ६२ ॥
कां एउनु फळाचा घडु । पारुखवी केळिचा वाढु
गुरु भेटौनि करी पाडु । मुमुक्षा तैसा ॥ ६३ ॥
मग आलंगिला पूर्णिमां । उणीव सांडी चंद्रमा ।
तैसें होये वीरोत्तमा । गुरुकृपा तेया ॥ ६४ ॥
तेधवां अबोध मात्र असे । तें तवं तेया कृपा नासे ।
तेथ रात्रीसवें जाये आपैसें । आंधारें जैसें ॥ ६५ ॥
तैसें अबोधनासा सवें । नासे क्रियाजात आघवें ।
ऐसा समूळु संभवे । संन्यासु हा ॥ ६६ ॥
एणें समूळज्ञानसंन्यासें । दृश्याचा ठाउ जेथ पूसे ।
तेथ बुझावें तें आपैसें । तो चि आहे ॥ ६७ ॥
चेइलेयां वरि पाहिं । स्वप्निचां तिये डोहीं ।
आपणेयांतें काई । काढूं जाइजे ॥ ६८ ॥
तें मीं नेगें आतां जाणैन । हें सरलें तेया स्वप्न ।
जाला ज्ञातृज्ञेया विहीन । चिदाकाश जो ॥ ६९ ॥
मुखाभासें आरिसा । परौता नेलेयां वीरेषा ।
पांतेपणें विण जैसा । पांत ठाके ॥ ९७० ॥
तैसें नेणणें जें गेलें । तेणें जाणणें हीं नेलें ।
मग निष्क्रिय उरलें । चिन्मात्र चि ॥ ७१ ॥

तेथ स्वभावें धनंजया । नाहिं कोण्हीं चि क्रिया ।
ह्मणौनि प्रवादु तेया । निष्कर्म्य ऐसा ॥ ७२ ॥
तें आपुलें आपणपें । असतू चि होउनि आरोपे ।
तरंगु कां वायुलोपें । समुद्रु जैसा ॥ ७३ ॥
तैसें न होणें निफजे । नैष्कर्म्यसिद्धि ह्मणिजे ।
सर्वा हीं सिद्धी साहाजें । प्रेम हें चि ॥ ७४ ॥
देउळिचिया कामा कळशु । परमु गंगे सिंधुप्रवेशु ।
कां सुवर्णशुद्धी कसु । सोळांवां जैसा ॥ ७५ ॥
तैसें आपुलें नेणणें । फेडिजे कां जाणणें ।
तें हिं गीळुनि जें असणें । ऐसी जे दशा ॥ ७६ ॥
तिये परौतें काहिं । निफजणें एथ नाहिं ।
ह्मणौनि ह्मणिपे पाहीं । परमसिद्धि ते ॥ ७७ ॥

**सिद्धि प्राप्तो यथा ब्रह्म तथाप्नोति निबोध मे ॥**
**समासेनैव कौंतेय निष्ठा ज्ञानस्य या परा ॥ ५० ॥**

परि हे चि आत्मसिद्धि । जो कोणु भाग्यनिधि ।
श्रीगुरुकृपालब्धीं । कालिं पात्रे ॥ ७८ ॥
उदैजतां दिनकरु । प्रकाशु आतें आंधारु ।
कां दीपा संगें दीपाकारु । होये तंतु ॥ ७९ ॥
ते लवणांची कणिका । मिळत खेऊं उदका ।
उदक चि होउनि देखां । ठाके जेवि ॥ ९८० ॥
कां निद्रितु चेवविलेयां । स्वप्नेंसीं नीदें वायां ।
जाउनि आपणपेयां । मिळे जैसा ॥ ८१ ॥
तैसिं जियां कोण्हाचीं दैवें । गुरुवाक्यश्रवणां चि सवें ।
द्वैत गीळुनि विसंवे । आपणपेयां वृत्ति ॥ ८२ ॥
तेयासि मग करणें । हें बोलिजैल चि कवणें ॥
आकाशा एणें जाणें । होये काइ ॥ ८३ ॥

म्हणौनि तेयासि काहिं । त्रिशुद्धी करणें नाहि
परि ऐसें हें जरि काहिं । नोहे जेया ॥ ८४ ॥
कानावचनाचिये भेटी । सरिसा चि पैं किरिटी ।
वस्तु होउनि उठी । कव्हणी एकु जो ॥ ८५ ॥
यन्हविं स्वकर्माचिया वन्ही । काम्यनिषेधाचां इंधनीं ।
रजतमें किर दोन्हीं । जाळिलीं आधीं ॥ ८६ ॥
पुत्र वित्त परलोकु । यया तिहींचा अभिलाखु ।
घरीं होये पाइकु । हें इं जालें ॥ ८७ ॥
इंद्रियें सदा पदार्थी । रिगतां विटाळलीं होंतीं ।
तियें प्रत्याहारतीर्थी । नाहाणिलिं कीर ॥ ८८ ॥
आणि स्वधर्माचें फळ । ईश्वरीं अर्पौनि केवळ ।
घेउनि केलें अढळ । वैराग्यपद ॥ ८९ ॥
ऐसी आत्मसाक्षात्कारीं । लाभे ज्ञानाची उजिरी ।
ते सामग्री किर पुरी । मेळविली ॥ ९९० ॥
आणि तिये चि समइं । सद्गुरु भेटले पाहीं ।
तेविं चि तिहीं । राहिजे ना ॥ ९१ ॥
परि औषध घेत खेउ । काइ लाभे आपुला थाउ ।
किं उदैजतां चि दीउ । मध्यान होए ॥ ९२ ॥
सुक्षेत्रि आणि वोलटें । बिं पेरिलें गोमटें ।
परि अलोट फळ भेटे । परि वेळे पैं गा ॥ ९३ ॥
जोडला मार्गु प्रांजळु । मीनला सुसंगाचा मेळु ।
तरि पाविजे वांचौनि वेळु । लागे चि किं ॥ ९४ ॥
तैसा वैराग्यलाभु जाला । वरि सद्गुरु भेटला ।
जीवा अंकुरु फूटला । विवेकाचा ॥ ९५ ॥
तेणें ब्रह्म एक आथि । एर आघवी चि भ्रांति ।
हे हीं किर प्रतीति । गाढी केली ॥ ९६ ॥

परि तें चि जें परब्रह्म । सर्वात्म सर्वोत्तम ॥
मोक्षाचें हीं काम । सरे जेथ ॥ ९७ ॥
इया तीन्हीं अवस्था पोटीं । जिरविजें कां किरीटी ।
तेया ज्ञानासि ही मीठी । दे जे वस्तु ॥ ९८ ॥
ऐक्याचें ऐक्यपण सरे । जेथ अद्वयकणु हीं विरे ।
काहिं चि नुरौनि उरे । जें कां हिं गा ॥ ९९ ॥
तिये ब्रह्मीं एकपणें । ब्रह्म चि होउनि असणें ।
तें काम चि वाहनि तेणें । पाविजे पैं ॥ १००० ॥
भूकैलेया पासीं । ओगरिलें षड्रसीं ।
तो तृप्ति ग्रासीं । लाहे जेवि ॥ १ ॥
तैसा वैराग्याचा ओलावा । विचाराचा तो दिवा ।
आंबुथितां आत्मठेवा । काढी चि तो ॥ २ ॥
तरि भोगिजे आत्मरिद्धि । यवडी योग्यतेची सिद्धि ।
जेया आंगिं निरवधी । लेणें जाली ॥ ३ ॥
तो जेणें क्रमें ब्रह्म । होणें करी कां सुगम ।
तेया क्रमाचें आतां वर्म । आइक सांघों ॥ ४ ॥

**बुध्या विशुद्धया युक्तो धृत्यात्मानं नियम्य च ।**
**शब्दादीन्विषयांस्त्यक्त्वा रागद्वेषौ व्युदस्य च ॥ ५१ ॥**

तरि गुरु दाविलेया वाटा । एउनि विवेकतीर्थतटा ।
धूनियां मलकटा । बुद्धिचा तेणें ॥ ५ ॥
मग राहूनि उगलिली । प्रभा चंद्रें आलिंगिली ।
तैसी शुद्धी ते जडली । आपणपां बुद्धि ॥ ६ ॥
सांडौनि कुळें दोन्हीं । क्रिया अनुसरे कामिनी ।
द्वंद्वत्यागें स्वचिंतनीं । पडिली तैसी ॥ ७ ॥
आणि ज्ञान ऐसें जिव्हार । नेवों नेंति निरंतर ।
इंद्रियें पीकेलें थोर । शद्बादिक जें ॥ ८ ॥

तें रश्मिजाल काढिलेयां । मृगजळ जाये लया ।
तैसें धृतिरोखें तेया । पांचां हिं केलें ॥ ९ ॥
नेणतां अधमाचें अन्न । खादलेयां कीजे वमन ।
तैसीं वोकविलीं सवासन । इंद्रियें विषयीं ॥ १०१० ॥
मग प्रत्यक्प्रवृत्ति चोखटे । गंगेचेनि लाविलीं तटें ।
ऐसी प्रायश्चित्तें धोवटें । केलीं एणें ॥ ११ ॥
पाठिं सात्विकें धीरें तेणें । शोधारिलीं तियें करणें ।
मनेंसिं योगधारणें । मेळविलीं ॥ १२ ॥
तेविं चि प्राचीन इष्टानिष्टें । भोगेंसिं येउनि भेटे ।
तेथ देखिलेयां हिं वोखटें । द्वेषु न करी ॥ १३ ॥
ना गोमटें चि विपायें । तें आणूनि पुढां सुये ।
तरि तेया लागि नोहे । साभिलाखु ॥ १४ ॥

**विविक्तसेवी लघ्वाशी यतवाक्कायमानसः ॥**
**ध्यानयोगपरो नित्यं वैराग्यं समुपाश्रितः ॥ ५२ ॥**

इया परीं इष्टानिष्टीं । रागद्वेष किरीटी ।
त्यजूनि गिरिकपाटीं । निकुंजीं वसे ॥ १५ ॥
गजबज सांडिलिया । वसत्री वनस्थलिया ।
आंगाचिया मांदिया । एकलिया ॥ १६ ॥
शमदमादिकिं खेळे । न बोलणेंनि चावळे ।
गुरुवाक्याचेनि मेळें । नेणे वेळु ॥ १७ ॥
आणि आंगा बळ यावें । नातरि क्षुधा जावें ।
कां जीभेचे पुरवावे । मनोरथ ॥ १८ ॥
भोजन करितां विषीं । यां तिहींतें हीं न लेखी ।
आहारीं मीति संतोषीं । माप सुये ॥ १९ ॥
आसनाचेनि पावकें । द्रुरपतां प्राणु पोखे ।
येया चि लागि मोटकें । अशन करी ॥ १०२० ॥

आणि परपुरुषें कामिली । कुळवधू आंग न घली ।
निद्रालस्य न मेकली । आसन तैसें ॥ २१ ॥
दंडवताचेनि प्रसंगें । भुइं हात आंग लागे ।
वांचौनि एर नेघे । राभस्य जेथें ॥ २२ ॥
देहनिर्वाहा पुरतें । राहाटवी हातपायांतें ।
किंबहुना आपैतें । सबाह्य केलें ॥ २३ ॥
आणि मनाचा उंबरा । वृत्तीसि देखों नेदी वीरा ।
तेथ कें वाग्व्यापारा । अवकाशु असे ॥ २४ ॥
ऐसेन देहवाचामानस । हें जीणौनि बाह्य प्रदेश ।
आकोलिलें आकाश । ध्यानाचें तेणें ॥ २५ ॥
गुरुवाक्यें उठिला । बोधाचा निश्चयो आपुला ।
नेंहाळीं हातीं घेतला । आरिसा जैसा ॥ २६ ॥
पैं ध्याता आपणपें चि परी । ध्यानरूपें वृत्ती माझारीं ।
ध्येयत्वें हे अवधारीं । ध्यानरूढि गा ॥ २७ ॥
तेथ ध्यानध्येयध्याता । यां तिहिं एकरूपता ।
होये तवं पांडुसुता । कीजे तें गा ॥ २८ ॥
ह्मणौनि तो मुमुक्षु । आत्मज्ञानीं जाला दक्षु ।
परि पुढां सूनि पक्षु । योगाभ्यासाचा ॥ २९ ॥
अपानरंध्रद्वया । माझारि धनंजया ।
पार्ष्णी पीडूनियां । कांवरूमूळा ॥ १०३० ॥
आकुंचूनु अध । देउनि तीन्हीं बंध ।
करूनि एकवद शुद्ध । वायुभेद ॥ ३१ ॥
कुंडलिणी जागौनि । मध्यमा विकासौनि ।
आधारादि भेदुनि । आज्ञा वेन्हीं ॥ ३२ ॥
सहस्रदलाचा मेघु । पीयूखु वरिखौनि चांगु ।
तो मूळ वेन्हीं ओघु । आणूनियां ॥ ३३ ॥

नाचतेया पुण्यगिरि । चिद्भैरवाचां खापरीं ।
मनपवनाचां खीचु करी । वाढूनियां ॥ ३४ ॥
जालेयां योगाचा गाढा । मेळावा सूनि हा पुढां ।
ध्याना मागिली कडां । स्वयंभ केलें ॥ ३५ ॥
आणि ध्यानयोग दोन्हीं । इयें आत्मतत्वज्ञानीं ।
पैठि होआवेया निर्विघ्नीं । आदीं चि तेणें ॥ ३६ ॥
वीतराग तेया सारिखा । जोडूनि ठेविला सखा ।
तो आघवेया चि भूमिका । सवें चाले ॥ ३७ ॥
पांवें तें दीसे तवं वेन्हीं । दीठितें न संडी दीपु जारि ।
तारि कें असे अवसरी । देखावेया ॥ ३८ ॥
तैसें मोक्षीं प्रवर्त्तलेयां । वृत्ति ब्रह्मीं जाये लया ।
तवं वैराग्य आधि तेया । भंगु कैंचा ॥ ३९ ॥
ह्मणौनि सवैराग्यु । ज्ञानाभ्यासु तो सभाग्यु ।
करूनि जाला योग्यु । आत्मलाभा ॥ १०४० ॥
ऐसी वैराग्याची आंगीं । बाणूनियां वज्रांगी ।
राजयोगुतुरंगीं । आरूढला ॥ ४१ ॥
वरिपडिलें दीठी । सानें थोर ही निवटी ।
ते बली विवेकमूठी । ध्यानांचे खांडे ॥ ४२ ॥
ऐसेनि संसाररणा आंतु । आंधरीं सूर्यु तैसा असे जांतु ।
मोक्षविजयश्रियें वरैतु । होआवेया ॥ ४३ ॥

**अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहं ॥**
**विमुच्य निर्ममः शांतो ब्रह्मभूयाय कल्पते ॥ ५३ ॥**

तेथ आडवैरें चि आले । दोषवैरी जे धोपटिले ।
तेयां माझि पहिलें । देहीं अहंकारु ॥ ४४ ॥
जो न मोकली मारुनि । जित्तों नेंदी उपजौनि ।
विचंबी खोडां घालुनि । हाडाचां इये ॥ ४५ ॥

तेयाचा देह हा थारा । मोडूनि घेतला वीरा ।
आणि बळ हा दुसरा । मारिला वैरी ॥ ४६ ॥
जें विषयांचेनि नावें । चौगुणें हीं परि ठावें ।
जीणें मृतावस्था धांवे । सर्वत्र जगा ॥ ४७ ॥
तो विषयविषिचा थावो । आघवेयां दोषांचा रावो ।
ध्यानखड्गाचा घाऊ । साहील कैंचा ॥ ४८ ॥
आणि प्रियप्राप्ती । करी जेया सुखाची व्यक्ती ।
तेयाची घालूनि बूंथि । आंगीं जो वाजे ॥ ४९ ॥
जो सन्मार्गा भुलवी । मग अधर्माचां अडवीं ।
सूनि वाघां सांपडवीं । नरकादिकां ॥ १०५० ॥
तो विश्वासें मारितां रिपु । निवटूनि घातला दर्पु ।
आणि जेयाचा आहा कंपु । तापसांसि ॥ ५१ ॥
क्रोध ऐसा हा महादोखु । देख पां जेयाचा परिपाकु ।
भरिजे तवं अधिकु । रिता होये जो ॥ ५२ ॥
तो कामु कोण्हीं चि ठांइं । नसे ऐसें केलें पाहीं ।
किं तें चि क्रोधा ही । साहाजें जालें ॥ ५३ ॥
मूळाचें तोडणें जैसें । होये कां शाखा दोसें ।
कामें नासिलेनि नासे । तैसा क्रोधु ॥ ५४ ॥
ह्मणौनि कामु वैरी । जाला जेथ ठाणौरी ।
तेथ सरली वारी । क्रोधाची ही ॥ ५५ ॥
समर्थु आपुला खोडा । सीसें वाहावी जैसा होडा ।
तसा भुंजौनि गाढा । परिग्रहो ॥ ५६ ॥
जो माथा चि पालाणवी । आंगा आवगु घालवी ।
ममत्वाची वेववी । जिये दांडी ॥ ५७ ॥
शिष्यशास्त्रादिविलासें । मठामुद्राचेनि मीसें ।
घातले आहाति पांसें । निसंगा जेणें ५८ ॥

वरि कुटंबपणें सरे । तरि वनीं वनत्वें अवतरे ।
नागिवेया ही शरीरें । लागला आहे ॥ ५९ ॥
ऐसा दुर्जयो परिग्रहो । तेयाचा फेडूनि ठाऊ ।
भवविजयाचा उत्साहो । भोगीतु असे तो ॥ १०६० ॥
तेथ अमानित्वादि आघवे । ज्ञानगुणाचे जे मेळावे ।
ते कैवल्यदेशिचे आघवे । राय जैसे आले ॥ ६१ ॥
नव्हे सम्यग्ज्ञानाचिया । राणिवा उगाणूनि तेया ।
परिवारु होउनियां । राहांति आपण ॥ ६२ ॥
प्रवृत्तीचिये राजवीदी । अवस्थाभेदप्रमदीं ।
कीजतायें प्रतिपदीं । सुखाचें लोण ॥ ६३ ॥
पुढां बोधाचिये कांबि वेन्हीं । विवेकु दस्याची मांदी सारी ।
योगभूमि आरतीकरी । यंति जैसिया ॥ ६४ ॥
तेथ रिद्धीसिद्धीचीं अनेकें । वृंदें मिळतें प्रसंगें ।
तिये पुष्पवर्षी आंगें । नाहांतसे तो ॥ ६५ ॥
ऐसें ब्रह्मैक्या सारिखें । स्वराज्य यंतां जवळिके ।
झळंबित आहे हरिखें । तीन्ही लोक ॥ ६६ ॥
तेधवां वैरी कां मैत्रिया । तेयासि माझें ह्मणावेया ।
सन्माना धनंजया । उरे चि ना ॥ ६७ ॥
हें ना भलेतेणें व्याजें । जो जेयातें ह्मणे माझें ।
तें नोडवे चि मां दूजें । अद्वितीयु जाला ॥ ६८ ॥
पैं आपुलिया ऐकी सत्ता । सर्वें कवळूनि पांडुसुता ।
कहिं न लगती ममता । धाडिली तेणें ॥ ६९ ॥
ऐसा जींतलेयां रिपुवर्गु । आपु मानलेयां हा जगु ।
आपैसेया योगतुरंगु । थीरु जाला ॥ १०७० ॥
वैराग्याचें गाढलें । आंगीं त्राण होतें उभलें ।
तें हिं नावेक ढिलें । केलें तेधवां ॥ ७१ ॥

आणि लोटी ध्यानाचें खांडें । तें दूजें नाहिं पुडें ।
ह्मणौनि हातु आसुडे । वृत्तिचा ही ॥ ७२ ॥
जैसें रसौषध खेरें । आपुलें काज करूनि पुरें ।
आपण हिं उतरे । तैसें होरें ॥ ७३ ॥
देखौनि टाकिता ठावो । धांवतां थिरावे पाउ ।
तैसा ब्रह्मसामीप्यें थांवो । अभ्यासु सांडी ॥ ७४ ॥
वडतां महोदधीसीं । गंगा वेगें सांडिजे जैसी ।
कां कामिनी कांथा पासीं । स्थिर होए ॥ ७५ ॥
नाना फळतिए वेळे । केळिची वाढि मांडुले ।
कां गावां पुढें वाळे । मार्गु जैसा ॥ ७६ ॥
तैसा आत्मसाक्षात्कारु । होइल देखौं गोचरु ।
ऐसा साधनहातियेरु । ठेवु चि ठेवी ॥ ७७ ॥
ह्मणौनि ब्रह्मेंसिं तेया । ऐक्याचा समयो धनंजया ।
होंतसे तैं उपाया । उन्हटु पडिला ॥ ७८ ॥
मग वैराग्याची गोधुलुक । जें ज्ञानअभ्यासाचें वार्द्धक ।
योगफळाची ही परीपाक । दशा जे कां ॥ ७९ ॥
ते शांति पैं गा सुभगा । संपूर्ण ये तयाचिया आंगा ।
तैं ब्रह्म होआवेया जोगा । होये तो पुरुषु ॥ १०८० ॥
पुनिवेहूनि चाउदसी । जेतुलें उणेपण शशी ।
कां सोळें पाडुनि जैसी । पन्हराबी वानी ॥ ८१ ॥
सागरीं हीं पाणि वेगें । लर्थेर तें रूप गंगे ।
येर निश्चळ जें उगें । तें समुद्रु जैसा ॥ ८२ ॥
ब्रह्म आणि ब्रह्मौतेयें । योग्यतें तैसा पाडु आहे ।
तें चि शांतिजेनि लाहे । ठेलें तो गा ॥ ८३ ॥
पैं तें चि होणेन विण । प्रतीती आलें ब्रह्मपण ।
ते ब्रह्म होती जाण । योग्यता एथ ॥ ८४ ॥

ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न कांक्षति ।।
समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते परां ।। ५४ ।।

ते ब्रह्मभावयोग्यता । पुरुषु मग तो पांडुसुता ।
आत्मबोधप्रसन्नता---। पदीं बैसे ।। ८५ ।।
जेणें निफजे रससोए । तो तापु ही जैं जाए ।
तैं ते कां होए । प्रसन्न जैसी ।। ८६ ।।
नाना भरतिया लगबगा । शरत्कालिं सांडिजे गंगा ।
कां गीत राहातां उपांगा । अन्हटु पडे ।। ८७ ।।
तैसा आत्मबोधीं उद्यमु । करितां होये जो श्रमु ।
तो ही जेथ समु । होउनि जाए ।। ८८ ।।
आत्मबोधप्रशस्ती । हे तिये दशेची क्षिति ।
ते भोगितसे महामती । योग्यु तो गा ।। ८९ ।।
तेथवां अप्राप्तें शोचावें । काहिं कामावेया कामावें ।
हें सरलें समभावें । भरतेया तेया ।। १०९० ।।
उदया यंतां गभस्ती । नानानक्षत्रव्यक्ती ।
हारविजति दीप्ती । आंगिका जेवि ।। ९१ ।।
तेवि उठितिया आत्मप्रथा । हे भूतभेदव्यवस्था ।
मोडितमोडितां पार्था । वास पाए तो ।। ९२ ।।
पाटेया वरिलें आखरें । जैसिं पूसतें यंति करें ।
तैसीं हरपति भेदांतरें । तेयाचिया दीठी ।। ९३ ।।
ऐसेनि अन्यथाज्ञानें । जियें घेपति जागरस्वप्नें ।
तियें दोन्हीं केलीं लीनें । अव्यक्ता माझि ।। ९४ ।।
मग तें हिं अव्यक्त । बोधु वाढतां झिजत ।
पूर्णबोधीं समस्त । बुडौनि जाए ।। ९५ ।।
नाना चालिचिया वाढी । वाट होंत थोडी ।
पातलां ठांइं बुडी । देउनि रिगे ।। ९६ ।।

जैसी भोजनव्यापारीं । क्षुधा जिरत अवधारीं ।
तृप्तिचां अवसरीं । नाहिं होए ॥ ९७ ॥
कां जागृति जवं उद्दीपे । तवं तवं नीद हारपे ।
मग जागिनलेयां स्वरूपें । नसे चि गा ॥ ९८ ॥
हें ना आपुलें पूर्णत्व भेटे । जेथ चंद्रासि वाढि कुंठे ।
तेथ शुक्लपक्षु आटे । निशेषु जैसा ॥ ९९ ॥
तैसें बोध्यजात गीळितु । बोध बोधें ये मज आंतु ।
मिसळला तेथ सांघातु । अबोधु गेला ॥ ११०० ॥
तेधवां कल्पांतिचिये वेळे । नदी सिंधुचे पेंडवळे ।
मोडौनि भरे जळें । आब्रह्म जैसें ॥ १ ॥
नाना गेलेयां घटमठ । आकाश ठाके एकवट ।
कां जळौनि काष्टें काष्ट । वन्ही चि होए ॥ २ ॥
नातरि लेणेयांचे ठसे । आटौनि गेलेयां मूसे ।
नामरूपभेदें तैसें । सांडिलें सोनें ॥ ३ ॥
हें हीं असो चेइलेयां । तें स्वप्न नाहिं जालेयां ।
आपण चि कां आपणेयां । उरिजे जैसें ॥ ४ ॥
तैसा मी एकु वांचौनि काहिं । तेया तेया ही सकट नाहिं ।
हे चौथी भक्ति पाहीं । माझी तो लाहे ॥ ५ ॥

**भक्त्या मामभिजानाति यावान्यश्चास्मि तत्वतः ॥**
**ततो मां तत्वतो ज्ञात्वा विशते तदनंतरं ॥ ५५ ॥**

येर आर्त्त जिज्ञासु अर्थी । हे भक्ति जिहीं पंथीं ।
ते तीन्ही पावौनि चौथी । ह्मणत आहों ॥ ६ ॥
यऱ्हवि तीजी नां चौथी । हे पहिली नां सरती ।
पैं माझी सहजस्थिति । भक्ति नावं ॥ ७ ॥
जें नेणतें माझें प्रकाशूनि । अन्यथात्वें मातें दाउनि ।
सर्व ही सर्वीं भजौनि । बुझावितसे ॥ ८ ॥

जो जेथ जैसें पाऊं वैसे । तिया तेथ तैसें चि असे ।
हें उजिवडें कां दीसे । अखंडें जेणें ॥ ९ ॥
स्वप्निचें दीसणें न दिसणें । जैसें आपुलेनि अखिलेपणें ।
विश्वाचें आहे नाहीं जेणें । प्रकाशे जैसें ॥ ११९० ॥
ऐसा सहजु माझा । प्रकाशु जो कपिध्वजा ।
तो भक्ति या उज्जा । बोलिजे गा ॥ ११ ॥
ह्मणौनि आर्त्तांचां ठांइं । हे आर्त्ति होउनि पाहीं ।
अपेक्षणीय जें कांहिं । तें मीं केलां ॥ १२ ॥
जिज्ञासु पुढां वीरेषा । हे चि होउनि जिज्ञासा ।
मी जिज्ञासु ऐसा । दाखविला ॥ १३ ॥
हे चि होउनि अर्थना । मी चि माझां अर्थी अर्जुना ।
करूनि अर्थाभिधाना । आणी मातें ॥ १४ ॥
अथवा घेउनि अज्ञानातें । माझिया भक्ती जैं हें वर्ते ।
तैं दावी मज द्रष्टेयातें । दृश्य करूनि ॥ १५ ॥
एथ मुख चि दीसे मुखें । या बोला कांहिं न चुके ।
परि दूजेपण हें लटकें । आरिसा करी ॥ १६ ॥
दीठी चंद्रू चि घे साचें । परि येतुलें हें तिमिराचें ।
जें एक चि असे तेयाचें । दोनि दावी ॥ १७ ॥
तैसें सर्वत्र मीं चि मियां । देखतसें भक्ती इया ।
परि दृश्यत्व हें वायां । अज्ञानवशें ॥ १८ ॥
तें अज्ञान आतां फीटलें । माझें दृश्यत्व मज भेटलें ।
निजबिंबिं एकवटलें । प्रतिबिंब जैसें ॥ १९ ॥
पैं जेधवां इं असे कीगाळ । तेधवां इं सोनें चि अढल ।
परि तें गेलेयां केवळ । उरे जैसें ॥ ११२० ॥
हो कां पुनिवे आदिं कांहिं । चंद्रिं सांधा चि नाहिं ।
परि तिये दीं भेटे पाहीं । पूर्णता तेया ॥ २१ ॥

तैसा मी चि अज्ञानद्वारें । दीसें परि दृश्यांतरें ।
मग दृश्य तें सरे । मियां चि मीं लाभें ॥ २२ ॥
ह्मणौनि दृश्य पंथा । अतीतु माझा पार्था ।
भक्तियोगु चौथा । ह्मणितला गा ॥ २३ ॥
येया ज्ञानभक्ती सहज । भक्तु एकवटला मज ।
तो मी चि केवल तुज । श्रुत ही आहे ॥ २४ ॥
जें उभूनियां भुजा । ज्ञानियां आत्मा माझा ।
हें बोलिलों कपिध्वजा । सप्तमाध्याइं ॥ २५ ॥
ते हे कल्पादिभक्ति मियां । भागवतमीषें ब्रह्मेयां ।
उत्तम ह्मणौनियां । उपदेशिली ॥ २६ ॥
ज्ञानिये इयेतें स्वसंविति । ह्मणति शैव शक्ति ।
आह्मीं परमभक्ति । आपुली ह्मणों गा ॥ २७ ॥
हे मज मिलतिये वेळे । तेयां क्रमयोगियां फळे ।
मग समस्त ही निखळें । मियां चि भरे ॥ २८ ॥
तेथ वैराग्य विवेकेंसीं । आटे बंधु मोक्षेंसी ।
वृत्ति तिया आवृत्तिसीं । बुडौनि जाए ॥ २९ ॥
वेंठनि ऐलपणातें । परत्व हारपे जेथें ।
गीळनि च्यान्ही भूतें । आकाश जैसें ॥ ११३० ॥
तेया परीं साध्य-- । साधनातीत शुद्ध ।
तें मीं होउनि एकवद । भोगी तो माझें ॥ ३१ ॥
घडौनि सिंधुचेया आंगा । सिंधु वरि तळपे गंगा ।
तैसा पाडु तेया भोगा । अवधारिजो ॥ ३२ ॥
कां आरिसेयासि आरिसा । उट्टुनि दाविला जैसा ।
देखणां अतिसो तैसा । भोगणां तिये ॥ ३३ ॥
चेइलेयां स्वप्न नासे । आपुलें ऐक्य चि दीसे ।
तें दूजेन विण जैसें । भोगिजे कां ॥ ३४ ॥

हें असो दर्पणु नेलेयां । तो मुखबोधु ही गेलेयां ।
देखिलेपण एकलेयां । आस्वादिजे जेवि ॥ ३५ ॥
तो चि जालेयां भोगु तेयाचा । न घडे हा भावो जेयांचा ।
तें हि बोलें किर बोलाचा । उच्चारु कीजे ॥ ३६ ॥
तेयाचां नेणों गावीं । रवि प्रकाशे हान दिवी ।
किं व्योमा लागि पडवी । उभिली तिहिं ॥ ३७ ॥
हांगा राज्ञत्व नव्हतां आंगिं । रावो आपण काइ भोगी ।
किं आंधारु हान आलंगी । दिनकरातें ॥ ३८ ॥
आणि आकाश जें नव्हे । तें आकाश काइ जाणावें ।
रत्नाचां रूपिं मिरवे । गुंजांचें लेणें ॥ ३९ ॥
ह्मणौनि मी होणें नाहिं । तेया मीं आहें कें हीं ।
मग भजैल हें काइ । बोलों किर ॥ ११४० ॥
यया लागि तो क्रमयोगी । मी जाला चि मातें भोगी ।
तारुण्य कां तरुणांगी । जिया परीं ॥ ४१ ॥
तरंगु सर्वांगिं तोय चुंबी । प्रभा सर्वत्र विलसे बिंबिं ।
नाना अवकाशु नभीं । लुंठतु जैसा ॥ ४२ ॥
तैसा रूप होउनि माझें । मातें क्रिया विण तो भजे ।
घनाकारु कां साहाजें । सोनेयातें जेवि ॥ ४३ ॥
चंदनाची द्रुति जैसी । चंदनीं असे आपैसी ।
कां एकत्र गर्भशशी । चंद्रिका ते ॥ ४४ ॥
तैसी क्रिया किर न साहे । तर्‍हीं अद्वैतीं भक्ति आहे ।
हें अनुभवा जोगें नोहे । बोला ऐसें ॥ ४५ ॥
तेथवां पूर्वसंस्कारसंदें । जें काहिं तो अनुवादे ।
तेणें आलविलेनि वो दें । बोलता मीं चि ॥ ४६ ॥
बोलतेया बोलता चि भेटे । तेथ बोलिलें हें न घटे ।
तें मौन तवं गोमटें । स्तवन माझें ॥ ४७ ॥

म्हणौनि तेया बोलतां । बोलीं बोलला मीं भेटतां ।
मौन होये तेणें तत्वता । स्तवी तो मातें ॥ ४८ ॥
तैसें चि बुद्धीं कां दीठी । जें देखों जाये तो किरीटी ।
तें देखणेयां दृश्य लोटी । देखतें चि दावी ॥ ४९ ॥
आरिसेया आदी जैसें । देखतें चि मुख दीसे ।
तेया तें देखणें तैसें । मेलवी द्रष्टें ॥ ११५० ॥
दृश्य जाउनियां द्रष्टें । द्रष्टेयासी चि जैं भेटे ।
तैं एकलेपण न घटे । द्रष्टेपण हि ॥ ५१ ॥
तेथ स्वप्निचिया प्रिया । चेउनि झोंबों गेलेयां ।
ठाइजे दोन्हीं होउनियां । आपण चि जैसें ॥ ५२ ॥
कां दोन्ही काष्ठांचिया घृष्टी । माझि वन्हि जो एकु उठी ।
तो दोनि हे भाष आटी । आपण चि होए ॥ ५३ ॥
नाना प्रतिबिंब हातिं । घेऊं गेलेयां गभस्ती ।
बिंबता ही थिती । जाये जैसी ॥ ५४ ॥
तैसा मी होउनि देखतें । तो घेऊं जाये दृश्यातें ।
तेथ दृश्य नेथिलें तें । द्रष्टत्व ही ॥ ५५ ॥
रवी आंधारु प्रकाशितां । नुरे चि जेवि प्रकाश्यता ।
तेवि दृश्या नाहिं द्रष्टता । मी जालेयां ॥ ५६ ॥
मग देखिजे कां नेदखिजे । ऐसी जे दशा निफजे ।
तें तें दर्शन माझें । साचोकारें ॥ ५७ ॥
तें भलेतेया किरीटी । पदार्थांचिया भेटी ।
दृश्यादृश्यातीता दृष्टी । भोगी तो सदा ॥ ५८ ॥
आणि आकाश हें आकाशें । दाटलें न ढले जैसें ।
मियां आपणपेनि तैसें । जालें तेया ॥ ५९ ॥
कल्पांतिं उदक उदकें । रुंधलेयां वाहो ठाके ।
तैसें आत्मेनि मियां एकें । कोंदला तो ॥ ११६० ॥

पाउल आपणपेयां बळघे । केवि वन्हि आपणपेयां लागे ।
आपणपेयां पाणी रिगे । गंगे स्नाना केवि ॥ ६१ ॥
ह्मणौनि सर्व मी जालेपणें । ठेलें तेया एणें जाणें ।
हें चि गा यात्रा करणें । अद्वया मज ॥ ६२ ॥
पैं जळा वरिलु तरंगु । जन्हीं धांविनला सवेगु ।
तन्हीं नाहिं भूमीभागु । क्रमिला जैसा ॥ ६३ ॥
जें सांडावें कां ठेवावें । चाळणें जें चालावें ।
तें तो चि एक आघवें । ह्मणौनियां ॥ ६४ ॥
गेलेयां भलेतेउता । उदकपणें पांडुसुता ।
तरंगाची कां निश्चळता । न मोडे चि जेवि ॥ ६५ ॥
तैसा मीपणें हालों ठेला । तो आघवेया चि मज आला ।
इया यात्रा होये भला । कापडी माझा ॥ ६६ ॥
आणि शरीरस्वभावबसें । काहिं एक करूं बैसे ।
तरि मीं चि तेवि तेणें मीसें । भटे तेया ॥ ६७ ॥
तेथ कर्म आणि कर्त्ता । हें जाउनियां पांडुसुता ।
मी आत्मेनि मातें पांतां । मीं चि होयें ॥ ६८ ॥
पैं दर्पणातें दर्पणें । पाहिलेयां होये न पाणें ।
सोनें झांकिलेयां सुवर्णे । न झंके जेवि ॥ ६९ ॥
दीपातें दीपें प्रकाशिजे । तें न प्रकाशणें चि निफजे ।
तैसें कर्म मियां कीजे । तें करणें कैंचें ॥ ११७० ॥
तें होंत चि आहे । जें करावें भाष जाए ।
ऐसें न करणें चि होए । तेयाचें केलें ॥ ७१ ॥
क्रियाजात मियां जालेपणें । घडे काहिं चि न करणें ।
तेया चि नावं पूजणें । तुरेचें माझें ॥ ७२ ॥
ह्मणौनि करितिया वोजा । न करणें कपिध्वजा ।
निफजे तेया महापूजा । पूजि तो मातें ॥ ७३ ॥

येवं तो बोले तें स्तवन । तो देखे तें दर्शन ।
अद्वया मज गमन । तो चाले तें चि ॥ ७४ ॥
तो करी तेतुली पूजा । तो कल्पी तो जपु माझा ।
तो असे ते चि कपिध्वजा । समाधि माझी ॥ ७५ ॥
जैसें कनकेंसिं कांकणें । असिजे अनन्यपणें ।
तो भक्तियोगें एणें । मासिं तैसा ॥ ७६ ॥
किंबहुना तंतुसिं पटु । कां मृत्तिकेसीं घटु ।
तैसा तो एकवटु । मजसिं माझा ॥ ७७ ॥
उदकिं कल्लोळु । कापुरिं परिमळु ।
रत्निं उजाळु । अनन्यु जैसा ॥ ७८ ॥
इया अनन्यभक्ती । इयें आघवीं चि दृश्य जातीं ।
मज आपणपेयां सुमती । द्रष्टेयातें जाणें ॥ ७९ ॥
तिहिं अवस्थांचेनि द्वारें । उपाधि उपहिताकारें ।
भावाभावरूप स्फुरे । दृश्य जें हें ॥ ११८० ॥
तें हें आघवें चि द्रष्टा । ऐसां बोधाचां माजिवठां ।
अनुभवाचा सुभटा । ढेंढा तो नाचे ॥ ८१ ॥
रज्जु जालेयां गोचरु । आभासता तो व्यालाकारु ।
रज्जू चि ऐसा निर्धारु । होये जेवि ॥ ८२ ॥
भांगारा परौतें काहीं । लेणें गुंज भरि ही नाहिं ।
हें आटूनि पाइं । कीजे जैसें ॥ ८३ ॥
उदका एका परौतें । तरंग नाहिं चि हें निरुतें ।
जाणौनि तेया आकारातें । नेघपे जेवि ॥ ८४ ॥
कां स्वप्नविस्तारा समस्तां । चेउनियां उमाणें घेतां ।
आपणपेयां परौता । न दिसे जैसा ॥ ८५ ॥
तैसो जे काहिं आथिनाथि— । पणें जे होये स्फूर्त्ति ।
ते ज्ञाता चि मीं हे प्रतीति । होउनि तो भोगी ॥ ८६ ॥

जाणें अजु मीं अजरु । अक्षय मीं अक्षरु ।
अपूरु मीं अपारु । आनंदु मीं ॥ ८७ ॥
अचलु मीं अच्युतु । अनंतु मीं अद्वैतु ।
आद्यु मीं अव्यक्तु । व्यक्तु ही मीं ॥ ८८ ॥
ईश्यु मीं ईश्वरु । अनादि मीं अमरु ।
अभय मीं आधारु । आधेय मीं ॥ ८९ ॥
स्वामि मीं सदोदितु । सहजु मीं सतंतु ।
सर्व मी सर्वगतु । सर्वातीतु मीं ॥ ११९० ॥
नवा मी पुराणु । शून्य मीं संपूर्णु ।
अस्थूलु मी अणणू । जें काहिं तें मीं ॥ ९१ ॥
अक्रियु मीं एकु । असंगु मी अशोकु ।
व्याप्य मी व्यापकु । पुरुषोत्तमु मीं ॥ ९२ ॥
अशद्बु मीं अश्रोतृ । अरूपु मीं अगोत्रु ।
समु मीं स्वतंत्रु । ब्रह्म मीं पर ॥ ९३ ॥
ऐसें आत्मत्वें एका मातें । इया भक्ती जाणे विरुतें ।
आणि इया बोधा जाणणें तें । तें ही मीं चि जाणें ॥ ९४ ॥
पैं चेइलेया नंतरें । आपलें एकपण उरे ।
तें हीं तें वारि स्फुरे । तेयासि जैसें ॥ ९५ ॥
कां प्रकाशतां अर्कु । तो चि होये प्रकाशकु ।
तेया ही अभेदा द्योतकु । तो चि जैसा ॥ ९६ ॥
तैसा वेद्याचां विलइं । केवल वेदकु उरे पाहीं ।
तेणें जाणिवे तेया तो ही । हें इ जें जाणे ॥ ९७ ॥
तेणें अद्वय आपणां आपलेया । जाणति ज्ञप्ति जे धनंजया ।
ते ईश्वरू चि मीं तेया । बोधासि एं ॥ ९८ ॥
मग अद्वैतातीत । मी चि आत्मा एकु निभ्रांत ।
हें जाणौनि जाणणें जेथ । अनुभविं रिगे ॥ ९९ ॥

तेथ चेइलेयां एकपण । दीसे जें आपणेयां आपण ।
तें हिं जातां नेणों कोण । होइज जेवि ॥ १२०० ॥
कां डोला देतिये क्षणीं । सरूपपण सुवर्णीं ।
आटौनि होये आटणी । घनाकाराची ही ॥ १ ॥
नाना लवण तोय होए । मग क्षारता तोयत्वें राहे ।
तें किं जिरतां जें जाए । जालेपण तें ॥ २ ॥
तैसा मीं तो हें जें असें । ते स्वानंदानुभवरसें ।
कालवौनि प्रवेशे । मज चि माझि ॥ ३ ॥
आणि तो हे भाष तेथ जाए । तेथ मीं कोणासिं आहें ।
ऐसा मीं नां तो तिये सामाए । माझां चि रूपीं ॥ ४ ॥
जेधवां कापुरु जळों सरे । तेया चि नावं आगि पुरे ।
मग उभयातीत उरे । आकाश जेवि ॥ ५ ॥
कां गेलेयां एकाएकु । वाढे तो शून्यविशेखु ।
तैसा आहेनाहींचा शोखु । मीं चि मग आथि ॥ ६ ॥
तेथ ब्रह्म आत्मा ईशु । या बोला मोडे सौरसु ।
न बोलणेयां हिं पैसु । नाहिं जेथ ॥ ७ ॥
न बोलणें हिं न बोलैनि । तें बोलिजे तोंड भरूनि ।
जाणिवे नेणिव नेणौनि । जाणिजे तो ॥ ८ ॥
तेथ बोधिजे बोधु बोधें । आनंदु घेपे आनंदें ।
सुख वरि नसुदें । सुख भोगिजे ॥ ९ ॥
तेथ लाभु जोडला लाभा । प्रभा आलिंगिली प्रभा ।
विस्मयो बुडाला उभा । विस्मया माझि ॥ १२१० ॥
समु तो सामाविला । विश्रामु विश्रांती आला ।
अनुभवु ही वेडावला । अनुभूतीपणें ॥ ११ ॥
किंबहुना ऐसें निखळ । मीपणें जोडे तेया एक फल ।
सेउनि वेल्हाळ । क्रमयोगाची ते ॥ १२ ॥

पैं क्रमयोगा किरीटी । चक्रवर्तिचां मुगुटीं ।
मी चिद्रत्न ते साटोवाटी । होये तो माझा ॥ १३ ॥
किं क्रमयोगप्रसादाचा । कळसु जो हा मोक्षाचा ।
तेया वरिला आकाशाचा । उवाऊ जाला तो ॥ १४ ॥
नाना संसारअडवीं । क्रमयोगु वाट बरवी ।
जोडलिया मदैक्यगावीं । पैठा जाला ॥ १५ ॥
ऐसा क्रमयोगु ऊभें । तेणें भक्तिचित्तगंगें ।
मी स्वानंदोदधि वेगें । टाकिलां गा ॥ १६ ॥
हा ठाऊ वेरीं सुवर्मा । क्रमयोगी आहे महिमा ।
ह्मणौनि वेलोवेलां तुह्मां । सांघों तें आह्मीं ॥ १७ ॥
पैं देशें काळे पदार्थें । साधुनि घेइं मातें ।
तैसा नव्हे मी आइतें । सर्वांचें सर्व ॥ १८ ॥
एकु शिष्यु एकु गुरु । हा रूढला साचु वेव्हारु ।
तो मत्प्राप्तिप्रकारु । जाणावेया ॥ १९ ॥
ह्मणौनि माझां ठांइं । जचावें न लगे काहिं ।
मी लाभें ये उपाइं । जचिजे चि गा ॥ १२२० ॥
अगा वसुधेचां पोटीं । निधान सिद्ध किरीटी ।
वन्हि सिद्धु काष्टीं । वोहां दूध ॥ २१ ॥
परि लाभे तें असतें । तेया कीजे उपायातें ।
एर सिद्ध तैसा येथें । उपायें मीं ॥ २२ ॥
हा फळ ही वरि उपाऊ । कां प्रस्तावितसे देवो ।
हें पूसा तरि अभिप्राऊ । एथिचा ऐसा ॥ २३ ॥
जें गीतार्थाचें चांगावें । मोक्षउपाय परि आघवें ।
आणि शास्त्रउपाय किं न्हवे । प्रमाणसिद्धी ॥ २४ ॥
वारा अभाळ चि फेडी । वांचौनि सूर्यातें न घडी ।
कां हातु बाबुळी धाडी । तोय न करी ॥ २५ ॥

तैसा आत्मदर्शनीं आडलु । असे जो अविद्येचा मलु ।
तो शास्त्र नासी एरु निर्मलु । प्रकाशें स्वयें ॥ २६ ॥
ह्मणौनि आघवीं चि शास्त्रें । अविद्याविनाशिचीं पात्रें ।
वांचौनि नव्हंति स्वतंत्रें । आत्मबोधीं ॥ २७ ॥
तेया आत्मबोधा शास्त्रांसि । जैं साचपणांचीये पूति ।
तें एइजे जेया ठायासि । ते हे गीता ॥ २८ ॥
भानुभूषिता प्राचिया । येरी सतेजा दिशा आघविया ।
तैसी असे सर्वा गीता येया । सनाथें शास्त्रें ॥ २९ ॥
हें असो एणें शास्त्रेश्वरें । मागां उपावो बहुवें विस्तारें ।
सांघितला असे जो निकरें । वेॐ ये आत्मा ॥ १२३० ॥
पारि प्रथमा श्रवणा सवें । अर्जुना विपायें फावे ।
हा भाॐ सकणवे । धरुनि श्रीहरी ॥ ३१ ॥
तें चि प्रमेय येकोल । शिष्यें होआवें अढल ।
सांघिजतसे मुकुल—। मुद्रा आतां ॥ ३२ ॥
आणि प्रसंगें गीता । हा ठावो ही संपता ।
ह्मणौनि दावी आद्यंता । एकार्थत्वें ॥ ३३ ॥
जें ग्रंथाचां मध्यभागीं । नाना अधिकारप्रसंगीं ।
निरूपण अनेगीं । सिद्धांतीं केलें ॥ ३४ ॥
तारि तेतुले ही सिद्धांत । इये शास्त्रीं प्रस्तुत ।
हें पूर्वापर नेणत । कोण्ही जैं मानीनां ॥ ३५ ॥
तें महासिद्धांचा एवाका । सिद्धांतकक्षा अनेका ।
भिडूनि आरंभें देखां । संपवितसें ॥ ३६ ॥
एथ अविद्यानाशु हें स्थल । तेणें मोक्षोपादान फल ।
येयां दोहीं केवल । साधन ज्ञान ॥ ३७ ॥
हें एतुलें चि नाना परीं । निरोपिलें ग्रंथविस्तारीं ।
तें आतां दों आखरीं । अनुवादावें ॥ ३८ ॥

ह्मणौनि उपेय ही हातीं । जालेयां उपायस्थिति ।
देउ प्रवर्त्तले पुढुतीं । एणें चि भावें ॥ ३९ ॥

सर्वकर्माण्यपि सदा कुर्वाणो मद्व्यपाश्रयः
मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययं ॥ ५६ ॥

मग ह्मणे गा सूभटा । तो क्रमयोगि इया निष्ठा ।
मी होउनि होये पैठा । माझां रूपीं ॥ १२४० ॥
स्वकर्मांचां लाखौलीं । मज पूजा करुनि भली ।
तेणें प्रसादें आकली । ज्ञाननिष्ठेतें ॥ ४१ ॥
ते निष्ठा जेथ हातवसे । तेथ भक्ति माझी उल्हासे ।
तेया मजसीं समरसें । सुखिया होए ॥ ४२ ॥
आणि विश्वप्रकाशितेया । आत्मेयां मज आपुलेया ।
अनुसरे जो मज करुनिया । सर्वत्रताइं ॥ ४३ ॥
सांडूनि आपुला आडलु । लवण आश्राये जलु ।
कां हींडौं राहे निश्चलु । वायु व्योमीं ॥ ४४
तैसा बुद्धी वाचा कायें । जो मातें आश्राउनि ठाए ।
तो निषिद्धें हीं विपायें । कर्में करू ॥ ४५ ॥
पारि गंगेचां संबंधीं । बीदी आणि महानदी ।
ऐक्य तेवि माझां बोधीं । शुभाशुभांसि ॥ ४६ ॥
कां बावनेयां आणि घूरें । हा निवाडु तवं चि सरे ।
जवं नेघपति वैश्वानरें । कवलूनि दोन्हीं ॥ ४७ ॥
नाना पांचिकें आणि सोळें । हें सोनेयां तवं चि आलें ।
जवं परिसु आंगमेळें । एकवटी नां ॥ ४८ ॥
तेवि शुभाशुभें ऐसें । हें तवं चि वेन्हीं आभासे ।
जवं एकु न प्रकाशे । सर्वत्र मी ॥ ४९ ॥
आगा रात्रि आणि दीवो । हा तवं चि द्वैतभाउ ।
जवं न रिगिजे गाउ । गभस्तीचा ॥ ५० ॥

ह्मणौनि माझिया भेटी । तेयाचीं सर्व कर्में किरीटी ।
जाउनि बैसे तो पाटीं । सायुज्याचां ॥ ५१ ॥
देशें काळें स्वभावें । वेचु जेया न संभवे ।
तें पद माझें पावे । अविनाश तें ॥ ५२ ॥

**चेतसा सर्वकर्माणि मयि संन्यस्य मत्परः ॥**
**बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भव ॥ ५७ ॥**

किंबहुना पांडुसुता । मज आत्मेयाची प्रसन्नता ।
लाहे तेणें न पविजता । लाभु कवणु असे ॥ ५३ ॥
या कारणें गा तुयां । सर्वकर्मीं आपुलेयां । (तूं या)
माझां रूपिं धनंजया । संन्यासु कीजे ॥ ९४ ॥
परि तो चि संन्यासु वीरा । करणीयेचा झनें करा ।
आत्मविवेकीं धरा । चित्तवृत्ति हे ॥ ९९ ॥
मग तेणें विवेकबळें । आपणपें कर्मा वेगळें ।
माझां स्वरूपीं निर्मळे । देखिजैल ॥ ९६ ॥
आणि कर्माची जन्म भोए । ये प्रकृती जे कांहीं आहे ।
ते आपणेयांहूनि बहुतें । देखसी दुरि ॥ ५७ ॥
तेथ प्रकृति आपणेयां । वेगळी नुरे धनंजया ।
रूपें विण छाया । जिया परीं ॥ ९८ ॥
ऐसेनि प्रकृतीनाशु । जालेयां कर्मसंन्यासु ।
निफजैल अनायासु । सकारणु ॥ ९९ ॥
मग कर्मजात गेलेयां । आत्मा मी उरें आपणपेयां ।
बुद्धि घापे करूनियां । पतिव्रता ॥ १२६० ॥
बुद्धी अनन्य एणें योगें । मज माझि जैं रिगे ।
तैं चित्त चैत्यत्यागें । मातें चि भजे ॥ ६१ ॥
ऐसें चइत्य जातें सांडिलें । चित्त माझां ठांइं जडलें ।
ठाके तैसें वहिलें । सर्वदा करीं ॥ ६२ ॥

**मच्चित्तः सर्वदुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि ।**
**अथ चेत्त्वमहंकारान्न श्रोष्यसि विनंक्ष्यसि ॥ ५८ ॥**

मग अभिन्ना इया सेवा । चित्त मियां चि भरे जेधवां ।
माझा प्रसादु जाण तेधवां । संपूर्ण जाला ॥ ६३ ॥
तेथ सकलदु:खधामे । भुंजिजति जियें मृत्युजन्में ।
तियें दुर्गमें चि सुगमें । होंती तुज ॥ ६४ ॥
सूर्याचेनि सावायें । डोळा सावाइला होए ।
तैं आंधाराचा आहे । पाडु तेया ६५ ॥
तैसा माझेनि प्रसादें । जीवकणु जेयाचा मर्दे ।
तो संसाराचेनि बंधें । बांधला केंवि ॥ ६६ ॥
ह्मणौनि धनंजया । संसारदुर्गती इया ।
तरसील माझिया । प्रसादा तव ॥ ६७ ॥
अथवा हान अहंभावें । माझें बोलणें हें आघवें ।
कानामनाचिये सींवे । नेंदीसि टेंकों ॥ ६८ ॥
जेया देहसंबंधा आंतु । प्रतिपदीं आत्मघातु ।
भुंजतां उसंतु । कहीं चि नाहिं ॥ ६९ ॥

**यदहंकारमाश्रित्य न योत्स्य इति मन्यसे ॥**
**मिथ्यैष व्यवसायस्ते प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति ॥ ५९ ॥**

येवडेनि दारुणें । निमणें न निमणें ।
पडैल जारिं बोलणें । न वेसी माझें ॥ १२७० ॥
पथ्यद्वेषिया पोसी ज्वरु । कां दीपद्वेषिया आंधारु ।
विवेकद्वेषें अहंकारु । पोसुनि तैसा ॥ ७१ ॥
स्वदेहा नावं अर्जुनु । परदेहा नावं स्वजनु ।
संग्रामा नावं मळिनु । पापाचारु ॥ ७२ ॥
ये मती आपुलेया । तीवां तीनि नावें इयां ।
ठेउनि धनंजया । न झुंझें ह्मणसी ॥ ७३ ॥

जीवा माझिं निष्टंकु । करीसि जो अत्यंतिकु ।
तो वायां धाडी वेलु नैसर्गिकु । स्वभाव तूझा ॥ ७४ ॥
आणि मीं अर्जुनु हें आत्मक । इयां वधु करणें हें पातक ।
हें माया वांचौनि तात्विक । कांहिं आहे ॥ ७५ ॥
आदिं तूंतें जूझ होआवें । मग जूझा शस्त्र घेयावें ।
कां न जुझावेया करावें । देवांगण ॥ ७६ ॥
ह्मणौनि न जूझणें । ह्मणसी तें वायागें ।
ना मानूं लोकपणें । लोक दृष्टिसि इहिं ॥ ७७ ॥
तऱ्हि न जुझें ऐसें । निष्टंकीसि जें मानसें ।
ते प्रकृति अनारिसें । करिल चि ॥ ७८ ॥
पैं पूर्वे वाहांत पाणी । पऱ्हिजे पश्चिमिली वाहाणी ।
तरि आग्रहो चि उरे तें आणी । आपुलिया लेखा ॥ ७९ ॥
कां सालिचा कणु ह्मणे । मीं नुगवें सालिराणें ।
तऱ्हीं आन न करणें । स्वभावासि ॥ १२८० ॥
तैसा क्षत्रिया संस्कारुसिद्धा । प्रकृती घडिलासि प्रबुद्धा ।
आतां नुठिं ह्मणसि हा धांधा । उठिविजसी चि ॥ ८१ ॥
शौर्य तेज दक्ष्यता । एवमादिक पांडुसुता ।
गुण दीधले नियता । प्रकृति तुज ॥ ८२ ॥

**स्वभाजेन कौंतेय निबद्धः स्वेन कर्मणा ॥**
**कर्त्तुं नेछसि यन्मोहात्करिष्यस्यवशोपि तत् ॥ ६० ॥**

तरि तेथाचेया समवाया । आन रूप धनंजया ।
न करितां उगलेयां । न येईल ऐसें ॥ ८३ ॥
ह्मणौनि तिहिं गुणिं । बांधलासि तूं कोदंडपाणी ।
त्रिशुद्धी निगसी वाहाणी । क्षात्राचिया ॥ ८४ ॥
नां हें आपुलें जन्ममूळ । न विचारीसि तूं केवळ ।
न जुझें ऐसें अढळ । व्रत जरि वेसी ॥ ८५ ॥

तरि बांधौनि हातपाए । जो रथीं घातला आये ।
तो न चले तन्हीं जाये । दिगंता जेवि ॥ ८६ ॥
तैसा तूं आपुलेया कढौनि । मीं काहिं चि न करिं ह्मणौनि ।
ठांसी परि भरवसेंनि । तें चि करीसी ॥ ८७ ॥

**ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ॥**
**भ्रामयन्सर्वभूतानि यंत्रारूढानि मायया ॥ ६१ ॥**

हांगा रोगु काइ रोगिया । आवडे दारिद्र दरिद्रिया ।
परि भोगविजे बलिया । अदृष्टें जेणें ॥ ८८ ॥
तें अदृष्ट अनारिसें । न करील ईश्वरवसें ।
तो ईश्वरु ही असे । जवळिके चि ॥ ८९ ॥
सर्वभूतांचां अंतरीं । हृदयमहाअंबरीं ।
चिद्वृत्तिचां सहस्रकरीं । उदैला असे जो ॥ १२९० ॥
अवस्थात्रया तीन्हीं लोक । नव्हे प्रकाशूनि अशेष ।
अन्यथादृष्टी पथीक । चेवविले ॥ ९१ ॥
वेद्योदकाचां सरोवरीं । फांकति विषयकल्हारीं ।
इंद्रियषट्पदाचारी । जीवभवंरांतें ॥ ९२ ॥
असो रूपक हें तो ईश्वरु । सकळ भूतांचा अहंकारु ।
पांगुरौनि निरंतरु । उल्हासतसे ॥ ९३ ॥
स्वमायेचें आडवस्त्र । लेउनि एकला खेळवी सूत्र ।
बाहिरि नटि छायाचित्र । चौरासी लक्ष ॥ ९४ ॥
तेया ब्रह्मादिकीटांतां । अशेषां हिं भूतजातां ।
देहाकारें योग्यता । पाउनि दावी ॥ ९५ ॥
तेथ हें देह तेयां पुढें । अनुरूपपणें मांडे ।
तें भूत तिये आरूढे । हें मीं ह्मणौनि ॥ ९६ ॥
सूत सूतें गुंतलें । तृण तृणें बांधलें ।
कां आत्मबिंब घातलें । बाळकें जळीं ॥ ९७ ॥

तैया परीं देहाकारें । आपणपें चि दुसरें ।
देखौनि जीउ आविष्करे । आत्मबुद्धी ॥ ९८ ॥
ऐसें शरीराकारें । यंत्रीं भूतें अत्रधारीं ।
वाउनि हालवी दोरी । प्राचीनांची ॥ ९९ ॥
तेथ जेया जें कर्मसूत्र । मांडूनि ठेविलें स्वतंत्र ।
तें तिये गती पात्र । हों चि लागे ॥ १३०० ॥
किंबहुना धनुर्द्धरा । भूतांतें स्वर्गसंसारा ।
माजि भवंडी तृणें वारा । आकाशीं जैसा ॥ १ ॥
भ्रामकाचेनि संगें । जैसें लोह चि वेढां रिगे ।
तैसीं ईश्वरसत्तायोगें । चेष्टती भूतें ॥ २ ॥
जैसें चष्टा आपुलालिया । समुद्रादिक धनंजया ।
चेष्टति चंद्राचिया । संनिधी एकी ॥ ३ ॥
तेयां सिंधू भरितें दाटे । सोमकांता पाझरु फूटे ।
कुमुदचकोरां फीटे । संकोचु तो ॥ ४ ॥
तैसीं बीजप्रकृतिवसें । अनेकें भूतें एकें ईसें ।
चेष्टविजे तो असे । तूझां हृदइं ॥ ५ ॥
अर्जुनपण नेघतां । मी ऐसें पांडुसुता ।
उठितसे तें तत्वता । तेयाचें रूप ॥ ६ ॥
यया लागि तो प्रकृतितें । प्रवर्त्तवील हें निरुतें ।
आणि तें जूझवील तूतें । न जुझसि तन्हीं ॥ ७ ॥

**तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत ।**
**तत्प्रसादात्परां शांतिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतं ॥ ६२ ॥**

झणौनि ईश्वरु गोसांविं । तेणें प्रकृति हे नियमावी ।
तिया सुखें राहाटवावि । इंद्रियें आपुलीं ॥ ८ ॥
तूं करणें न करणें दोन्हीं । लाउनि प्रकृतिचां मानीं ।
प्रकृति ही कां आधीनि । हृदयस्था जेया ॥ ९ ॥

तेयां अहं वाचा आंग । देउनि शरण रीग ।
महोदधी कां गांग । रिगालें जैसें ॥ १३१० ॥
मग तेयाचेनि प्रसादें । सर्वोपशांतिप्रमदें ।
कांतु होउनि स्वानंदें । स्वरूपिं रमसी ॥ ११ ॥
संभूति जेणें संभवे । विश्रांति जेथ विसंवे ।
अनुभूतीं अनुभवे । अनुभउ जेया ॥ १२ ॥
तिये निजात्मपदिंचा राऊ । होउनि ठांसी अव्ययो ।
ह्मणे लक्ष्मीयेचा नाहो । पार्था तूं गा ॥ १३ ॥

**इति ते ज्ञानमाख्यातं गुह्याद्गुह्यतरं मया ।**
**विमृश्यैतदशेषेण यथेच्छसि तथा कुरु ॥ ६३॥**

हे गीता नावं विख्यात । सर्ववाङ्मयाचें मथित ।
आत्मा जेणें हस्तगत । रत्न होए ॥ १४ ॥
ज्ञानी ऐसिया रूढी । वेदांतिं जेयाची प्रौढि ।
वानितां कीर्त्ति चोखडी । पातली जगीं ॥ १५ ॥
बुध्यादिकें डोलसें । हे जेयाचे कां कडवसे ।
मी सर्वद्रिष्टी ही दीसें । पाहों जिया ॥ १६ ॥
तें हें गा आत्मज्ञान । मज गोप्याचें हि गुपित धन ।
परि तूं ह्मणौनि आन । केवि करूं ॥ १७ ॥
येया कारणें गा पांडवा । आह्मिं आपुला हा ठेवा ।
तुज दीधला कणवा । जाकलिलेपणें ॥ १८ ॥
परि भूलली वोरसें । माये बोले बालका दोसें ।
प्रीति ही परि तैसें । न करं चि हो ॥ १९ ॥
एथ आकाश आणि गालिजे । अमृता ही झारि फेडिजे ।
कां दिव्या करविजे । दिव्य जैसें ॥ १३२० ॥
जेयाचेनि अंगप्रकाशें । पातालिचा परिमाणु दीसे ।
तेया सूर्या ही कां जैसें । अंजन सूदलें ॥ २१ ॥

तैसें सर्वज्ञें ही मियां । सर्व ही निर्द्धारूनियां ।
नीकें होये तें धनंजया । सांवितलें तुज ॥ २२ ॥
आतां तूं यया वरी । नीकें हें निर्द्धारीं ।
मग निर्द्धारुनि करीं । आवडे जैसें ॥ २३ ॥
येया देवाचेया बोला । अर्जुनु उगा चि ठेला ।
तेथ देउ॰ ह्मणे भला । अवंचकु होंसी ॥ २४ ॥
वाढितेया पुढां भूकैला । उपरोधें ह्मणे धालां ।
तैं तो चि पीडे आपुला । दोखु ही तेया ॥ २५ ॥
तैसा सर्वज्ञ श्रीगुरु । भेटलेयां आत्मनिर्द्धारु ।
न पुसे जैसा भारु । धरुनियां ॥ २६ ॥
तैं आपण चि वंचे । आणि पाप ही तेया वंचनाचें ।
आपणेयां चि तें साचें । चुकविलें तुवां ॥ २७ ॥
पैं उगेपणां तूझेया । अभिप्राउ॰ हा चि धनंजया ।
जें एकोल एक वेंकौनियां । सांघावें ज्ञान ॥ २८ ॥
एथ पार्थु ह्मणे दातारा । भलें जाणसि माझेया अंतरा ।
हें ह्मणों तरि दुसरा । जाणता असे काइ ॥ २९ ॥
परि ज्ञेय जी हें आघवें । तूं ज्ञाता एकू चि स्वभावें ।
मा सूर्यो ह्मणौनि वानावें । सूर्यातें काइ ॥ १३३० ॥
यया बोला श्रीकृष्णें । ह्मणितलें काइ एणें ।
हें चि थोडें गा वानणें । जें बुझतासि तूं ॥ ३१ ॥

**सर्वगुह्यतमं भूयः श्रृणु मे परमं वचः ।**
**इष्टोऽसि मे दृढमिति ततो वक्ष्यामि ते हितं ॥ ६४ ॥**

तरि अवधान प्रबळ । करूनि एकोळ ।
वाक्य माझें निर्मळ । अवधारि पां ॥ ३२ ॥
हें वाच्य ह्मणौनि बोलिजे । कां अवागमें आइकिजे ।
तैसें नव्हे परि तूझें । भाग्य बरवें ॥ ३३ ॥

कूर्मिचेया पीलिया । दृष्टि पान्हा ये धनंजया ।
आकाश बाहे बापैया । घरिचें पाणी ॥ ३४ ॥
जो व्यवहारु ही जेथें न घडे । तेयातें फल चि तेथ जोडे ।
काइ दैवें न संपडे । सानुकूलें ॥ ३५ ॥
यन्हवि द्वैताची वारि । सारूनि ऐक्याचां परिवरीं ।
भोगिजे तें अवधारीं । रहस्य हें । ३६ ॥
आणि निरूपचारा प्रेमा । विषो होये जें वीरोत्तमा ।
तें दूजें नोहे किं आत्मा । ऐसें चि जाणावें ॥ ३७ ॥
आरिसेयाचें देखिलेयां । गोमटें कीजे धनंजया ।
तें तेया नव्हे आपणेयां । लागि जैसें ॥ ३८ ॥
तैसें पार्था तूझेनि मिसें । मी बोलें आपणपेया चि दोसें ।
माझां तूझां ठांइं असे । मीतूंपण गा ॥ ३९ ॥
ह्मणौनि जिव्हारिचें गुज । सांघतसें जीवितासी चि तुज ।
अनन्यगतिचें मज । आथि व्यसन ॥ १३४० ॥
पैं जला आपणपेया देंतां । लवण भूललें पांडुसुता ।
किं आघवें तेयाचें होंतां । न लजे चि तें ॥ ४१ ॥
तैसा तूं माझां ठांइं । राखों नेणसी चि काहिं ।
तरि आतां तुज मी काई । गोप्य करीं ॥ ४२ ॥
ह्मणौनि आघवीं चि गुढें । जें पाउनि अति उघडें ।
तें गोप्य माझें चोखडें । वाक्य आइक ॥ ४३ ॥

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ॥**
**मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोसि मे ॥ ६५ ॥**

तरि बाह्यांतरा । आपुलेया सर्वव्यापारां ।
मज व्यापकातें वीरा । विषो करीं ॥ ४४ ॥
आघवां आंगिं जैसा । वायु मिलौनि आकाशा ।
तूं सर्वकामिं तैसा । मासीं चि अस ॥ ४५ ॥

किंबहुना आपुलें मन । करीं माझें एकायतन ।
माझेनि श्रवणें कान । भरूनि घालीं ॥ ४६ ॥
आत्मज्ञानें चोखडीं । संत जे माझिं रूपडीं ।
तेथ दृष्टि पडो आवडी । कामिनी जैसी ॥ ४७ ॥
मज सर्ववसतिचें वसैठें । माझिं नामें जियें चोखटें ।
तें जिव्हा येयावेया वाटे । वाचेचिये लावीं ॥ ४८ ॥
हातांचें करणें । पायांचें चालणें ।
तें होये मज कारणें । ऐसें करीं ॥ ४९ ॥
आपुलां अथवीं परावां । ठांइं उपकरिसि पांडवा ।
तेणें यज्ञें होये बरवा । याज्ञिकु माझा ॥ १३५० ॥
हें येकैक सिकउं काई । पैं सेवकै आपुलां ठांइं ।
उरौनि एर सर्व ही । मी सेव्यु चि करीं ॥ ५१ ॥
तेथ जाउनि भूतद्वेषु । सर्वत्र नमवीन मीं चि एकु ।
ऐसेनि आश्रयो अत्यंतिकु । लहांसील तूं माझा ॥ ५२ ॥
मग भरलेया जगा आंतु । जाउनि तिजेयाची मातु ।
होउनि टाईल एकांतु । आह्मां तुह्मां ॥ ५३ ॥
तेधवां भलेतिये अवस्थे । मी तूंतें तूं मातें ।
भोगीसि ऐसें ऐक्य तें । वाढैल सुख ॥ ५४ ॥
आणि तीजें आडलु करितें । निमालें अर्जुना जेथें ।
तैं मीं तूं चि ह्मणौनि मातें । पावसि सेखीं ॥ ५५ ॥
जळिचीं प्रतिभा । जळनाशीं बिंबा ।
येतां गाभागोभा । कांहिं असो ॥ ५६ ॥
पैं पवनु अंबरा । कां कल्लोळु सागरा ।
मीळतां आडवारा । कोणाचा गा ॥ ५७ ॥
ह्मणौनि तूं आणि आह्मीं । हें दीसतसे देहधर्मीं ।
मग याचां विरामीं । मी चि होसी ॥ ५८ ॥

एया बोला माझारि । होये नव्हे हें झनें करीं ।
एथ आन आथि तरि । तूझी आण ॥ ५९ ॥
पैं तूझी आण वाणें । हें आत्मलिंगातें सिवणें ।
प्रीतिची जाति लाजणें । आठवों नेदी ॥ १३६० ॥
यऱ्हवि वेद्धनि प्रपंचु । जेणें विश्वाभासु हा साचु ।
आज्ञेचा नडनाचु । कालातें जिणें ॥ ६१ ॥
तो देउ मी सत्यसंकल्पु । आणि जगाचा ही बापु ।
म्री आणेचा आक्षेपु । कां करावा ॥ ६२ ॥
पैं अर्जुना तूझेनि वेधें । मियां देवपणाचि बिरुदें ।
सांडिलीं गा मी हें आधें । सगळें तुवां ॥ ६३ ॥
पैं काजा आपुलिया । रावो आपुली आपणेयां ।
आण वाये धनंजया । तैसें हें चि ॥ ६४ ॥
येथ अर्जुनु ह्मणे देवें । अचाट हें न बोलावें ।
जी आमचें काज नावें । तूझेनि होये ॥ ६५ ॥
यया वारि सांघों बैससी । कां सांघतां भाष हीं देंसी ।
यया तूझेया विनोदासि । पार असे जी ॥ ६६ ॥
कमलवनिं विकाशु । करी रवीचा एकु अंशु ।
किं तेथ आघवा चि प्रकाशु । नीच देंतो ॥ ६७ ॥
पृथिवी निवौनि सागर । भारिजति एवडे थोर ।
वरिषे तेथ मिषांतर । चातकु कीजे ॥ ६८ ॥
ह्मणौनि औदार्या तूझेया । मज निमित्त ना ह्मणावेंया ।
प्राप्ति असे दानिराया । कृपानिधी ॥ ६९ ॥
तवं देउ ह्मणति राहें । यया बोलाचा प्रस्ताउ नोहे ।
पैं मातें पावसी उपायें । साच चि एणें ॥ १३७० ॥
सैंधव सिंधू पडिलेयां । जो क्षणु एकु धनंजया ।
तेणें विरे चि किं उरावेया । कारण कवण ॥ ७१ ॥

तैसें सर्वत्र मातें भजतां । सर्व मी होतां जातां ।
शेष जाउनि तत्वता । मी चि होंसि ॥ ७२ ॥
एवं माझी प्राप्ति वेऱ्हीं । कर्मा लागौनि अवधारिं ।
दाविली तुज उजिरी । उपायाची ॥ ७३ ॥
जें आधिं तवं पांडुसुता । सर्व कर्मे मज अर्पितां ।
सर्वत्र प्रसन्नता । लाहिजे माझी ॥ ७४ ॥
पाठिं माझां तिये प्रसादीं । माझें ज्ञान जाये सिद्धी ।
तेणें मिसलिजे त्रिशुद्धी । स्वरूपिं माझां ॥ ७५ ॥
मग पार्था तिये ठांइं । साध्यसाधना होये नाहिं ।
किंबहुना तुज काहिं । उरे चि ना ॥ ७६ ॥
तरि सर्व कर्मे आपुलीं । तुवां मज अर्पिलीं ।
तेणें प्रसन्नता लाधली । आजि हे माझी ॥ ७७ ॥
ह्मणौनि एणें प्रसादबळें । नोहे जूझाचेनि आडळें ।
न ठकें चि एकें वेळें । भाललां तुज ॥ ७८ ॥
जें सप्रपंच अज्ञान जाये । जेणें एकु मी गोचरु होयें ।
तें उपपत्तिचेनि उवायें । गीतारूप हें ॥ ७९ ॥
मियां ज्ञान तुज आपुलें । नाना परिं उपदेशिलें ।
एणें अज्ञान सांडी विआलें । धर्माधर्म जें ॥ १३८० ॥

**सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज ॥**
**अहं त्वां सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुच ॥ ६६ ॥**

आशा जैसी दुःखातें । व्याली निंदा दुरितें ।
हें असो जैसें दैन्यातें । दुर्भरत्व ॥ ८१ ॥
तैसें स्वर्गनरकसूचक । अज्ञान वियालें धर्मादिक ।
तें सांडूनि घालीं अशेख । ज्ञानें एणें ॥ ८२ ॥
हातिं घेउनि तो दोरु । सांडिजे जैसा सर्पाकारु ।
कां निद्रात्यागें घराचारु । स्वप्निचा जैसा ॥ ८३ ॥

नाना सांडिलेनि कवळें । चंद्राचें लोपे पीवळें ।
व्याधित्यागें कडुवाळे— । पण मुखाचें ॥ ८४ ॥
आगा दिवसा पाठि देउनि । मृगजळ घापे त्यजूनि ।
कां काष्ठत्यागें वन्हि । त्याजिजे जैसा ॥ ८५ ॥
तैसें धर्माअधर्माचें टवाळ । दावी अज्ञाना कां जें मूळ ।
तें त्यजूनि त्यजीं सकळ । धर्मजात ॥ ८६ ॥
मग अज्ञान निमालेयां । मी चि एकु असें आपैसेया ।
सनिद्र स्वप्न गेलेयां । आपणपें जैसें ॥ ८७ ॥
तैसा एकु मी वांचौनि कांहिं । मग भिन्नाभिन्न आन नाहिं ।
स्वयंबोधें तेयाचा ठांइं । अनन्यु होयें ॥ ८८ ॥
पैं आपुलेनि भेदें विण । माझें जाणिजे एकपण ।
त्या चि नावें शरण । मज एणें गा ॥ ८९ ॥
ह्मणौनि घटाचेनि नासें । गगन चि गगनीं असे ।
मज शरण एणें तैसें । ऐक्यें करीं ॥ १३९० ॥
सुवर्णमणि सोनेयां । ए कल्लोळु जैसा पाणियां ।
तैसा मज धनंजया । ए शरण तूं ॥ ९१ ॥
वांचौनि सागराचां पोटीं । वडवानळ शरण किरीटी ।
जाळों न ठाके तिया गोठीं । जाळी देख पां ॥ ९२ ॥
मज शरण रिगिजे । आणि जीवत्वें असिजे ।
धिगी बोलिया या न लजे । प्रज्ञा केवि ॥ ९३ ॥
आगा प्राकृतां ही राया । आंगि पडे जें धनंजया ।
तें दाशिरुं हिं किं तेया । मान्य होये ॥ ९४ ॥
मा मीं विश्वेश्वर भेटें । आणि जीवग्रंथि न सुटे ।
हे बोल नको उखटे । कानीं लाउं ॥ ९५ ॥
ह्मणौनि मी होउनि मातें । सेवणें असे आइतें ।
तरि करिं हाताइतें । ज्ञानें एणें ॥ ९६ ॥

मग ताकौनियां काढिलें । लोणिं ताकिं माघौतें घातलें ।
परि नेघपे चि काहिं केलें । ताकें जेवि ॥ ९७ ॥
लोह उभें खाये माती । तें परिसाचेया संगती ।
सोनें जालेयां पुडुतीं । न लिंपिजे मळीं ॥ ९८ ॥
हें असो काष्टा पासौनि । मथूनि घेतलेयां वन्हि ।
मग काष्टें हिं कोंडौनि । न ठके जैसा ॥ ९९ ॥
तैसें अद्वैतत्वें मज । शरण रिगालेयां तुज ।
धर्माधर्म हे साहाज । लागतील नां ॥ १४०० ॥
अर्जुना काइ दिनकरु । देखतसे अंधकारु ।
किं प्रबोधां होये गोचरु । स्वप्नसंभ्रमु ॥ १ ॥
तैसें मजसिं एकवटलेयां । मी सर्व रूप वांचौनियां ।
आन काहिं उरावेया । कारण असे गा ॥ २ ॥
ह्मणौनि तेयाचें काहिं । न चिंतीं आपुलां ठांइं ।
तूझें पापपुण्य पाहिं । मी चि होइन ॥ ३ ॥
जळिं पडिलेयां लवण । सवैं जळ चि होये विचक्षण ।
तुज मी अनन्यशरण । होईन तैसा ॥ ४ ॥
तेथ सर्वबंधलक्षणें । पापें उरावें दूजेपणें ।
तें माझे बोधिं वायाणें । होउनि जाइल ॥ ५ ॥
एतुलेनि आपैसेया । सूटला चि अससि धनंजया ।
घेइं मी प्रकाशूनियां । सोडवीन तूतें ॥ ६ ॥
यया कारणें पुडुतीं । हें आधीं न व्हाये चित्तीं ।
मज एकासि ए सुमती । जाणौनि शरण ॥ ७ ॥
ऐसें सर्वरूपें रूपसें । सर्वदृष्टी डोलसें ।
सर्वदेवनिवासें । बोलिलें कृष्णें ॥ ८ ॥
मग सावळा सकंकणु । बाहु पसरूनि दक्षणु ।
आलंगिला स्वशरणु । भगतराजु तो ॥ ९ ॥

तन्मयता जेयातें । काखे सूनि बुद्धितें ।
बोलणें मार्घौतें । ऊसरलें ॥ १४१० ॥
ऐसें जें काहिं एक । बोला बुद्धी ही अटक ।
तें देयावेया मीख । क्षेमाचें केलें ॥ ११ ॥
दीपें दीपु लाविला । तैसा परिससंगु तो जाला ।
द्वैत न मोडितां केला । आपणपें पार्थु ॥ १२ ॥
तेधवां सुखाचा मग तेया । पुरु आला जो धनंजया ।
तेथ वाडु तन्हीं बुडौनियां । ठेला देऊ ॥ १३ ॥
सिंधु सिंधुतें पाऊ जाए । तें पाहणें ठाकणें दूण होए ।
वरि रिगे पुरवणिये । आकाश ही ॥ १४ ॥
तैसें दोहिंचें तेयां मीळणें । दोघां नावरे जाणावें कवणें ।
किंबहुना नारायणें । विश्व कोंदलें ॥ १५ ॥
एवं वेदाचें मूलसूत्र । सर्वाधिकारैकपवित्र ।
श्रीकृष्णें गीताशास्त्र । प्रकट केलें ॥ १६ ॥
एथ गीता मूल वेदां । ऐसें केवि आलें पां बोधा ।
हें ह्मणा तरि प्रसिद्धा । उपपत्ती सांघों ॥ १७ ॥
तरि जेयाचेनि श्वासीं । जन्म जालें शद्वराशी ।
तो सत्यप्रज्ञ पैजेसीं । बोलिला हे ॥ १८ ॥
ह्मणौनि वेदा मूलभूत । गीता ह्मणों हें होये उचित ।
आणिकि ही एकि एथ । उपपत्ति असे ॥ १९ ॥
जें न नसत स्वरूपें । जेयाचा विस्तारु जेथ लपे ।
तें तेयाचें ह्मणिपे । बीज जगीं ॥ १४२० ॥
तरि कांडत्रयात्मकु । शद्वराशि अशेखु ।
गीते माझि असे रूंखु । बीजीं जैसा ॥ २१ ॥
ह्मणौनि वेदांचें बीज । श्रीगीता होये हें मज ।
गमे आणि साहाज । दीसत ही असे ॥ २२ ॥

जें वेदांचे तीन्ही भाग । गीते उमटले असति चांग ।
भूषणरत्निं सर्वांग । आपुलें जैसें ॥ २३ ॥
तियें चि कर्मादिकें तीन्हीं । कांडें कोणी कोणी स्थानीं ।
गीते असति तियें नयनीं । दाखउं आइकां ॥ २४ ॥
तरि पहिला जो अध्याउ । तो शास्त्रप्रवृत्तिप्रस्ताउ ।
द्वितीये सांख्यसद्भाउ । प्रकाशिला ॥ २५ ॥
मोक्षदानिं स्वतंत्र । ज्ञानप्रधान हें शास्त्र ।
येतुलालें दूजां सूत्र । उभारिलें ॥ २६ ॥
मग अज्ञानें बांधलेयां । मोक्षपदिं बैसावेया ।
साधनां आरंभु तो तृतीया । अध्याइं बोलिला ॥ २७ ॥
जें देहाभिमानबंधें । सांडूनि काम्यें निषिद्धें ।
विहित परि अप्रमादें । अनुष्ठावें ॥ २८ ॥
ऐसेनि कर्म करावें । हा तीजां अध्याइं जो देवें ।
निर्णयो केला तो जाणावें । कर्मकांड एथ ॥ २९ ॥
आणि तें चि नित्यादिक । अज्ञानाचें आवश्यक ।
आचरतां मोचक । केवि होये पां ॥ १४३० ॥
ऐसी अपेक्षा जालेयां । बद्धु मुमुक्षते आलेयां ।
देवें ब्रह्मार्पणक्रिया । सांघीतली ॥ ३१ ॥
जें देहवाचामानसें । विहित निफजे जैसें ।
तें एका चि ईश्वरोदेशें । कीजे ह्मणितलें ॥ ३२ ॥
हें चि ईश्वरीं कर्मयोगें । भजनकथनाचेनि खागें ।
आदरिलें शेषभागें । चतुर्थाचेनि ॥ ३३ ॥
तें विश्वरूप अकरावा । अध्याउ संपे जेथ आघवा ।
तवं कर्मीं ईशु भजावा । हें जें बोलिलें ॥ ३४ ॥
तें अष्टाध्याइं उघड । जाणा एथ देवताकांड ।
शास्त्र सांघतसे आड । मोडूनि बोलें ॥ ३५ ॥

आणि तेणें चि ईशप्रसादें । श्रीगुरुसंप्रदायलब्धें ।
साच ज्ञान उद्बोधें । कोवळें जें ॥ ३६ ॥
तें अद्वेष्टादिप्रभृतिकीं । अथवा अमानित्वादिकिं ।
वाढविजे ह्मणौनि लेखीं । बारावां गुणु ॥ ३७ ॥
तो बारावां अध्याउ आधीं । आणि पन्हरावा अवधि ।
ज्ञानफलसिद्धी । निरूपणांसी ॥ ३८ ॥
ह्मणौनि चहूं इहीं । ऊर्ध्वमूलांतीं अध्यायिं ।
ज्ञानकांड इयें ठांइं । निरूपिजे ॥ ३९ ॥
एवं कांडत्रयनिरूपणी । श्रुति हे कोडीसवाणी ।
गीतापदरत्नाचिं लेणीं । लेइली असे ॥ १४४० ॥
हें असो कांडत्रयात्मक । श्रुति मोक्षरूप फल एक ।
बोबाये जें आवश्यक । टाकावेया ह्मणौनि ॥ ४१ ॥
तेयाचेनि साधनें ज्ञानेंसिं । वैर कारि जो प्रतिदिवसीं ।
तो अज्ञान वर्गु षोडशीं । प्रतिपादिजे ॥ ४२ ॥
तो चि शास्त्रउल्लावा । घेउनि वैरी जीणावा ।
हा निर्णयो तो सतरावां । अध्याउ एथ ॥ ४३ ॥
ऐसा प्रथमा लागौनि । सतरावां लाणि करूनि ।
आत्मनिश्वास विवरूनि । दाविला देवें ॥ ४४ ॥
तेयां अर्थजातां अशेषां । केला तात्पर्याचा एवांका ।
तो अठरावां देखां । कलशाध्याउ ॥ ४५ ॥
एवं सकलसांख्यसिंधु । श्रीभगवद्गीता प्रबंधु ।
हा औदार्यें आगला वेदु । मूर्त्तु जाणा ॥ ४६ ॥
वेदु संपन्न होये ठांइं । पारि कृपणु आन नाहीं ।
जें कानिं लागला तिहिं । वर्णाचां चि ॥ ४७ ॥
एरां भवव्यथा ठेलेयां । स्त्रीशूद्रादिकां प्राणियां ।
अनवसरु मांडूनियां । असे नव्हे ॥ ४८ ॥

तरि मज पांतां तें उणें । फेडावेया गीतापणें ।
वेदु वेठला भलेतेणें । सेव्यु होआवेया ॥ ४९ ॥
नव्हे अर्थें रिगौनि मनिं । श्रवणें लागौनि कानीं ।
जपमीखें वदनीं । वसौनियां ॥ १४५० ॥
गीतेचा पाठु जाणे । तयाचेनि सांघातीपणें ।
गीता लीहुनु वाहाणें । पुस्तकमीखें ॥ ५१ ॥
ऐसैसां मीसकटां । संसाराचां चौहटां ।
गवांदि घातली चोखटा । मोक्षसुखाची ॥ ५२ ॥
परि आकाशिं वसावेया । पृथ्वी वरि बैसावेया ।
रविदीप्ति राहाटावेया । आवारु जैसें ॥ ५३ ॥
तेवि उत्तम अधम ऐसें । सेवितां कव्हणातें हिं न पुसे ।
कैवल्यदानें जैसें । निववी जग ॥ ५४ ॥
इया लागि मागिली कूटी । बिहाला वेदु गीतेचां पोटीं ।
रिगाला आतां गोमटी । कीर्ति पातला ॥ ५५ ॥
ह्मणौनि वेदांची सुसेव्यता । ते हे मूर्त्ति जाणा गीता ।
श्रीकृष्णें पांडुसुता । उपदेशिली ॥ ५६ ॥
परि वछाचेनि वोरसें । दुभतें होये घरा दोसें ।
जालें पांडवाचेनि मीसें । तैसें विश्वा ॥ ५७ ॥
चातकाचिये कणवे । मेघु पाणियेंसिं धांवे ।
तेथ चराचर आघवें । निवालें जेवि ॥ ५८ ॥
कां अनन्यगती कमळां । लागि सूर्यु ए वेळोवेळां ।
किं सुखिया होइजे डोळां । त्रिभुवनाचेया ॥ ५९ ॥
तैसें अर्जुनाचेनि व्याजें । गीता प्रकाशूनि श्रीराजें ।
संसारा एसणें थोर वोझें । फेडिलें जगाचें ॥ १४६० ॥
सर्वशास्त्रा रत्नदीप्ती । उजलिता हा त्रीजगती ।
सूर्यु नव्हे लक्ष्मीपती । वक्त्राकाशिचा ॥ ६१ ॥

बापु कुळ तें पवित्र । जेथिचा पार्थु येया पात्र ।
जेणें गीता केलें शास्त्र । आवारुं जगा ॥ ६२ ॥

**इदं ते नातपस्काय नाभक्ताय कदाचन ॥**
**न चाशुश्रूषवे वाच्यं न च मां योऽभ्यसूयति ॥ ६७॥**

हें असो मग तेणें । सद्गुरुश्रीकृष्णें ।
पार्थाचें मिसळणें । आणिलें द्वैता ॥ ६३ ॥
पाठिं ह्मणतसे पांडवा । शास्त्र हें मानलें कीं जीवा ।
तेथ येरु ह्मणे देवा । आपुलीया कृपा ॥ ६४ ॥
तरि निधान जोडावेया । भाग्य घडे गा धनंजया ।
परि जोडलें भोगावेया । विपायें होये ॥ ६५ ॥
पैं क्षीरसागरा एवडें । अविरजीं दूधाचें भांडें ।
सुरां असुरां केवडें । मथितां जालें ॥ ६६ ॥
ते सायास ही फळा आले । जें अमृत डोळां देखिलें ।
परि वरिचिली चूकले । जतनें तिए ॥ ६७ ॥
जेथ अमरत्वा उग्गरिलें । तें मरणा चि लागि जालें ।
भोगु नेणतां जोडलें । ऐसें असे ॥ ६८ ॥
नहुषु स्वर्गप्राप्ति जाला । परि राहाटी भांभावला ।
तो भुजंगत्व पातला । नेणसि काई ॥ ६९ ॥
ह्मणौनि बहू पुण्य तुआं । केलें धनंजया ।
आजि शास्त्रराजा येया । जालासि विषो ॥ १४७० ॥
तरि येया चि शास्त्रचेनि । संप्रदायें पांगुरौनि ।
शास्त्रार्थु हा नीकेनि । अनुष्ठीं हो ॥ ७१ ॥
यऱ्हवि अमृतमथनां । सारिखें होईल अर्जुना ।
जरि रिगसी अनुष्ठाना । संप्रदायें विण ॥ ७२ ॥
गाये धड जोडे गोमटी । ते तैं चि पियों ये किरीटी ।
जैं जाणिजे हातवटी । सांजवणिची ॥ ७३ ॥

तैसा गुरु प्रसन्न होए । शिश्यु विद्या ही किर लाहे ।
परि ते फळे संप्रदायें । उपासिली ॥ ७४ ॥
ह्मणौनि शास्त्रिं जो इये । उचित संप्रदाओ आहे ।
तो तो आइक बहुवें । आदरेंसीं ॥ ७५ ॥
तरि जें हें तुवां पार्था । गीताशास्त्र लाधलें आस्था ।
तें तपोहीना सर्वथा । सांगावें ना ॥ ७६ ॥
अथवा तापसु ही जाला । परि गुरुभक्ती जो भीला ।
तो वेदुं अंत्यु वाळिला । तैसा वाळीं हो ॥ ७७ ॥
नातरि पुरोडासु जैसा । नेघेपे वृद्धु तऱ्हीं वायंसा ।
गीता नेंदीं तैसी तापसा । गुरुभक्ती हीनां ॥ ७८ ॥
कां तप ही जोडे देहीं । भजे गुरुदेवाचां ठांइं ।
परि आकर्णनिं नाहिं । चाड जरि ॥ ७९ ॥
तरि तो मागिलीं दोहिं आंगिं । उत्तमु होये किर जगिं ।
परि येया श्रवणा लागि । योग्यु नोहे ॥ १४८० ॥
मुक्ताफळ भलेतैसें । होये परि मुख नसे ।
तवं गुणु प्रवेशे । तेथ काइ ॥ ८१ ॥
सागरु गंभीरु होए । हें कोण ना ह्मणत आहे ।
परि वृष्टि वायां जाए । जाली तेथ ॥ ८२ ॥
धालेया दिव्यान्न सोआवें । मग जें वायां धाडावें ।
तें आर्त्तीं कां न करावें । उदारपण ॥ ८३ ॥
ह्मणौनि योग्या भलेतैसें । होंतु परि चाड नसे ।
तरि ज्ञानें वानवसें । देंसी हें तेया ॥ ८४ ॥
रूपाचा सुजाणु डोळा । वोडौं ये काइ परिमळा ।
जेथ जें मानें तें फळा । तेथ चि ये गा ॥ ८५ ॥
ह्मणौनि तपीं भक्ती । पाहा ते सुभद्रापती ।
शास्त्रश्रवणिं अनाकृती । वाळावे चि ते ॥ ८६ ॥

नातरि तप भक्ति । होउनि श्रवणीं आर्त्ति ।
आथि ऐसी आइती । देखसी जऱ्हीं ॥ ८७ ॥
तऱ्हीं गीताशास्त्रनिर्मिता । जो मीं सकललोकु शास्ता ।
तेया मातें सामान्यता । बोलैल जो ॥ ८८ ॥
माझा सज्जनीं मातें । पैशून्याचेनि अव्हातें ।
एकाहाथी तेयातें । योग्यु न ह्मण ॥ ८९ ॥
तेयाची परि आघवी । सामग्री ऐसी जाणावी ।
दीपें विण ठाणवी । रात्रिची जैसी ॥ १४९० ॥
आगा गोरें आणि तरुणें । वरि लेइलें असे भूषणें ।
परि एकलेनि प्राणें । सांडिलें जेवि ॥ ९१ ॥
सोनेयाचें सुंदर । निर्वाललें होये घर ।
परि सर्पांगना द्वार । रुंधलें असे ॥ ९२ ॥
निफजे दिव्यान्न चोखट । परि माझि असे कालकूट ।
हें असो मैत्री कपट— । गुर्विंगी जैसी ॥ ९३ ॥
तैसिं तपभक्तिमेधा । तेयाचिं जाण प्रबुद्धा ।
जो माझेयाची कां निंदा । माझी चि करी ॥ ९४ ॥
येया कारणें धनंजया । तो भक्तु मेधावी तपिया ।
तऱ्हीं नको बापा शास्त्रा इया । आतळों देवों ॥ ९५ ॥
काइ बोलों निंदका । योग्या स्रष्टेया ही एका ।
गीता हे कवतिका । लागि ही नेदों ॥ ९६ ॥
ह्मणौनि तपाचा धनुर्द्धरा । तळीं दाटौनि गाडौरा ।
वरि गुरुभक्तिचा पुरा । प्रासादु जो जाला ॥ ९७ ॥
आणि श्रवणेचा पुढां । दारवठा सदा उघडा ।
वरि कलसु चोखडा । अनिंदरत्नाचा ॥ ९८ ॥
ऐसां भक्तालइं चोखटीं । गीतारत्नेश्वर हा प्रतिष्ठीं ।
मग माझिया सर्वसाठीं । तूकसी जगीं ॥ ९९ ॥

**य इमं परमं गुह्यं मद्भक्तेष्वभिधास्यति ॥**
**भक्तिं मयि परां कृत्वा मामेवैष्यत्यसंशय ॥ ६८ ॥**

कां जें एकाक्षरपणोंसिं । त्रिमातृकेचिये कूंसी ।
प्रणवु होंता गर्भवासीं । सांकडला जो ॥ १६०० ॥
तो गीतेचिया बाहाली । वेदबीज गेलें पाहालीं ।
किं गायत्री फुलीं फलीं । श्लोकाचां आली ॥ १ ॥
तें हें मंत्ररहस्य गीता । मेलवी माझेयां जो भक्तां ।
अनन्यजीविता माता । बालका जैसी ॥ २ ॥
तैसी भक्तां गीतेसिं । भेटि करी जो आदरेंसीं ।
तो देहा पाठिं मजसीं । एक चि होए ॥ ३ ॥

**न च तस्मान्मनुष्येषु कश्चिन्मे प्रियकृत्तमः ॥**
**भविता न च मे तस्मादन्यः प्रियतरो भुवि ॥ ६९ ॥**

आणि देहाचें हिं लेणें । लेउनि वेगलेपणें ।
असे तवं जीवें प्राणें । तो चि पढियें ॥ ४ ॥
ज्ञानियां कर्मठां तापसां । इयां खूणेचियां माणुसां ।
माझि तो एकु ऐसा । पढियें मज ॥ ५ ॥
तैसा भूतलिं अघवा । आनु नेदखें पांडवा ।
जो गीता सांघे मेलावा । भक्तजनाचां ॥ ६ ॥

**अध्येष्यते च य इमं धर्म्यं संवादमावयोः ॥**
**ज्ञानयज्ञेन तेनाहमिष्टः स्यामिति मे मतिः ॥ ७० ॥**

मज ईश्वराचेनि लोभें । हें गीता पढतां अखोभें ।
जो मंडण होये सभे । संतांचिये ॥ ७ ॥
नवां पल्लविं रोमांचितु । मंदानीलें कंपवितु ।
आनंदजलें अव्लंबवितु । फलांचे डोले ॥ ८ ॥
कोकिलां कलरवाचेनि मीसें । सद्गद बोलवित जैसें ।
वसंतु कां प्रवेशे । आरामा माझि ॥ ९ ॥

कां जन्माचें फळ चकोरां । होंतु चंद्रु ये अंबरा ।
नाना नवा मेघु मयूरां । वो देंतु पावे ॥ १५१० ॥
तैसा सज्जनाचां मेळापिं । गीतापद्यरत्नीं उमपीं ।
बर्षे जो माझां रूपीं । हेतु ठेउनि ॥ ११ ॥
मग तेयाचेनि पाडें । पढियंतें भज फुडें ।
नाहिं चि मागें पुढें । निहाळितां ॥ १२ ॥
अर्जुना हा ठावो वेन्हीं । मीं तेयांतें सुबें जिव्हारीं ।
जो गीतार्थाचें करी । परगुणें संतां ॥ १३ ॥
पैं माझिया तूझिया मिळणी । वाढिनली जे हें काहाणी ।
मोक्षुधर्मु कां जीणी । आला असे जेथ ॥ १४ ॥
तो हा सकळार्थप्रसादु । आह्मां दोघांचा संवादु ।
न करितां पदभेदु । पाठें जो पढे ॥ १५ ॥
तेणें ज्ञानानाळें प्रदीप्तीं । मूळ अविद्येचिया आहुती ।
तोखविला होये सुमती । परमात्मा मीं ॥ १६ ॥
धे्ऊनि गीतार्था उगाणा । ज्ञानिये जेंवि विचक्षणां ।
टाकिति तें गाणांवाणां । गीतेचां तो लाहे ॥ १७ ॥
गीतापाठकासि एसें । फळ अर्थज्ञाना चि सरिसें ।
गीतामाउलीसि नसे । जाणेंतानें ॥ १८ ॥

**श्रद्धावाननसूयश्च शृणुयादपि यो नरः ॥**
**सोपि मुक्तः शुभांल्लोकान्प्राप्नुयात्पुण्यकर्मणां ॥ ७१ ॥**

आणि सर्वमार्गीं निंदा । सांडूनि आस्था शुद्धा ।
गीताश्रवणीं श्रद्धा । उभारी जो ॥ १९ ॥
तेयाचां श्रवणसंपुटीं । गीतेचि अक्षरें पैठीं ।
होंति ना तवं उठाउठी । पळे चि पाप ॥ १५२० ॥
अटविये माझि जैसा । वन्हि रिगतां सहसा ।
लंघीति कां दिशा । वनौकें तियें ॥ २१ ॥

कां उदयाचळा कुळीं । झळकतां अंशुमाळी ।
तिमिरें अंतराळीं । हारपती ॥ २२ ॥
तैसा कानाचां महाद्वारीं । गीता जपु जेथ करी ।
तेथ श्रिष्टि आदि वेरी । जळे चि कलुष ॥ २३ ॥
ऐसी जन्मवेलि धोवट । होये पुण्यरूप चोखट ।
यया ही वरि अचाट । फळ लाहे ॥ २४ ॥
जो इये गीतेचिं अक्षरें । जेतुलीं कर्णद्वारें ।
घे तेतुलीं होंती पुरे । अश्वमेध किं ॥ २५ ॥
म्हणौनि श्रवणें पापें जांती । आणि धर्मु धरी उन्नती ।
तेणें स्वर्गराज्यसंपती । लाहे चि शेषीं ॥ २६ ॥
तो पैं मज येयावेया लागि । पहिलें पेणें कारि स्वर्गीं ।
मग आवडे तवं भोगी । पाठीं ए चि तो ॥ २७ ॥
ऐसी गीता धनंजया । आइकतेया पढतेया ।
फळे महानंदें मियां । बहुत काइ बोलों ॥ २८ ॥

**कच्चिदेतच्छ्रुतं पार्थ त्वयैकाग्रेण चेतसा ।**
**कच्चिदज्ञानसंमोहः प्रनष्टस्ते धनंजय ॥ ७२ ॥**

एया कारणें असो । जेया लागि शास्त्रअतिसो ।
केला तें तवं तूतें पूसों । काज तूझें ॥ २९ ॥
तरि सांघ पां पांडवा । हा शास्त्रसिद्धांतु आघवा ।
तुज एकचित्तें फावा । गेला आहे ॥ १९३० ॥
आम्हिं जैसें हें जिया रीतीं । उगाणिलें कानाचां हातीं ।
इहिं तैसें तूझां चित्तीं । पैठें केलें किं ॥ ३१ ॥
हांगा स्वज्ञानजनितें । मागिलें मोहें तूतें ।
भुलविलें तो एथें । असे कीं ना ॥ ३२ ॥
हें बहू पूसों काइ । सांघैं तूं आपुलां ठांइं ।
कर्माकर्म काहीं । देखतु आहासि ॥ ३३ ॥

पार्थु स्वानंदैकरसें । विरैल ऐसा भेददशे ।
आणिला एणें मीसें । प्रश्णाचेनि ॥ ३४ ॥
यऱ्हवीं आपुलें करणें । सर्वज्ञ काइ तो नेणें ।
परि केलें पूसणें । या चि लागि ॥ ३५ ॥

**अर्जुन उवाच ॥**

**नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाच्युत ।**
**स्थितोऽस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव ॥ ७३ ॥**

मग क्षीराब्धितें सांडितु । गगनीं पूंजा मांडितु ।
निवडे जैसा न निवडितू । पूर्णचंद्रु ॥ ३६ ॥
तैसा ब्रह्म हें मीं विसरें । तेथ जग चि ब्रह्में भरे ।
हें इं सांडे तरि विरे । ब्रह्मपण हीं ॥ ३७ ॥
दुःखें देहाचिये सीमे । मी अर्जुनु एणें नामें ।
मोडतु मांडतु ब्रह्में । उभा ठेला ॥ ३८ ॥
मग कांपतां करतळीं । दडपौनि रोमावळी ।
पुलकस्वेदजळीं । विरोनियां ॥ ३९ ॥
प्राणक्षोभें डोलतेया । आंगा आंग टेंकतेया ।
सुनि स्तंभुचालेया । भुलौनियां ॥ १५४० ॥
नेत्रयुगुळिचेनि उन्तें । आनंदामृताचें भरितें ।
उन्संडत तें माघौतें । काढौनियां ॥ ४१ ॥
विविधा औत्सुक्याची दाटि । चीप आतलि होंती कंठिं ।
ते करूनियां पैठी । हृदया माझि ॥ ४२ ॥
वाचेचें वितुळणें । सांवरौनि प्राणें ।
अक्रमाचें स्वसणें । ठेउनि ठांइं ॥ ४३ ॥
मग ह्मणे काइ देउ । पूसताति आवडे मोहो ।
तो सकु गेला जी ठाउ । घेउनि आपुला ॥ ४४ ॥

पासिं एउनि दिनकरें । डोळेयांतें अंधारें ।
पूसिजे हें काइ सरे । कोणी ठांइं ॥ ४५ ॥
तैसा तूं श्रीकृष्णा राया । आमचेयां इयां डोळेयां ।
गोचरु हें चि काइसेया । न पुरे तवं ॥ ४६ ॥
वारें लोभें माए पासौनि । तें सांघसि तोंड भरूनि ।
जें काइसेनि हिं करुनि । जाणों नैए ॥ ४७ ॥
आतां मोहो असे किं नाहिं । हें ऐसें पूससी काई ।
कृतकृत्य जाला पाहीं । तूझेपणें ॥ ४८ ॥
मी तूझेनि प्रसादें । लाधलेनि आत्मबोधें ।
मोहाचे तेया कांदे । नेंदिसी चि उरों ॥ ४९ ॥
आतां करणें न करणें । हें उठी जेणें दूजेपणें ।
तें तूं वांचौनि नेणें । सर्वत्र गा ॥ १५५० ॥
इये विखिं माझां ठांइं । संदेहाचें नूरे चि काहिं ।
त्रिशुद्धी कर्म जेथ नाहिं । तें मि जालां ॥ ५१ ॥
ह्मणौनि मी एक पाहुनि । कृय गेलें निपटौनि ।
परि आज्ञा हे वांचौनि । तूझी प्रभू ॥ ५२ ॥
कां जें दृश्यातें नासी । जें दूजें दूजेयातें ग्रासी ।
जें एक परि सर्वदेशीं । वसवी सदा ॥ ५३ ॥
जेयाचेनि संबंधें बंधु फीटे । जेयाचिया आशा आश तूटे ।
जें भेटलेयां सर्व भेटे । आपणगं चि ॥ ५४ ॥
तें तूं गुरुलिंग जी माझें । एकलेपणिचें विरजें ।
जेया लागि उल्लांडिजे । अद्वैतबोधु ॥ ५५ ॥
आपण चि होउनि ब्रह्म । सारिजे कल्पाकल्पाचें काम ।
मग कीजे कां निःसीम । सेवा जेयाची ॥ ५६ ॥
तें मां तूं निरुपचारु । सेव्य सकळां दातारु ।
मीं ब्रह्मतेचा उपकारु । हा चि मानीं ॥ ५७ ॥

जें मज तुह्मां आड । होतें भेदाचें कवाड ।
तें फेडूनि केलें सुआड । तुवां जी देवा ॥ ५८ ॥
तरि आतां तूझी आज्ञा । सकलदेवराज्ञा ।
करीन देइं अनुज्ञा । भलेतिये विषीं ॥ ५९ ॥
येया अर्जुनाचेया बोला । दे॰ डोलों लागला ।
ह्मणे विश्वफला जाला । लाभु हा मज ॥ १५६० ॥
उणेनि उभचला सुधाकरु । देखौनि आपुला कुमरु ।
मर्यादा क्षीरसागरु । विसरे चि ना ॥ ६१ ॥
ऐसें संवादाचा बाउलां । लग्न दोघांचेयां आंतुलां ।
लागलें देखौनि जाला । निर्भरु संजयो ॥ ६२ ॥

संजय उवाच ॥

इत्यहं वासुदेवस्य पार्थस्य च महात्मनः ॥
संवादमिममश्रौषमद्भुतं रोमहर्षणं ॥ ७४ ॥

तेणें उचंबललेपणें । मग धृतराष्ट्रतें ह्मणे ।
जी कैसें बादरायणें । रक्षिलों दोघे ॥ ६३ ॥
आजि तुमतें अवधारां । चर्मचक्षु ही सवंसारा ।
किं ज्ञानदृष्टी व्यवहारा । आणिलेति ॥ ६४ ॥
आणि रथिचिये राहाटी । घेइजे घोडेयां साठीं ।
तेया आह्मां इया गोटी । गोचरा होंति ॥ ६५ ॥
वरि जूझाचें निर्वाण । मांडलें असे दारुण ।
दोघींसि हारि आपण । हारविजे ऐसें ॥ ६६ ॥
एवडां इये सांकडां । कैसा अनुग्रहो पैं गाढा ।
जें ब्रह्मानंदु उघडा । भोगवीतसे ॥ ६७ ॥
ऐसें संजयो बोलिला । परि न द्रवे एरु उगला ।
चंद्रकिरणीं सीतला । पाखाणु जैसा ॥ ६८ ॥

हे देखौनि तेयाची दशा । मग कांरि चि ना वारिषा ।
पारि सुखें जाला पीसा । बोलतु असे ॥ ६९ ॥
भुलविला हर्षवेगें । ह्मणौनि धृतराष्ट्रा सांघे ।
यऱ्हवि नोहे तेया जोगें । हें किर जाणे ॥ १५७० ॥
मग ह्मणे पैं कुरुराजा । ऐसें भ्रातृपुत्र तो तूझा ।
बोलिला तें अधोक्षजा । गोड जालें ॥ ७१ ॥
आगा पूर्वापरसागर । इयां नावांचा सिनार ।
येर आघवें चि नीर । एक जैसें ॥ ७२ ॥
तैसा श्रीकृष्णु पार्थु ऐसें । हें आंगा चि पासीं दीसे ।
मग संवादीं जी नसे । काहीं चि भेदू ॥ ७३ ॥
दर्पणा हिं हूनि चोखें । दोन्हि होंति संमुखें ।
तेथ एरीं एर देखे । आपणपें जैसें ॥ ७४ ॥
तैसा देवेंसिं पांडुसुतु । आपणपें देवि देखतु ।
पांडवेंसिं देखे अनंतु । आपणपें पार्थीं ॥ ७५ ॥
देउ देवा भक्ता लागि । जिये विवरु नेदखे आंगि ।
येरु ही तिए चि भागीं । दोन्हीं देखे ॥ ७६ ॥
आणिक काहिं चि नाहिं । ह्मणोनि करिती काई ।
दोघे एकपणें पाहीं । नांदत आहाति ॥ ७७ ॥
आतां भेदु जरि मोडे । तरि प्रश्णोत्तर कां घडे ।
ना भेदू चि तरि जोडे । संवादसुख कां ॥ ७८ ॥
ऐसें बोलतां दूजेपणें । संवादें द्वैत जें गीळणें ।
तें आइकिलें बोलणें । दोघांचें मियां ॥ ७९ ॥
उटूनि दोन्हीं आरिसे । वोडविलेयां सरिसे ।
कोण कोणां पाहातसे । जाणवे ना ॥ १५८० ॥
कां दीपा सदमुखु । ठेविलेयां दीपकु ।
कोणु कोणा अधिकु । कोणु जाणे ॥ ८१ ॥

हें निद्रांरूं जातां फुडें । निद्रारासि ठक पडे ।
ते दोघे जाले एवडे । संवादें सारिसे ॥ ८२ ॥
तैसे श्रीकृष्ण ते दोन्हीं । संवादले तें मनीं ।
धरितां मज ही वानीं । ते चि हों पांतसे ॥ ८३ ॥
ऐसें ह्मणे ना मोटकें । तवं हींरौनि सात्विकें ।
आठौ नेला नेणों कें । संजयपणांचा ॥ ८४ ॥
रोमांच जवं फरके । तवं तवं आंग सुरके ।
स्तंभस्वेदातें जींके । एकला कंपु ॥ ८५ ॥
अद्वयानंदपरिसें । दृष्टि रसमय जाली असे ।
ते अश्रु नव्हंति जैसे । द्रवत्व चि ॥ ८६ ॥
नेणों काइ न माये पोटीं । काइ नेणों गुंपे कंठिं ।
व्यग्रता पडे मिठी । उससाचिया ॥ ८७ ॥
किंबहुना सात्विकां आठां । चाचरु मांडतां उमेठा ।
संजय जाला असे चौहटा । भावभवनिचा ॥ ८८ ॥
तेया सुखाची ऐसी जाति । जें आपणपां चि धरी शांति ।
मग पुडुतीं देहस्मृति । लाधली तेणें ॥ ८९ ॥

**व्यासप्रसादाच्छ्रुतवानेतद्गुह्यमहं परं ॥**
**योगं योगेश्वरात्कृष्णात्साक्षात्कथयतः स्वयं ॥ ७५ ॥**

तेधवां बैसतेन आनंदें । ह्मणे जी जें उपनिषदें ।
नेणति तें व्यासप्रसादें । आइकिलें मियां ॥ १५९० ॥
हे आघवे चि योग । जेया ठाया यंति मार्ग ।
तेयाचें वाक्य समर्घ । केलें व्यासें ॥ ९१ ॥
आहो अर्जुनाचेनि मीसें । आपणपें चि दूजें ऐसें ।
नटूनि आपणेयां दोसें । बोलिले जें देवो ॥ ९२ ॥
तेथ किं माझे श्रोत्र । पाठाचें जालें पात्र ।
काइ वानूं स्वतंत्र । सामर्थ्य गुरुचें ॥ ९३ ॥

**राजन्संस्मृत्य संस्मृत्य संवादमिममद्भुतं ॥**
**केशवार्जुनयोः पुण्यं हृष्यामि च मुहुर्मुहुः ॥ ७६ ॥**

हें बोलतां कां राउ॰ होए । तेणें चि मोडवला ठाए ।
रत्न कां रत्नकीळा ए । झांकोळें जैसें ॥ ९४ ॥
हिमवंतिचिं सरोवरें । चंद्रोदइं होंति काश्मिरें ।
मग सूर्यागमीं माघारें । द्रवत्व ए ॥ ९५ ॥
तैसा शरीराचेया स्मृतीं । तो संवादु संजयो चित्तीं ।
धरुनि आणि पुडुतीं । तें चि होए ॥ ९६ ॥

**तच्च संस्मृत्य संस्मृत्य रूपमत्यद्भुतं हरेः ॥**
**विस्मयो मे महान्राजन्हृष्यामि च पुनः पुनः ॥ ७७ ॥**

मग उठूनि ह्मणे नृपा । श्रीहरिचेया विश्वरूपा ।
भेटलेयां उगा पां । काइ असिजे ॥ ९७ ॥
नेदखणेन जें दीसे । नाहिंपण चि जें असे ।
विसरें आठवे तें कैसें । चुकौं आतां ॥ ९८ ॥
देखौनि चमत्कारु । कीजे तो नाहिं पैसारु ।
मजै सकट हा पूरु । नेंत असे ॥ ९९ ॥
ऐसा श्रीकृष्णार्जुन— । संवादसंगमिं स्नान ।
करूनि देंतसें दान । अहंतेचें ॥ १६०० ॥
तेथ असंवरें आनंदें । अलौकिक ही स्पंदें ।
श्रीकृष्णु ह्मणे सद्गदें । वेळवेळां ॥ १ ॥
इया अवस्थांची काहीं । कौरवांतें पारि नाहिं ।
ह्मणौनि राया तें काहिं । कल्पावें जवं ॥ २ ॥
तवं जाला सुखलाभु । आपणपां करुनि स्वयंभु ।
बुझविला अवष्टंभु । संजयें तेणें ॥ ३ ॥
एथ कोण्हीं एकि अवसरि । होवावी ते करूनि दूरि ।
रावो ह्मणे संजया परि । कैसी तूझी गा ॥ ४ ॥

तेणें तूंतें एथ व्यासें । बैसविलें काइसेया दोसें ।
अप्रसंगा माजि ऐसें । बोलसी काइ ॥ ५ ॥
रानिचें राउला नेलेयां । दाही दिशा मानी सुनियां ।
कां रात्रि होये पाहालेयां । निशाचरां ॥ ६ ॥
जो जेथिचें गौरव नेणे । तेयातें भिंगुलवाणें ।
ह्मणौनि अप्रसंगु तेणें । ह्मगावा किं तो ॥ ७ ॥
मग ह्मणे सांवैं प्रस्तुत । उदैलें असे जें हें उत्कलित ।
तें कोणासि रे बा जैत । देईल शेषीं ॥ ८ ॥
यऱ्हवीं विश्वे बहुत एक । आमचें ऐसें मानसिक ।
जें दुर्योधनाचे अधिक । प्रताप सदा ॥ ९ ॥
आणि एरांचेनि पाडें । दल ही तें देवडें ।
ह्मणौनि जैत फुडें । आणील तो तें ॥ १६१० ॥
आह्मा तवं गमे ऐसें । मां तूझें जोईस कैसें ।
तें नेणों संजया असे । तैसें सांव पां ॥ ११ ॥

**यत्र योगीश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्द्धरः ॥**
**तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ॥ ७८ ॥**

यया बोला संजयो ह्मणे । जी येरायेरांचें मीं नेणें ।
परि आयुष्य तेथ जीणें । हें फुडें गा ॥ १२ ॥
चंद्रु तेथ चंद्रिका । शंभु तेथ अंबिका ।
संत तेथ विवेका । असणें कीं जी ॥ १३ ॥
रावो तेथ कटक । सौजन्य तेथ सोइरिक ।
वन्हि तेथ दाहक । सामर्थ्यता ॥ १४ ॥
दया तेथ धर्मु । धर्मु तेथ सुखागमु ।
सुखीं पुरुषोत्तमु । असे जैसा ॥ १५ ॥
वसंतु तेथ वनें । वनें तेथ सुमनें ।
सुमनीं पालेगनें । सारंगांचिं ॥ १६ ॥

गुरु तेथ ज्ञान । ज्ञानिं आत्मदर्शन ।
दर्शनीं समाधान । आथि जैसें ॥ १७ ॥
भाग्य तेथ विलासु । सुख तेथ उल्हासु ।
हें असो तेथ प्रकाशु । सूर्यो जेथें ॥ १८ ॥
तैसे सकल पुरुषार्थ । जेणें स्वामी कां सनाथ ।
तो श्रीकृष्णराऊ जेथ । तेथ लक्ष्मी ॥ १९ ॥
आणि आपुलेनि कांतेंसिं । ते जगदंबा जया पासिं ।
अणिमादिकी दासी । नो होंतु तेयातें ॥ १६२० ॥
तेयांचिये देशिचां झाडिं । कल्पतरुतें होडीं ।
न जीणावें काइ थोडीं । मायबापें ॥ २१ ॥
ते पाषाण हिं आघवे । चिंतारत्नीं कां नोहावें ।
तिये भूमी कां नैयावें । सुवर्णत्व ॥ २२ ॥
तेयांचिये गाविंचिया । नदी अमृतें वाहाविया ।
नवल काइ राया । विचारिं पां ॥ २३ ॥
तेयांचे त्रिसाट शब्द । सुखां ह्मणों यंति वेद ।
सदेह सच्चिदानंद । कां न व्हावे ते ॥ २४ ॥
पैं स्वर्गापवर्ग दोन्हीं । इयें पदें तियां आधिनि ।
श्रीकृष्णु बापु जननी । कमला जेयां ॥ २५ ॥
ह्मणौनि जिये बाहे उभा । तो लक्ष्मीयेचा वाल्लभा ।
तेथ सर्वसिद्धी स्वयंभा । एर नेणों ॥ २६ ॥
आणि समुद्रा मेघु । उपेगें तेया ही हुनि चांगु ।
तैसा पार्थी आजि लागु । असे तिये ॥ २७ ॥
कनकत्वदीक्षागुरु । लोहा परिसु होये कीरु ।
परि जगा पोसिता व्यवहारु । तें चि जाणे ॥ २८ ॥
एथ गुरू यंतसे उणें । ऐसें ज्ञनें हें कोण्हीं ह्मणे ।
तन्हि प्रकाशु दीपपणें । प्रकाशी आपुलां ॥ २९ ॥

तैसा देवाचिया शक्ती । पार्थु देवासी चि बहुती ।
परी माने इये स्तुती । गौरव असे ॥ १६३० ॥
आणि पुत्रें मी सर्वगुणीं । जीणांवा हे बापु श्रियाणी ।
करी तैसा सारंगपाणी । फला आला ॥ ३१ ॥
किंबहुना ऐसा नृपा । पार्थु जाला असे कृष्णकृपा ।
तो जिया कडे साक्षेपा । रिती प्राहे ॥ ३२ ॥
तो चि गा विजयासि ठावो । एथ कोणु तुज संदेहो ।
तेथ न ए तरि वावो । विजयो चि होये ॥ ३३ ॥
ह्मणौनि जेथ श्रीमंतु । आणि जेथ पांडुचा सुतु ।
तेथ विजयो समस्तु । अभ्युदयो तेथ ॥ ३४ ॥
जरि व्यासाचेनि साचें । मानी मन तुमचें ।
तरि या बोलाचें । ध्रुव चि माना ॥ ३५ ॥
जेथ तो श्रीवल्लभु । जेथ तो भक्तकदंबु ।
जेथ सुखें तेथ लाभु । मंगलांचा ॥ ३६ ॥
या बोला आन होये । तरि व्यासाचा अंकु न व्हाए ।
ऐसें गाजौनि बाहे । उभिली तेणें ॥ ३७ ॥
एवं भारताचा एवांका । आणूनि अक्षरा एका ।
संजयें कुरुनायका । दीधला हातिं ॥ ३८ ॥
जैसा नेणों केवडा वन्हि । कां परि गुणाग्निं ठेउनिं ।
आणिजे सूर्याची हाणी । निस्तरावेया ॥ ३९ ॥
तैसें शद्बब्रह्म अनंत । जालें सवा लक्षु भारत ।
भारताचें सतें सात । सर्वस्व गीता ॥ १६४० ॥
तेयां हिं सातां शतांचा । इत्यर्थु हा श्लोकु शेषिचा ।
व्यासशिष्यसंजयाचा । पूर्णोद्गारु हा ॥ ४१ ॥
एणें एकें चि श्लोकें । राहे तेणें अलिकें ।
अविद्याजाताचें नीकें । जींतलें होए ॥ ४२ ॥

ऐसियां श्लोकां सें सात । गीतेचिं पदें आंगें वाहात ।
पदें ह्मणों किं अमृत । गीताकाशिचें ॥ ४३ ॥
किं आत्मराजाचिये सभे । गीते उभविले खांबे ।
मज श्लोक प्रतिभे । ऐसे एंती ॥ ४४ ॥
किं गीता हे सप्तशती— । मंत्रप्रतिपाद्य भगवती ।
मोहमहिषमुक्ती । आनंदली असे ॥ ४५ ॥
ह्मणौनि मनें कानें वाचा । जो सेवकु होईल इयेचा ।
तो स्वानंदसाम्राज्यींचा । चक्रवर्ति करी ॥ ४६ ॥
किं अविद्यातिमिररोखें । श्लोक सूर्याचें सावाइकें ।
खेळविलें गीतामीखें । रायें श्रीकृष्णें ॥ ४७ ॥
किं श्लोकाक्षरद्राक्षलता । मांडौ जाली आहे गीता ।
संसारपथश्रांता । विसावांवेया ॥ ४८ ॥
किं सभाग्यसंतीं भ्रमरीं । केले ते श्लोक कल्हारीं ।
श्रीकृष्णास्यसरोवरीं । सांसिनली हे ॥ ४९ ॥
किं श्लोक नव्हंति आन । गमे गीतेचें महिमान ।
वाखाणिते बंदिजन । उदंड जैसे ॥ ११५० ॥
किं श्लोकांचिया आवरां । सात से करूनि सौंदरा ।
सर्वागम गीतापुरा । वसों आले ॥ ५१ ॥
कां निजकांता आत्मेयां । आवडि गीता मिळावेया ।
श्लोक नव्हंति बाह्या । पसरु कां जो ॥ ५२ ॥
किं गीता कमळिचे भृंग । किं गीतासागरतरंग ।
किं हरिचे हे तुरंग । गीतारथिचे ॥ ५३ ॥
किं श्लोक–सर्वतीर्थांतु । आली गीता गंगा अद्भुत ।
जें अर्जुनु जाला सिंहस्थु । ह्मणौनियां ॥ ५४ ॥
किं नव्हे हे श्लोकश्रेणी । सतंत जाली चिंतामणी ।
किं निर्विकल्पलावणी । कल्पतरूची हे ॥ ५५ ॥

ऐसेयां सें सात श्लोकां । परि आगला एकु एका ।
आतां कोणु वेगलिका । वानावा पां ॥ ५६ ॥
दीपा आदीलु मागीलु । सूर्यासि धाकुटा वडीलु ।
अमृतसिंधु खोलु । उतलु काइसा ॥ ५७ ॥
तानी आणि पारिठी । इया कामधेनूतें दीठी ।
सूनि जैसिया गोठी । कीजति नां ॥ ५८ ॥
तैसे पहिले आणि सरते । श्लोक न ह्मणावे गीते ।
जूनिं नविं पारिजातें । असति काइ ॥ ५९ ॥
आणि श्लोकां पाडु नाहिं । हें किर समर्थु काइ ।
एथ वाच्यवाचक हिं । भागु न धरी ॥ १६६० ॥
जे इये शास्त्रि एकु । श्रीकृष्णु चि वाच्यवाचकु ।
हें प्रसिद्धी जाणे लोकु । भलेतो ही ॥ ६१ ॥
एथ अर्थें तें चि पाठें । जोडे एवडेनि धटें ।
वाच्यवाचकें एकवटें । साधीति शास्त्रें ॥ ६२ ॥
ह्मणौनि मज काहिं । समर्थनीं आतां विषो नाहिं ।
गीता जाणा हे वाङ्मई । श्रीमूर्त्ति प्रभूची ॥ ६३ ॥
शास्त्र वाच्यें अर्थें फळे । मग आपण मावळे ।
तैसें हें नव्हे समूळें । परमतत्व चि ॥ ६४ ॥
कैसा विश्वाचिया कृपा । करूनि महाआनंदु सोहपा ।
अर्जुना व्याजें रूपा । आणिला देवें ॥ ६५ ॥
चकोरांचेनि निमित्तें । तीन्हीं भुवनें संतप्तें ।
निववीलिं कलावंतें । जिया परीं ॥ ६६ ॥
तैसें हें गीतेचें दुभतें । वत्स करूनि पार्थातें ।
दुभिनली पुरतें । श्रीकृष्णु गाए ॥ ६७ ॥
कां गौतमाचेनि मीसें । कलिकालुज्वरितादोसें ।
पाणिढालु गिरीशें । गंगेचा केला ॥ ६८ ॥

एथ जीवें जरि नाहाल । तरि हें चि कीरु होआल ।
ना पाठमीखें तीमाल । जीभ पैं जरि ॥ ६९ ॥
तऱ्हीं लोह हें एकें अंशें । झगटिले होये परिसें ।
तरि एकी कडे आपैसें । सुवर्ण होए ॥ १६७० ॥
तैसी पाठाची ते वाटी । लाविजे ना जवं वोंठीं ।
तवं ब्रह्मतेची पुष्टी । एईल आंगा ॥ ७१ ॥
नां येणेंसि तोंड वांकुडें । करूनु ठाकाल कानवडें ।
तरि कानें हिं घेंति पडे । तें चि लेख ॥ ७२ ॥
कां जें श्रवणें पाठें अर्थें । गीता नेंदी मोक्षा आरौतें ।
स्थूल दाता किं कोण्हातें । नास्ति न ह्मणैल ॥ ७३ ॥
ह्मणौनि जिया तिया सवा । गीता चि येकि सेवा ।
काइ कराल आघवां । शास्त्रिं एरीं ॥ ७४ ॥
आणि कृष्णार्जुनिं मोकली । गोठि केली निरालीं ।
ते व्यासें दाविली करतलीं । घेऊं ये ऐसी ॥ ७५ ॥
बालकातें वोरसें । माये जेवऊं बैसे ।
तेव्हळिं तेया ठाकति तैसें । घांस करी ॥ ७६ ॥
कां अफांटा समीरणा । आपैतेपणेंसि आणा ।
केलें जैसें वीजणा । निर्मूनियां ॥ ७७ ॥
तैसें शब्दें जें न लभे । तें घडूनु अनुष्टुभें ।
स्त्रीशूद्रादिप्रतिभे । सामविलें ॥ ७८ ॥
स्वातीचेनि पाणियें । न्हवंति जरि मोतियें ।
तरि आंगीं सौंदर्यांचियें । कां शोभती तियें ॥ ७९ ॥
नादु वाद्या नैयंता । तरि कां गोचरु होंता ।
फुलें नव्हतां घेपता । आमोदु केंवि ॥ १६८० ॥
गोडें नव्हंति पक्वान्नें । तरि कां फावती रसनें ।
दर्पणें विण नयनें । नयनु कां दीसे ॥ ८१ ॥

द्रष्टा श्रीगुरुमूर्ति । न रिगतां दृश्यपंथीं ।
तरि काह्या उपास्ती । आकलता तो ॥ ८२ ॥
तैसें वस्तु जें असंख्यात । तेया संख्या इयें शतें सात ।
नव्हंति तरि कोण एथ । लागों ये तें ॥ ८३ ॥
मेघु सिंधुचें पाणी वाहे । तऱ्हीं जग तेयातें चि पाहे ।
कां जें उमप तें नोहे । टाकतें कोण्हां ॥ ८४ ॥
आणि वाचा जें न पवे । तें श्लोक न्हवंति बरवें ।
तरि कानें मुखें फावे । ऐसें कां होंतें ॥ ८५ ॥
ह्मणौनि व्यासाचा हा थोरु । विश्वा जाला उपकारु ।
श्रीकृष्णउक्ति आकारु । ग्रंथाचा केला ॥ ८६ ॥
आणि तो मियां हा आतां । व्यासाचिं पदें पाहातपाहातां ।
आणिला श्रवणपथा । मऱ्हाटिया ॥ ८७ ॥
व्यासादिकांचे उन्मेष । राहाटति जेथ साशंक ।
तेथ मी रंक एक । वाचाळै करीं ॥ ८८ ॥
परि गीता ईश्वरु भोळा । ले व्यासोक्तिकुसुममाळा ।
परि माझेया दूर्वादळा । ना न ह्मणे ॥ ८९ ॥
आणि जेया सिंधुतटा । पाणियां येंति गजघंटा ।
तरि काइ मुरकुटां । वारिजतसे ॥ १६९० ॥
पांखिकुटें पांखिरुं । गगनीं नुडे तरि काइ करुं ।
नभ क्रमूनि थोरु । गरुडु देखैं ॥ ९१ ॥
राजहंसाचें चाळणें । भूतळिं चालावें कवणें ।
तरि आणिकिं ही कुंटेपणें । चालावें लागे ॥ ९२ ॥
जी आपुलेनि अवकाशें । अगाध घेपे कलशें ।
चूळु चूळु पाणी ऐसें । घेउनि निगे ॥ ९३ ॥
दिवियेचां आंगिं थोरी । तरि ते बहुतां तेजातें करी ।
वाति आपुलिया परी । आणीकीं ना ॥ ९४ ॥

जी समुद्राचेनि पैसें । समुद्रीं आकाशें आभासे ।
थिलरीं थिलरा ऐसें । बिंबें चि पैं ॥ ९५ ॥
तेवि व्यासादिमहामती । वावरों ये इये ग्रंथीं ।
मां आह्मी ठाकों हें युगुति । निमळे चि कीर ॥ ९६ ॥
जिये सागरीं जळचरें । संचरति मंदराकारें ।
तेथ काइ सफरें । पव्हों न ल्हांति ॥ ९७ ॥
अरुणु आंगा जवळिके । ह्मणौनि सूर्यातें तो देखे ।
मा भूतळिं चि नेदखे । मुंगी काई ॥ ९८ ॥
इया लागि आह्मां प्राकृतां । देशिकारें बांधों गीता ।
ह्मणणें हें अनुचिता । कारण नव्हे ॥ ९९ ॥
आणि बापु पुढां जाये । देखां उचलता पायें ।
आणि बालक हळु हळु ये । तरि तें न पवों काइ ॥१७००॥
तैसा व्यासाचा मागोवा घेंतू । भाष्यकारातें पूसतु ।
अयोग्यु ही मी न पवतु । कें जाइन ॥ १ ॥
आणि पृथ्वी जेया क्षेमा । नुभगे स्थावरजंगमा ।
जेयाचेनि अमृतें चंद्रमा । निववी जग ॥ २ ॥
जेयाचें आंगें असिकें । तेज लाहूनि अर्कें ।
आंधाराचें सावाइकें । लोटिजतसे ॥ ३ ॥
समुद्रा जेयाचें तोए । तोया जेयाचें माधुर्य ।
माधूर्या सौंदर्य । जेयाचे होंतें ॥ ४ ॥
पवना जेयाचें बळ । आकाश जेणें पवळ ।
ज्ञान जेणें उजळ । चक्रवर्ती ॥ ५ ॥
वेद जेणें सुभास । सुख जेणें सोल्लास ।
हें असो रूपस । विश्व जेणें ॥ ६ ॥
तो सर्वोपकारी समर्थु । सद्गुरु श्रीनिवृत्तिनाथु ।
राहाटतसे मज आंतु । रिगौनियां ॥ ७ ॥

आतां आइती गीता जगीं । मीं सांवें मऱ्हाटिया भंगीं ।
एथ कैंचा विस्मया लागि । ठाउ असे ॥ ८ ॥
श्रीगुरुचेनि नावें माती । डोंगरीं जेया पासिं होंती ।
तेणें कोलियें त्रिजगती । एकावद केली ॥ ९ ॥
चंदनें वेधिलीं झाडें । जालिं चंदनाचेनि पाडें ।
वसिष्ठें मानिली कीं भांडे । भानुसीं बाठी ॥ १७१० ॥
मा मी तवं चित्ताथिला । आणि श्रीगुरु ऐसा दादुला ।
जो दीठिवेनि आपुलां । बैसवी पदीं ॥ ११ ॥
आधीं चि देखणी दीठि । वरि सूर्यु पुरवी पाठि ।
तैं न दिसे ऐसी गोठि । कोठें असे ॥ १२ ॥
ह्मणौनि माझे नीच नवे । श्वास ही प्रबंध होआवे ।
गुरुकृपा काइ न्हवे । ज्ञानदेउ ह्मणे ॥ १३ ॥
या कारणें मियां । गीतार्थु मऱ्हाटिया ।
केला लोका लागिया । दीठिचा विखो ॥ १४ ॥
परि मऱ्हाटे बोल रंगें । कवलितां जैं गीतांगें ।
तैं गा तेयाचेनि पांगें । एकावट जाले ॥ १५ ॥
ह्मणौनि गातां गाउ ह्मणे । तैं गाणिवे होये नेणें ।
ना मोलें तरि उणें । गीता ही न आणिती ॥ १६ ॥
सुंदर आंगि लेणें न सूए । तैं तो मोकला श्रिंगारु होये ।
ना लेइलें तरि आहे । तैसें कें उचित ॥ १७ ॥
कां मोतियांची जैसी जाति । सोनेयां हिं मानु देंति ।
ना यऱ्हविं तऱ्हीं मानवति । आंगें चि गुणु ॥ १८ ॥
नाना गुंफिलीं कां मोकलीं । उणीं न्हवेति परिमलीं ।
वसंतागमिंचि वाटौलीं । मोगरीं जैसिं ॥ १९ ॥
तैसी गाणीव तें मिरवी । गीतें विण रंगु दावी ।
ते शोभाचां बंधु उभ्वी । केली मियां ॥ १७२० ॥

तेणें आबालसुबोधें । ओवियेचेनि बंधें ।
ब्रह्मरसुस्वादें । आखरें गुंफिलीं ॥ २१ ॥
आतां चंदनाचां सेजारीं । परिमला लागि निमिष भरी ।
पारुखणें जिया परी । न लगे तेथ ॥ २२ ॥
तैसा प्रबंधु हा श्रवणीं । लागत खेओ समाधी आणी ।
आइकिलेयां वाखाणी । व्यसन न लवी ॥ २३ ॥
पाकु करिति व्याजें । पांडिलें एथ वेखजें ।
तें अमृतातें नेणिजे । पातलेयां ॥ २४ ॥
तैसेनि आइतेपणें । कवित्व जालें उभणें ।
मननिदिध्यासश्रवणें । जींतलें आतां ॥ २५ ॥
हें स्वआनंदभोगाची सेल । भलेतेयासी चि देइल ।
सर्वेंद्रियें पोसवील । श्रवणा करवीं ॥ २६ ॥
चंद्रातें आंगवणें । भोगुनि चकोर सिहाणे ।
तऱ्हीं फावे जैसें चांदिणें । भलतेया ॥ २७ ॥
तैसें आध्यात्मशास्त्रीं इयें । एक अंतरंग चि अधिकारिये ।
येरि लोक वाक्चातुर्यें । होईल सुखिया ॥ २८ ॥
ऐसें श्रीनिवृत्तिनाथाचें । गौरव असें जी साचें ।
ग्रंथु नव्हे सुकृपेचें । वैभव तिये ॥ २९ ॥
क्षीरसिंधुपरिसरीं । शक्तिचां कर्णकुहरीं ।
तेणें कैं श्रीत्रिपुरारी । सांघितलें जें ॥ १७३० ॥
तें क्षीरकल्लोला आंतु । मकरोदरिं गुपितु ।
होंता तेयाचा हातु । पैठें जालें ॥ ३१ ॥
तो मछप्रसवसृंगी । भग्नावयव चौरंगी ।
भेटला तो सर्वांगिं । संपूर्णु जाला ॥ ३२ ॥
मग समाधि अव्यया इया । भोगाचा वास नां इया ।
ते मुद्रा श्रीगोरखराया । दिधली मीनीं ॥ ३३ ॥

तेणें योगाब्जिनीसरोवरू । विषयविध्वंसैकवीरु ।
तिये पदीं कां सर्वेश्वरु । अभिषेकिला ॥ ३४ ॥
मग तेहीं तें शांभव । अद्वयानंदवैभव ।
संपादिलें सप्रभाव । श्रीगायणिनाथीं ॥ ३५ ॥
तेणें कलिकळितभूतां । आला देखौनि निरुता ।
आज्ञा श्रीनिवृत्तिनाथा । दीधली ऐसी ॥ ३६ ॥
अनादिगुरुशंकरा । पासौनि शिष्यपरंपरा ।
बोधाचा हा सवंसारा । जाला आमतें ॥ ३७ ॥
तो हा घेउनि आघवा । कलिगीळितेयां जीवां ।
सर्वप्रकारिं धावा । करि पां वेगां ॥ ३८ ॥
आधि तो तवं कृपाळु । वरि गुरुआज्ञेचा बोलु ।
जाला जैसा वरिषाकाळु । खवणलें मेघां ॥ ३९ ॥
मग आर्त्ताचेन उमसें । गीतार्थग्रथनमिसें ।
वरिखला शांतरसें । तो हा ग्रंथू ॥ १७४० ॥
तेथ पुढां मी बापिया । मांडलां आर्ती आपुलेया ।
कीं यया साठिं यवडेया । आणिलां यशा ॥ ४१ ॥
एवं गुरुक्रमें लाधलें । समाधिधन जें आपुलें ।
तें ग्रंथिं बांधौनि दीधलें । गोसांवें मज ॥ ४२ ॥
वांचौनि पढें ना वाचीं । ना सेवा ही जाणें स्वामिची ।
ऐसेया मज ग्रंथाची । योग्यता के असे ॥ ४३ ॥
परि साच चि गुरुनाथें । निमित्य करुनि मातें ।
प्रबंधव्याजें जगातें । रक्षिलें जाणा ॥ ४४ ॥
तऱ्हि पुरोहितगुणें । मी बोलिलां पुरें उणें ।
तें तुह्मीं माउलीपणें । उपसाहिजो जी ॥ ४५ ॥
शद्बु कैसा घडिजे । प्रमेय कैसेयां चढिजे ।
अलंकारु ह्मणिजे । काइ तें नेंणें ॥ ४६ ॥

साएखेडाचें बाउलें । चालवीतिया सूत्राचेनि चालें ।
तैसा मातें दावीति बोलें । स्वामि तो माझा ॥ ४७ ॥
या लागि मी गुणदोष । विषीं क्षमाविं ना विशेष ।
जें संजात मी ग्रंथिलों देख । आचार्यें कीं जी ॥ ४८ ॥
आणि तुह्मां संतांचिये सभे । जें उणीवांसिं ठाके उभें ।
तें पूर्ण नोहे तैं लाभे । तुह्मा कोपों ॥ ४९ ॥
सितलेयां हिं परिसें । लोहत्वाचिए अवदशे ।
न मूकिजे चि आयसें । तो कोणां बोलु ॥ १७५० ॥
वोहलें हें चि करावें । जें गंगेचें आंग टाकावें ।
मग ही गंगा नोहे । तैं तो काइ करी ॥ ५१ ॥
ह्मणौनि भाग्ययोगें बहुवें । तुह्मां संतांचे मी पाए ।
पातलां आतां कें आहे । उणें जगीं ॥ ५२ ॥
आहो जी माझेनि स्वामीं । मज संत जोडुनु तुह्मीं ।
दीधलेति सर्वकामीं । संपूर्णु जालां ॥ ५३ ॥
पाहे पां मातें तुह्मां सांगडें । माहेर तेणें सुरवाडें ।
ग्रंथाचें हें आलियाडें । सिद्धी गेलें ॥ ५४ ॥
जी कनकाचें निखल । उभूं येईल भूतल ।
चिंतारत्नीं कुलाचल । निर्मूं एंती ॥ ५५ ॥
सातां हिं सागरातें । सोहपें भरितां अमृतें ।
दुवाड नोहे तारातें । चंद्रु करितां ॥ ५६ ॥
कल्पतरूंचे आराम । लावितां नाहिं विषम ।
पारि गीतार्थाचें वर्म । निवडीं नैए ॥ ५७ ॥
तें मीं एकु सर्व मूंका । बोलौनि मऱ्हाटिया चोखा ।
करिं डोले वरि लोकां । घेऊं ए ऐसें ॥ ५८ ॥
हा ग्रंथसागरु एवडा । उतरौनि पैलीकडां ।
कीर्तिविजयाचा ढेंढा । नाचे जे कां ॥ ५९ ॥

गीतार्थिचा अरुवारु । कळशेंसि महामेरु ।
रचूनि माझी श्रीगुरु- । लिंग जें पूजी ॥ १७६० ॥
गीता निष्कपट माए । चुकौनि हींडिजे बाएं ।
ते माथे पूतां भेटि होए । हा धर्मु तुमचा ॥ ६१ ॥
तुह्मा सज्जनाचें केलें । आकळूनि जी मीं बोलें ।
ज्ञानदेउ ह्मणे ठेंकुलें । तैसें हें नोहे ॥ ६२ ॥
काइ बहू बोलों सकळां । मेळविलां जन्मफळा ।
ग्रंथसिद्धिचा सोहळा । दाविला जो हा ॥ ६३ ॥
मियां जैसीजैसिया आशा । केला तुमचा भरवसा ।
तो पुरौनि जी बहुवसा । आणिलां सुखा ॥ ६४ ॥
जी मज लागि ग्रंथाची स्वामी । दूजी सृष्टि केली तुह्मीं ।
तें पाहूनि हांसों आह्मि । विश्वामित्रातें ॥ ६५ ॥
जें असौनि त्रिशंकुदोसें । धात्रेया ही आणावें वोसें ।
तें नासतें कीजे कि ऐसें । निर्मवें ना हीं ॥ ६६ ॥
शंभु उपमन्युचेनि मोहें । क्षीरसागरु केला आहे ।
एथ तो ही उपमो नोहे । जें विषगर्भ कि ॥ ६७ ॥
अंधकारा निशाचरां । गीळितां सूर्यें चराचरा ।
धावा केला तऱ्हीं खरा । ताउनि तो ॥ ६८ ॥
तातलेया जगा कारणें । चंद्रें हिं वेचिलें चांदिणें ।
तेया सदोषा कवि ह्मणें । सारिखें हें ॥ ६९ ॥
ह्मणौनि तुह्मीं मज संतीं । ग्रंथरूपु जो हा त्रीजगती ।
उपेगु केला तो हा पुडुतीं । निरूपमु जी ॥ १७७० ॥
किंबहुना तुमचें केलें । धर्मकीर्त्तन सिद्धी गेलें ।
एथ माझें जी उरलें । पाइकपण ॥ ७१ ॥
आतां विश्वात्मकें देवें । एणें वाग्यज्ञें तोषावें ।
तोखौनि मज देयावें । पसायदान हें ॥ ७२ ॥

जैं खळांची वांकुडै मोडे । तेयां सत्संगीं रति वाढे ।
भूतां परस्परें पडे । मैत्र जीवाचें ॥ ७३ ॥
दुरिताचें तिमिर जाऊ । विश्वा स्वधर्मसूर्यें पाहो ।
वांछिल तें तें लाहो । प्राणिजात ॥ ७४ ॥
वर्षतें सर्वमंगळीं । इश्वरनिष्ठांची मांदियळी ।
अनवरत भूतळीं । भेटोतु भूतां ॥ ७५ ॥
चलां कल्पतरूंचे आरव । चेतवांचिंतामणिचे गावं ।
बोलते पां अर्णव । पीयूखांचे ॥ ७६ ॥
चंद्रमे जे आलंछन । मार्त्तंड जे तपहीन ।
ते सर्वां हीं सदा सज्जन । सोयरे होंतु ॥ ७७ ॥
किंबहुना सर्वसुखीं । पूर्ण होउनि तिहीं लोकीं ।
भजिजो आदिपुरुषीं । अखंडित ॥ ७८ ॥
आणि ग्रंथोपजीविये । विशेषें लोकीं इयें ।
दृष्टादृष्टविजयें । होआवें जी ॥ ७९ ॥
एथ ह्मणे विश्वेसरु राऊ । हा होईल दानपसाऊ ।
ऐणें वचनें ज्ञानदेऊ । सुखिया जाला ॥ १७८० ॥
ऐसें युगीं वरि कली । आणि महाराष्ट्रमंडळीं ।
श्री गोदावरिच्यां कुळीं । दक्षिणिलीं ॥ ८१ ॥
तेथ भुवनैकपवित्र । अनादिपंचक्रोशक्षेत्र ।
जगाचें जीवनसूत्र । जेथ श्रीमहालसा ॥ ८२ ॥
तेथ इंदुवंशविलासु । जो सकळकळां निवासु ।
न्यायातें पोखीत क्षितीशु । श्रीरामचंद्रु ॥ ८३ ॥
तैं माहेषान्वयसंभूतें । श्रीनिवृत्तिनाथसुतें ।
केलें ज्ञानदेवें गीते । देशीकार लेणें ॥ ८४ ॥
एवं भारताचां गावीं । भीष्मनामीं प्रसिद्धपर्वीं ।
श्रीकृष्णार्जुनीं बरवी । जे गोष्टि केली ॥ ८५ ॥

जें उपनिषदाचें सार । सर्वशास्त्राचें माहिएर ।
परमहंसीं सरोवर । सेविजे जें ॥ ८६ ॥
तिये गीतेचा कळशु । संपूर्ण हा अष्टादशु ।
ह्मणे निवृत्तिदासु । ज्ञानदेवो ॥ ८७ ॥
पुढुतीं पुढुतीं पुढुतीं । इया ग्रंथा पुण्यसंपत्ती ।
सर्वसुखीं सर्वभूतीं । संपूर्ण होइजो ॥ ८८ ॥

ॐ तत्सदितिश्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे
श्रीकृष्णार्जुनसंवादे **मोक्षयोगो** नाम अष्टादशोध्यायः ॥
हिरण्य । श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ १८ ॥
लेखनं श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

श्री + + + + साम्राज्यलक्ष्मीस्वरूपीश्वरा
गुरुकृपालुनारायण पातु मां ॥



शके बारा शतें बारोत्तरें । तैं टीका केली ज्ञानेश्वरें ।
सच्चिदानंदबाबा आदरें । लेखक जाला ॥ ९२ ॥

---

हें पुस्तक विश्वनाथु कोनेर धोलरदेवनुरकर

**श्रीसद्गुरुमुकुंदेन दत्ता ज्ञानेश्वरी शुभा ॥**
**विद्याधराय शिष्याय स्वीए स्वत्वं न शोभते ॥ १ ॥**



# प्राचीन शब्दकोश

प्रस्तुत लहान कोशांत कांहीं ठळक ठळक प्राचीन शब्दांचे अर्थ दिले आहेत. दुसऱ्या खंडांत ज्ञानेश्वरींतील एकोनएक शब्दांची बृहत्सूचि द्यावयाची आहे, त्यांत अठराहि अध्यायांतील शब्दांचे अर्थ स्पष्ट होतील.

## अ

अगत्या–निरुपायानें.
अगाधपण–अमेयत्व, गूढत्व.
अघ–पाप, दुःख.
अचल–स्थिर, पर्वत.
अचुंबित–अस्पृष्ट, अतर्कित.
अझुइंवरि–अद्यापपर्यंत.
अडदर–भय.
अडव–रान.
अडिनांव–अयथार्थनाम.
अडे–सांठवे.
अढंचें–वरचें.
अणुसुट–अनुच्छिष्ट.
अतिसो–अतिशय.
अथव, अथाव,–ठव, ठाव नाहीं असा जलसंचय.
अध्वर–यज्ञ, याग.
अनकलित–समग्र.
अनव्रत–निरंतर, नियत, व्रतबद्ध.
अनस्यूतु–अखंड ओंवलेलें.
अनारिसें–भिन्न, भलतें.
अनावर–आवरण्यास अशक्य.
अनुकार–अनुकरण.
अनुघाड–उघाड नाहीं तें, गुप्तपणा, कोंडणी.
अनुपरोध–रूपोपरोधरहित, यथार्थ.
अनुभौ–अनुभव.
अनुसंग–संगति, संबंध, विश्वास.
अनेग–एकाहून अधिक.
अपभ्रंशु–नाश, अपशद्ध.
अपाड–साम्यरहित, अशक्य, सत्वर.
अपार–अपरिमित.
अपावृत–उघडले, प्रकटले.
अपांपरि–दुर्दशा, भिन्न रीति.
अभोल–भोळा नव्हे तो, प्रबुद्ध.
अर्चिरामार्ग–सूर्यकिरणमार्ग.
अरौतें–अलिकडचें.
अलिउलें–भुंग्यांचे थवे.
अलुकी–व्यसन, क्षुधा, आसक्ति.
अलौकिका–अलौकिकवान्, लोकांना सोडून वागणारा.

अवगाळ–गाळ.
अवष्टंभ–अहंकार, आश्रय, धैर्य.
अवसरीं–मोहें, समयीं.
अवसात–अकस्मात्.
अव्हाटां–आडवाट.
अविद्या–माया.
अविट, अवीट–अलिप्त, शुद्ध, सरळ,
अविनाभाव–व्याप्तिमत्व, अविलगपणा
असकरणें–धिक्कारणें.
असका–अवघा, समग्र.
अस्तोव्यस्त–अस्ताव्यस्त
असमसाहस–ज्याचे साहसास साम्य नाहीं असा, अमर्याद.
असमाई–न समावणारी, न राहणारी
असंघडे–विघडे.
अक्षौहिणी–रथ व हत्ती २१८७०, घोडे ६५६१०, पदाति १०९३५०
अंगस्तिगौवण–अंग आच्छादणारी पिशवी

## आ

आउठावियें–साडेतिसऱ्या.
आंकण–बंदी, प्रतिरोध.
आंकला–अंकित.
आंकूनि–मुद्रा ठोकून.
आखलिचे–दुष्टपणाचे.
आखर–अक्षर.
आगरीं–खाण, शेत, मळा.
आंगलगें–समागमें.
आगलिक–आधिक्य.
आगलें–अन्य, भिन्न.
आंगवटा–अंतरंग, जातिस्वभाव.
आंगवणें–मानवणें.
आंगवखां–अंगप्रदेशांत.
आगसे–डाहाळ्याचे शेंडे.
आगा–अरे, रे, अहो.
आगियल–आगीचा डोंब.
आचरणें–करणें, अनुष्ठिणें.
आचरतेनि–आचरणाऱ्यांनीं.
आझुंई–अद्यापि.
आझूं–अद्यापि.
आटलिजों–आळावयास.
आंटी–गांठ, मिठी.
आटोपे–डौल, महत्व, व्यापकता.
आठमुठी–अज्ञपणानें व मुग्धपणानें
आंठूइ–श्रमून.
आठौ–स्मृति.
आडकंठ–अलीकडला कांठ.
आडदरु–प्रतिभय.
आडालिजे–अडखळावें.
आडवंकी–खीळ.
आडें–आणि, अथवा, कां.
आणी–आणतो.
आणि, णी–अग्र, महत्व.
आंतर–अंतःकरण.
आत्राटणें–थापटणें.
आंतुवटपणा–बलिष्टता.
आते–पावे.

आंतौतें-फार आंत.
आथि-आहे.
आथिला-संपन्न.
आथुवुरे-सदसत्पणें.
आदिल-प्रारंभीचें.
आधपलिपिं-तप्तझालेली.
आधव- आसक्ति.
आधाडा-मध्यभाग, आर्धीकडा, उद काचा उगम अथवा मध्य.
आधिका-बलवत्तर.
आधिली-अर्धी.
आनौति-अन्य.
आपणपें-आत्मत्व.
आपादिलें-प्रतिपादिलें.
आपु-प्राप्त.
आपेसिं-अपयशें.
आबुथिली-अभ्युत्थान झाली, उठली.
आम्नाय-वेद.
आय-वश, लाभ, आकार, ठिकाण.
आयणी-सामर्थ्य, इच्छा, प्रसर, रीति, तत्वनिर्णय.
आयतन-विश्रांतिस्थान.
आजैं-मिळें.
आडि-दरड, खोल विवरें.
आर्त-इच्छा.
आरणी-रक्षणकर्म, सेना.
आरंभरंभा-कदली, अप्सरोविशेष.
आराइले-वोपिले, अनुसरले.
आराणुक-विश्रांति.
आराय-सुख, समाधान, हर्ष.
आरौत-अलिकडील, अपकृष्ट.
आलवणें-बोलणें.
आलविलें-बोललें.
आलुकैलें-भुकेले.
आलोडावें-घुसळणें.
अवगाणिचें-अलिकडचें.
आंवगे-स्त्रीकारी, पावे.
आवडतें-हवें तें, इष्ट.
आवडे-वाटे.
आवरणें-पसरणें, विस्तरणें, आकारानें [अवच्छिन्न होणें.
आवसिक-अल्प वसती आहे जेथें.
आव्हासु-आभासु.
आवाळुवें-ओष्ठ प्रांत.
आविस-अमिष.
आवेंगवाणें-व्यंगरहित.
आशतूटि-निराश होऊन.
आसलगपणा-सोपेपणा, गोडी.
आसंसीति-वर्णन करतात.
आहाच-उथळ, सामान्य.
आहाचवाहाच-वरवर.
आहाणा-दृष्टान्त.
आहाति,ती-आहेत.
आहो-प्रतिष्ठा, आकार.
आक्षादिजे-आाछादिजे.

## इ, ई

इतुले वेन्हीं-इतक्यापर्यंत इतकें.
इयेतव-इच्याकारणें.

इं-देखील.
ईभ-हत्ती.

## उ, ऊ

उक्ता-सांगितल्या.
उकलियां-समविषमता.
उखितें-एकसरें, आगंतुक.
उगाणां, उगाणे-झाडा, उपदेश, सांगण, समर्पण.
उगेयां-स्वस्थ.
उगंडू-सुटका, बहिर्गमन.
उजगरा-जागृति.
उजरी, उजिरी-ऋजुता, रीति, स्वछता सरिसेपण, विस्तार.
उजलाचें-चकाकणारें.
उजीवडें-प्रकाश.
उजू-नीट.
उजुकारें-नीट प्रकारें.
उतत-बाहेर पडत.
उत्पवन-उडणें.
उते-बाहेर सांडणें,
उदका-उदकानीं.
उद्दंडीं-अत्युत्सुक होत्सात्यांनीं.
उदाणें-बाग, वर येणें, प्रादुर्भाव.
उदिपे-उद्दीपन होई.
उदो-उदय, प्रादुर्भाव.
उधवला-उसळला.
उन्मेखु सूक्ष्मेक्षणु-अवधान हाच सूक्ष्म [नेत्र ज्याचा.
उनदा-जागृत.
उपखा, खे-उपसा, व्यर्थत्व, वेच.
उपणितां-सुपानें झडपलें असतां.
उपरोधी-भीड, अडचण.
उपलवला-दृढ धरिला.
उपहतु-हानि पावलेला, येळिल.
उपादेय-ग्राह्य.
उपायिलें-प्राप्त झालें, विस्तारलें, प्रसिद्ध
उपास्ति-भक्ति.
उपासन-भक्ति.
उपेग-उपयोग.
उभगला-कंटाळा धरिला.
उभडा, डें-लोंढा, भडका.
उमपें-मोजण्यास अशक्य, अमूप,
उमाणितें-मोजितें.
उमेठें-मेळावा.
उराउरी-झडकर.
उरुयें-श्रेष्ठ.
उरोधु-प्रतिबंध, भीड.
उल्ब-गर्भाची पिशवी.
उल्हाटे-हटून पळे.
उलिगे-चोकऱ्या नोकऱ्या, बिगार, वेठ.
उवाउं-उत्साह.
उवायिला-बोधिला.
उवेढा-वेढा दूर करणें.
उसिटा-उच्छिष्ट.
उहरविलीं-उद्धरिलीं.
उहीपुही-भवति नभवति.
ऊठि-बाकी.

## ए, ऐ.

एं-येतें, येई.
एकतुकें-एकमापाचें.
एकनिष्ठ-दृढश्रद्ध.
एकवंकैयेचा-सारखेपणाचा.
एकाधें-एखादें.
एकोल-एकवेळ.
एषा-ईर्षा, बरोबरी.
एसणें-असलें.
एंति-येतात.
ऐसां-असा.

## ओ.

ओइचिलें-अत्यंत अल्प.
ओगरा-वाढणें.
ओडवला-पातला.
ओतपली-दीप्ति.
ओथिजलें-पातळ केलें.
ओभाणें-पूर, वेग.
ओलांतरला-उशीर झाल्यामुळें फसला,
ओलावणी-शांति.
ओलिवटा-येण्याजाण्याचा मार्ग.
ओवंडति-घडघडतात.
ओवरां-खोलींत, वोवरींत.
ओसंडूनि-सोडून, टाकून.
ओसणतां-बरळतां.
ओसाणें-केर, कसपट.
ओहिरी-खोली.

## क.

ककारांत-सुषुम्ना.
कटारे-शस्त्रविशेष.
कडवसा-कांहीं आधार, प्रडसावली.
कडसणी-कढ, मंथन, कसणें, सावध करणें, विचार करणें, यथाक्रम उच्चारणें.
कडसावें-परीक्षावें.
कडेलग-शेवटाजवळ
कडौनि-कढून.
कणव-दया.
कपोलें-गालानें.
कऱ्हें-उंट.
करांडी-कुरतुडी.
कल्पिति-मायारूप, मानीव.
कलिया-वळ.
कव्हणी-कोणी.
कव्हाल-कवच.
कविलासु-कैलास.
कस-परीक्षा.
कसु-सामर्थ्य, बळ, परीक्षा.
कलभा-झगडा.
काचें-कच्चें.
काचेयां-कच्चा लोकांस.
काज-काय ?
कांटालें-तराजू, रोमांच.

काढ-वेगानें वहाणारे.
काढत-धावत, लावित.
कांतले-छुंपिले.
कांबि-तिरकामठ्याची कांब.
कामिजे-इच्छावें.
कालवंखें-काळोख, अप्रकाश, आलस्य.
कालासला, कळासति=बांधिला, न्याहाळिला.
कालौनियां-विचारणा करून.
कासी-वाराणसी.
काह्मा-कसा.
क्रान्तदर्शी-ज्ञानी.
कीजतासि-केला जात आहेस.
कीड-हीण, वाईट.
कीडरु-सर्प.
कीडाल-खोटें, फटकळ.
कीरु-खरें पाहिलें तर.
कुडें-खोटें, लटकें, फटकाळ.
कुरुठा-शहाणा, गांव्याळ, खजाना.
कुरौंडीं-ओंवाळणी.
कुलकेणी-कुशलता.
कुलवाडी-संतति, रयतावा.
कुलैवा-कुलदीपक
कुवाड-दुर्घट.
कुवांसा-आश्रय, साहाय्य.
कुहां-कूप, विहीर
कूटि-निंदा, अपवाद.
कृदांतु-यमधर्म, मृत्यु.
कें-कोठें.
केणी-प्रकार वस्तु.
केणें-वस्त्राच्या घडीभोंवती बांधलेली दोरी
केती-किती.
केरु-नाश
केव्हालिं-कोणत्या वेळीं ही.
कोठली-कुजकी घाण.
कोंडा-भूस.
कोंडणी-कोंडून टाकणें.
कोडिं-सहज, कौतुक, प्रीति, संकट.
कोंढ-गावकुसूं.
कोंधाटें-व्यापे, भरे.
कोलु-इटी.
कोल्हेरी-शाला, मंडप.
कोवलिक-कोंवळेपणा.

## ख

खडुलें-गढूळ पाणी, गाळ.
खरपें-रुक्षपणा, कठिणपणा, नीरसपणा.
खराटे-फांका, अप्राप्ति.
खलन-स्खलन.
खवलें-खपली.
खपणेंयाचां-नग्न, नागा, बौद्ध.
खांखांते-कर्कश.
खांचे-दमें, श्रम पावे.
खाजें-खाद्य.
खाल-कातडी, साल,

खालतिले-खालच्या, अधोभागीच्या.
खिरडला-मागें सरला, हटला.
खीचु-खिचडी,
खेओ-बरोबर, समवेत.
खेलतां-लीलेनें.
खेवणिलें-कोंदिलें.
खेवणें-कोंदण.
खेवां-बरोबर, समवेत.
खोंकरें-फुटकें
खोटि-गोळा, आंटीव सोनें.
खोले-वस्त्राची खोळ.

## ग

गगनखलिचें-आकाशाच्या क्षेत्रांत वावरणारें.
गजघंटा-गजसमुदाय.
गडदे-अंधकार, निबिड.
गंधिकालिक-काळा मळ.
गमिजे-मिळविलें जातें.
ग्रंथुगरुवतिचा-ग्रंथगौरवाचा.
गवसणि-पिशवी.
गवे-सांपडे
गहीरु-गंभीर.
गाज्याबज्य-गजबज.
गाढिका-दृढता.
गावाई-विनोद.
गिवसावा-शोधावा, आच्छादावा.
गुतकुलिया-गुदगुल्या.
गुंपौनि-गुंतून.
गैसासै-नेणतेपणें.
गोखां-मध्यवर्त्ती लोकांस.
गोरि-व्याध, पारधी.
गोसांवि-धन्यानीं.
गोसांवीं-धनी.
गौल्य-माधुर्य.
गहिंसासा-निवांत असा.

## घ

घणवट-परिपूर्ण, भारी.
घरडहुली-घरझाडा.
घराणीं-धिरटीं.
घली-काढी.
घसणी-घसट.
घाउस-ग्रहण करण्यास उत्सुक.
घांघवसितां-शोधितां ( frequentative of गवसणें. )
घातेचिये-संकटाचे.
घापत-सांपडत.
घारले-प्याले, खारट, व्यापिले.
घेतें-अंत:करण.
घेपे-घेतलें जातें, घेइजे.
घोकरि-चटकन्.
घोघे-घोघो करीत जाणारे पाण्याचे लोट, जलद जाणारें.

## च

चटवंच-चटका व फसगत.
चडत-चढत.

चढावा—उत्कर्ष.
चलिया—क्षोभ, चांचल्य.
चवक—वचक, भय.
चवरें—शेवट, चामर, अंगण.
चांग—चांगले.
चांचोड—चोंच.
चाडे—बीं पेरावयाचें यंत्र.
चीरा पडे—नाश होई.
चुमळूनि—बुचकळून.
चुलकिं—मस्तकीं.
चेइरें—जागृति.
चेउनिया—जागृत होऊन.
चेंति—जागे होत.
चेंपणें—पुट घालणें.
चोजें—कौतुक, आवड, नवल.
चोंढा—गर्त्ता, विवर.
चोपि—घडी.
चोबारा—चवाठा.
चोहट, चौहटां—चवाठा.
चौपाहारी—चार प्रहर.
चौहोरि—चोहों बाजूनें.

## ज

जन्मौनि—जन्मापासून.
जमावारि—यमावर.
जरंगा—जाळें.
जलसेन—जलशयन, महाविष्णु.
जंवनीक—पडदा.
जवला—संनिध.
जवलिक—सान्निध्य.
जाकळूनि—व्यापून, ग्रासून.
जागेश्वरा—यागेश्वर, यज्ञेश्वर.
जाड—पचंग, बळ, थोर.
जाणतेन—ज्ञानी जो त्याणें.
जांपाणि जांपाणीं—लपतछपत.
जालीलीया—जाळल्या.
जियालें—जिणें.
जिव्हार—जीवनकला, मर्म.
जीणिजे—जिंकावें.
जींताणें—वाचणें, कुरवंडी.
जींति, जींथि—जीवन.
जींपे—जिंकवे.
जुतीस्वरूप—उक्तिरूप.
जूंतलेयां—जुंपलेल्यांना.
जें—यत्, यस्मात्, ज्या अर्थी.
जेउति—जितकी.
जेहाचें—ज्याचें.
जैं—जेव्हां.
जैत—जय.
जोगे—पोषक, समर्थक.
जोजारु—दुःख, कष्ट, संकट.
जौहर—अग्नि, विवर.

## झ

झकवलपणें—फसवणुकीनें.
झनें—नकारार्थी, निश्चयार्थी, कादाचित्कत्वार्थी.
झांक—उडी.

झाकरी—झटकर.
झांकवति—फसवितात, ठकवितात.
झांकोले—आच्छादितहोई.
झांटी—गर्दी, फळी, समुदाय, झाडी,
झावळें—अस्पष्ट, ना उजेड ना अंधार.
झांपकणे—फसलें जाणें, फसणें.
झुलुआ—झोके.
झोलु—पदर, मिथ्या, असार.

## ट

टकति—सुटतात.
टाकी—पावें, येई, प्राप्त होई.
टांक—ठसे.
टांचें—लहान.
टिटियांतु—पायांच्या तिकटांत.
टीविला—चर्मवाद्यविशेष.

## ठ

ठक—तटस्थ, तिऱ्हाईत.
ठाउनि—आसनावरून, स्थानावरून.
ठाणा दिवी—दिवली ठेवण्याची बैठक.
ठावावेऱ्हीं—हा काळपर्यंत.
ठी—स्थिति.

## ड

डंसु—दंश.
डहुलतें—घुसळतें.



डाखले—दंश करण्याचे दांत.
डालें—फुलेंफळें घालावयाची पाटी.
डावली—दूर करी, परिहरी.
डावा—दूर.
डोंड—मोठे चिरे.
डौंडी—दवंडी, डांगोरा.
डौरां—गोंधळयाचें वाद्य, उपहास
डौले—डोहाळे.

## ढ

ढवललें—शुभ्र झालें.
ढाली—हालवी, घाली.
ढिसाल—थोर.
ढेंढें—सूप.
ढोंढी—वाटोळा आकार, फुगारा
ढंकु—कोटाची भिंत.

## त

तंडों—भांडों.
तण्हारे—गवताची झोपडी.
त्राय—सत्ता, रक्षण, ठाव.
त्राये—रक्षण, आश्रय, बळ, सत्ता, ठाव.
त्रिमालिकें—तीन मजली.
त्रैधातुक—वातपित्तकफत्व.
तळगे—पिलीं.
तव्हातिचेनि—तळहातच्या.
तव—मुळें, कारणें.

तवकें—धैर्य.
ताउवा—उघड, प्रकाशित.
तागा—नाव ढकलावयाचा वेळू, आधार.
तातलें—तापलें.
तास—नांगराची रेघ.
तीमें—भिजे.
तुगुटी—त्रिकुटी, ज्ञातृज्ञानज्ञेयादि-प्रपंचरचना.
तुलिगासवें—प्रतिध्वनीबरोबर.
तुषान्न—कोंड्याचें अन्न.
तुहतें— तुला.
तूक, तूंक—महत्व, वजन, हीण.
तूकलें—वजन केलें, सारखें झालें, डोललें, हालविलें.
तेउती—तितकी.
तेया—त्या.
तेसणा—त्याप्रकारचा.
तैसा—तसा.
तोंडागलें—मुखर.

## थ

थाउं—ठिकाण, तळ.
थाटी—झाडी.
थाया—मोह.
थारे—स्थिर होई.
थावली—स्थिर झाली, बळावली.
थावें—बळ, उथळ, आश्रय, प्रांत.
थिनलें—छिन्न होणें.
थीतें—स्थित, सुस्थित, स्थिर.
थीलरातें—डबक्यास, पल्वलास.
थेंकुलें—थोडें.
थोकडें—थोडकें.

## द

दटिजे—श्रमावें, दमावें, संकोच-पावावें.
दरकुटें—पर्वत तट.
दलवाडें—समुदाय, घनवट, मोठा दगड, आकार.
दलवैपणाचा—सेनापतित्वाचा.
दांग—वन.
दाघु—दाह.
दांडेवारि—काठीनें.
दादुला—पति, धनी, थोर पुरुष.
दायाद—दाईज.
दारवठेकारु—उंबरठा झिझविणारा.
दासट—दाहक, नाशक, पीडक.
दियां—दिवसां.
दिहबलें—उजेडाच्या साहाय्यानें.
दिहा, हें—दिवसां.
दिहेंदीसें—दिवसेंदिवस.
दी—दिवस.
दीठें—दृष्ट, अनुभूत.
दुपाउली—दोन पावलांत.
दुबला—दुर्बल.

दुर्भर–भरण्यास कठिण.
दुरासे–दुराशेनें.
दुरिकें–लांब.
दुवाडपण–दुस्तरत्व.
दूण-दुपटी.
देखी–रीति, दीक्षा, दंडक.
देवढे–तिढे, वक्र.

## ध

धटे–निश्चयाने.
धडसा–धड असा, अव्यंग असा.
धडेयावारि–हातोळयावर (हातोळा=हस्तावलि )
धडौता–सांग.
धणि–पूर्ति, इच्छा.
धवड–मोठा दगड ( धावड=कठिण लोखंडाच्या दगडावर काम करणारा. )
ध्वनित–व्यंगोक्ति, सूचना.
ध्वनितें–व्यंगोक्तीनें, सूचनेनें.
धसाल–स्थूलदृष्टीचा, अविचाराचा.
धाकडांसि–बळकट, धीट.
धायेपण–दायीचें काम, संगोपन.
धारणीं–इच्छा, खांब.
धारसे–मध्यप्रवाह.
धावेया–हांकेसरसें.
धीटींवं–धीटपणा.
धूरे–अग्रभागीं.
धोंधा, दा–वर्षाव.
धोरणु–धोपटमार्ग.

## न

नडनाचें–नटाच्या नाचण्यानें.
नवानिसितिं–नव्यानें पाजळलेल्या तीक्ष्ण.
नव्हाली–तकतकी, नवाई.
न्यसावी–ठेवावी, घालावी.
नां–नकारार्थी अथवा, नाथवा.
नाइकें–कान न देई.
नाखि–टांकी.
नागर–राजस, चतुर, नगरवासी, लिपिविशेष.
नागरपणें–संभावितपणें, चातुर्यानें.
नांगवे–न सांपडे.
नाडले–आढळेना.
नाथिलि–नसली.
नादिचे–श्रवण सुखाचे.
नाना–अथवा.
नापूवे–न बुडे.
नांभरि–क्षणभर.
नाराणुक–असामाधान.
नाव, वं–क्षण (?)
नावांनावां–क्षणक्षणां.
नावेक–क्षणैक.
नाशिली–नष्ट.
निगदु–शपथ.
निचाड–निष्काम, चाड नाहीं असा.

निजाचा-मनाचा, आत्मस्वरूपाचा.
निडळीं-कपाळीं.
निडार-पक्कदशा, समता.
निफनलिं-निष्पन्न झालीं.
निमथा-माथा.
नियता-नियमनशील पुरुषांनीं.
निर्गुडु-जेथें उच्चनीच दगडधोंडे नाहींत असा.
निरतां-निरतिवान्, मग्न.
निर्लाग-निराश्रय, लाग नाहीं जेथें.
निरविडी-निश्चयानें अनुरूप.
निरालीं-अंतराळीं.
निराश-आशारहित पुरुष.
निरोललें-व्यवस्थित रचना केले गेले, निर्मळ केले गेले.
निरोलिलिये-निर्मळ केले गेलेल्या.
निरुता-निश्चयानें, खरा.
निलेयाचा-इंद्रनीळरत्नाचा.
निवाडु-निर्णय, भेद.
निशाण-नगारा.
निष्ठा-स्थिती, श्रद्धा.
निषण्ण-शांत बसलेले, निवांत, निश्चल स्थिर.
निस्तरैल-तरून जाईल.
निसिं-तीक्ष्ण.
निसुगै-निर्लज्जपणा.
निहिटिला-दडपिला, जडला.
नीक, का, केनी-चांगलें, खरें, बरें, हिताचें.
नीकें-खरें, चांगलें.
नीणिलें-नेले, मेळविले.
नीरु ताउनि-पाणी स्पष्ट तपासून.
नुमगिजे-दमूंभागूं नयें, त्रासूं नये.
नेदखति-पाहत नाहींत.
नेवाणें-तिरस्काराचें पात्र.
नैए-येत नाहीं.
नैयंतां-न येतां.
नैयेइल-न येईल.
नोंकिलीं-निंदिलीं, चुकविलीं, लपविलीं
नोडवेचि-पुढें न करणें, पुढें न येणें, प्राप्त न होणें, न ओढवे.

## प

पडप-प्रतिष्ठा, महत्व, श्रृंगार.
पडिभरें-आधिक्य, भर, अतिशय.
पडिसादा-प्रतिध्वनि.
पडिहासे-भासे, प्रतिभासे.
पढियंता-आवडता.
पढियें-प्रीतिपात्र.
पतिकरु-रचिलें ? संजोगिलें, अंगीकार
पन्नासिलें-रचिलें, संजोगिलें.
पन्हरें-पुतळीचें सोनें.
परउतें-पलीकडे, वेगळें.
परगुणें-पक्वान्न.
परमार्थ-महतत्त्व.
परवाली-प्रक्षाळलेले, धुतलेले, स्वच्छ
पऱ्हौतीं, पऱ्हौतें-पलीकडें.

परावा–परकी.
परि–प्रकार, रीति.
परिसावेया–ऐकण्यास.
परिहसें, परिहसैं, परियसें–लीलेनें, विनोदानें.
परिहसैं–विनोदानें किंवा लिलेनें बोलशील तर,
परौता–दुसरा, वेगळा, पलीकडे.
पलति–दूर जातात, पळतात.
पल्हातां–विस्तारानें विवेचन करतां.
पलिपे–पेटे.
पलिपलीं–पेटलीं.
पवडला–प्रवेशला.
पवले–प्रकर्षानें वळतो, जातो.
पव्हणा–पोहण्याजोग्या पाण्याचा डोह.
प्रतिपदी–विवेचन करी.
प्रतिस्फलें–उलट फलद्रूप होतें, परत उत्पन्न होतें.
प्रभवे–सामर्थ्य असतें.
प्लव–ताप, नौका.
पाइं–पाही, अवलोकी.
पाइकु, पाइक–सेवक, पदाति.
पाउखौनिया–फिरवून.
पाउटीं–पायरीनें.
पाउडु–दक्षणा, पैसासुपारी.
पाउसीं–प्रावट्कालीं.
पाएं–पायानें.
पाएरवें–वरदळीनें.
पाखर–आश्रय.
पांगु–गरज, अपेक्षा, ओशाळगत, हीनत्व, पराधीनत्व, एकदेशित्व, दुर्लभत्व, राबणें.
पांगुतलीसे–आच्छादिली असे.
पांगूळ–पंगु, व्यंगावयव.
पांचवनेया–पंचवन्हींच्या समुदायाच्या.
पांचाखरी–पंचाक्षरी, मांत्रिक.
पांजरा–प्रतिबंध.
पांजला–व्यापला.
पाझडीं–दाट झुडुपें.
पाटा–आडपडदा.
पाटाऊ–वस्त्र.
पाटु–पट्टा.
पाड, पाडु–साम्य, योग्यता, वेगळेपण, मान, किंमत.
पाडि–डोंगर, टेंकाड.
पाणिवलें–पाण्यातील केरकचरा.
पांत–पावत.
पातलें–प्राप्त झालें.
पांतां–पाहातां.
पानियेडें–तळें, जळपात्र.
पांपरा–लाथ.
पाबली–तुच्छ, नश्वर.
पायलू–पायाकडून उपजलेला, पायाळु
पारुखति–न राहती, न घडती, बंद होती, रुसती.
पालवे–पदर.
पाल्हाळु–विस्तार, गाबाळ, पाझर.
पालिंगणें–पंक्ति.

पालूविला-परजिला.
पावी-पाहावी, अवलोकावी.
पासवणें-फांस, बंधन.
पासिक-फांस.
पाहला-पातला, आला.
पाहांती-प्रकाश पावणारी,
पाहारु-प्रहर.
पाहाले-उजाडलें, प्रातःकाळ.
पाहिचा-उदयिकचा.
पाहूती-पायरी.
प्राकृतीं-अनधिकाऱ्यांनीं.
प्रांजल-सुगम, सोपें.
पींथि-पितात.
पुडुति-पुनः.
पुढिल, पुढैल-जवळचा, दुसरा.
पुणु-पुनः, पण, परंतु.
पुरुता-पुर्ता, पूर्ण.
पूंसा-पक्षी, पोपट.
पेंठा-आडरस्ता.
पेणा-मुक्काम, टप्पा, मजल.
पेलावा-ढकलावा, प्रेरावा.
पेलिला, पेलुनि-ढकलिला, ढकलून.
पैकु-समुदाय.
पैंज-प्रतिज्ञा ( पइज्जा. )
पैयारें-पाहिरी.
पैसारु-मार्ग, ( पादसार. )
पैसु, सें-मार्ग.
पोखलें-पोषलें.
पोटळूनियां-पोटाशीं धरून.
पोताशाची-भीमसेनी कापूर.
पौलि-प्रकार, सभोंवतालील भिंत.

## फ

फटिकु-स्फटिक.
फली-समुदाय, रांग, पक्ष.
फाडेवरि-वेगळे करीपर्यंत
फावले-प्राप्त झालें.
फावा-प्राप्ती, लाभ.
फुडें-खरें, बरें, स्पष्ट.
फूटति-स्पष्ट, धड.
फूटावें-दूर व्हावें.
फूटी-विकास, प्रकटता.
फेडणें-घालवणें, नाहींसा करणें, पुसणें, सोडणें.

## ब

बग-मार्ग, योग, देखावा, संबंध.
बनकरु-माळी.
बरटेनि-चिखलानें.
बरडी-माळजमीन.
बरल-भ्रांत, अस्वस्थ, एकाचें एक बोलणार, दुर्मार्गप्रवृत्त.
बरवतें-चांगलें.
बरवा-चांगला.
बलियावीलें-बळकट केले.
बहुते ( येकु )-फार, पुष्कळ.
बांधे-आकार.

बापु–वडिल, मान्य, संन्मान्य.
बापिकें–वडिलार्जित.
बाबुली–शेवाळ, गोंडाळ.
बाहाकातें–फाकणारीं.
बाहुडे, बहुडे–जाई, पाठवी, निरोप देई.
बाहिरसवडिआ–बहिरोष्ठानें, स्पष्टपणानें.
बिरिदांचे–बाणेदार, प्रतिज्ञावंत, थोर.
बिंवडु–बीजपोषक जमीन.
बीक–आधिक्य, आवड, शोभा, बडिवार.
बुडडा–बुडबुडा.
बूंथि, बुंथी–बुरखा, आच्छादन.
बेगें–खिडकी.
बेठा–बसलेला
बेंथु–दांडगा.
बैसणें–आसन.
बोधला–ज्ञानसंपन्न, कळला.
बोंवलें–लिंपले, सारवले.
बोबांतां–हाक मारतां, पुकारतां.
बोलावें–वक्तव्य.
बोलती–बोलणारी, अभिप्राय स्पष्ट करणारी
बोलिजत–बोलिलें जात.
बोहिलीं–भस्म केलीं.
बौहसपणें, बौहस–फार, अत्यंत.
बौहे–फार, पुष्कळ.

भ

भडसे–पूर, महत्व, लोट, आधिक्य.
भंगी–रीति, प्रकार.
भरवसेनि–भरवश्यानें.
भरितु–पूर्ण, भरलेला.
भरें–पूर्ण, अशयित.
भले–हवेतसे, चांगले.
भ्रमातुकातें–गरगर फिरणारे.
भांगार–सोनें.
भांजे–भग्न होई, तुटे.
भाडिचा–बीभत्स व्यवहार व भाषण करणाऱ्या स्त्रीशीं व्यवहार ठेवणारा.
भाणें–ताट, पात्र.
भातें–मजूरी, पोटगी.
भांभ, भा–भ्रांति, शोभा, सौंदर्य.
भारणी–वशीकरण.
भांसललें–भ्रंशलेलें.
भितिल–भितील.
भुरुहिं–वनस्पति.
भूतला–झालेला, अनुभवलेला.
भूतषिचां–भूतरूप खिचडी.
भूवंग–सर्प.
भोंकसा–सगळें चर्म, मृत जनावराचें गवत वगैरे भरून ठेवलेलें सबंद कातडे.
भोंज–संतोष, महत्त्व, सोंग, स्वेच्छा, कौतुक,

म

मगावासि–शोध केला जावास.
मऱ्हाटा–उघडा, प्राकृत, सुगम, मराठी भाषेंतील, भाषेनें.

मवला-मोजक्या.
मवावा-मोजावा.
महाकाव्याराऊ-महाकाव्यांचा राजा.
महारिखीचें-महर्षीचें.
महुर-मधुर.
ह्मणिपती-ह्मटले जातात, ह्मणवितात.
ह्मणियागत-आज्ञाधारक.
मांगल-मंगळ, पवित्र.
मागीलकी-पूर्वीची.
माजवण-कैफाचे पदार्थ.
मांजिठे-तांबडें वस्त्र.
माजिवटा-मध्यें.
माझारि-मध्यें.
माझिवडे-मध्यें, मध्यवाटेंत.
मांट-किर्र, निबिड.
माथुला-लहान रवि.
मांदल-वाद्यविशेष.
मांदोडा-फळांचा घड, बाहुल्य.
माधवी-वसंत.
मानेयाचे-अहंतावान पुरुषाचे.
मालें-राब, काकवी.
माल्हवे-विझे.
मासिं-मजशीं.
माह्येर-मायघर.
मिरवणियां-मिरविलेलीं रूपें.
मिळणीसमें-संयोगाबरोबर, प्राप्तिबरोबर.
मीति-गणना.
मीनले-मिळाला, भेटले, एकत्र झाले.
मुगतु-मुक्त.
मुगुतें-सायुज्य.
मुळीं-तळवटीं.
मेकली-घट्ट बांधलेलीं.
मेघौडें-लहान मेघ.
मेरे-मर्यादेस.
मेल्हावणें-संयोग.
मेहुडें-लहान मेघ.
मैले-योगानें, प्राप्तीनें.
मोगर-निवडक लोक.
मोटका-थोडकें, इवलेसें.
मोडौनियेणें-भरानें येणें, मोडून येणें.
मोहरें-सन्मार्गी.
मोहलले-भ्रांत झाले.
मोहोर-सन्मार्ग, दिशा, अभिमुखता.
मोआलें-मवाळ, नरम.

## य

यकवंकी-एकाकार.
यज्ञभावितीं-यज्ञानें पूजिलेल्या.
यंत्रवरचि मार-गोलंदाज.
येकोंळ-येकवेळ.
येतुला इतका, एवढा.
योगानिक-योगाग्नि ज्यानें ठेवला तो.

## र

रंगाथिलें-रंगविलेलें.
रमानाहें-रमानाथानें.

रळीं–विनोदानें.
रसव्रात्ति–शृंगारादिरसांची प्रकटता.
रसोयें–पाक.
रहवरु–रथश्रेष्ठ.
राउवें–पोपट.
राउनि–निश्चल करून, स्थिर करून, स्तब्ध करून, एकान्त करून.
राउळीं–राजवाड्यांत, महालांत.
राजवंटा–राजमार्ग.
राणिव–राजपण.
राभस्य–त्वरा, सामर्थ्य, बलात्कार.
राल–आसक्ति.
रावित–रंगवीत, रांपवीत.
रासौभा–पखलण.
राहांत–स्तब्धता, लोप.
राहांतें–स्तब्धता.
ऱ्हाय–राही.
रितु–ऋतूंच्या.
रितुपति–वसंत.
रूढ–प्रसिद्ध, लोकमान्य.
रेखा–काव्य रचना, अक्षरपंक्ति.
रेवले–बुजालें, सांचलें, रुतलें.
रेवा–रुतण्याजोगी मऊ वाळू.
रोसें–राग, क्रोध.

## ल

लंहिदवडी–लगबग, गडबड.
लाग–संबंध.
लागणेयां–लागट करणारा जो तो लागणा, त्याला.



लागु–संबंध.
लाटीं–वीचि.
लाडेपण—बलिष्ठता.
लाणि—प्राति, गोळा करणें, मर्यादा.
लादु—लभ्य.
लांबा—पर्जन्य पडून भातगोट्याचें दुसऱ्यांदा उगवणारें रोप.
लाहा—अतिशयित इच्छा.
लिंगभेदु—शिष्यत्वादिचिन्हनाश.
लिंगु—चिन्ह, दैवत, लक्षण, मर्यादाचिन्ह.
लूसिली—खुडली, मोडली.
लेख—गणना, आकार.
लेप—दोष, मळ, चित्र, वर्णलेप.
लेसां—बरे रीतीनें.
लो—लय.

## व

वंगु—कलंक, डाग.
वचिजे—जावें.
वज्रयोगें—हठयोग.
वडपें—वृष्टि.
वणवला—वणव्यानें व्यापिला.
वणिजे—उदिमास.
वणेसाठीं—व्यापाराकरतां, उदिमाकरितां.
वरगण—वांटणी.
वरचिंलि, वरिचील—वरकड, वरील.
वरपडा, वरिपडा—स्वाधीन, पडता.

वरिवं—शोभा, उत्कृष्टपणा.
वरिवावें—वर जावें, उलट जावें, चढून जावें.
वर्षु—पाऊस, वृष्टि.
वलघलेयां—उल्लंघल्यास.
वसें—वशीं.
वसैठ—वासस्थिति, वासस्थान.
वसैठा—वासस्थानक.
वहिला—सत्वर.
वहिवटीं—शेतें वाहणाऱ्यां लोकांच्या नावाचा पट्ट ह्मणजे याद.
वाइलें—वाहिलें, पेरिलें.
वाउनि—वाहून.
वाउर—वाईट.
वाउलीं—व्यर्थपणें, रिकामा.
वाखारी—वखार.
वाखोरां—हृदयरूप कपाटांत, छातीच्या कपाटांत.
वागारे—घोड्याचे दोर.
वागुर, वागूर—जाळें.
वांझौलें—वांझ फुलें.
वाटवंधें—वाटमार.
वाटवधेया—वाट मारणारातें.
वांठिवांविण—पुरुषार्थाविण.
वाणि—कमताई, वाचा.
वाणिये—प्रकारें, तऱ्हेनें.
वांत—वाहत.
वानिया—प्रकार, इयत्ता.
वानिवस—स्वेच्छा, कौतुक, दैवगती, मध्यगृह.
वानी—पर्ण, कस, सारखें.
वापसा—बीं पेरावयाचा समय.
वायकांडें—व्यर्थ बाण.
वायाणें, णी—व्यर्थ, निष्फळ.
वारिक—घोडे.
वारुक—घोडे.
वारुनि—सांगून, बजावून, निवडून, घालवून.
वालभाचें—प्रेम, आवड.
वालीप—गंवसणी.
वावटे—विश्रांति पावे.
वावटेलें—विश्रांत.
वावडी—दुर्घट, कठिण, घातक.
वावि—चार हातांनीं.
वास—वाट.
वासिपे, पु—भय पावे, नाश पावे.
वाहर—पीडा, वोहे, कास.
वाहातवणां—मार्गस्थ.
वाहो—कृषिकर्म.
व्याजें—निमित्त, रूप.
विकडी—चातुर्य.
विकरविला—विकार पावविला.
विकरे—क्षोभे.
विखें—विषयीं.
विखोंचे—भोंसकलें जाई.
विचंबे—श्रमे, कष्टे, उपहसे.
विणावणि—विणकर.

विंदाणें—निग्रह, कौतुक, दगाबाजी, येणें.
विनट—रंग, चिन्ह, खेळगडी.
विपाइलेया—एखादा, विरळा.
विपायें—कदाचित्, प्रसंगें.
विरगतां—विरक्तां.
विरजा—सहाय, व्यापक, दुसरा.
विरजेयाचेनि--सहायकर्त्याच्यानें.
विरु--विरोध.
विरुढि—अंकुर, पालवी.
विलग--उपद्रव.
विवळलें—प्रभात जालें, प्रकाशित झालें.
विवसी—पिशाची, डांकीण, त्रास.
विशेषिति—विशेष वर्णन करतात.
विश्वे--सर्वतोपरी.
विषें--विषयीं.
विस--असंभाव्य गोष्ट, विषम गोष्ट.
विसकुसे--विषमत्वें, वैषम्यानें, दुःखानें, गोंधळून.
विसणैले--वोसणेले, विषाद पावलेले.
विसंभति--सोडिती, मोकळिती.
विसंवादु--विरोध, भिन्नपणा.
विसुरा, रें--विस्मय, भ्रम, स्वरूप, चित्र.
विहिला--नियमिला, सांगितला.
वीकेति—विकत्ति.
वीजे--उत्पन्न होतो, निष्पन्न होतो.
वीपे--जाय.
वेखासें--श्रम, वाईट. व्यर्थ.
वेधयतियें--पृथ्वीला.
वेऱ्हीं, रि, ऱ्ही--पर्यंत.
वेल--काळ, विलंब, समय.
वेल्हाल--विलासी, विस्तृत.
वेल्हावणें--भोग घेणें, विस्तरणें.
वेसजें--कम
वेसन--जनावराच्या नाकांत घालतात दोरी ती, श्रोतृव्याख्यातृसंबंध, आसक्ति.
वैल्हे--सत्वर
वोज, वौजें-- चांगलें, प्रकार.
वोडण-- ढाल
वोतपली--कोंवळे ऊन, दीप्ति.
वोलिंबा--उधय, वाळवी
वोंवरा--खोलींत
वोहटावाहिला--मौन्य धरिलें

## श

शयानु--निजलेला.
श्रद्धासूं--श्रद्धावंतांनीं.
शास्ति—नियमन, शास्त्र.
श्रावली--संतृप्त.
शिखराश्रिलेयां--सानुमंत, पर्वत.
श्रिष्टि—सृष्टि.
श्येया—शंभरास.

## ष

षडा—खडा.

षडाडिलां--खडाडिता.
षूणें--खुणें.

## स

सकतीसवें-शक्तीबरोबर.
संकुल-व्याप्त, गर्द.
संकें-डाकलग.
संघे-जोडी, लावी.
संचकाची-चिक्कु, कृपण.
संजात-सार्थक.
सडिया आइती-केवळ देहमात्र सामग्रीनें.
सडेआ-एकट्याला, केवळ.
सणाणे-तीक्ष्ण.
सदमुखपण-सन्मुखता.
संदु-छंद.
सधर-बळकट, समर्थ.
सपिलें-समग्र दूध पिणारीं वत्सें.
सपुर-संपूर्ण, भरपूर.
सम-अविषम.
समस्या-शंका.
समात-समावत.
संयती-इंद्रिय नियमन.
सर-शर, बाण.
सरतें-ग्राह्य, मान्य, संपता.
सरली-मोकळीक.
सरलें--संपलें.
सरिपाडु--सोंगट्या.
सरिसे--सारखे, व्यापक.
सरौनि--संपून.
सली--छळी, क्षोभी.
संवचोर, संवियां--संगतीचा चोर, सोबतीचा चोर.
सवडी--ओठ.
सवंतारेनि--स्थिर आश्रयानें, ध्रुव जाग्याच्या आश्रयानें.
संवरे--सांवरतां येई, आटोपे.
संवसारा--पसारा, विस्तार, अनुसरणें, लाभ, दर्शनयोग्य.
सवा--बरोबर, समवेत, सह.
संवादियें--प्रश्नोत्तर करणारा.
सवियां--स्वतः
संहारवाहारे--संहाररूप उत्पात.
स्वसुखिचेनि--आत्मसुखाच्या ठायीं असणाऱ्या.
साइ-साहीं.
साइखेडेनि-सुत्रबाहुलीनें.
साउनि-सहन करून.
सांकडा-कठिण, संकटमय.
साकडु-कठिण.
साकें-डाकलग.
सांघडे-आचरण्यास सारखे.
सांचलु-चाहूल, जाग.
साचोकारें-यथार्थत्वें.
साजणें-सख्य, सज होणें.
सांटपा-साठवण, ब्रह्म.
सांटोवा-संग्रह.
साटोवाटी--अदलाबदल.
सांडले--सुटले.

सांता--अस् धातुचें वर्तमानकालवाचक पुल्लिंगी एकवचन.

सांते--अस् धातूचें वर्तमानकालवाचक धातुसाधित अनेकवचन संतः, त्याचें मराठी सांते ( पु. अ. )

साद--शब्द.

सांदुकला-पेटला.

साधिति-मारिति, सिद्धीस नेणें, अनुकूल करणें.

सांधुक्षणें-पेटणें.

साना-लहान.

सान्हाउ-कवच, चिलखत.

सानीव-लहानपण.

सांपडे-संपात होतो, गोंधळ होतो.

सांपें, पु-सांप्रत.

सांपेंचा-सांप्रतचा.

साबरें-अंगण.

साबेरी-सावरीचें झाड.

सामधेनिआ-समधातपणें.

सामान्यत्वें-नीचपणानें.

सारिखे-योग्य.

सावाइं-मदतीच्याकामीं, स्वेच्छेनें.

सावाऊं, ओ-सहाय, वृद्धि.

सान्हाउ-सहाय, उत्तेजक.

सान्हिआं, सावियां-बरोबर, समवेत, तत्काळ.

सावेसा--स्वेच्छा, अभिलाष.

सांसिनले-विस्तारले, भरले, साजे, जाहाले.

साहाजें-लिलीनें.

स्वाराज्य-स्वराज्याचा भाव.

सिंकिलेयां--भिजविण्यांत, सिंचण्यांत

सिघ, सीघ--शेंडा, अग्रभाग.

सिठीं--सृष्टि.

सिंपे--लिप्त होई.

सिरे, रें--क्षरे, खरें, कमी होई.

सिंविजे--स्पर्शिजे.

सिहाणें--शिक्षाज्ञ, शहाणें, सुज्ञ.

सियाणी--प्राप्ति, लब्धि.

सीग--शेंडा.

सीतले--शिवला.

सीलं--उद्युक्त.

सुअणी--मजली, टप्पे.

सुकतेया--सुकणाऱ्या.

सुखाडले--सुख जाले.

सुखाडें--आनंदलेल्या.

सुडसु--मर्मज्ञ.

सुडावणी--एकाकारता.

सुंदु--सुवासिक.

सुभति--पडल्ये, घातली जाते.

सुमथितु--चांगला घुसळलेला.

सुयाण--सुकाळ, घालणें.

सुयें--घाली.

सुरसाहें--देवांच्या साहाय्याच्या कामीं.

सुवट--सुरूप, छानदार, बेश.

सुवण--जन्म.

सुवर्णवाइ--सोनपण.

सुवर्म--मार्मिक.

सुसडा--चांगलें सडीक.
सुहडा--चांगला योद्धा, राजा.
सुहाडा--आनंदयुक्त, मनोरम.
सूची--चिंती.
सूठिका--पडणें, सर.
सूतला--निजला.
सूती--वास करणें.
सूनु--घालून.
सूनि--घालून.
सूषाचें--सुखाचें.
से--स्मृति
सेखामृत--शेषामृत
सेयरी--डाकीण, भय, पिशाची.
सेल--उत्तम वांटा
सेलत--हातानें पाणी तोडीत
सेलवांटा--उत्तम शेलक्या वाटा
सेवडी--चर्म
सेविती--भजणाऱ्यांत
सेस--नवरानवरीस सोयऱ्यांनीं अक्षतां ठेवणें, उरलें.
सैघ--समूह, केवळ
स्थैर्यताअनुजिनी--स्थैर्याची धाकटी बहीण.
सोआंगें--सोंगें
सोंके--दु:खे, असंतुष्ट होई.
सोय--स्वरूप, ओळख, मार्ग.
सोरसें--प्रसाद, गोडी, अभिप्राय.
सोसु--शोष, तृष्णा.

### ह

हकरे--टकरा.
हरैला--हरविला, घालविला.
हलुवट-हलकें.
हलुवारणें-हलकें केले, झाले.
हलुवारपण-मार्दव.
हल्लरु-एकप्रकारचें गाणें, पाळणा हालवितांना गावयाचें गाणें.
हवाव-शोभा, सुखी होणें.
हांगा-अंग, अरे.
हाततुकें-तर्क, अदमास.
हातबोनें-हातांतले भक्ष्य.
हातासनें-मिषें.
हाथिवेनि-काडवातीनें.
हान-मग, कीं, जें, कांहीं, हा, ही, कदाचित्, का, पा, मा.
हारतला-हरविला.
हालासि-हाणिला गेलास, मारिला गेलास.
ऱ्हातेआतें-राहाणाऱ्यास.
हियें-हृदय.
हीतलें-दूर नेणें, हिरून नेणें.
हींव-हिम.
हुडा-समय, उत्सव, सुकाळ.
हुडे-बुरुज.
हेंकाडु-अडाणी.
हेंट-येथें, खाली.
हेय-निषिद्ध.
हेला-वेळा.
होडा-पैज.
होनि-होऊन.

### क्ष

क्षपिलें-काढून टाकले.
क्षीरारें-खिल्लार.
क्षेत्रीं-शेतांत.

# प्राचीन शब्दकोश

ह्या खंडांत ज्ञानेश्वरींतील एकोनएक शब्दांची बृहत्सूचि द्यावयाचा विचार होता. पण ती फारच व्यापक होत असल्यामुळें तो विचार तूर्त तहकूब केला आहे. या ठिकाणीं अध्याय १३ ते १८ यांतील ठळक शब्दांचे अर्थ दिले आहेत. पहिल्या बारा अध्यायांतील शब्द पहिल्या खंडांत दिलेच आहेत.

**अ.**

**अगारीं**–अग्रीं, अंकुरीं.
**अगारे**–अग्राच्या अन्या, शेंडे, अंकुर.
**अडवंतावो**–अडथळा.
**अडी**–रोधी.
**अणगटीं**–मुळांचे ठायीं, शरीरीं.
**अणुआरु**–बारीक चुरा.
**अतिकरे**–उशीरानें.
**अतूट**–सबंद, बळकट.
**अदलपण**–झेंपण्याचें असामर्थ्य.
**अभिचार**–मंत्रप्रयोग.
**अनावरातें**–जें आवरण्यास कठिण त्यास
**अनुघडु**–उघाड नसलेला.
**अनुपायनी**–सहज.
**अनुभौ**–अनुभव.
**अपखडी**–निंदा.
**अपटांतरी**–पडद्याच्या आंत, परोक्ष.
**अपवाडु**–उमट नसलेला.
**अपाडु**–अप्रतिबंध.
**अबोट**–अखंडित लेप.
**अभियत्न**–जवळ नेणारा प्रयत्न.
**अरडांते**–आरडणाऱ्याला.
**अरुवारें**–सुकुमार, मृदु.
**अल्हें**–लवकर, एकदम.
**अळू**–लघू, लहान.
**अवगळला**–ढासळलेला, गाळानें भरलेला.
**अवर**–अपर, खालचे, कनिष्ट.
**अवल्हाओ**–अपलाभ, अनिष्ट लाभ.
**अवष्टंभ**–ऊर्मि.
**अवागमें**–अशास्त्रानें.
**अवाटु**–वाटेची गरज नसलेला, आडमार्गानें जाणारा.
**अव्हातें**–दुष्ट पक्षानें.
**अव्हांतिक**–भलत्याच्या मालकीचें.
**अविनाभावें**–व्याप्तीनें.
**अवेंगवाणें**–अव्यंग.
**अशंकडी**–विसंगतपणा.
**असंघाडि**–असंघटित.
**असंभड**–असंबद्ध.
**असंवरे**–सांवरण्यास कठिण.
**असिकें**–अशेष, समग्र, सर्व.
**अहलि**–जमली.
**अक्षौणी**–सैन्य.

## आ.

आइती–विस्तार, ऐट.
आउख–आयुष्य.
आउतिं–बैलांच्या मेळयांत, नांग-राच्या जुवांत.
आकर्णा–ऐका.
आकसाला–पारख.
आखरु–अक्षर.
आंखें–अंकानें.
आंगझील–वरची चकाकी, आंगची साल.
आंगदट–आंगानें दट, बळकट.
आगरा–क्षेत्रास.
आगलिक–आधिक्य.
आगलें–अन्य, भिन्न.
आंगवसें–स्वरूपतः.
आगारी–डिरी.
आगिठां–शेगडीवर.
आंगोपचार–अवयवांचे उपचार.
आग्रया–आग्रहास.
आघाट–भाग.
आटणियां–क्लेश.
आंटि–टु–मिठी, श्रम.
आठुलैजे–घट्ट होइजे, बांधिजे, निबर होइजे.
आडमोडी–प्रतिबंधाचा नाश.
आडवंगी–खीळ.
आडवारा–अटकाव.
आडसें–अडथळा.
आडें–दादरा, अडसर, प्रतिबंध.
आढंच–वर.
आणी–अग्र, टोंक आयणी.
आणोजें–अंकुर.
आते–पावे, होई, प्राप्त होई.
आंतौते–आंतील.
आधवणी–अर्धवट तृप्त, अर्धपोटी.
आंध्य–आंधळेपणा.
आधाइलें–म्यालें.
आधैलें–अर्ध्या ताटांत जेवणें.
आनाभूती–नाना भूतांच्या रूपानें.
आनु–दुसरा.
आपजलिये–उत्पन्न झालेल्या.
आपैतिया–स्वाधीन.
आंबुखे–शिंतोडे.
आबुथे–विपरीत होय.
आबुली–प्रिय पत्नी, स्त्री.
आमुला–प्रिय पती, नवरा.
आयें–आकार, प्रमाण, लाभ.
आर–अंकुर.
आरवसें–अंकुराच्या योगानें.
आरा–अंकुर.
आरौतें–अलीकडील.
आलव–आलाप.
आलावला–बळास आला.
आलिखलें–गोंठलें, घट्ट झालें.
आलोचु–विचार.
आवगु–घोड्याच्या काहाडण्या.

आवगे-स्वीकारला जाई.
आवांके-धैर्य धरी.
आवासु-स्थान.
आविष्कारें-प्राकट्यें, बळें.
आंविसा-आमिषास.
आंविसाले-आमिषाचें स्थान.
आंवु-ऊर्मि, वाचेची निष्ठुरता,प्रतिष्ठा.
आंवुट-साडे तीन.
आवैल-येईल, उगवेल.
आशसेया-आशारूपी डांकीण.
आसतूटिया-निरपेक्षेनें.
आसलग-सोपा, गोड.
आसललें-मंद गतीनें वाहणारें.
आहाच वाहाच-वरवर.
आहाड वाहाड-विस्ताराविस्तार.
आहाण-सर्व.
आहावसुवारे-अद्भुत राजवाडे.

## इ.

इहंतेसि-हें ह्मणून बुद्धि तीस.
इटाल-धोंडमार.
इसालु-ईर्ष्यालु, कामुक.

## उ.

उखरा-वालुकामय अरण्य.
उखरेवे-जमलेल्या रेतीच्या ढिगांत.
उखि-ऊहा, अनित्यत्व.
उखिता-एकसरा, आगंतुक.
उखिविखी-उहापोह, होयनव्हे.
उगाणा-झाडा, उपदेश.
उजगरा-जागृती.
उजरि-ऋजुता, विस्तार इ. इ.
उजिरिया-उदय, महत्व, उत्कर्ष.
उजिवडे-प्रकाश.
उटकलें-वेगळें झालें.
उठविजसी-उठिवितोस.
उडवा-रचिलेली राशि.
उंडी-ग्रास, वली.
उणखुण-कमी अधीक, कामना.
उणेनि-उण्यानें.
उतान्ही-धान सोडलेलीं बाळें, तृष्णा.
उदले-उधळे, वर येई.
उद्याणी-मांडणी, सांगण, उद्घाटण.
उदावादा-परिपूर्णत्व.
उधि-निर्गम.
उपखे-कमी होई,खर्च होई,नाश पावे
उपखो-कमी होऊं देणें, खर्च करणें.
उपरतविलें-उफराटें फिरविलें.
उपलवणी-दृढीकरण.
उपलाणें-जिनावेगळें घोडें.
उपेगु-उपयोग.
उफकेन-उपेक्षेनें.
उवडे-पालथें, कललेलें.
उभगु-कंटाळा.
उभजे-त्रासे, कंटाळा करी.
उभड्ड-लोट, झरा.
उभणें-उभारणें, रचना.
उभलिचा-खोकल्याची ढास.

उभाट–उद्भट, विशाल, मोठें.
उमचला–सुटला.
उमचावेया–उगविण्यास.
उमडे–उमटे.
उमप–अमूप, पुष्कळ.
उमसिजैल–सांगितलें जाईल.
उमरुझनि–मुरझून.
उमाणी–मोजी.
उमाणें–माप.
उमाहो–पूर.
उमेठा–मेळावा.
उरिणें–ऋणमुक्तता.
उरोधु–अवरोध,प्रतिबंध,आग्रह,भीड.
उलिंग–चाकऱ्या नोकऱ्या,बिगार, वेठ
उलिंगें–वेठ, काम, बिगार.
उवलें–प्रसन्न, शुद्ध.
उवाय–सुख, आनंद.
उवावो–उत्साह, अवकाश.
उवीलु–अतिक्रांत वेळ, सायंकाळ.
उसटिलें–उच्छिष्ट झालेलें.
उससे–प्रकट होय.

## ए.

एकलौते—एक्या लेंकराच्या मायेस.
एकवंके—सारखेपणा.
एकवंकौनिया—समग्र व सरळ करून.
एकावट—एक झालेले.
एकावदी—ऐक्य.
एकाहाथी—एक आहेत.
एकोधियें–एखादे.
एटालें–विटाळीं.

## ऐ.

ऐहेरा–अहेर.
ऐहेव–सुवासिनी.

## ॐ.

ॐझीलपणें–भार, वजन.
ॐपासिरा–संबंध.
ॐलगणें–आश्रय, सेवा, रक्षण.
ॐवांडैल–लवेल.

## क.

कटा रे–हाय रे.
कटले–श्रमी झाले.
कडा–बाजूनें.
कणवा–दयेनें.
कंथा–झोळी.
कदर्थत–कष्टी करीत.
कदरसि–भय घेसि.
कऱ्हेयाचा–उंटाचा.
कलासी–कौशल्य.
कल्हातां–कलत असतां.
कव–कवटाळणें.
कश्मलु–मळ, दोष.
कांटसु–कांटेरी.
कांटियडे–कांट्याची जाळी.

कांडें–भाग, टिपरें.
काणि–सूचना.
कांदे–कंद.
कामठां–कारखाना, टांकसाळ.
कालली–पायरवानें काळी झालेली.
कालाबुला–कासावीस.
कालासे–बांधिला जाई.
कालियाणा–कृष्णसर्प.
कालुग–काळा.
कावडी–कावड.
कावरुखें–क्षणभंगुर, अदृष्टपूर्व.
कांवरूमूल–वायुनिरोधनस्थानविशेष.
कावरें–भ्रांत.
काशि–माजबंधीं, कमरेस.
कुटि–स्थान, कपट, निंदा.
कुड्मल–कळी.
कुबुजे–कुबडे.
कुबोल–अपशब्द.
कुरौंडी–वोवाळणें.
कुसल–गवताच्या अणकुच्या.
कुंसि–कुक्षित.
कुहा–विहीर.
कुहिलें–कुजलेलें.
कूटिचें–निंदेचें.
कैकाणें–खोगीर.
केलवलि–प्रौढ झाली.
कैकटे–कैकाड्यांचा देश.
कोडी–कौतुक, आवड.
कोढी–कुष्ठरोगी.
कोंता–शस्त्रविशेष.
कोंपट–झोंपडी.
कोंपटि–लहान झोंपडी, कोंप.
कोंभारा–कोंब.
कोलें–तिलादिकांचीं काष्टें.
क्रांतमति–व्यापकबुद्धि.

## ख.

खटेया–वाईटाला.
खडकिलां–खडकाचे कपरे असलेले.
खडाणें–अदृष्ट गाईस.
खडुपाणी–खड्गपाणि.
खणुवाला–गोड, सरळ.
खतेलें–लिप्त
खनुवाले–सरळ
खवणलें–कंड्व, उत्कंठा.
खांकरूं–फलोन्मुख होऊं, उसन्न होऊं, गळा साफ करतां.
खांखरैजति–गळा साफ करतात, उसन्न होतात, फलोन्मुख होतात.
खागें–अंत्यस्थल, विषय.
खांची–दमे, कमी होई.
खांडेहूनि–खड्गाहून.
खाताडें–खरकटें.
खिरडें–मागें सरें.
खुडुके–अडके.
खुरखोडी–लाथाळ गुरुं.

खुरथोडी–दुष्ट गाई.
खुरपें–शस्त्रविशेष.
खुरीं–खुराच्या ठाइं.
खेटली–गर्दीनें जमली.
खेवणें–कोंदणें.
खेवंगी–अंश.
खोंकरपणें–विनाशिता.
खोंचणी–भोसकणें.
खोटी–गोळा.
खोडां–लाकडाचें अडकण.
खोदें–नाशबुद्धीनें.
खोमणें–लवणें, वक्र होणें, हानि.
खोमे–लवे, वक्र होई.
खोलणें–पुढें चालणें, फिरणें.
खोलविजति–सापडविती.

## ग.

गंड्डु–दर्प, गर्व.
गंडी–दगडविशेष.
गदलपणे–केरपणानें.
गरुवा–मोठा.
गव्हरीं–गुहेंत.
गवांदि–अन्नसत्र.
गाडारा–पाया.
गाणांवाणां–गाण्यावाण्यानें.
गादे–पीडा पावे.
गाभागोभा–प्रतिबंध.
गाळी–टाकी, सांडी.
गावंधणें–गांवचीं गुरें.
गांवरसैया–गांवांतल्या मोरीचें पाणी.
गावारु–गव्हार, अडाणी.
गुडगा–अवयव विशेष.
गुंडे–दगड.
गुढा–गुंडा, दगड.
गोख–मध्यवर्त्ति लोक.
गोंदली–पिशाची, कैकाडी.
गोधुलुक–गाईच्या पायाची धूळ. सूर्य-
अस्तमानसमय.
गोरी–पारधी.
गोरुवें–गुरें.
गोवारी–गुराखी, गुरुसखि.
गोवी–गुंतागुंत.
गोसी–परस्पर आकर्षण, भांडवल.
ग्रामकोल–गावांतील कोल लोक.

## घ.

घनावलि–घट्ट झालेली, मेघपंक्ति.
घाइं–घावाचे ठाइं.
घामेजे–श्रमी होई.
घुमरी–भरास.
घुमे–घुम् शब्द करणें, हाले.
घुरें–खोटें सोनें.
घेणी–स्वीकार, मान.

## च.

चउर–चतुर.
चवलित–बडबडत.

चंक्रमण-सातत्यानें गमन.
चांगावेया-चांगुलपणास.
चाडा-इच्छा, आवड.
चाडैला-आसक्त.
चांथी-बडबड.
चांपडे-फासे.
चिरींव-चिरलेली.
चूकी-चूक, प्रमाद.
चोखटिवां-चांगुलपणास.
चोखेल-उत्तम, स्पष्ट, सस्ता.
चोज-कौतुक.
चोंढि-गर्त्ता.
चौखुरी-बाज.
चौबारा-चवाठ्यावर.

छ.

छांदसत्वें-लडिवाळपणें.

ज.

जचे-पीडे.
जाकलिजत-व्यात होत असे.
जाततेन-जन्मल्या.
जानेतानें-तान्हें वासरूं.
जाळ-जाळें.
जाली-दहन करी.
जालेन-झालेल्या.
जावलि-सान्निध्य, सादृश्य.
जीणि-वांचणें, जिंकणें.

जिवितांतु-जीवितांतून.
जुझं-युद्ध.
जुंबाडे-समुदाय.
जुवारुं-द्यूत.
जेविति-जेवण्याची.
जोईस-ज्योतिषी.
जोगावणें-निर्वाह करणें, पोसणें, प्रगटणें, समजावणें.

झ.

झारि-क्षार.
झांसुरे-आळस येई, वोसणे, धोका धरी.
झोति-विक्षेप.

ट.

टकुली-आशा, उत्कट इच्छा, हपाप.
टकें-सुटलेलें, सत्यापासून सुटलेलें.
टवच-दु:ख, दुख.
टांची-अल्प, लहान.
टालिये-टाळाला, हाताच्या टाळीला.
टिकलग-शोभिवंत, जडित.
टिटंघर-तिट्यावरचें घर.
टेकें-टेकलो.
टेहणी-निर्बंध.
टोपु-फुगवटा, फुगारा, सूज.

ठ.

ठके-कमी पडे, बंद होई.

ठसेंठोमसें-मोठें धाटें.
ठाणें-स्वरूप, आकार.
ठाणोरियाचें-ठार पडलेल्याचे.
ठांसी-स्वस्थ बससी.
ठिकरिया-टुकडे.
ठी-स्थिति.
ठीक-जड, मोत्यांचा झुबका.
ठीकरणें-निश्चय करणें, स्थैर्य करणें.

### ड.

डगरु-प्रसिद्धि.
डगलें-स्थूल.
डाऊ-प्रसंग.
डाकुलिया-चुटक्या.
डांगुरटी-डांगोरा.
डाल-शाखा, डाहाळी.
डाली-फुलेंफळें घालावयाची पाटी.
डालुका-लहान डाहाळी.
डावी-दूर करी, परिहार करी.
डाहारिजे-भागिजे, प्रकाशिजे, प्रसिद्ध करिजे.
डिंडिमा-वाद्य विशेष, गजर.
डुडुल-वोखिटें पाखरूं, घुबड.
डैंडि-डांगोरा.
डौरु-थट्टा करी, उपहास करी.

### ढ

ढाल-स्वभाव, घर्षण.
ढिवांचे-मुलाम्याचे.
ढूमे-डगर, डोंगर, टेकडी.
ढेंढें-सूप, घेंड, प्रस्थ.
ढेंपुली-ढेंकूळ.
ढोंडी-धोंड, डगर, दगड, आकार.

### त.

तडवा-छत, तलवा.
तणाचें-गवताचें, पेंढ्याचें.
तलबुडे-खालचा बुंधा, बुड.
तलहाटीं-अधोभागीं.
तलौटेपण-सपाटपण, नीचपण, नम्रता.
तांडी-कळप.
तांतला-तापलेल्या.
ताला-तळ, खाल, जमिनीची सपाटी.
तिखें-तीक्ष्ण, तिखट, अणकुचीदार.
तीघ-तीन.
तीमाल-भिजवाल.
तुंडिल-दोंद आलेला.
तुलई-गादी.
तूलियें-गादीवर, कापसाच्या गादीवर.
तोंडौता-वाचाळ.
तोयबगें-पाण्याच्या उपाधीनें, देखाव्यानें.
त्राय-रक्षण.
त्रायें-सत्ता, रक्षण, ठाव.

### थ.

[ लपि ] थपिं-लपंडाव.
थरुविथरु-चोखटबिखट.

थलिवं-स्वर्णकारनिर्मित वस्तुविशेष.
थाउं, अ. थाॐ-बळ, उथळ, आश्रय, प्रांत.
थाथंबूनि-थांबवून, निरसून.
थावें-तळ, ठिकाण.
थेंकुले-ठेंगणें.
थोरांडें-मोठें.

## द.

दंदिया-वैरी, द्वंद्व करणारा.
दलवाडें-समुदाय, स्वरूप.
दवडा-पळ, धांव.
दाखठां-उंबरठा.
दाटणी-गर्दी,भरताड.
दाटुगा-दांडगा.
दांग-वन, अरण्य.
दाशिरूं-बटिक.
दाघट-दाहक, पीडक.
दिये-दिवस.
दीपलें-मशाली.
दुकळु-मोडकळलेली स्थिति.
दुर्मेलावे-दुःखसमुदाय.
दुवालि-क्लेश.
दुहवेवारी-वाईट कर्माची.
दुहिलें-दूध काढलें.
दूण-दुप्पट.
दूस-वस्त्र, तंबू, प्रमेय.
देवपैकीं-देवसमुदायांत.
देवलविंसें-पुजाऱ्याचे आंगांत येणें.
देवांगण-निश्चय.
दैवलदैवं-पुजाऱ्याचें ऊर्फ गुरवाचें दैव

## ध.

धडीं-दवडीन, घालवीन.
धाडी-हल्ला, अभिक्रम.
धांडे-हल्ले, अभिक्रम.
धानी-धान्याची रास किंवा ढीग, धान्य ठेवण्याचा ठोकळा, गृह.
धांधा-व्यापार.
धाप-धग, ताप.
धुमाडु-धामधूम, गडबड, आधिक्य, योग.
धारें-धाकटें.
धिटे-स्वैरिणी स्त्रीस.
धुवारी-धूमाची आकुलता.

## न

नई-नदी.
नडनाचु-नटाचा नाच.
नाखी-टाकी, प्राप्ति, समुपगम.
नागारी-नाग धरणारे गारुडी.
नागोवा-नागवण.
नाडर-थिल्लर, डबकें.
नावणिगी-यथार्थकथनीं.
निगलें-धुरानें, झांपडेनें.
निगावों-सुटका.
निगुतिया-युक्त्या.
निजगडे-स्वतःचे ठायीं बळकट, आत्मनिष्ठ.
निधनिं-अंतकाळ, मृत्यु.

निघिये-सम तोलांत, भ्रमणांत.
निमांते-लय पावणारे.
निरुते-खरे, निश्चित.
निरुपहिर्ति-निरुपाधिक.
निर्बुजें-गोंधळानें.
निर्वचु-निराकरण.
निर्वाळलेनि-शुद्ध, धूत, निष्कलंक.
निन्हां-अगदीं, केवळ.
निळागु-निराश्रित.
निळेयाचा-इंद्रनीळाचा.
निष्टकी-निश्चित.
निष्टंकिति-निश्चयानें चिकटवितात.
निसले-पाजळें जाई.
निसुगु-निर्लज्ज, ओंगळ.
निस्तरे-तरून जाई.
नुधवी-वर काढीत नाहीं.
नुमचवे-प्रत्युपकार न करवे.
नुरोधी-प्रतिबंध करूं नकोस.
नुसंतितां-उत्सादन केल्यावांचून.
नूकौनियां-पराभव करून,दुःख देऊन.
नेना-नेत नाहीं, जाणत नाहीं.
न्यामक-नियामक.

## प.

पडप-प्रतिष्ठा, महत्व.
पडिघांति-मारती, आदळती.
पढिगाइलें-मोजून पाहिलें, धरलें.
पढिये-अति प्रिय.
पढिकर-रोग बरा करणारा वैद्य, साहाय्यक.
परगुणे-पक्कान्न.
परमार-शत्रूंचा उच्छेद करणारे.
परवडि-रीती, प्रकार.
परिवाण-भाषा, शब्द, बोलणें.
परिवरिचें-घरचें, गुप्तस्थानचें.
पव्हिवे-मोरीस.
पलिपे-पेटे.
पवली-महामार्ग, राजमार्ग.
पसाव-प्रसाद, उपकार.
पहुरणीं-ओढाळ, भटकणारी.
पशु-आरोप.
पांउखला-लाथेनें.
पाउटी-पाहिरी.
पाउड-पैसासुपारी, दक्षणा.
पाउवा-पादुका.
पांकी-पातळ पदार्थ, पक्व अन्न.
पाखाणी-प्रक्षाळी,धुवून टाकी.
पाखालणियां-धुण्यानें.
पाखाली-प्रक्षाळी, धुई.
पांगुतले-अडकलेले, आच्छादिलेले.
पांगें-अधीनत्वानें.
पांगोरा-सूक्ष्म भाग, अंत.
पांचवेउली-पांच नांग्यांची इंगळी.
पांचिका-हीण सोन्यास.
पांजरा-पंजर, पिंजरा.
पाट-पदवी, आसन, अधिकार.
पाटाचें-अधिकार, आसन, पदवी.
पाढाउ-पढविणारा,मार्गदर्शक,साधक
पाणधी-दोन कुंपणामधील वाट.
पाणवाडा-मोरी.

पाणियड–तळें, जळपात्र.
पाणियांचा–पाण्याचा.
पांति–पावतात.
पातिजों–विश्वास ठेवों.
पापता–पापत्व.
पारकेयां–शत्रूस.
पालति–रक्षण.
पालव–इंद्रियवृत्ति.
पाल्हालें–विस्तारें, गाबाळानें.
पालें–कटकें.
पालौं–विस्तारून.
पावे–पोहोंचे.
पासाव–पासून.
पासिं–जवळ.
पासिवणें–पायमाघार.
पाहिचे–उद्यांचे.
पाहेचा–उद्यांचा.
पिचडीं–थुकीनें.
पिंडि–पाया.
पिंडु–अहंपदविशिष्ट जीव.
पिशित–मांस.
पीसा–वेडा, पिच्छ.
पीसेया–वेड्यास, वेडास.
पुटीं–मूस, पुडा, सुवर्णशोधन.
पुढारलों–पुढें झालों, कबूल झालों, बोलिलों.
पुरवाणिया–सिद्धि.
पूंस–राघूं, पारव्याचा भेद.
पेटी–जोडी.
पेंडवला–बांध.
पेंढी–जुडी.
पेणा–मजल, टप्पा, मुक्काम.
पेंदलीं–वेंटाळें.
पेंधा–गोळा.
पेले–लोटणें, संभाळून धरणें.
पेलेवेलीं–प्रतिदिन वृद्धि.
पैठी–प्रविष्ट.
पैसार–मार्ग, पसारा, विस्तार.
पैसिजे–प्रवेश करी.
पैसें–योगानें, मार्गानें.
पोटलवे–पोटाशीं धरवे, आलिंगवे.
पोटाळूं–पोटाशीं धरूं.
पोफल–प्रतिज्ञा, पैज.
पोतीं–तागाचीं पोतीं.
पोली–आवार, भोंवतालची भिंत.
पौली–महामार्ग, राजमार्ग.
प्रतिमल्ल–शत्रू, सामनेवाला.
प्रतिलपसि–अनुलक्षून बोलतोस.
प्रत्यवावो–दोष.
प्रांगण–ताशे, नगारे.
प्राची–उदय.
प्रायेचा–पूर्वींचा, पूर्ववयाचा.

फ.

फरसालें–भिन्न स्वादें.
फरारी–ध्वज, निशाण.
फाउरी–आभास.
फाडोवाडा–वेगळें करून.
फारां–पुष्कळ.
फारु–पुष्कळ.

फाली–फाडी, चिरी.
फुंजे–गर्वानें.
फुडी–स्पष्ट, खरी.
फुलिं–फुलांनीं.
फूटौनि–दमून.
फोकरिजे–वाचेनें उच्चारिजे.
फोकिलियां–वाऱ्यानें ओढून नेलेल्या, वाऱ्यानें फुंकून नेलेल्या.
फोडसें–फुरसें.

## ब

बगें–देखावा, आकार, मार्ग, संबंध.
बणवे–प्रतीतीस येई.
बडंबा–गडबड, कोलाहल.
बल्बचेन–सैराट उगवणारे गवताच्या.
बहिकरि–बहिष्कार घालून.
बहुचकै–अनेकता.
बहुवसा–फार, पुष्कळ.
बागडी–मर्कटादि नाचविणार.
बागीवल–कंप.
बाधकां–दोषांस.
बांधी–बंधन, नियम, समुदित आकार, दोहीकडील कूप.
बायणी–वायदा.
बायिणियां–वायदे.
बासट्टु–बहुविष.
बाहाली–विस्तार, वेडा.
बाहिरिवाहिरा–परभारें.
बीक–बळ, तेज.
बीजे कीजे–गमन केलें पाहिजे, आलें पाहिजे.
बुकी–मुष्टि, मूठ.
बुडकली–बुडी.
बुडलूं–बुडवूं.
बुडसले–शुष्क काष्ट.
बुबुलें–अवयव विशेष.
बुरी–कूज, रोग विशेष.
बूरु–वेडा.
बेचें–कोंभ.
बेझें–युक्ति.
बेंबल–विव्हल.
बेलें–कुंपणाचा आडा, डेळकें.
बैसणां–बैठक, आसन.
बोकौटी–झोळी.
बोबाणें–हाक मारी.
बोबांत–हाक मारीत.
बोंबे–आरोळीच्या.
बोल–भाषण, शब्द.
बोहणीए–मोलपैकीं प्रथम, आरंभ, सुरवात.
बोहिरि–वणवा.

## भ.

भंगी–रीति, प्रकार.
भराडा–पूजक.
भरोवरी–साधनातिशय.
भवैचि–भिवयांची, भ्रुकुटीची.
भ्रमक–लोहचुंबक.

भाउँरें-भ्रमणारें.
भाखे-भाषेस.
भांगारें-सोनें.
भांजे-भग्न होई.
भाटिं-निकृष्ट जमीनींत, स्तुतिपाठक.
भाटिव-स्तुति, पराक्रम.
भांडुके-भांडखोर.
भाणें-ताट, पात्र.
भादि-भली गाय.
भाली-शस्त्र विशेष.
भिंगारा-भिंगाचें घर, कंदील.
भिंगोरि-भोंवरा.
भीला-पराङ्मुख.
भुररे-वेड, पिसें.
भुररी-वेड, पिसें.
भूवंगीं-सर्पाचे ठाईं.
भोकसा-सगळें चर्म.
भोजे-संतोष, आवड, सोंग, महत्व.

## म.

मगे-शोधी.
मटंगणे-स्तोत्र, उपहास.
मढ-मठ.
मणिजु-अंडज.
मदवी-वस्त्र विशेष.
मरमारु-प्राणान्त करणारे.
मरुणारुवाचें-मरणाऱ्याचें.
मवणें-मोजणें.
माघुतसाउमे-मागलेंपुढलें.
मांच-आश्रय, अंतराळीं केलेला मार्ग.
माजिरां-मत्त.
माजिवडा-झिवडा-मध्यें.
मांदिएसी-समुदायास, मंडळीस.
मांदुरी-चाबुकस्वार.
मांदोडा-फळांचा घड, बाहुल्य.
मांधति-रजतात, काढतात.
मालातिलें-अंगीकारिलें, आश्रयिलें.
माल्हांत-अंगीकारीत.
माहेवणी-कुलीन, गर्भार.
मिणधी-कपटी.
मिरवणियां-मिरवणुकी, शोभा.
मीकें-संशयानें.
मीतलें-मिळालें.
मुगुतकीं-मोतीं.
मुगुतिबाला-मुक्ति हीच कोणी मुलगी.
मुदी-मुद्रा.
मुल्हारी-मूळ ऊर्फ आमंत्रण घेऊन जाणारे.
मुसिं-ओष्ठ्यांत, पदरांत.
मुसिलें-फसले.
मूंके-मुगवायाचें.
मूग-मौन.
मेचवे-आटोपे, मृदु करवे.
मेचु-प्रीति, आवड.
मेलापकिं-विषयग्राहक, समुदाय.
मेले-लें-योग, संयोग, संयोगानें.
मेलीसी-योगास, संयोगास, एकवटतेस.
मेर-रे-मर्यादा, अवधि ( संस्कृत मीर=मर्यादा ).

मेहो-मेघ.
मोहर-मार्ग, दिशा.

य.

यंते—येणारें.
यावा—आगमन, प्राप्ति.
युगावृत्ति—कृतयुगादींची आवृत्ति.
येकोल—एक वेळ.

र.

रंधन—पाक.
रयणीं—रात्रीं.
राजवळिं—राजाचें हस्ताक्षर, राजमुद्रा.
राजागर—राजांच्या बागा.
रांधवण—स्वयंपाकांतलें पाणी, आचारीण.
राबाउणें—राबाच्या विना.
राविले—रंगविले.
रिगिनिगि—प्रवेशनिर्गम.
रोहो—अंकुर, आरंभ, वाढ.

ल.

लंघे—ओलांडणें, उपवास करणें.
लचकणें—तरळणें, चळणें.
लवंघा—लवंग.
लवलवां—अति त्वरेनें.
लाइलें—हकालिलें.
लांकण—बंधन.
लागां—संबंधीं.
लागु—संबंध.
लाटु—बळकट.
लाठी—दांडगी, मोठी.
लाणें—अवधि, शेवट, प्राप्ति, गोळा करणें.
लांब—भातगोट्याचें रोप.
लांबिजे—लांब उभे टांगणें.
लावणी—गणना, नेमावणी.
लांवा—व्याघ्रस्त्री.
लांसे—चिन्ह.
लाहाणा—प्राप्त होणारा.
लाहालाहात—अत्युत्कंठित.
लुंचिति—वपन करिती, काढिती.
लूंति—लग्रोग.
लेखे—गणनेस.
लेंडिये—अमंगळ ओहळास.
लेप—चित्र, दोष.
लेवे—लेप.
लेसां—बऱ्या बोलानें.
लेहें—चाटी.
लोटी—ढकलणें, दूर करणें, मारणें.
लोथ—मोट.
लोलौनि—लोळून.
लोंवे—लोंकरी.

व.

वंगु—कलंक.
वचवे—जावे.
वंठाऊ—न्यूनत्व.

वडप—वृष्टि.
वत्सनाग—वचनाग.
वन्हिया—इष्ट.
वरिषा—पाऊसाळा.
वरैतु–भर्ता, नवरा, पति.
वरोसी–नित्यकृत्याची सामग्री.
वलसा–वळण, फेरा, भोंवरा.
वलित–छेदनायोग्यता.
वसो–बैल, वसू.
वसोवा–बैलास.
वाउधाण–वादळ.
वाउर–वाईट.
वाउली–पाउलीं.
वाकडिया–पावसाची झड, कडाक्या- [ची थंडी.
वाखाण–व्याख्यान.
वाखाणा–व्याख्यानां.
वागतृता–वक्तृत्व.
वागौरा–वाखदोर.
वाजटा–व्यर्थ.
वाटबंधा–वाटमाऱ्या.
वाटवीजे–मार्ग काढते.
वाडजतन–फार तत्परता.
वाडु–फार.
वाडुवडु–महा भयंकर.
वाणसिये–वेश्येचे.
वाणि–तोटा, कमीपणा, वाचा.
वाति–दिवा.
वाधावा–येतें चिन्ह, पूर्वसूचना, वार्ता.
वानी–कस, मासला.
वायप्रसंगें–अनुद्दिष्ट प्रसंगानें.
वायें–वाहणें, दाखवणें.
वार्तेवरिल–दोरावरील.
वालभ–वात्सल्य.
वाला–वजन विशेष.



वाली–त्यागी, टाकी.
वालें–कृष होई.
वाल्हें दुल्हें–अति प्रीतीचें, अपूर्व.
वावंदणे–दगड, खडक.
वावाटें–ओहोटे.
वासिपैल–वचकेल.
वासिपो–वचकूं, भिऊं.
वास्ति–रहाण्याचें ठिकाण.
वाहाणधर–जोडे उचलणार.
वाहाती–मळलेली.
विकणु–फोल.
विकिरा–विक्री.
विखाभरणें–विषयांचे अलंकार.
विटंकु–मोठे, घनदाट, निबिड.
विटाळें–दोष.
विडा–तांबुल.
विडालु–दोष.
विदल–द्विजातीय, डांक.
विंदाण–कौशल्य, कळसूत्र.
विंदाणिये–कुशल.
विधुले–विसकटे, नाश पावे.
विन्यासाते–प्रतिपादनास, निरूपणास.
विपाऊ–कादाचित्कत्व.
विभांडी–पराभवी, फोडी,
विभुटणी–वियोग.
विरगति–विरक्ति.
विरंगुला–अडथळा.
विवलतिये–प्रकाशणाऱ्या.
विवसी–डाकीण, भूत.
विशेकु–ज्ञान.
विसंवणें–विश्रांति पावणें.
विहिं–विधींत.
वीति–उत्पन्न करतात, प्रसवतात.
वृत्तिकां–वतनदार.

वेख-वेष.
वेखजें-व्यवहार.
वेखासें-विरुद्ध.
वेगल-भिन्न, निरनिराळे.
वेगु-त्वरा.
वेचिं-खर्चांत, क्षयांत.
वेझ-सुईचा डोळा, भोंक.
वेझिला-वेढिला.
वेंटालु-गोळा.
वेटालों-गळा करतां.
वेंठ-पेठ.
वेठला-वेष्टला.
वेंठावें-वेष्टावें, आछादावें.
वेलरिया-वेली.
वेलाउल-लतामंडप, धूर.
वेलांडी-विस्तार.
वेलाभेड-समुद्राच्या लाटांना भिणारा.
वेव्हारु-व्यवहार.
वेव्हारे-व्यापारी.
वोइरणा-आडवेपण.
वोइरिलें-आडवें झालें.
वोइरी-आडवी.
वोउसेयाचेया-व्रत करणाऱ्याच्या.
वोखती-चिंता.
वोज-रीति, चांगुलपण, प्रभा.
वोजावी-रीति दाखवी, शिकवी.
वोडण-ढाल.
वोडौ-आदर.
वोढालाचा-उनाडाचा.
वोढालिवा-चोरी करणाऱ्या.
वोथंबा-गवंड्यांचा लंबक,आश्रयस्तंभ
वोरकली-सोनें कसायाचा पाषाण.
वोरकळू-सोनें कसायाचा पाषाण.
वोरसें-पान्हा, प्रीति.
वोलाटे-ओल्या जमिनी.
वोली-गहाण.
वोवांडे-उलटे, ओलांडे, पडे.
वोवी-बंध.
वोसें-मिथ्यात्व, न्यूनता.
वोह-कांस, आंचळ.
वौसें-व्रत.
व्यंजे-व्यक्त होतें.
व्यामिजे-उद्योगीं लावणें.

### श.

शराव-परळ.
शाड्वलु-हिरवेंगार.
शालिका-स्थान, भूमि.
शिवमुष्टिगंडु-आभिमानाचा पण, पैज.
शोच्यते-दैन्यास.
शोधारिलीं-शुद्ध केलीं.
श्रीमाडु-संपत्तीचा मद.

### स.

सकलव-मिश्रित.
सकु-सत्ता.
सकुडि-सशरीर.
सचकु-संग्रही.
सणाणें-तीक्ष्ण.
सत्राण-बळकट.
सदटे-सदृढ, बळकट.
संदु-छंद.
संदे-छंदानें.
संपजति-संप्रद्यमान होतात.
सपाई-संपूर्ण.
सपोल-व्यर्थ, निष्फळ.
सबडबुडी-गुडुप.
समूठ-संपूर्ण.

